# ऐतिहासिक फार्सी साहित्य
## सहावा खंड

### औरंगजेबाच्या दरबाराचे अखबार

भारत इतिहास संशोधक मंडळ स्वीय ग्रंथमाला क्र. १०६

# ऐतिहासिक फार्सी साहित्य
# सहावा खंड

## औरंगजेबाच्या दरबाराचे अखबार

संपादक

**प्रा. गणेश हरी खरे**

५३ पुस्तक-पुस्तिका व ३६० लेख यांचे लेखक;
पुणें विद्यापीठांत मराठी इतिहासाच्या
पदव्युत्तर संशोधनाचे अधिकृत मार्गदर्शक अध्यापक.

सहसंपादक

**डॉ. गोविंद त्र्यंबक कुळकर्णी**

एम्. ए., पीएच्. डी.

मूल्य १५ रुपये

श. १८९४] रा. श. २९९ [इ. १९७२

या ग्रंथाची निर्मिति व प्रकाशन यांसाठीं

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ,

पुणें, शिवाजी व मराठवाडा विद्यापीठें,

विद्यापीठ अनुदान मंडळ आणि

श्री. वि. द. घाटे

यांनीं अनुदान दिलें आहे.

# प्रस्तावना

या ग्रंथाचें नांव औरंगजेबाच्या दरबाराचे अखबार असें आहे. अखबार हा शद्व खबर या अरबी शद्वाचें बहुवचन आहे. खबर म्हणजे बातमी. अर्थात् अखबार म्हणजे बातम्या. पुढें या बातम्या ज्या कागदावर लिहीत त्यासच अखबार म्हणूं लागले. हे अखबार किमान दोन प्रकारचे आहेत. एक व्यक्तीनें लिहिलेले व दुसरे दरबारांत तयार झालेले. येथें प्रकाशित होत असलेले अखबार दुसऱ्या प्रकारचे आहेत. मुघल बादशाह रोज दरबारांत किंवा खाजगींत जें काम करी तें या अखबारांत नोंदीत. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें किंवा इतर कोणत्याही कारणानें दरबार झाला नाहीं किंवा त्यांत नमूद करण्यासारखें कांहीं घडलें नाहीं तर तसें लिहून त्या अखबाराच्या कागदाचा पुढील भाग कोरा ठेवीत. म्हणजे अखबाराच्या प्रत्येक कागदावर किमान अखबार कुणाच्या दरबाराचा, त्या दिवसाची तारीख, महिना, जुलूस वर्ष आणि विकल्पानें वार एवढा अंश व वरील नोंद निश्चयानें आहेतच. दरबारांत कांहीं झालें असल्यास तें नोंदून झाल्यावर तो अखबार बादशाह आपल्या दृष्टीखालीं घाली किंवा त्यास वाचून दाखविण्यांत येई, त्यांत त्याला कांहीं उणें-अधिक करावेंसें वाटलें तर तसें करणें किंवा बादशाहाच्या अप्रतिष्ठेचा कांहीं मजकूर आढळला तर तो काढून टाकणें इत्यादि संस्कार केल्यानंतर तो सर्वांसाठीं खुला होई. मग दरबारी लोक आपापल्या आवश्यकतेप्रमाणें त्याच्या नकला करून घेत आणि आपल्या मालकाकडे पाठवीत. जयपूरच्या घराण्याचा एक प्रतिनिधि कायमचा मुघल बादशाहाच्या दरबारांत असे. त्यानें करविलेल्या अखबारांच्या नकला जयपूरच्या लेख्यशालेंत होत्या. जयपूर संस्थानची पहिली राजधानी आंबेर येथें होती. सवाई जयसिंहानें जयपूर शहर उभारल्यावर राजधानी जयपूर येथें हलविण्यांत आली. पण ह्यामुळें जयपूरच्या लेख्यशालेचे दोन भाग झाले. एक भाग आंबेर येथें राहिला व दुसरा जयपूर येथें तयार झाला.

२) जयपूर येथील लेख्यशालेंत अखबार इतर कागदपत्रांप्रमाणें ठेवले होते. पण आंबेर येथील कागदपत्र वाळवी, कसर इत्यादींनीं खाऊं नयेत म्हणून एक थर कडूलिंबाच्या पानांच्या राखेचा व त्यावर एक थर कागदांचा, त्यावर पुनः राखेचा थर व त्यावर कागदांचा थर अशा पद्धतीनें ठेवलेले होते. परंतु वाळवी व कसर यांपुढें राखेची मात्रा न चालून शेकडों कागद उण्याअधिक प्रमाणांत खाल्लेले सांपडले. त्या अवस्थेंत अखबारही मिळाले.

जयपूरची लेख्यशाला संस्थानांच्या विलीनीकरणानंतर बिकानेरला हलविण्यांत आली व तेथें इतर संस्थानिकांचे कागदपत्रही जमविण्यांत आले. त्याचबरोबर आंबेरचे कागदपत्रही बिकानेरला नेले. हे कागदपत्र बिकानेरला नेण्यापूर्वी कांहीं कागदांचें वर्गीकरण झालें होतें; कांहींचें बिकानेरला झालें; कांहींचें वर्गीकरण अद्यापही संपलेलें नाहीं. तरीही नवीन कागदांची आवक चालूच आहे. ज्यांचें वर्गीकरण व कालानुक्रमें लावणें झालें आहे त्यांत अखबार, वकीलवृत्तांत, फर्मानें, निशानें इत्यादि प्रकारचे कागद मोडतात. आतां अखबार वर्ष, महिना व तारीख यांच्या अनुक्रमानें लावून ठेवले आहेत व त्यांचा जीर्णोद्धारही झाला आहे.

३) जयपूरच्या राजघराण्याचा मुघलांशीं अकबरापासून मांडलीक व नातेवाईक ह्या दोन प्रकारांनीं संबंध आला. अकबराच्या कारकिर्दीत मुघल राज्याला स्थिरता लाभल्यावर अखबार लिहिण्याची पद्धत प्रचारांत आली. तथापि अकबर व जहांगीर यांच्या वेळचे दरबारी अखबार मला अद्याप पहावयास मिळालेले नाहींत. शाहजहानच्या कारकिर्दीचेहि खास दरबारी अखबार मी पाहिलेले नाहींत. पण दुय्यम तिय्यम दर्जाच्या कार्यालयांचे कांहीं अखबार हैद्राबादेच्या दफ्तर-इ-दीवानी (आतां केंद्रीय अभिलेखागारा)नें 'सिलेक्टेड डॉक्युमेंट्स ऑफ शाहजहान्स रेन' (प्रकाशनकाल इ. १९५०) या नावानें छापिले आहेत. अशा कांहीं अखबारांतील उतारे 'न्यूज लेटर्स ऑफ दि मुघल कोर्ट' (संपादक प्रा. भ. द. वर्मा) या नांवानें मुंबई सरकारनें प्रकाशिले आहेत (इ. १९४९). यापुढील कांहीं शासकीय, कांहीं संस्थानिकांचे, तर आणखी कांहीं खाजगी वृत्तसंस्थांकडील अखबार मुंबई सरकारनें पेशवे दफ्तर मालेंत 'मिसलेनिअस् पेपर्स' या नावाखालीं (संपादक डॉ. एम. नाझिम) प्रकाशिले आहेत (इ. १९३३). मी संपादिलेल्या 'ऐतिहासिक फार्सी साहित्य खंड २ व ५' यांमध्यें असेच चव्वेचाळीस अखबार (भा. इ. सं. मंडळ प्रकाशनें इ. १९३७, १९६१ व १९६९) प्रकाशिले आहेत. अशाच प्रकारचे सुमारें १०० अखबार डॉ. परमात्म शरण यांनीं संपादिलेल्या व दिल्ली विद्यापीठानें पुरस्कारिलेल्या 'पर्शियन डॉक्युमेंटस् पार्ट १' यामध्यें प्रकाशिले आहेत.

४) औरंगजेबाच्या कारकिर्दीतील खास त्याच्या दरबारचे व त्याच्या प्रतिनिधीच्या दरबारचे अखबार उपलब्ध आहेत तसे त्याच्या मागून मुघली गादीवर बसलेल्यांपैकीं अहमदशाह (इ. १७४८-५४) पर्यंतचे दरबारी अखबार उपलब्ध आहेत. प्रस्तुत खंडांत मात्र औरंगजेबाच्या दरबारचे अखबारांपैकीं पहिल्या २८ वर्षांचे अखबार अर्थात् त्यांतील उतारे संग्रहीत केले आहेत.

औरंगजेबानें सुमारें २१६४० दिवस राज्य केलें. प्रत्येक दिवसाचा एक अखबार ह्या हिशेबानें २१६४० अखबार मूलतः तयार झाले असतील व असावयास पाहिजेत. पण उपलब्ध असलेल्या अखबारांची संख्या सुमारें ६४६३ एवढीच आहे. हे अखबार दोन ठिकाणीं विभागले गेले आहेत. एक भाग प्रथम आंबेर–जयपूर येथें होता तो राजस्थान राज्याची बिकानेर येथें स्वतंत्र लेख्यशाला स्थापन झाल्यावर तेथें हलविण्यांत आला. दुसरा भाग लंडनच्या रॉयल एशियाटिक सोसायटीमध्यें आहे. दुसऱ्या भागांत असलेले अखबार कर्नल टॉडनें तो त्या संस्थेचा ग्रंथपाल असतां त्या संस्थेस इ. १८२९ सालीं इतर कांहीं हस्तलिखितांसह प्रदान केले आहेत. हे अखबार टॉडला कसे, केव्हां व कोणाकडून मिळाले याची माहिती मला अद्याप मिळालेली नाहीं. पण असें दिसतें कीं, औरंगजेबाच्या काळांतील जेवढे अखबार (३१५९) बिकानेरास आहेत त्यांपेक्षा थोडे अधिक लंडनमधील संस्थेंत (३३०४) आहेत आणि हे अखबार सामान्यत: एकमेकांस पूरक आहेत. म्हणजे ज्या तारखांचे अखबार बिकानेरास आहेत त्या तारखांचे अखबार वरील संस्थेंत नाहींत; जे वरील संस्थेंत आहेत ते बिकानेर येथें नाहींत. सामान्यत: म्हणण्याचें कारण एवढेंच कीं, कांहीं अखबार थोड्या शब्दभेदानें दोन्हीकडे सांपडतात.

५) जयपुरास अखबारांचा एक भाग आहे हें तुलनेनें बरेंच अलीकडे ठाऊक झालें असलें तरी लंडनमध्यें रॉयल एशियाटिक सोसायटीमध्यें औरंगजेबाचे अखबार असल्याची माहिती दीडशे वर्षांइतकी जुनी आहे. इ. १८५४ मध्यें प्रकाशित झालेल्या, डब्ल्यू. एच्. मोर्ले यांनीं रचलेल्या आणि त्या संस्थेंत असलेल्या अरबी व फार्सी या भाषांमधील ऐतिहासिक हस्तलिखितांच्या बृहत्-सूचीमध्यें या कागदांचा निर्देश आहे. इ. १९०८–९ सालीं श्री. करकारिया यांनीं बातमीपत्रांवर लिहिलेल्या एका लेखांत या कागदांचा उल्लेख केला आहे. पुढें सर जदुनाथ सरकार यांनीं लिहिलेल्या औरंगजेबाच्या पंचखंडात्मक इतिहासांत या अखबारांचा उपयोग केलेला आहे (शेवटचा खंड इ. १९२४ सुमार). तथापि या वेळपर्यंत कै. सरकारांस किंवा आणखी कोणा इतिहासाभ्यासी मनुष्यास जयपूर येथें असलेले अखबार पहावयास मिळाले नाहींत. श्री. मोर्लंड यांनीं लिहिलेल्या इंडिया ॲट दि डेथ ऑफ अकबर आणि ॲग्रेरियन सिस्टिम ऑफ दि मुघल्स या आपल्या दोन्ही पुस्तकांत जयपूरच्या लेख्यशालेंतील फर्मानादि कांहीं कागदांचा उपयोग केला असला तरी त्यांचें त्या लेख्यशालेंत असलेल्या अखबारांकडे लक्ष गेलें होतें असें दिसत नाहीं. नंतर

कित्येक वर्षें जयपूर येथील लेख्यशालेंतील कागदपत्रांकडे कोणी विशेष लक्ष दिलें नव्हतें. परंतु सुमारें ३० वर्षांपूर्वी सर जदुनाथ सरकार यांजकडे जयपूरच्या महाराजांनीं आपल्या घराण्याचा इतिहास लिहिण्याचें काम सोपविलें तेव्हां त्यांनीं जयपूरच्या लेख्यशालेंत असलेल्या ऐतिहासिक कागदपत्रांची पहाणी करूं देण्याची आणि आवश्यक त्या कागदपत्रांच्या नकला पुरविण्याची अट घातली. या अटीप्रमाणें त्यांनीं जयपूर लेख्यशालेंतील हजारो कागदांची पहाणी केली व आवश्यक त्या कागदांच्या नकला मिळविल्या. कै. सरकारांनीं या अगोदरच इंग्लंडमध्यें असलेल्या अखबारांच्या नकला मिळविल्या होत्या आणि आतां जयपूरच्या लेख्यशालेंत असलेल्या फर्मानें, अखबार, इत्यादींच्या नकला संपादिल्या. पण ते येवढ्यावरच थांबून राहिले नव्हते. त्यांनीं शेकडो ठिकाणीं असलेलीं फार्सी कागदपत्रें व हस्तलिखितें यांच्या नकला मिळविण्याचा प्रयत्न केला. अशा तऱ्हेनें त्यांजकडे जमलेला हस्तलिखितांचा सर्व संग्रह त्यांच्या पश्चात् त्यांच्या वारसांनीं कलकत्त्याच्या राष्ट्रीय ग्रंथालयास देऊन टाकला. कै. सरकारांचा हा सर्व संग्रह मी कलकत्त्यास गेलों असतां बारकाईनें पाहिला. तेव्हां मला असें आढळून आलें कीं, त्यांनीं मिळविलेल्या नकला विविध काळीं निरनिराळ्या लेखकांकडून करवून घेतल्या असल्यामुळें लेखनाच्या व शुद्धतेच्या दृष्टीनें एकसारख्या नाहींत. त्यांमध्यें उणी–अधिक अशुद्धें आहेत.

६) कै. सरकार यांचे एक शिष्य सितामऊचे डॉ. राजकुमार रघुवीरसिंह यांनीं जदुनाथ सरकारांच्या या सर्व नकलांची आपल्या मुन्शीकरवी एक यथादृष्ट नकल करून घेतली व ती आपल्या संग्रहांत नीट लावून ठेवली आहे. या नकलेंत मूळ जदुनाथ सरकारांच्या नकलांमध्ये असलेले शोध व समासांमधील शेरेही उतरून घेतले आहेत. शिवाय हें सर्व लिखाण प्रायः एक टाकी व चांगल्या कागदावर सुवाच्य अक्षरांनीं लिहिलें गेलें असल्यामुळें जदुनाथांच्या नकलांपेक्षां सितामऊ येथील नकला अधिक उपयुक्त ठरत आहेत.

७) मी मागें सांगितलेंच आहे कीं, हे अखबार मूळ दरबारांत प्रकट केलेल्या अखबारांच्या जयपूरच्या सेवकांनीं केलेल्या नकला आहेत. सरकारांच्या संग्रहांतील नकला मूळ नकल प्रतीच्या नकला आहेत. म्हणजे त्या ठिकाणीं तिसरें हस्तांतर झालें. सितामऊच्या नकला हें चौथें हस्तांतर आहे. अशीं हस्तांतरें होत असतां प्रतिकारांच्या हातून भाषेचें अज्ञान, इतिहासाचें अज्ञान, आणि स्थलकालांचें अज्ञान यामुळें विविध चुका झाल्या आहेत. म्हणून हें पुस्तक तयार करतांना अखबारांच्या जयपूर येथील नकलांचा मी, माझे सहकारी

श्री. देवीसिंग चौहान, डॉ. गो. त्र्यं. कुलकर्णी व डॉ. कुमारी इंदर कौर यांचें सहाय्य घेऊन अभ्यास केला व आवश्यक त्या भागांच्या नकला करून आणल्या. तसेंच लंडनच्या संस्थेंत असलेल्या अखबारांची मायक्रो फिल्म डॉ. अ. रा. कुलकर्णी यांच्या साह्यानें मिळवून शक्य तेथें तिच्या सहाय्यानें येथील संपादनाचें काम उरकलें आहे.

८) कै. सरकारांना जयपूर येथील अखबार जरी फार लवकर पहावयास मिळाले तरी ते आपल्या तद्नंतरच्या लेखनांत या अखबारादि कागदपत्रांचा पाहिजे तसा उपयोग करूं शकले नाहींत आणि जयपूर येथील कागदपत्र सर्व सामान्य संशोधकाला अप्राप्य असेच राहिले. हे कागदपत्र पहावयाला मिळावे यासाठीं मी कसकसा प्रयत्न केला हेंही येथें संक्षेपानें नमूद करण्यास हरकत नाहीं. इ. १९४८च्या फेब्रुवारींत इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्डस् कमिशनच्या बैठकीसाठीं मी जयपूर येथें गेलों असतां तेथील प्रदर्शनांत मांडलेले कांहीं फार्सी व राजस्थानी कागद बारकाईनें पहाण्याचा मी प्रयत्न केला. पण अशी पहाणी कोणास करूं द्यावयाची नाहीं असा तेथील नोकरांना आदेश असल्यामुळें तेथील नोकरांनीं कागदांविषयीं कांहीं गोंधळ झाल्याची भुमका उठवून मला व इतरांना ते कागद नीट तपासूं दिले नाहींत. तथापि माझी जिज्ञासा अधिक वाढल्यानें तेथल्या लेख्यशालेंतील कागद पहावयास मिळावे म्हणून मी व म. म. पोतदार या दोघांनीं एक निकराचा प्रयत्न केला. पण एक दिवसभराच्या हेलपाटयानंतर त्या वेळच्या 'मिनिस्टर इन् वेटिंग'नें आम्हांस सांगून टाकलें कीं, 'महाराजांच्या परवानगीशिवाय कागद कोणाला दाखवितां येत नाहींत आणि महाराज तर आजच १५ दिवसांच्या दौऱ्यासाठीं युरोपांत निघून गेले. तेव्हां तुम्हांस कागद पहावयाचे असतील तर महाराज आल्यानंतर यावें किंवा तोंवर येथेंच थांबावें.' अशा तऱ्हेनें आमच्या तोंडास पानें पुसलीं गेलीं आणि आमचा दोघांचा तो प्रयत्न फुकट गेला. तरीही मी लेख्यशालेंतील कागदपत्र पहावयाचा प्रयत्न अजिबात सोडला नाहीं. वर दिलेला प्रयत्न फुकट गेल्यानंतर त्याच्या दुसरेच दिवशीं मी व्यक्तिशः एखाद्या अपरिचित गृहस्थाप्रमाणें लेख्यशालेमध्यें गेलों आणि तेथील विशिष्ट पगडी व जूते घालण्याचा आवश्यक तो उपचार उरकल्यावर एक सेवक मला तेथील अधिकारी पं. रामचंद्र जोशी यांजकडे घेऊन गेला. मी त्यांना माझा कागद पहाण्याचा हेतू सांगितला. त्यांनीं मला एक सेवक बरोबर देऊन लेख्यशालेंत सर्वत्र हिंडून येण्याची परवानगी दिली. त्याप्रमाणें हिंडून आल्यावर मी त्यांना

तेथील फर्मानादि फार्सी कागद दाखविण्याविषयीं विनंती केली. त्यांनीं दुसरे दिवशीं येण्यास सांगितलें. तदनुसार मी दुसरे दिवशीं गेल्यावर त्यांनीं आपल्या हाताखालच्या एका अधिकाऱ्यास फर्मानादि फार्सी कागद दाखविण्यास सांगितलें. तो थोडा वेळ स्तब्ध उभा राहून नंतर पं. रामचंद्र जोशींना म्हणाला, 'आप इनको फार्सी कागजात बताने के लिए कहते हो, किन्तु आपको ज्ञात है कि, सिवा महाराज साहबकी इजाजत आप किसीको कागजात नहीं बता सकते'. त्यावर पं. रामचंद्र जोशी यांनीं त्या सेवकास 'इनको बता दे तो सही' म्हणून हुकूम केला. तेव्हा तो सेवक मला ज्याच्या ताब्यांत ते फार्सी कागद होते, त्या मुसलमान मुन्शीकडे घेऊन गेला. त्यानें वरील प्रमाणेंच आक्षेप घेतला; पण कागद दाखविण्यास सुरुवात केली. मी त्यांपैकीं एक फर्मान वाचूं लागताच तो माझ्यावर खेकसून म्हणाला, 'आपको कागज खाली बतानेका आदेश है। आपको पढनेकी इजाजत नहीं है। अगर आप पढोगे तो मैं कागज बतानेका काम बंद कर दूँगा'। तेव्हां मी कागद पहाण्यावरच समाधान मानलें आणि तेथून परत फिरलों. नंतर मला वाटतें इ. १९४९ मध्यें कै. न. वि. गाडगीळ हे केंद्रामध्यें मंत्री असतांना त्यांना विनंती करून या दप्तरखान्यांतील कागदपत्र पहावयास, तपासावयास व नकला घ्यावयास परवानगी मिळविली होती. पण मंडळाच्या दरिद्री अवस्थेमुळें मला त्या संधीचा उपयोग करून घेतां आला नाहीं

९) पुढें १९५१ मध्यें जयपूर येथें भारतीय इतिहास परिषदेच्या अधिवेशनास गेलों असतां तेंथील एक श्रीमान गृहस्थ श्री. दुग्गड यांनीं जयपूरच्या लेख्यशालेंतील कागदांच्या प्रकाशनासाठीं ५००० रुपयांची देणगी जाहीर केली. अर्थात् तेथील कागद पहावयास मिळण्याचा संभव अधिक वाढूं लागला. त्याचा फायदा घेऊन इ. १९५४ मध्ये मी माझे तेथील एक परिचित श्री. सत्यप्रकाश श्रीवास्तव यांजकडे पत्र पाठवून कित्येक हिंदी पत्रांच्या नकला मागितल्या. त्याप्रमाणें त्यांनीं मजकडे सहा हिंदी पत्रांच्या नकला पाठवून दिल्या. त्या नकला मी भा. इ. सं. मंडळ त्रैमासिक, चाळिसावें वर्ष, पृष्ठ ४४ ते ५२ यांत प्रसिद्ध केल्या आहेत. साधारणतः या व इतर कांहीं कागदांच्या नकला कै. सरकार यांना मिळाल्या होत्या. त्यांपैकीं कांहींचा व मला मिळालेल्या नकलांपैकीं एक सोडून उरलेल्यांचा इंग्रजी सारांश त्यांनीं आपल्या 'हाउस ऑफ शिवाजी' या पुस्तकांत इ. १९३९ मध्येंच प्रसिद्ध केला. अर्थात् यांच्या नकला यापूर्वीच केव्हां तरी त्यांना मिळाल्या असल्या पाहिजेत.

१०) पुढें लौकरच सर्व संस्थानें राजस्थान या एका राज्यांत विलीन

झाल्यानंतर जयपूरच्या महाराजांनीं लेख्यशालेंतील बहुतेक कागद राजस्थानाच्या अभिलेखागाराकडे सुपुर्द केले. याच सुमारास या लेख्यशालेंतील कागद-पत्रांची तपशीलवार माहिती देणारा एक लेख तेथील एक सेवक मुरारीलाल माथूर यांनीं 'इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स कमिशन' पुढें वाचला. तो इ. १९५८च्या त्रिवेंद्रम् अधिवेशनाच्या इतिवृत्तांत प्रसिद्ध झाला आहे. पुढें इ. १९६० च्या फेब्रुवारींत मी दिल्लींतील या कमिशनची बैठक आटोपून जयपूरला गेलों होतों तेव्हां संस्थानें विलीन होण्याचा कार्यक्रम पूर्ण होऊन जयपूर व इतर ठिकाणच्या लेख्यशाला नव्या राजस्थान सरकारच्या अधिकाराखालीं आल्या होत्या आणि त्यांवर कै. प्रा. खड्गावत यांची नेमणूक झाली होती. या वेळीं पूर्वीचा मनू पार बदलून जाऊन या लेख्यशालेंतील कागदपत्र पहाण्याची सर्वांना मोकळीक मिळाली होती. त्याप्रमाणें माझ्या तेथील २–३ दिवसांच्या वास्तव्यांत मला जें कागद पहाणें शक्य होतें ते सर्व कागद मी पाहिले. त्यामुळें मला तेथील कागदांची संख्या व महत्व यांविषयीं अधिक कल्पना आली. तरीहि तेथील कागद तपासण्याची संधी श. १८८६ (१९६५) पर्यंत मला मिळाली नाहीं. त्या वर्षीं महाराष्ट्र राज्याच्या पुराभिलेख व पुरातत्त्व खात्याचे संचालक डॉ. पु. म. जोशी यांनीं सांगितल्यावरून मी व त्यांचे एक सहाय्यक श्री. खोबरेकर बिकानेरास गेलों, तेथें तीन दिवस राहिलों आणि तेथील कागदांची अधिक वास्तव माहिती करून घेतली. या माहितीमुळें तेथील कागदपत्र तपासणें व त्यांतील मराठी इतिहासाला उपयुक्त असे उतारे काढणें अगदीं आवश्यक आहे हें ध्यानांत घेऊन त्याच वर्षी (श. १८८७, इ. १९६५) मध्यें मी, माझी विद्यार्थिनी कु. इंदर कौर, माझे मित्र श्री. बाबा पुरंदरे व डॉ. अ. रा. कुलकर्णी असे चौघे बिकानेर येथें गेलों. तेथें सुमारें आठ दिवस राहून मी व इंदर कौर यांनीं फार्सी फर्मानें, निशानें व इतर कागद तपासले आणि महत्वाच्या कागदांच्या नकला करून आणल्या. या वेळीं श्री. पुरंदरे व डॉ. कुलकर्णी यांनीं हिन्दी पत्रांबाबत हेंच काम केलें. पुढें याच वर्षीं (श. १८८७, इ. १९६६ मध्यें) मी आणि माझे विद्यार्थी-विद्यार्थिनी श्री. गो. त्र्यं. कुलकर्णी व कु. इंदर कौर असे तिघे व श. १८८८ (इ. १९६६) मध्यें (४) मी, माझे विद्यार्थी श्री. गो. त्र्यं. कुलकर्णी व माझे मित्र श्री. देवीसिंह चौहान आणि श्री. श्री. म. जोशी व एकदां (५) मी एकटा तेथें गेलों आणि शेवटीं १९६८ च्या अगदीं आरंभीं (६) मी व श्री. गो. त्र्यं. कुलकर्णी असे दोघे बिकानेरास गेलों. या सर्व खेपांत आमचे सुमारें तीन महिने बिकानेरास रहाणें घडलें. इतक्या लांबच्या ठिकाणीं जाऊन फार दिवस रहाणें शक्य नसल्यानें आम्ही तेथील

लेख्यशालेंत शक्य तितका अधिक वेळ बसत असूं. एकदोन खेपेस तर आमचें दुपारचें जेवणही तेथेंच मागवत असूं. त्या लेख्यशालेचा संशोधनकक्ष सकाळीं आठ ते सायंकाळीं आठपर्यंत उघडा रहात असल्यामुळें त्याचा फायदा घेऊन आम्ही साप्ताहिक सुटी न घेतां रोजीं सुमारें ११ तास काम केलें. खुर्चीवर पाय खालीं सोडून इतका वेळ बसावें लागल्यानें श्री. चौहान यांचे पाय सुजूं लागले. यावरून कामाची कांहीं कल्पना येईल. या अवधींत सुमारें १३०० उतारे आम्ही नकलून काढले. हें काम करीत असतां असें लक्षांत आलें कीं, बिकानेरच्या लेख्यशालेंत जेवढे अखबार आहेत प्रायः तेवढेच अखबार लंडनच्या रॉयल एशियाटिक सोसायटींत आहेत. आणि त्यांच्या नकला कलकत्ता व सितामऊ येथें आहेत. त्या नकला तपासून त्यांतीलही उतारे काढून आणावेत या उद्देशानें श. १८८९ (इ. १९६७) मध्यें मी, डॉ. गो. त्र्य. कुलकर्णी व श्री. देवीसिंह चौहान असे तिघे मिळून सितामऊस गेलो तेथें ४–५ दिवस राहिलों आणि इंग्लंडमधील अखबारांच्या नकला तपासून त्यांतील औरंगजेबाच्या जुलूस २५ पर्यंतच्या अखबारांतील उपयुक्त उतारे नकलून आणले. शिवाय डॉ. अ. रा. कुलकर्णी इंग्लडमध्यें गेले असतां त्यांच्या साह्यानें रॉ. ए. सोसायटीमधील औरंगजेबकलीन अखबारांची मायक्रो फिल्म आणविली. या सर्व प्रयत्नांमुळें सध्या मंडळापाशीं बिकानेर येथील औरंगजेबाच्या अखेर-पर्यंतच्या अखबारांतील मराठी इतिहासाला उपयुक्त असे सर्व उतारे, तसेंच फर्मानादि कागदांच्या पूर्ण नकला, वकीलवृत्तांतामधील मराठी इतिहासास उपयुक्त असे उतारे आणि लंडनमधील अखबारांची मायक्रो फिल्म एवढी सामग्री आज एकत्रित झाली आहे.

११) हे सर्व उतारे येथें आणल्यानंतर ते कालानुक्रमानें लावणें, त्यांमध्यें इंग्लंडमधील उताऱ्यांची योग्य ठिकाणीं भर घालणें, प्रत्येक उताऱ्याचा अनुवाद करणें, त्यांच्या तारखा काढणें, त्यांची मुद्रणप्रत तयार करणें, त्यांचीं प्रुफें तपासणें इत्यादि कामें मी व माझे पूर्वीचे विद्यार्थी व आतांचे मित्र डॉ. गो. त्र्यं. कुलकर्णी यांनीं केलें आहे. त्यांतल्या त्यांत अनुवादाचे काम मुख्यतः डॉ. कुलकर्णी यांनींच केलें आहे. हें सर्व करीत असतां मुख्य उत्तरदायित्व माझें असल्यामुळें यांत झालेल्या चुकांचा मुख्य दोषही मजवरच आहे.

१२) या पुस्तकांतील पहिलीं १९२ पृष्ठें पुण्यांतील आर्यभूषण छापखान्यांत छापलीं. पण त्यांचा अशा छपाईंतील मांड लहान; यामुळें हें काम रेंगाळणार असें दिसूं लागलें. म्हणून उरलेलें काम मुंबईस करून घ्यावें असें ठरविलें. पण तेथेंही

कांहींना कांहीं अडचणी येऊन काम कांहीं लांबलेंसेंच. दोन ठिकाणीं छपाईचें काम केल्यामुळें फार्सी व मराठी टाईपांमध्यें कांहीं फरक झाला. पण तसें होणें अपरिहार्यच होतें. ग्राहक याबद्दल क्षमा करतील अशी आशा आहे. या कामीं भा. इ. सं. मंडळाचे एक अभिमानी सदस्य श्री. बापूराव नायक यांचे फार मोठें साह्य झालें आहे.

१३) आतां या प्रयत्नाची आर्थिक बाजू सांगतों. या कामासाठीं पुणें विद्यापीठ प्रथम १२०० रुपये, मराठवाडा विद्यापीठ ६०० रु., शिवाजी विद्यापीठ ६०० रुपये, श्री. वि. द. घाटे ५०० रुपये, विद्यापीठ अनुदान मंडळ १००० रुपये आणि महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ यांजकडून ५००० रुपये आले आहेत. शिवाय पुणें विद्यापीठानें बाळाजी बाजीराव कालीन शकावली व बिकानेर कागदपत्र प्रकाशन या दोन योजनांस मिळून दोन वर्षांत बारा हजार रुपये देण्याचें मान्य करुन एका वर्षाचे सहा हजार रुपये दिले. यांतील विद्यापीठ अनुदान मंडळाचे पैसे मायक्रो फिल्मिंगसाठींही खर्च करण्यासारखे असून महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळानें या सामग्रीच्या प्रकाशनाच्या पहिल्या खंडास एकंदर २० हजार रुपये लागतील असें गृहीत धरून १०००० रुपये देणगी देण्याचें मान्य केलें आहे. याशिवाय पुणें विद्यापीठानें दोन वेळां मला यात्रानुदानें दिलीं. तसेंच माझ्या पहिल्या बिकानेर यात्रेचा खर्च महाराष्ट्र राज्य शासनानें केलेला आहे.

१४) हे अखबार नकलांच्या रूपांत आज उपलब्ध आहेत हें वर सांगितलेंच आहे. हस्तांतर व व्यक्तिस्थळनामांचें अज्ञान यांमुळें उत्पन्न झालेल्या दोषांविषयींही वर लिहिलें आहे. पूर्वीच्या नकलकारांना शास्त्रशुद्ध प्रत कशी करावयाची हें माहीत नसल्यानें शुद्धाचें अशुद्ध, अशुद्धाचें शुद्ध, असलेले शब्द गाळणें, नसलेले घालणें, शब्दांचें चुकीचें वाचन करणें, विभक्ति, वचन, काळ, पुरूष यांचा विचार न करतां केलेले प्रयोग इत्यादि अनेकविध दोष या नकलांत शिरले आहेत. शिवाय फार्सी लिपीच्या सदोषत्वामुळेंही या नकलांत कांहीं वैगुण्यें उत्पन्न झालीं आहेत. उणे—अधिक नुक्ते म्हणजेच बिंदू दिल्यानें वर्णबदल होतो, तसे उणे—अधिक शोशे म्हणजेच अकुर्ली काढल्यानें वचन व वर्ण यांत बदल होतो. प्रतिकार या बाबतींत कितीही सावध राहिला तरी त्याच्या हातून चुका न होणें अशक्य आहे. इंग्रजीप्रमाणें फार्सींतही वर्णविन्यासाच्या चुका होतात. यांत छपाईच्या चुका मिळविल्या म्हणजे चुकांची केवढी मोठी मालिका तयार होणें शक्य आहे याचा वाचकांनींच विचार करावा. सांगण्याचें तात्पर्य हें कीं, या पुस्तकांत फार्सी उताऱ्यांचे पाठ देतांना कांहीं चुका झाल्या असल्यास त्यांचीं कारणें लक्षांत यावीं. मी येथें पाठ जसा मिळाला तसा देण्याचा

प्रयत्न केला आहे. जेथें फारच मोठी चूक होण्याचा संभव तेथें पाठ सुधारला आहे. पण अशीं स्थळें फार थोडीं असतील. वचनभेद व पुरुषभेद सहज सुधारतां आले असते; पण तेंही शक्य तोंवर जसेच्या तसेच ठेवले आहेत. एकूण एक चुका स्वतंत्रतेनें दाखवून सुधारत गेलों असतों तर पाठांची लांबी सव्वापट सहज होती; म्हणून तसें केलें नाहीं.

१५) या अखबारांच्या लेखनांत व्याकरणाच्या दृष्टीनें वचन, काळ पुरूष, अर्थ यांच्या बाबत किती तरी दोष आढळतात. यांतील कांही दोष प्रतिकाराच्या हातून झाले असणें शक्य आहे. प्रत करतांना हस्तांतरें जितकी अधिक तितक्या चुका अधिक असा सामान्य नियम समजण्यास हरकत नाहीं. अरबी-फार्सी लिपी उच्चारनिश्चयाच्या दृष्टीनें अतिशय सदोष आहेत. त्यांत स्वर व व्यंजन निर्धारक चिन्हें व बिंदू आहेत. पण त्यांचा उपयोग अतिशय अनियमितपणें करीत असल्यानें मूळ लेखक व त्याचा वर्णविन्यास बाजूला राहून प्रतिकाराची करामत आपल्यापुढें येते. लेखकाच्या मानानें प्रतिकार अधिक विद्वान असें क्वचितच घडलें असेल. प्रतिकार सुवाच्य लेखनासाठीं निवडला जातो. तो बहुधा विद्वान नसतो. यामुळें प्रत करतांना त्याच्या हातून अनेक चुका होतात. तशा येथेंही झाल्या आहेत. त्या सुधारण्याचा खटाटोप येथें केलेला नाहीं.

१६) या पुस्तकांत आलेल्या माहितीवर टीपा देऊन उतारे अधिक बोलके करावे असा विचार होता. पण एकतर याच काळांतील फर्मानादि शासकीय आज्ञा आणि वकिलांनीं आपल्या धन्यांस पाठविलेले वृत्तांत आज अप्रकाशित पण उपलब्ध आहेत. त्यांच्या व इतर प्रकाशित साधनांच्या सहाय्यानें त्या टीपा लिहितों तर त्यांनीं किमान शंभर पृष्ठें सहज व्यापिलीं असतीं. कारण या टीपांत अप्रकाशित कागदपत्रांतील उद्धरणें कालांसह द्यावीं लागलीं असतीं व तीं फार मोठी झाल्यामुळें त्यांनींच पुष्कळ जागा अडविली असती. म्हणून तो विचार सोडून देऊन असा विचार केला कीं, पुढील सातशे उतारे आणखी एका किंवा दीड खंडांमध्यें पुरे करून मग प्रकाशित व क्वचित राहिले असल्यास अप्रकाशित अशा उताऱ्यांच्या माहितीच्या सहाय्यानें सर्वच उतारे सुमारें दोन अडीचशे पानांत बोलके करून हा विषय हातावेगळा करावा. म्हणून येथें हात आखडता घेतला.

श्री. शिवजयंति शक १८९४ फाल्गुन वद्य ३
इ. १९७३ मार्च २१.

ग. ह. खरे
संपादक

# PREFACE

The title of this volume is "News Letters of Aurangzeb's Court" ( औरंगजेबाच्या दरबाराचे अखबार ) and is the sixth volume in the series 'Persian Sources of Indian History'. Akhbar is the plural of the Arabic word Khabar meaning news. Subsequently the piece of paper on which the news was written came to be termed Akhbar. These Akhbars fall into two categories. One is of those drafted by individual news-writers and despatched to the concerned personalities and the other is of those that were drafted by Court news-writers and edited by the ruler of that Court. The news-letters or rather extracts from them published in this volume belong to the second category. It was the custom of Mughal emperors to commit to writing the daily transactions of the Court, edit them and release the same to their courtiers. Sometimes, if due to indisposition or some other cause, no Court was held or no transactions took place in it. The news-letter was kept blank after noting the date, the month, the *Julus* year and sometimes the week day, together with the name of the emperor ruling at that time. After a particular day's business was recorded in the news-letter, the same was submitted to the ruling emperor, who would go through the news-letter and amend it as he chose, deleting derogatory or blasphemous words and adding eulogistic words and phrases, suiting his pomp and grandeur. We, therefore, cannot be too sure of the honest and faithful recording of the happenings entered in such a news-letter. Still we must confess that it is a primary source for the compilation of our history, inspite of the draw-backs of the contents. After the formal release of these news-letters, the courtiers' representatives, used to copy them according to the needs and likings of their masters and send the same to them. But these representatives, or Vakils as they were called, used to despatch, besides these news-letters, reports of the happenings at the Court secretly and many times they contained information which was nearer to the truth. As such the Vakil Reports are more factual, even more important

primary sources than these news-letters; but their number is quite insignificant as compared with the news-letters.

Representatives of different courtiers must have sent the copies of such news-letters and their own reports to their respective masters; but those that were sent by the representatives of the Jaipur chieftain, have come down to us. At least at present we do not know of any other state, which had preserved such news-letters and Vakil Reports. Originally the Jaipur state had more than 6 thousand news-letters of Aurangzeb's period; but some how or other the late Mr. Tod, the wellknown historiographer of Rajasthan acquired about thirty three hundred such news-letters, which he presented to the Royal Asiatic Society, London, when he was serving there as its Librarian. They are now preserved there. About thirty-one hundred remained with the Jaipur State. Out of these again, some were lying at Amber, the earlier capital of the Jaipur State and some were in the new capital Jaipur. All these akhbars are now deposited and preserved in the Rajasthan State Archives, Bikaner.

The existence of these akhbars at Jaipur has come to light comparatively very recently; but those that are in the Royal Asiatic Society were known to scholars, since a very long time. For instance Morley, the earliest cataloguer of the collection of the Royal Asiatic Society had noted them in his catalogue, published in 1854 A.C. The late Sir Jadunath Sarkar and other scholars have utilised them in their works such as, the History of Aurangzeb, and others. But it was in the 4th decade of the present century that the existence of such akhbars in the Jaipur State Archives, came to be known to the scholarly world, when the task of writing the history of Jaipur State was entrusted to the late Sir Jadunath Sarkar. It was he who first ransacked these akhbars and prepared their copies for his own use. He even published the translations or gists of some of these akhbars in the first edition of his book, House of Shivaji, published in 1939. A few other scholars had an access to these akhbars and they have used them sparingly. But in general these akhbars remained sealed to the common scholars. It was only in 1960 when the whole of the Rajasthan State Archives were thrown open, that common scholars began to get access to the akhbars and other records of the various states merged into Rajasthan.

About 25 years ago during the Jaipur session of the Indian Historical Records Commission, I and M. M. D. V. Potdar tried to get an access to these akhbars, farmans and Hindi correspondence; but we failed. Then after some four or five years through the efforts of my friend Shri. Satyaprakash Shrivastava, I could procure copies of a few Hindi letters, the English version of which, had been published by Sir Jadunath Sarkar in his work 'House of Shivaji', and which I have published in the 12th volume of 'Shiva Charitra-Sahitya'—a Mandala publication. In 1965, under the advice of the Govt. of Maharashtra Dr. P. M. Joshi, Director of Archives and Archaeology deputed me and Shri V. G. Khobrekar, an assistant of his, to visit the Rajasthan Archives at Bikaner and examine the archives there in order to have a fair idea of their contents.

Keeping this in mind I paid a second visit to Bikaner with my student Miss Indar Kaur and my friends Dr. A. R. Kulkarni and Shri. B. M. Purandare. We stayed there for a fortnight or so and I with my student copied the Persian farmans, nishans, etc.. My friends did similar work about Hindi Letters. My third visit was in 1966, along with my students Dr. G. T. Kulkarni and Miss Indar Kaur, and my friend Shri Devisingh Chauhan. My next visit was in the same year along the very research students and scholars. In December 1967 I, along with Shri. Devisingh Chauhan and Dr. G. T. Kulkarni visited Sitamau, and copied some extracts from the copies of akhbars in the possession of Maharaj Kumar Dr. Raghubir Sinh especially from those that are in the RAS London. In the beginning of 1968, I and Dr. G. T. Kulkarni visited Bikaner and copied some more extracts. Our total stay at Bikaner was for more than 3 months and we copied about 1300 farmans, nishans and extracts from the Persian akhbars and Vakil reports. We generally worked there eleven hours a day without any holiday. In the meantime through the efforts of my friend Dr. A. R. Kulkarni, we procured a micro-film copy of all the Aurangzeb's akhbars from the RAS London.

After collecting this material, extracts of the akhbar's were arranged in a chronological order. Most of the translation work has been done by Dr. G. T. Kulkarni.

The project has been financed by various learned institutes like Poona University ( Rs. 1200/–and a portion of Rs. 6000/–).

Marathwada and Shivaji Universities (Rs. 600/-each), U. G. C. (Rs. 1000/-) and Maharashtra Rajya Sahitya Sanskriti Mandala (Rs. 5000/-). The last-mentioned body has also promised us in all a donation of Rs. ten thousand or roughly half the cost of bringing out the work. Among the individual donors I must mention the name of Shri V. D. Ghate, who has donated Rs. 500/- for this important project.

While editing the Persian text, I have tried to be faithful with the original copies that were available to us. Where there were quite obvious mistakes, I have ventured to correct them. Otherwise all grammatical and syntactical mistakes have been retained as they are.

The printing of the volume was first entrusted to the Aryabhushan Press, Poona; but finding that their resources were quite limited in this type of work, we had to arrange a portion of the printing in Bombay. The printing of this volume was completed early in 1973. We hope that this will explain to our readers the delay caused in the completion of the project and will excuse us for the same.

Before concluding I must thank firstly all the above-mentioned bodies and persons for providing us with necessary funds; secondly the late-lamented Prof. N. R. Khadgawat, the then Director of the Rajasthan Archives, along with his staff, who not only offered us all possible facilities, but also allowed us to publish the material thus collected; thirdly Dr. Rajkumar Raghubir Sinh for kindly allowing us a free use of his valuable collections; fourthly all my colleagues for working hard with me ungrudingly and lastly Shri B. S. Naik, a member of this institute, for taking interest at every stage and in seeing this volume through the press.

21-3-1973 }

**G. H. Khare,**
*Editor in Chief.*

# ऐतिहासिक फार्सी साहित्य सहावा खंड

## औरंगजेबाच्या दरबाराचे अखबार

### १

| | | |
|---|---|---|
| सितामऊ संग्रह<br>जु. ८ जखर ६ शनि. | اخبارات درگاه معلی<br>ماه جمادی الثانی سنه ۸<br>۶ منهم یوم السبت | श. १५८७ मार्गशीर्ष शुद्ध ८<br>इ. १६६५ डिसेंबर ४ |

میرزا راجه جی سنگه شیر سنگه راتهور را قلعه‌داری پلندرگده
تجویز نموده دوصدی و صد سوار اضافه مقرر ساختند التماس به
درگاه والاجاه نوشته بود حضرت شنیده به جمدة الملک جعفرخان
فرمودند که شما حسب الحکم به مرزا راجه جیسنگه بنویسید سپاه‌گری
شیرسنگه به بودن قلعه‌دار معلوم شده است و شما هم سپاه‌گری
می دانسته باشند از این ممر این را قلعه‌دار پلندرگده
نخواهند کرد پردمن گور که سابق قلعه دار پلندرگده است
همون را برقرارند —

मिर्झा राजा जयसिंगानें शेरसिंग राठोडासाठीं पुरंदरच्या किल्लेदारीची तजवीज करून त्यास २०० जात व १०० स्वार एवढी वाढ देण्याबद्दलची विनंती बादशहाकडे केली होती. ती ऐकून बादशाहानें जाफरखानास हुकूम केला कीं, ‘तू राजा जयसिंगास हस्बुलहुकूम लिही कीं, किल्लेदार होण्याबाबत शेरसिंगाची शिपाईगिरी माहीतच आहे. आणि तुम्हाला शिपाईगिरी काय असते हेंही माहीत आहे. म्हणून त्यास पुरंदरचा किल्लेदार करूं नये. प्रद्युम्न गौड हा पूर्वीं पुरंदरचा किल्लेदार होता. आतां त्यासच नेमीत आहे.’

२

| | | |
|---|---|---|
| सितामऊ संग्रह<br>जु. ८ जखर ७ रवि. | اخبارات درگاه معلے<br>ماه جمادی الثانے سنہ ۸<br>۷ منہم یوم الاحد | श. १५८७ मार्गशीर्ष शुद्ध ८<br>इ. १६६५ डिसेंबर ५ |

عرضداشت ملّا یحی بیجاپوری آمده التماس خود نوشته بود وقتی که حضرت این بنده را همراه میرزا راجه بمهم دکن رخصت فرموده بودند حکم نموده بودند که وقتی شما انجا دکن رفته حتوی دولت خواهی تردد خواهند نمود آنزمان اضافه شما خواهند فرمود بنده در اینجا آمده به سیواجی ردبدل کرده آورده بمرزا راجه ملاقات کنانیده و حالا برادر ما ملا احمد دیوان والے بیجاپور است باو نیز سخنان نموده آورده بمرزا راجه رجوع کنانیدیم این طور خدمت نموده ایم حضرت عرضداشت ملایحی خوانده حواله جمدة الملک کردند —

मुल्ला यह्या विजापुरी याचा अर्ज आला कीं, मिर्झा राजाबरोबर दक्षिणेच्या मोहिमेवर मला बादशाहांनीं पाठविलें तेव्हां हुकूम केला होता कीं, येथून दक्षिणेंत पोहोंचल्यावर दौलतीसाठीं चांगले प्रयत्न करशील तेव्हां तुला वाढ दिली जाईल. मी येथें आलों. नंतर सीवाशीं रदबदल करून मिर्झा राजाशीं त्याची भेट घडवून आणली. सध्या माझा भाऊ विजापूरकरांचा दिवाण आहे त्याशीं बोलणीं करविलीं व त्यास मिर्झा राजाकडे रुजू केलें. अशा प्रकारें मी सेवा केली आहे. बादशाहानें अर्ज ऐकून तो जुम्दतुल्मुल्काकडे दिला.

३

| | | |
|---|---|---|
| सितामऊ संग्रह<br>जु. ९ जिल्हेज<br>६ गुरु. | امورات حضور کشور<br>کشای ماه ذی الحجه<br>سنه ۹ یوم الخمس ۶ منہم | श. १५८८ ज्येष्ठ शुद्ध ८<br>इ. १६६६ मे ३१ |

فولادخان عرض نمود که جمله مردم سیوا دکهنی نالش میکنند و سیوا نیز عاجزی میکند و میگوید که از بنده این چنین تقصیر نه شده است که بادشاه جیو چنین نامهربانے میفرمایند حضرت شنیده خاموش ماندند حضرت بمحمد امین خان فرمودند که بغازی بیگ

گرزبرداز بپرسند کہ سیواجی از پیش امام وردی خان چہ قدر
از فیل خریدہ نمودہ است محمد امین خان پرسیدہ عرض نمود کہ
از مبلغ پانزدہ ہزار روپیہ خرید نمودہ است و آن زر را تا حال
وصول نہ کردہ است —

फौलादखानाने अर्ज केला कीं, सीवाकडील सर्व दख्खनी लोक तक्रार करीत आहेत व सीवाही याचना करून सांगत आहे कीं, 'माझ्याकडून कांहीं एवढी मोठी चूक झाली नाहीं कीं, बादशाहानीं माझ्यावर एवढी अवकृपा करावी.' ऐकून बादशाह गप्प बसला. मुहम्मद अमीनखानास हुकूम झाला कीं, गाझीबेग गुर्जबर्दारास विचारावें कीं, सीवानें इमामविर्दीखानाकडून किती हत्ती विकत घेतले? उपर्युक्तानें चौकशी करून 'त्यानें पंधरा हजार रुपयांचे घेतले आहेत व ते पैसे अजून वसूल झाले नाहींत' असें कळविलें.

४

| | | |
|---|---|---|
| जु. ९ सफर २३<br>(२२) मंगळवार | سیاہہ اخبارات دربار<br>معلے ماہ صفر سنہ ۹<br>۲۳ منہہ یوم الثلث | श. १५८८ श्रावण वद्य ९<br>इ. १६६६ ऑगस्ट १४ |

صدیقخان بعرض رسانید کہ خانے خان بخشی فوج دکہن خط
نوشتہ آید کہ راگہو پنڈت امیدوار خدمت است فرمودند مرزا
راجہ جے سنگہہ بنویسد خدمت برائے او تجویز نمایند —

सिद्दीकखानानें अर्ज केला कीं, 'दक्षिणच्या फौजेचा बक्षी खानेखानान यानें पत्र लिहिलें आहे कीं "रावो पंडीत हा चाकरीचा उमेदवार आहे." हुकूम झाला कीं, "मिर्झा राजा जयसिंग यास लिहावें कीं 'त्यासाठीं चाकरीची तजवीज करावी."

५

| | | |
|---|---|---|
| ज. ९ सफर २५<br>(२४) गुरु. | سیاهم اخبارات دربار<br>معلے ماہ صفر<br>۲۵ منہہ یوم الخمس | श. १५८८ श्रावण वद्य ११<br>इ. १६६६ ऑगस्ट १६ |

بہ کنور رام سنگہ فرمودند کہ سیوا را معقول نماید کہ منصب
قبول دارد و اہل عیال خود حضور طلبد و قلعہ خود بدہد از اورا

حضور داشتہ اورا تعیناتت کابل فرمودہ خواہد شد عرض نمود او التماس دارد کہ وطن بندہ بحال باشد بعد از آن ہرچہ حکم خواہد شد قبول است —

कुंवर रामसिंगास हुकूम झाला कीं, ‘सीवा मनसब कबूल करील अशा तऱ्हेनें त्याचें मन वळवावें. त्याचे नातेवाईक व इतर लोक यांस हुजूर बोलवावें. त्यानें स्वतःचे किल्ले देऊन टाकावे. त्याची येथून काबूल येथें नेमणूक करीन.” रामसिंगानें अर्ज केला कीं, ‘सीवा विनंती करीत आहे कीं, ‘ बंद्यास वतनावर असूं द्यावें. मग हुकूम होईल तो मान्य आहे. ”

६

| जु. ९ सफर २७ (२६) शनि. | اخبارات دربار معلی<br>ماہ صفر سنہ ۹<br>۲۷ منہ یوم السبت | श. १५८८ श्रावण वद्य १३<br>इ. १६६६ ऑगस्ट १८ |
|---|---|---|

(۱) خواجہ بختاورخان عرض رسانید کہ کنور رام سنگہ مینماید کہ سیوا گریختہ رفت فولادخان نیز عرض نمود کہ پی او معلوم نمیشود و بفرار راز کسے نرفتہ است فرمودند کہ بروید خبر بگیرد فولادخان دیرہ سیوارا رفتہ چہ میشنید کہ دستاربستہ و یک آینہ بر چہارپائے داشتہ اند و از چہارپائے پاپوش سیوا افتادہ اند سہ ۳ اسپ و دو پالکی و یک غلام گذاشتہ رفتہ دیگر متاع ہیچ نیست خان موصی الیہ آمدہ عرض رسانید فرمودند تفحص او نمایند در این ضمن رائے بندرابن عرض نمود کہ کنوررام بدیوان دیودہی غسلخانہ نشستہ فرمودند باو بگوید کہ او ضامن او است اورا پیدا بکند و الا نہ جائے کہ او رفتہ است او ہم برود و کنوررا خاص عام و غسلخانہ آمدن ندہند و چہار زناردار کنور نزد چہارپائے سیوا چوکے میدارند آنہارا در قید نمایند و بہ فولادخان فرمودند کہ در شہر ہم تاکید نمایند —

(۲) بہ جمدة الملکے فرمودند کہ بہ صاحب صوبہائی و فوجداران ممالک محروسہ بنویسد کہ سیوا از حضور گریختہ است ہر کدام از سرحد خود خبردار باشد در ہر حد ہر کس کہ بیدارد جوی او خواہد نمود اگر سیوا خواہد رفت او بے جائے خواہد شد —

(۳) به مهاراجه فرمودند که دیدید کنور رام سنگه چه کرد که سیوارا از دست داده عرض نمود که او خانه‌زاد است چه قدرت دارد که این طور نماید و او هم کجا خواهد رفت بسته خواهد آمد —

(۴) یک امکر استغاثه شده که حکیم ........ احدی بنده را درخانه داشته است مسلمان نمیشود فرمودند که اگر مسلمان شود بهتر و الانه امکر را ازاو علحده نماید و او را در قید نگاه دارند —

(۵) حاجی عبدل وهاب و عابدخان در خلوت عرض رسانیدند سیوا گریخته است فرمودند که سیوا کجا خواهد رفت ضامن معتبر دارد —

( १ ) बख्तावरखानानें अर्ज केला कीं, 'कुंवर रामसिंग म्हणतो 'सीवा पळून गेला." फौलादखानानें अर्ज केला कीं, 'मलाही कळलें नाहीं. त्याच्या पलायनाचें रहस्य कोणासही उमगलें नाहीं'. हुकूम केला 'तूं जा व बातमी काढ'. फौलादखान सीवाच्या डेऱ्यापाशीं गेला तेव्हां त्यानें ऐकलें (पाहिलें) कीं, एक बांधलेली पगडी व एक आरसा पलंगावर आहेत व त्याचे जोडे खालीं पडले आहेत. तीन घोडे, दोन पालख्या व एक नोकर पाठीमागें सोडून तो गेला. इतर कांहींही सामान नाहीं. तेव्हां उपर्युक्त खानानें येऊन तसा अर्ज केला. यावर हुकूम केला, 'त्याचा तपास करा.' या बाबतींत राय ब्रिंदाबननें अर्ज केला कीं, 'कुंवर रामसिंग घुसलखान्यांत बसला आहे.' यावर हुकूम केला कीं, 'त्याला म्हणावें "तू त्याचा (सीवाचा) जामीन आहेस. तू त्यास हजर केलें पाहिजेस. नाहींतर तो गेला आहे तेथें तूही जा". कुंवर रामसिंगास खास, आम व घुसलखाना यांत येऊं देऊं नये." कुंवरचे चार ब्राह्मण सीवाच्या पलंगापाशीं पहाऱ्यास होते त्यांस कैद करावे व फौलादखानास हुकूम केला कीं, शहरांतही ताकीद करावी.

( २ ) जुम्दतुलमुल्कास हुकूम केला कीं, देशांतील सुभेदार, फौजदार मार्गाधिकारी (गुजर पाथानच) व जमीदार यांस लिहा 'सीवा हुजुराकडून पळाला आहे. प्रत्येकानें आपआपल्या सरहद्दीबाबत जागरूक असावें. प्रत्येकाच्या हद्दींत जो कोणी येईल त्याचा तपास करावा. सीवा ज्याच्या हद्दींतून निसटेल त्यास काढून टाकण्यात येईल.'

( ३ ) महाराजास हुकूम केला कीं, 'बघितलेस, कुंवर रामसिंगानें काय केलें. सीवास हातांतून निसटूं दिलें.' त्यानें अर्ज केला कीं, 'तो आपल्या घरचा आहे. त्याची काय छाती आहे कीं, तो असें करील आणि तो (सीवा) तरी कुठें जाऊं शकेल. त्यास बांधून आणीन.'

(४) एका खोडसाळ माणसानें न्यायासाठीं अर्ज केला कीं, 'एका माणसानें मला घरांत ठेवलें आहे……त्याचा धर्म रूमी आहे. तो फिरंगी आहे. तो मुसलमान होत नाहीं.' हुकूम झाला कीं, तो मुसलमान झाला तर ठीक; नाहींतर खोडसाळ माणसास वेगळें करून त्यास कैदेंत ठेवावें.'

(५) हाजी अब्दुल वहहाब व आबिदखान यांनीं अंतस्थ अर्ज केला कीं, 'सीवा पळून गेला आहे'. हुकूम केला कीं, 'सीवा कुठें जाईल? त्यानें मातबर जामीन दिला आहे.'

७

| | | |
|---|---|---|
| जु. ९ सफर २८<br>(२७) रवि. | اخبارات دربار معلی<br>ماه صفر سنہ ۹<br>۲۸ صفر یوم الاحد | श. १५८८ श्रावण वद्य १४<br>इ. १६६६ ऑगस्ट १९ |

داودخان و دلیرخان و قطب الدین خان و داد خان و راو امرسنگہ چندراوت جمعیت نہ ہزار سوار را نعیناتے دکہن کہ فور دکہن طلب شده —

दाऊदखान, दिलेरखान, कुत्बुद्दीनखान, दादखान व राव अमरसिंग चंद्रावत नऊ हजार स्वारांसह दक्षिणेंत नेमले होते. त्यांना तावडतोब परत बोलावलें.

८

| | | |
|---|---|---|
| जु. ९ सफर २९<br>(२८) सोम. | اخبارات دربار معلی<br>ماه صفر سنہ ۹<br>۲۹ صفر یوم الاثناء | श. १५८८ श्रावण वद्य ३०<br>इ. १६६६ ऑगस्ट २० |

سیدی فولاد خان عرض رسانید کہ راگہوجی وغیرہ پنج نفر اسا (از) یار سیوا در قید اند آنہا مینمایند کہ مرزا راجہ جئے سنگہ بہ کنور رام سنگہ نوشتہ بود ہر طوریکہ داند سیوارا از انجا برآرند و ہوست رائے ہرکارہ نیز ازین ممررا اطلاع دارند داروغگے ہر کارہائے بہ اعتمادخان مقرر نگاہ داده کسوجی و غیرہ حوالہ اعتمادخان شدند وکیل مرزا راجہ را از غسلخانہ مانع (منع) کرد بہ محمد امین خان فرمودند کہ بہ کنور رام سنگہ بنویسند کہ از

دربار نرود بہ فولاد خان فرمودند کہ نزدک (نزد) دیرہ رام سنگہ ہرست رائے چوکے نشانند و خبردار شوند منصب جماعت ذیل بوطرف فرمودند

کنور رام سنگہ ہرست رائے کسن رائے خویش

چہار ہزاری اصل کمی ہرست رائے سہ ۳ صد بر طرف

سوار بر طرف چہارصدی ۵۰ یکصدی

۲۰

फौलादखानानें अर्ज केला कीं, ‘सीवाच्या सोबत्यांपैकीं राघोजी वगैरे पाच लोक कैदेंत आहेत; ते सांगतात कीं, ‘मिर्झा राजा जयसिंगानें कुंवर रामसिंगास लिहिलें होतें कीं, “‘समजेल त्या मार्गानें सीवाला तेथून काढावें व हरसतराय हरकारा यास देखील याबद्दल माहिती आहे.’” हरकाऱ्याच्या दारूग्यावर अअतमादखानास नेमिलें व केसोजी वगैरेंना त्याच्या हवाला केलें’ मिर्झाराजाच्या वकिलास घुसलखाना मना केला. बादशाहानें मुहम्मद अमीन. खानास हुकूम केला कीं, ‘कुंवरसिंगास लिहावे कीं, दरबारांतून जाऊं नये. - फौलादखानास हुकूम केला कीं, ‘रामसिंगाच्या तंबूजवळ व हरसतरायापाशीं पाहरा बसवून सावध रहावें.’ खालील लोकांची मनसब बडतर्फ केली. कुंवर रामसिंग चार हजार स्वार बडतर्फ, हरसतराय असल ४०० व ५० अनुक्रमें १०० व २० कमी, हरसताचा नातलग किसनराय ३०० बडतर्फ.

९

| | | |
|---|---|---|
| जु. ९ सफर २९<br>(२८) सोम. | اخبارات دربار معلے<br>ماہ صفر سنہ ۹<br>۲۹ صفرہ یوم الاثناء | श. १५८८ श्रावण वद्य ३०<br>इ. १६६६ ऑगस्ट २० |

فرمان عالیشان بہ مرزا راجہ جئےسنگہ صادر شد

} صفر ۲۹ سنہ ۹ { بمضمون آنکہ آن دولتخواہ و معتمد درست بآنچہ (پیشتر) تردد و تلاش سیوا مقہور را دستگیر ساختہ بحضور معلی ارسال داشتہ بود و ما بدولت کنور رام سنگہ را اعتمادی و نیکخواہ دانستہ سیوا مذکور را حوالہ نمودہ بود کنور مذکور قطع نظر از نیک خواہی و بندگے کردہ جانب داری مقہور مذکور نمودہ او را بہ نسک و فریب ازینجا گریزان ساختہ چنانچہ ما بدولت میخواہیم کہ جزای تقصیر کنور رامسنگہ را پیوست از پیش علحدہ کردہ در شہر بگردانم اما بسبب آن تنتو (؟) غلام کہ در بندگے

درگاه و رسیخ دم و ثابت قدم است درمیان بود ازین جهت جان بخشی آن بدبخت را نمود از منصب برطرف فرمودیم میباید که آن دولت خواه باندک جزای تقصیر بسر خود شکر پروردگار بجا آورد ه‌چنانچه فرمان مسطور حوالہ اعتماد خان نموده که بداک چوکے بفرستند —

मिर्झा राजा जयसिंग याच्या नांवें बादशाही फर्मान सादर झाला कीं, 'तू हर प्रयत्नानें सीवा मजकुरास ताब्यांत आणून हुजूर पाठविलेंस व बादशाहानें कुंवर रामसिंगास अत्यंत विश्वासू व भले चिंतणारा समजून सीवा मजकुरास त्याच्या हवालीं केलें होतें. पण कुंवरनें कल्याणेच्छा व सेवा यांजकडे दुर्लक्ष करून त्याची तरफदारी करून त्यास कपटानें येथून पळून जाऊ दिलें. म्हणून मला असें वाटतें कीं, रामसिंगास त्याच्या अपराधाबद्दल योग्य ती शिक्षा करावी. त्यास दृष्टीआड करून शहरांतून फिरवणार होतों. परंतु तुझी एकनिष्ठसेवा आड आली. मुलाच्या अपराधाबद्दल तुला शिक्षा थोडीच मिळाली ? याबद्दल परमेश्वराचे आभार मानावे.' नंतर हा फर्मान अअतमादखानाच्या हवाला करून चौकीच्या डाकेनें पाठविण्यास सांगितलें.

१०

| | | |
|---|---|---|
| जु. ९ सफर ३० (२९) मंगळ. | اخبارات دربار معلی<br>ماه صفر سنہ ۹<br>۳۰ مئہم یوم الثلث | श. १५८८ भाद्रपद शुद्ध २<br>इ. १६६६ ऑगस्ट २१ |

بعمدة الملکے فرمودند که در چوکے سیوا منصبدار و برقنداز و بندوقچی و خاص خیل چہ قدر بود اسم آنہا نوشتہ بعرض رسانند —

जुम्दतुलमुल्कास हुकूम केला कीं, 'सीवाच्या पाहऱ्यावर मनसबदार, बर्कंदाज, बंदूकची व खासखेल कोणकोण होते त्यांची नांवें कळवावी.'

११

| | | |
|---|---|---|
| जु. ९ रवल २ गुरु. | اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول سنہ ۹<br>۲ مئہم یوم الخمس | श. १५८८ भाद्रपद शुद्ध ४<br>इ. १६६६ ऑगस्ट २३ |

عرض داشت عباد اللہ خان فوجدار نرور (برور) آمده نوشتہ بود که بروز شنبہ بوقت نماز شام سیوا با پنج سوار بہ این راه

گذشت چون با آنهان پرسیدند جواب داد که ما مردم سیوا ایم
بوطن میرویم دستک بمهر محمد امین خان ظاهر کرد بعد از آن نیز
ظاهر کرد که ما سیوا ایم لیکن معلوم نباشد فرمودند عباد الله خان
بسیار بد کرد که عقب او نکرده و دستک خوب وجهه ملاحظه نه نموده ـ

नरवरचा (बरोरचा) फौजदार इबादुल्लाहखान याची अर्जदाश्त आली. तींत लिहिलें होतें कीं, ‘संध्याकाळच्या नमाजाच्या वेळीं सीवा पाच स्वारांसह या वाटेनें गेला. विचारलें तेव्हां त्यानें सांगितलें कीं, “आम्ही सीवाचे लोक आहों.” त्यांनीं मुहम्मद अमीनखानाच्या शिक्क्याचा दस्तक दाखविला. त्यानंतर त्यानें जाहीर केलें कीं, ‘आम्ही सीवाच आहों.’ परंतु समजलें नाहीं.” हुकूम केला कीं ‘इबादुल्लाहखानानें अत्यंत गैर गोष्ट केली; त्यांचा पाठलाग केला नाहीं व दस्तकही नीट तपासलें नाहीं.’

१२

| | | |
|---|---|---|
| जु. ९ रवल २<br>गुरु. | سیاه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول سنه ۹<br>۲ منهم یوم الخمس | श. १५८८ भाद्रपद शुद्ध ४<br>इ. १६६६ ऑगस्ट २३ |

(۱) بعرض رسید که اودیت سنگه بهدوریه آن مرد ملازم سیوارا گرفته فرستاده است حکم شده که آنهارا حواله اعتماد خان نماید که بحضور نماید —

(۲) به محمد امین خان میفرمودند که قبل ازین شما بعرض اشرف رسانیده بود که سیوا مقهور بسیار متضمین [؟]و حرامزاده است حضرت آنرا اعتماد نکند چنانچه حالا همچون حرف درپیش آمد —

(१) बादशहाकडे अर्ज आला कीं, ‘उदीतसिंग भदूरियानें सीवाच्या चाकरांना पकडून पाठविलें आहे.’ हुकूम झाला कीं, ‘त्यांना अअतमाद्-खानाच्या ताब्यांत द्यावें म्हणजे तो त्यांना हुजुरांसमोर आणील.’

(२) मुहम्मद अमीनखानास हुकूम केला कीं, ‘या पूर्वीं तू सीवा मकहूर अतिशय विश्वास दाखविणारा पण हरामजादा आहे असा अर्ज केला होतास. त्यावेळीं बादशाहांनीं त्यावर विश्वास ठेविला नव्हता; परंतु तें आतां खरें झालें.’

१३

| | | |
|---|---|---|
| जु. ९ रवल ४<br>शनि. | اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول سنہ ۹<br>۴ منہر یوم السبت | श. १५८८ भाद्रपद शुद्ध ६<br>इ. १६६६ ऑगस्ट २५ |

مراتب مرزا راجہ جئی سنگہ طلب فرمودہ بودند جعفرخان بعرض رسانید کہ حضرت مراتب مرزا راجہ طلب فرمودہ میخواہند کہ او بےتقصیر است او دودلہ خواہد شد وہم این ظاہر است بندگان حضرت فرمودند کہ فرمان عالیشان بنام مرزا راجہ جئی سنگہ صادر نمایند مضمون آنکہ سیوا مقہور از اینجا گریختہ است دیدہ دانستہ از اشارہ کنور رام‌سنگہ گریختہ رفتہ اگرچہ رام‌سنگہ داخل آن فطور است برای خاطر شما درگزر نمودند وطن بحال داشتہ و شمارا باید کہ از طرف سیوا خبردار شوند ہر جائی کہ او باشد دستگیر خواہند نمود از بندبست آنجا بواقع خبردار باشد—

मिर्झा राजा जयसिंगाच्या मरातिबाविषयीं विचारलें असतां त्यावर जाफरखानानें अर्ज केला कीं, 'आपण मिर्झा राजाच्या मरातिबाबद्दल विचारलें; पण तो बेकसूर आहे. तेव्हां त्याची मनस्थिती द्विधा होईल हेंही आपण जाणता.' तेव्हां बादशाहानें मिर्झा राजा जयसिंगाच्या नावानें पुढील आशयाचें फर्मान लिहावें असें सांगितलें— 'सीवा येथून पळाला तो जाणून-बुजून रामसिंगाच्या इशाऱ्यानें पळाला आहे. या फितुरांत रामसिंगाचा हात आहे. तरीही तुझ्यासाठीं दुर्लक्ष केलें आहे. तुझें वतन तुजकडे ठेवतों. तू सीवाच्या बाबतींत खबरदार असावें. तो असेल तेथून त्यास कैद करावें. तेथील बंदोबस्ताविषयीं अत्यंत तत्पर रहावें.'

१४

| | | |
|---|---|---|
| जु. ९ रवल ५<br>रवि. | اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول سنہ ۹<br>۵ منہر یوم الاحد | श. १५८८ भाद्रपद शुद्ध ७<br>इ. १६६६ ऑगस्ट २६ |

بہ فولاد خان حکم شدہ بود کہ طرح چوکےہائے گردش سیوا نوشتہ بنظر گذرانید چنانچہ موصی الیہ حسب الحکم طرح را نوشتہ بنظر گذرانیدہ کہ اندرون چوکے مردم کنور رام‌سنگہ بود و بیرون مردم بندہ بودند بندگان حضرت خاموش شدند —

फौलादखानास हुकूम झाला होता कीं, 'सीवाच्या जवळपासच्या चौक्यांचे नकाशे काढून नजरेखालून घालावे.' त्यानें हुकूमाप्रमाणें नकाशे काढून बादशाहाच्या नजरेखालून घातले. [व म्हटलें*] 'आंतील चौकींत रामसिंगाचे व बाहेरील (चौकींत) माझे लोक होते, यावर बादशाह गप्प बसला.

१५

जु. ९ रवल ५<br>रवि.

اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول سنہ ۹<br>۵ منہر یوم الاحد

श. १५८८ भाद्रपद शुद्ध ७.<br>इ. १६६६ ऑगस्ट २६

به حافظ رحیم الدین فرمودند که رائی بندرابن مشرف غسلخانه و کنور رام سنگه بیارد پنج مهر [نذر] گذاشتند حقیقت سیوا باین اظهار کرده باشد مشارالیه پرسیده بعوض رسانیده که رائی مذکور التماس می نماید که اگر به بنده اظهار میکردند بنده پیشتر عرض می نمودیم حکم [شد] که این چنین اخبار باین بیچاره چرا خواهد گفت —

बादशाहानें हाफिज रहीमुद्दीन यास हुकूम केला कीं, 'घुसलखान्याचा मुश्रीफ राय बिंद्राबन व कुंवर रामसिंग यांस समोर आणावें.' [ते आले] व त्यांनीं पाच मोहरा नजर केल्या. 'सीवाची हकीकत सांगा' असा हुकूम झाला. तेव्हां त्यानें अर्ज केला कीं, 'राय मजकूर विनंती करीत आहे कीं, 'ह्या बंद्यास माहिती असती तर ती यानें अगोदरच जाहीर केली असती.' हुकूम झाला कीं, 'अशा प्रकारची बातमी त्या बिचाऱ्याशीं कशाला बोलेल?'

१६

जु. ९ रवल ६<br>सोम.

اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول سنہ ۹<br>۶ منہر یوم الاثنا

श. १५८८ भाद्रपद शुद्ध ८<br>इ. १६६६ ऑगस्ट २७

چترسی مسلمان شد سروپا عنایت نمود —

छत्रसी मुसलमान झाला. त्यावर सरोपाची कृपा झाली.

१७

| जु. ९ रवल ७ मंगळ. | اخبارات دربار معلے ماه ربیع الاول سنه ۹ ۷ منہم یوم السلت | श. १५८८ भाद्रपद शुद्ध ९ इ. १६६६ ऑगस्ट २८ |
|---|---|---|

(۱) از واقعه لشکر ظفر اثر همراه میرزا راجه جئے سنگه بعرض رسید که میرزا راجه (نو) نزده نفر برادری داود خان که از دست آنها تردد [و] تلاش خوب بوقوع آمده بود بنابران اضافه آنها تجویز نموده است و خواجه عبدالله از برادری خانمذکور بمنصب هفصدی ذات یکصدی پنجاه سوار برقرار بود به قزای الهی فوت شده و علی عادل بیجاپوری نیک نام خان را جهت صلح نزد میرزا راجه فرستاده است حکم شده که افراد واقعه تجویز میرزا راجه حواله صیف خان نمایند که بعرض اشرف رساند ـــ

(۲) سلیم بیگ گرزبردار از نزد میرزا راجه جئے سنگه آمده ملازمت نموده پنج روپیه نذر و عرضداشت میرزا راجه بنظر گذرانیده بند [گا]ن حضرت مطالعے خاص در آورده بشاهزاده سلطان محمد معظم نمودند و شاهزاده جیو نیز مطالعے نموده بعد ازآن حکم [شده] که حواله بختاور خان نماید و به محمد امین خان فرمودند که بزبانے گرزبردار مذکور پرسد چنانچه خان مشارالیه پرسیده بعرض رسانیده که نیک نام خان وغیره مردم بیجاپوری پیغام صلح آورده اند تا هنوز بغیر از حکم معلے صلح مقرر نشده هرگاه بنده بر لب آب نربده آمده اخبار گریختن سیوا مقهو [ر] شنیده بودیم و بجابجائے مردم سیوا را در راه میگیرند شنیده خاموش شدند ـــ

(१) मिर्झा राजा जयसिंगाच्या लश्करांतून बातमी आल्यावरून समजलें कीं, मिर्झा राजानें दाउदखानाच्या भाऊबंदांपैकीं १९ लोकांना त्यांच्या हातून श्रम व प्रयत्न खूप झाल्यामुळें त्यांच्या (मनसबीच्या) वाढीची तजवीज केली होती. परंतु खानमजकुराचा भाऊबंद ख्वाजा अबदुल्लाह ७०० जात व १५० स्वार यांचा मनसबदार होता तो मरण पावला. अली आदिल विजापुरी यानें तहासाठीं नेकनामखानास मिर्झा राजाकडे पाठविलें आहे. हुकूम केला कीं, ‘मिर्झा राजानें केलेल्या तजविजीचे कागद सैफखानाकडे द्यावे व त्यानें बादशाहाकडे द्यावे.’

( २ ) सलीमबेग गुर्जबर्दार यानें मिर्झा राजा जयसिंगाकडून येऊन भेट घेतली. पाच रुपये नजर व मिर्झा राजाची अर्जदाश्त नजरेस आणली. बादशाहानें स्वतः ती पाहिली. शाहजादा सुलतान मुअज्जम यासही अर्जी दाखविली. त्यावर हुकूम झाला कीं, 'बख्तावरखानाच्या हवाला करावी. मुहम्मद अमीनखानास गुर्जबर्दारांना तोंडीं विचारण्यास सांगितलें. त्याप्रमाणें विचारून त्यानें अर्ज केला कीं, 'नेकनामखान वगैरे विजापुरी लोकांनीं तहाचीं बोलणीं केलीं आहेत. परंतु बादशाही हुकूम नसल्यानें तह केला गेला नाहीं. सेवक ( मिर्झा राजा ) नर्मदेच्या ( भिंवरेच्या ) कांठीं आला [ तेव्हां ] सीवा मकहूराच्या पलायनाची बातमी आली. ठिकठिकाणीं वाटेवर सीवाच्या लोकांना कैद करीत आहे.' हें ऐकून बादशाह गप्प बसला.

१८

| | | |
|---|---|---|
| जु. ९ रवल ७<br>मंगळ. | اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الاول سنہ ۹<br>۷ صفہر یوم الثلث: | श. १५८८ भाद्रपद शुद्ध ९<br>इ. १६६६ ऑगस्ट २८ |

سلیم بیگ عرضہ داشت مرزا راجہ آوردہ در دوازدہ [روز] بنظر گذرانید نوشتہ بود کہ وکیلان بیجاپوری پیغام صلح آوردہ می نماید کہ یک پرگنہ در حد منگل بیرہ بدہد دیگر پرگنہ عیوض نقد نخواہد داد و می خواہند بعد از برسات جنگ نماید فرمودند بہ مرزا راجہ حکم رفتہ است آنچہ بہتر خواہد بود خواہد کرد بہ سلیم بیگ فرمودند چیزی خبر سیوا دارد عرض نمود این روز [بر] نربدہ خبر سیوا شنیدہ بودیم لیکن سیوارا ندیدہ مردمان سیوارا در گذرہائے قید می کنند عرضہ داشت بہ شاہزادہ نمودند —

सलीमबेग यानें मिर्झा राजाची अर्जदाश्त आणली ती आजूर ( महिन्याच्या ) १२ तारखेस बादशाहाच्या नजरेखालीं घातली. त्यांत लिहिलें होतें कीं, 'विजापूरच्या वकिलांनीं तहाचें बोलणें केलें कीं, मंगळवेढ्याच्या हद्दींतील एक परगणा देऊं; पण रोख रकमेच्या ऐवजीं दुसरा परगणा देणार नाहीं. पावसाळ्यानंतर लढाई करू इच्छितात.' त्यावर हुकूम झाला कीं, 'मिर्झा राजास हुकूम गेला आहे कीं, ज्यानें चांगलें होईल तें करावें' व सलीमबेगास हुकूम केला कीं, 'सीवाबद्दल कांहीं बातमी आणलीस कां?' तो म्हणाला 'सीवा अलीकडे नर्मदेवर आल्याची खबर समजली होती. परंतु तो दिसला नाहीं. त्याच्या लोकांना वाटेंत कैद केलें जात आहे.' अर्ज शाहजाद्यासही दाखविला.

१९

| | | |
|---|---|---|
| जु. ९ रवल ८<br>रवि. | اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول سنہ ۹<br>۸ منہم یوم الاحد | श. १५८८ भाद्रपद शुद्ध १०<br>इ. १६६६ ऑगस्ट २९ |

فدائی خان بعرض رسانید کہ گماشتہ مہابت خان از جاگیر
پرگنہ دھولپور بہ بندہ خطے نوشتہ کہ دو کس وکیل علی عادل
بیجاپوری از جمدۃ الملکے رخصت شدہ درین جا فرود امدہ بودند
و سہ ۳ کس ملازم سیوا دو سفید پوش ویک سناسی وپنج اسپ
ہمراہ آنہا اند چانچہ کہ وکیل مذکور می نمایند کہ پرتیت رائے
پنج اسپ و آنہارا ہمراہ دادہ است کہ بہ بیجاپور رسانند بنابران
آنہارا قید نمادہ [نمودہ] اند و کنور رام سنگہ میخواست
کہ دریاے چنبل آنطرف شدہ آنہارا دستگیر سازد لیکن بغیر از حکم
والا کنور مذکوررا بآنصوب دریا رفتن ندادہ ہرچہ امر شود حکم
شد کہ حسب الحکم بہ او بونگارد کہ آنہارا روانہ درگاہ معلے نماید —

फिदाईखान यानें अर्ज केला कीं, ‘ धोलपूर परगण्याच्या जागीरींतून महाबतखानाच्या गुमास्त्यानें मला पत्र लिहिलें कीं, “ अली आदिल विजापुरी याचे दोन वकील जुम्दतुल-मुल्काचा निरोप घेऊन इकडे आले होते. तसेंच सीवाचे तीन नोकर होते.” [ दोन पांढऱ्या पोषाखांतील व एक संन्यासी ] व त्यांच्याबरोबर पाच घोडे होते.” वकिलांनीं जाहीर केलें कीं, ‘ प्रतीतराय यानें पाच घोडे व हे लोक यांस विजापुरास पोंचवावें असें सांगितलें. म्हणून त्या लोकांना कैद केलें.’ कुंवर रामसिंगाची इच्छा आहे कीं, ‘ चंबळ नदी ओलांडून त्या लोकांस कैद करावें. परंतु हुकूम नसल्यामुळें त्यास नदी पलीकडे जाऊं दिलें नाहीं. हुकूम व्हावा.’ यावर हुकूम झाला कीं, ‘ त्यास हस्बुलहुकूम लिहावा कीं, त्यांना दरबारकडे पाठवावें.’

२०

| | | |
|---|---|---|
| जु. ९ रवल ९<br>गुरु. (सोम.) | اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول سنہ ۹<br>۹ منہم یوم الخمس | श. १५८८ भाद्रपद शुद्ध ११<br>इ. १६६६ ऑगस्ट ३० |

(۱) محمد عاقل و میر رستم گرزبرداران حسب الحکم بہ
اودی خان صوبہ دار مالوہ بردہ بود کہ سیوا مقہور از حضور پرنور

گریختہ است می باید کہ اخبار بباشد [ نیافتہ ] بند [ ہ ] آنرا دستگیر
سازد درایں ولا عرضہ داشت خان مشارالیہ رسیدن حسب الحکم آوردہ
بنظر گذرانیدند معروضداشتہ بود کہ بموجب حکم معلے جابجائے
مردمان خودرا تاکید نمودہ فرستادہ کہ ہرجائے کہ مقہور مذکور پیدا
شود بگیرند تا ہنوز ہم جائے مقہور مسطور اظہار نشد و مردم او را
جابجائے در راہ میگیرند شنیدہ خاموش شدند —

(۲) محمد عاقل و رستم بیگ گرزبردار را حکم شدہ بود کہ
شما سیوارا می‌شناسید تا بہ نربدہ بروید و جائے بجائے تحقیق
نماید در چہار روز آمدہ بعرض رسانید کہ تا بہ گزرپٹے جمولہ
نربدہ ہیچ اسری از او ظاہر نشد و کسانے آنہا جابجائے قید
میشوند عرضداشت وزیرخان صاحب صوبہ اوجین بنظر گذرانید
عرضداشت کہ خبر سیوا مقہور یافتہ ایم جابجائے خبرگیران نشستہ‌ایم —

(۳) کسانے مہابت خان کہ درگذر دہولپور بودند پنج راس
اسپ عربی و دو نفر خدمتگار اشار سیوا دستگیر نمودہ اند حکم
شد کہ حضور بفرستند —

(१) मुहमद आकिल व मीर रुस्तुम गुर्जबर्दार यांनीं माळव्याचा सुभेदार तू ( लो ) दीवान यास हस्बुलहुकूम आणला कीं, ‘सीवा येथून पळून गेला आहे त्यानें सावध रहावें व त्यास कैद करावें.’ आतां खान मजकूर याच्या हस्बुलहुकुमाप्रमाणें अर्ज आला व तो नजरेखालून गेला. त्यांत लिहिलें आहे कीं, ‘बादशाही हुकुमाप्रमाणें दिसेल तेथें सीवा मकहूरास पकडावें म्हणून ताकीद देऊन माझ्या लोकांना मी धाडलें आहे. आतापर्यंत तो कोठेंही दिसला नाहीं. ते त्याच्या लोकांना वाटेल ठिकठिकाणीं कैद करीत आहेत.’ बादशाह ऐकून गप्प बसला.

( २ ) मुहम्मद आकिल व रुस्तुमबेग गुर्जबर्दार यांस हुकूम झाला होता कीं, ‘तुम्ही सीवाला ओळखता. नर्मदेपर्यंत जाऊन ठिकठिकाणीं चौकशी करावी.’ कांहीं दिवसांनीं परत येऊन त्यांनीं अर्ज केला कीं, ‘नर्मदेच्या जमुल्याच्या गुजरपट्टीपर्यंत त्याचें कांहींच चिन्ह दिसलें नाहीं. त्याचे लोक ठिकठिकाणीं कैद होत आहेत.’ उज्जैनचा सुभेदार वझीरखान याची अर्जदाश्त नजरेखालून गेली. तींत लिहिलें आहे कीं, ‘आम्हास सीवा मकहूराची खबर मिळाली. आम्ही ठिकठिकाणीं बातमीदार ठेविले आहेत.’

( ३ ) धोलपुरांतील महाबतखानाच्या लोकानीं सीवाचे दोन नोकर व पाच अरबी घोडे पकडले आहेत. हुकूम झाला कीं, ‘त्यांस हुजूर पाठवावें.

२१

जु. ९ रवल ११ शनि.

اخبارات دربار معلی
ماه ربیع الاول سنه ۹
۱۱ سنه یوم السبت

श. १५८८ भाद्रपद शुद्ध १३
इ. १६६६ सप्टेंबर १

فدای خان بعرض رسانید که گماشته مهابت خان از پرگنه دهولپور بحسب الحکم وکیل بیجاپوری و ملازمان سیوارا قید نموده فرستاده میشود امر شود حکم شد که حواله سیدی فولاد خان نماید —

फिदाईखानानें अर्ज केला कीं, 'धोलपूर परगण्यांतील महाबतखानाच्या गुमास्त्यांनीं हस्बुलहुकुमाप्रमाणें विजापुरी वकील व सीवाचे नोकर यांना कैद करून पाठविलें आहे. हुकूम व्हावा.' हुकूम झाला कीं, 'सीदी फौलादखानाच्या हवाला करावें.'

२२

जु. ९ रवल २३ गुरु.

اخبارات دربار معلی
ماه ربیع الاول سنه ۹
۲۳ سنه یوم الخمس

श. १५८८ भाद्रपद वद्य १०
इ. १६६६ सप्टेंबर १३

از واقع دکهن بعرض رسید کسان سیوا مقهور میخواهند که دست درازی بکنند به جمدة الملکے حکم شده که حسب الحکم به مرزا راجه بنویسد که اختیار آنجا برشما است از بندبست آنجا خبردار باشند —

दक्षिणच्या वाक्यावरून समजलें कीं, सीवा मकहूराचे कांहीं लोक लूटमार करण्याची इच्छा करतात. तेव्हां जुम्दतुलमुल्कास हुकूम झाला कीं, 'मिर्झा राजास हस्बुलहुकूम लिहावा कीं, "तिकडील अखत्यार तुजवर आहे. तिकडील बंदोबस्ताबद्दल सावध असावें."'

२३

जु. ९ रवल २९ बुध.

۲۹ سنه یوم الاربعه

श. १५८८ आश्विन शुद्ध ६
इ. १६६६ सप्टेंबर १९

خلعت و غیره سماند (؟) رائے بخوش رضای مسلمان شد

جگ جیون بعرض رسانید که پانصد روپیه از سرکار صفخان (قرض حال ؟) بر من بنده است بنابران مسلمان میشوم فرمودند

کہ پانصد روپیہ او از سرکار والا بہ صرف خان (قرض خان) بدہد
و مسلمان سازد —

समीदराय खुषीनें मुसलमान झाला. त्यास खिलअत वगैरे मिळालें.

जगजीवन यानें अर्ज केला कीं, 'ह्या चाकराकडे सरकारांतून घेतलेलें ५०० रुपये कर्ज आहे. म्हणून मुसलमान होतों.' हुकूम झाला कीं, 'सरकारांतून ५०० रुपये द्यावे व मुसलमान करावें.'

२४

| सितामऊ<br>जु. ९ रखर ३<br>सोम. (शनि.) | امورات حضور کشورکشای<br>ماه ربیع الثانے<br>سنہ ۹ یوم الاثنین | श. १५८८ आश्विन शुद्ध ४<br>इ. १६६६ सप्टेंबर २२ |
|---|---|---|

بموجب عرض مرزا راجہ جیسنگہ دو امرای دکنی را بمنصب نمودند بموجب دیل تولاجی را ہفت ہزاری ذات ہفتصد سوار مرزا راجہ تجویز نمودہ نوشتہ بود دراین جا حضرت ہفتصدی ذات چہار صد سوار نمودند منصب جسونت رائے ہفت صدی ذات چہار صد سوار مرزا راجہ تجویز نمودہ نوشتہ بود دراین جا چہار صدی دو صد سوار نمودند —

मिर्झा राजाच्या अर्जाप्रमाणें दोन दक्षिणी उमरावांना मनसबी दिल्या गेल्या त्या : तुळाजीस ७०० जात व ७०० स्वार अशी मिर्झा राजानें तजवीज केली होती. बादशाहानें ती ७०० जात, ४०० स्वार अशी केली. जसवंतरायास ७०० जात व ४०० स्वार अशी तजवीज केली होती. त्यास ४०० जात व २०० स्वार अशी केली.

२५

| जु. ९ रखर ३ | اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانے<br>سنہ ۹ ۳ صفر | श. १५८८ आश्विन शुद्ध ४<br>इ. १६६६ सप्टेंबर २२ |
|---|---|---|

گردہرلعل بوسیلہ سعادت مند مسلمان شد سروپا دادہ —

सआदतमंदाच्या मध्यस्थीनें गिरधरलाल मुसलमान झाला तेव्हां त्यास सरोपा दिला.

...२...

२६

| | | |
|---|---|---|
| जु. ९ रखर ७ | اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الثانی<br>سنہ ۹ | श. १५८८ आश्विन शुद्ध ९<br>इ. १६६६ सप्टेंबर २६ |

(۱) ۷ شہر دلیر خان عرضداشت نموده بود کہ فرمان حضور طلب رسیده ہرگاه مرزا راجہ رخصت خواہد کرد روانہ حضور خواہم شد —

(۲) مرزا راجہ عرضداشت نموده بود کہ سیوا در ملک خود نرسیده نیتوجی را قید ساختہ خوشوقت شدند مراتب کنور رام را طلب فرمودند —

( १ ) दिलेरखानानें अर्ज केला होता कीं, हुजूर येण्याचा हुकूम मिळाला. मिर्झा राजा निरोप देईल तेव्हां हुजूरास रवाना होईन.

( २ ) मिर्झा राजानें अर्ज केला होता कीं, सीवा [ अजून ] आपल्या मुलखांत पोचलेला नाहीं. नेतोजीस कैद केलें. [ बादशाह ] आनंदी झाला. रामसिंगाचे मानमरातब बादशाहानें मागवले.

२७

| | | |
|---|---|---|
| जु. ९ रखर १३<br>मंगळ. | اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الثانی سنہ ۹<br>۱۳ شہر یوم الثلث | श. १५८८ आश्विन शुद्ध १५<br>इ. १६६६ आक्टोबर २ |

دلیر خان بمحمد امین خان نوشتہ بود کہ حکم از حضور درباب طلب رسید از مرزا راجہ رخصت شده روانہ حضور خواہم رسید [شد] و درباب منصبداران احدی ہرچہ امر شود فرمودند کہ بہ مرزا راجہ بنویسد کہ بغایت رخصت طلب احدی داده حضور نماید —

दिलेरखानानें मुहम्मद अमीनखानास लिहिलें होतें, 'हुजूर येण्याचा हुकूम मिळाला. मिर्झा राजाचा निरोप घेऊन हुजूर येत आहे. रोखीच्या मनसबदाराबद्दल हुकूम व्हावा.' हुकूम झाला 'मिर्झा राजास लिहावें कीं, रोख पैसे देऊन ताबडतोब हुजूर येण्यासाठीं निरोप द्यावा.'

२८

जु. ९ रखर १५
गुरु.

اخبارات دربار معلی
ماه ربیع الثانی سنه ۹
۱۵ شهر یوم الخمیس

श. १५८८ आश्विन वद्य १
इ. १६६६ आक्टोबर ४

غیاث الدین خان فوجدار سورت عرض داشت نموده بود که سیوا در اینجا ظاهر اند (نشد) —

सुरतेचा फौजदार गियासुद्दीनखान यानें अर्ज केला होता कीं, सीवा इकडे दिसला [ नाहीं ].

२९

जु. ९ रखर १७
शनि.

اخبارات دربار معلی
ماه ربیع الثانی سنه ۹
۱۷ شهر یوم السبت

श. १५८८ आश्विन वद्य १
इ. १६६६ आक्टोबर ४

از واقع لشکر راجه جی سنگه بعرض رسید که از تالاب کانکریه جانب پرینده روانه شده غنیم آن روی لب آب بهیمرا است حرف صلح و جنگ درمیان است شنیده خاموش ماندند —

राजा जयसिंगाच्या लश्करांतील वाक्यावरून समजलें कीं, तो कांकरिया तलावापासून परिंड्याकडे रवाना झाला. गनीम भीमा नदीच्या पलीकडील काठावर आहे. लढाई व तह यांचीं बोलणीं चालू आहेत. हें ऐकून बादशाह गप्प बसले.

३०

जु. ९ रखर १८
रवि.

اخبارات دربار معلی
ماه ربیع الثانی سنه ۹
۱۸ شهر یوم الاحد

श. १५८८ आश्विन वद्य ४
इ. १६६६ आक्टोबर ७

فولاد خان عرض رسانید که اسپان و فیلان و نقد و جنس از بابت سیوا ضبط کردیم فرمودند داخل بیت المال نمود می نمایند —

फौलादखानानें अर्ज केला कीं, सीवाचे घोडे, हत्ती, नकद व जिन्नस जप्त केले आहेत. हुकूम झाला कीं, बैतुलमालामध्यें दाखल करावे.

३१

| | | |
|---|---|---|
| सितामऊ<br>जु. ९ रखर २४<br>शनि. | امورات حضور کشور<br>کشای ماه ربیع الثانے<br>سنہ ۹ یوم السبت ۲۴ منہ | श. १५८८ आश्विन वद्य १०<br>इ. १६६६ आक्टोबर १३ |

بعرض حضرت رسید کہ در متھرا جیو در بتخانہ کہ کیشو رای جیو یک کٹھرہ سنگے بے شکوہ نمودہ است حضرت شنیدہ فرمودند کہ در مذہب مسلمانے بتخانہ را دیدن ہم خوب نیست و این بے شکوہ در آن کٹھرہ راست کنانید این سخن مسلمانان را خوب نیست از این ممر این کٹھرہ را دور باید نمود بعبدالنبی خان فرمودند کہ شما رفتہ آن کٹھرہ را از میان آن بتخانہ دور نمایند آن زمان عبدالنبی خان آمدہ آن کٹھرہ را دور کردہ بعد پیش بادشاہ جیو رفتہ معلوم نمود کہ آن کٹھرہ را از میان آن بتخانہ دور کرد در آن کوتھری کہ سری کیسورائی جیو می نشیند بیرون آن کوتھری در جنگ موہن آن کٹھرہ سنگین دارا شکوہ کنانیدہ بود تمام خلق متصل آن کٹھرہ را دور نمودند سابق در آنجا کٹھرہ چوبین بود عبدالنبی خان گفت آن کٹھرہ سابق چوبین را آوردہ ایستادہ بکند آن زمان سیوکان کٹھرہ چوب را ایستادہ کرد آن روز بندہ ہم متھرا جیو بود. بعد از آن ایستادہ نمودہ کٹھرہ چوب جملہ خلق درشن نمود —

**बादशाहाकडे** अर्ज आला. मथुरेंत केशवरायाच्या देवळांत बेशिकोह (दारा शिकोह) यानें एक दगडी कठडा बांधला आहे. बादशाहानें तें ऐकून हुकूम दिला कीं, मुसलमानी धर्मांत देऊळ बघणेंसुद्धा निषिद्ध मानलें आहे व या बेशिकोहानें (दारा शिकोहने) तेथें कठडा उभा केला आहे. ही गोष्ट मुसलमानास योग्य नाहीं. या कारणास्तव हा कठडा तेथून हलवला पाहिजे. अब्दुन्नबीखानास हुकूम झाला कीं, तू जाऊन त्या देवळांतील तो कठडा काढून टाक. यानंतर अब्दुन्नबीखानानें जाऊन तो कठडा तेथून काढून टाकून बादशाहाकडे येऊन कळविलें कीं, त्या देवळांतून तो कठडा काढून टाकला आहे. केशवरायाच्या गाभाऱ्याच्या बाहेर मोहन येथील लढाईमध्यें दाराशिकोह यानें हा दगडी कठडा तयार केला होता. तेथें जवळ असलेल्या सर्व लोकांनीं कठडा दूर केला. पूर्वी तेथें लाकडी कठडा होता. अब्दुन्नबीखानानें सांगितलें कीं, पूर्वी तेथें असलेला लाकडी कठडा आणून उभा

करावा. नंतर लोकानीं तो कठडा उभा केला. त्या दिवशीं मी मथुरेंत होतों. तो लाकडी कठडा उभा केल्यानंतर सर्व लोकांनीं दर्शन घेतलें.

## ३२

| | | |
|---|---|---|
| जु. ९ जवल १६ | اخبارات دربار معلی | श. १५८८ कार्तिक वद्य ३ |
| रवि. | ماه جمادی الاول سنہ ۹ | इ. १६६६ नोव्हेंबर ४ |
| | ۱۶ صفر یوم الاحد | |

از واقع دکهن بعرض رسیده که سیوا مقهور مع پسر آمده در راجگده رسید پسر مادم (؟) بیمار بود فوت شده او به مرزا راجه نوشته بود که بر قول شما حضور رفته بودیم که چون بهبودی خود ندیدیم برخاسته آمدیم مرزا راجه هیچ جواب نداد —

दख्खनकडील वाक्यावरून समजलें कीं, सीवा राजगडास आपल्या मुलासह पोहचला. त्याचा मुलगा ...... आजारी होता तो मेला. त्यानें (सीवानें) मिर्झा राजास लिहिलें कीं, तुमच्या शब्दावरून मी हुजुरास गेलों होतों. परंतू स्वतःचे भलें न दिसल्यामुळें उठून निघून आलों. मिर्झा राजानें कांहींही उत्तर दिलें नाहीं.

## ३३

| | | |
|---|---|---|
| जु. ९ जवल २७ | اخبارات دربار معلی | श. १५८८ कार्तिक वद्य १४ |
| गुरु. | ماه جمادی الاول سنہ ۹ | इ. १६६६ नोव्हेंबर १५ |
| | ۲۷ صفر یوم الخمس | |

از واقع اورنگ آباد بعرض رسید که بخانه سیوا مقهور فرزند تولد شد و خود بیمار است —

औरंगाबादेच्या वाक्यावरून समजलें कीं, सीवाच्या घरीं मुलगा जन्मला व तो स्वतः आजारी आहे.

## ३४

| | | |
|---|---|---|
| जु. ९ जखर २८ | اخبارات درگاه معلی | श. १५८८ मार्गशीर्ष व. ३० |
| शनि. | ماه جمادی الثانی | इ. १६६६ डिसेंबर १५ |
| | ۲۸ صفر یوم السبت سنہ ۹ | |

(۱) هیرا بیراگی ساکن موضع کهرکوده مسلمان شد سروپا و پاؤ روپیه روز نیم سرفراز فرمودند —

(۲) عالم سنگھ (سکھ) گوہر بہ رعد انداز خان رقعہ نوشتہ بود کہ ما و شما خانہ دورانی ہستند اگر ضامن بندہ دہند خلاصی شوم خان مذکور عرض رسانید فرمودند چنانچہ کنور رام سنگھ ضامن سیوا بودہ شما چرا ضامن میدہد او را خلاصی کردہ نخواہد شد—

खरकोदा ( खरगोदा ) चा रहिवासी हीरा बैरागी मुसलमान झाला; त्यास सरोपा व दर अर्ध्या दिवसास पाव रुपया मंजूर केला.

आलमसिंग गौहर यानें रअद्अंदाजखानास पत्र लिहिलें होतें कीं, आमचा व तुमचा घरोबा आहे. आपण जामीन राहिला तर माझी सुटका होईल. खान मजकुरानें तसा अर्ज केला. बादशाहानें हुकूम दिला कीं, रामसिंग सीवास जामीन होता. तू कशाला जामीन राहतोस? त्याला सोडूं इच्छीत नाहीं.

३५

| | | |
|---|---|---|
| जु. ९ जखर ३० सोम. | اخبارات دربار معلے ماہ جمادی الثانے سنہ ۹ ۳۰ منہم یوم الاثناء | श. १५८८ पौष शुद्ध २ इ. १६६६ डिसेंबर १७ |

بہ محمد امین خان فرمودند کہ حسب الحکم از روئے اعتراضے بہ مرزا راجہ جئے سنگھ بنویسد کہ اخبار رسیدن سیوا از واقعہ بھاگ نگر بعرض رسیدہ و شما و واقع نویس ہیچ نہ نوشتہ حالا حقیقت آنجا مفصل معروض میداشتہ باشند—

मुहम्मद अमीनखानास हुकूम झाला कीं, मिर्झा राजा जयसिंगास इतराजीचा हस्बुलहुकूम लिहावा कीं, ‘सीवा पोंचल्याची बातमी भागानगरच्या वाक्यावरून समजली. तुम्ही व वाकेनवीस यांनीं मात्र कांहींच लिहिलें नाहीं. आतां तिकडील हकीकत तपशीलवार लिहीत जावी.’

३६

| | | |
|---|---|---|
| जु. ९ रज्जब २४ गुरु. | اخبارات دربار معلے ماہ رجب سنہ ۹ ۲۴ منہم یوم الخمس | श. १५८८ पौष वद्य ११ इ. १६६७ जानेवारी १० |

بہ بیگم صاحب فرمودند کہ ماما نجیو مرزا راجہ جئے سنگھ

نوشته اند که سیوا در ملک خود رسید او در اشارت راجه رفته
است حقیقت نمک حلالے واضح شد—

बेगमसाहेबास हुकूम झाला कीं, 'मीर्झा राजा जयसिंगाच्या मामानें लिहिलें कीं, सीवा स्वतःच्या मुलखांत पोंचला. तो राजाच्या इशारतीवरून गेला आहे. [ त्याचा ] एकनिष्ठपणा उघड झाला'.

३७

| | | |
|---|---|---|
| जु. ९ रज्जब २८<br>सोम. | اخبارات دربار معلے<br>ماه رجب سنه ۹<br>۲۸ مذهب یوم الاثنا | श. १५८८ पौष वद्य ३०<br>इ. १६६७ जानेवारी १४ |

نذر ملازمت منصبداران که از دکهن بحضور آمدند...جیواجی
دکهنی —

दख्खनमधून हुजुरास आलेल्या मनसबदारांनीं दिलेली भेट व नजर ···जीवाजी दखनी.

३८

| | | |
|---|---|---|
| जु. ९ शाबान ५<br>रवि. | سیاهه اخبارات دربار<br>معلے ماه شعبان المعظم<br>سنه ۹ ۵ مذهب یوم الاحد | श. १५८८ माघ शुद्ध ६<br>इ. १६६७ जानेवारी २० |

سری سواری طاهرخان بعرض رسانید که مرزا راجه
جئے سنگه خوب سردار است در دکهن کاری کرده در باب کنور
رام سنگه حضرت مهربانے فرمایند فرمودند که [ ما ] بدولت اعتبار
ایشان میکردیم که سیوا مقهور را حواله نموده بودیم باز بعرض
رسانید که خانه زاد موروثی است حکم شد چند روز باشد فهمیده
خواهم فرمود—

शाही फेरफटक्याच्या शेवटीं ताहिरखानानें अर्ज केला कीं, 'मिर्झा राजा जयसिंग हा चांगला सरदार आहे. त्यानें दक्षिणेंत कामगिरी केली आहे. कुवर रामसिंगाबाबत बादशाहानीं मेहेरबानगी करावी.' हुकूम झाला 'आम्ही त्याजवर विश्वास टाकला व सीवास त्याच्या हवाली केलें.' त्यावर त्यानें पुन्हा अर्ज केला कीं, 'हा घरचा आनुवंशिक चाकर आहे.' हुकूम झाला कीं, कांहीं दिवसांनंतर विचार करून सांगूं.

## ३९

जु. ९ शाबान १४
सोम. (मंगळ.)

سیاهم اخبارات دربار
معلے ماه شعبان المعظم
سنہ ۹ ۱۴ منہ یوم الاثناء

श. १५८९ माघ शुद्ध १५
इ. १६६७ जानेवारी २९

از واقعہ دکہن بعرض رسید کہ مہادجی خویش سیوا نواحی قلعہ چمار گونده وغیره تاخت کرده برد فرمودند بعد از مہم ایران فکر آنہا ہر اصیل نموده خواہد شد و فرمودند این فساد ہمہ از وقوف مرزا راجہ است اعتراضی فرمودند —

दख्खनच्या वाक्यावरून समजलें कीं, सीवाचा नातेवाईक महादजी हा किल्ले चमारगोंदा वगैरेच्या आसपासच्या प्रदेश लुटून घेऊन गेला. हुकूम झाला कीं, 'इराणच्या मोहिमेनंतर त्याकडे लक्ष देऊं. हें सर्व बंड मिर्झा राजाच्या माहितीनें चाललें आहे'. बादशाहानें इतराजी जाहीर केली.

## ४०

जु. ९ शाबान २२
बुध.

اخبارات دربار معلے
ماه شعبان المعظم سنہ ۹
۲۲ منہ یوم الاربعہ

श. १५८८ माघ वद्य ८
इ. १६६७ फेब्रुवारी ६

بعرض رسید کہ ہر گاه سیوا حضور در قید بود بمعرفت مولچند ساہوکار مروارید و ہون و اشرفی ہائے حوالہ قاصدان ساہوکار نموده روانہ وطن خود ساختہ بود چون سیوا گریخت قاصدان برگشتہ نزد ساہوکار مذکور آمدند مطاع مذکور بوسیلہ فدائی خان بنظر گذشت فرمودند حوالہ افتخار خان نمایند —

अर्ज आला कीं, सीवा हुजूरच्या कैदेंत होता: तेव्हां त्यानें मूलचंद सावकाराच्या मार्फत पोळें, होन व अश्रफ्या सावकाराच्या कासिदांच्या हवालीं करून आपल्या देशास पाठवल्या होत्या. सीवा पळाला तेव्हां सावकाराकडे कासीद परत आले. ती मालमत्ता फिदाईखानानें बादशाही नजरेखालीं घातली. हुकूम झाला कीं, ती सर्व इफ्तिखारखानाच्या हवाला करावी.

## ४१

जु. १० रमजान ५
मंगळ.

اخبارات دربار معلے
ماه فی رمضان المبارک
سنہ ۱۰ ۵ منہ
یوم الثلاث

श. १५८८ फाल्गुन शुद्ध ६
इ. १६६७ फेब्रुवारी १९

سورت سنگه رام داس ولد چوهن و بکر کشور و چوهن و روپا و مکند دیو و لعل داس این هفت کس مسلمان شدند از این ممر هفت کسان را هفت سروپا دادند —

सूरतसिंग, रामदास वलद चोहण, बकर ( ? ) किशोर, चोहन, रूपा, मुकुंददेव, लालदास हे सात लोक मुसलमान झाले. त्या सात लोकांना सात सरोपा दिले.

## ४२

| | | |
|---|---|---|
| जु. १० शव्वाल १६<br>शनि. (सोम.) | سیاهه اخبارات دربار معلے ماه شوال سنه ۱۰ ۱۶ منه یوم السبت | श. १५८९ चैत्र शुद्ध ३<br>इ. १६६७ एप्रील १ |

بمانسنگه ولد روپ سنگه راتهور فرمودند که شما بوطن بروید رخصت فرمایم و جمعیت خود را در دکهن بدستور سابق بحال باشد —

मानसिंग वलद रूपसिंग राठोड यास हुकूम झाला कीं, ‘ तुम्ही वतनास जावें. रजा देतों. स्वतःचे लोक पूर्वीप्रमाणें दक्षिणेंत ठेवावे’.

## ४३

| | | |
|---|---|---|
| जु. १० शव्वाल २१<br>शनि. | سیاهه اخبارات دربار معلے ماه شوال سنه ۱۰ ۲۱ منه یوم السبت | श. १५८९ चैत्र वद्य ८<br>इ. १६६७ एप्रिल ६ |

( ۱ ) از واقعه لشکر مرزا راجه جئے سنگه عرض رسید که جاسوس مرزا راجه جیو آوردند که سیوا مقهور سه ۳ هزار سوار پانزده هزار پیاده و گاوان بسیار گرفته جانب کلبرگه روانه شد معلوم نیست که کدام طرف خواهد رفت —

( ۲ ) به فدای خان فرمودند که محمد قلی عرف نیتوجی را تهانه داری پنج میر میفرمایم او را خبر رسانند عرض نمود او جائے خبر است این منصب کلان دارد برای همین میفرمایم که چند روز از آن سرحد واقف حال باشد بعد از یک سال تهانه داری غزنی خواهم فرمود —

मिर्झा राजा जयसिंगाच्या लश्करांतील वाक्यावरून समजलें तें असें- मिर्झा राजाच्या हेरांनीं बातमी आणली कीं, सीवा तीन हजार स्वार, पंधरा हजार प्यादे व पुष्कळ बैल घेऊन कलबर्ग्याकडे गेला. तो कुठें जाणार तें समजत नाहीं.

फिदाईखानास हुकूम झाला कीं, 'मुहम्मद् कुली उर्फ नेतोजी यास पंजमीरची ठाणेदारी फर्माविली आहे. त्यास तसें कळवावें'. त्यानें अर्ज केला कीं, त्याला तें माहीत आहे. [ त्यावर बाद्शाह म्हणाला ] 'ही मनसब मातबर आहे. त्यासाठींच सांगत आहे कीं, त्यानें कांहीं दिवस सरहद्दीबद्दल माहितगारी करून घ्यावी. एक वर्षानंतर गझनीची ठाणेदारी देईन'.

४४

| | | |
|---|---|---|
| जु. १० शव्वाल २४<br>मंगळ. | اخبارات دربار معلی<br>ماه شوال سنه ۱۰<br>۲۴ صفحه یوم الثلاث | श. १५८९ चैत्र वद्य ११<br>इ. १६६७ एप्रिल ९ |

به جمدة الملکے فرمودند که به متصدیان صوبه جات ممالک محروسه بر نگارند که آتشبازی مانع نماید به فولاد خان نیز حکم شد که در شهر منادی بگذارند که کسے آتشبازی ننماید —

जुम्दतुल्मुल्कास हुकूम केला कीं, देशांतील सर्व सुभ्यांतील मुत्सद्दी लोकांना लिहावें कीं शोभेच्या दारूचें काम मना करावें. फौलादखानासही हुकूम झाला कीं, शहरांत दौंडी पिटवून कोणीही दारूकाम करूं नये असें जाहीर करावें.

४५

| | | |
|---|---|---|
| जु. १० शव्वाल २५<br>बुध. | اخبارات دربار معلی<br>ماه شوال سنه ۱۰<br>۲۵ صفه یوم الاربعه | श. १५८८ चेत्र वद्य १२<br>इ. १६६७ एप्रिल १० |

عرضه داشت ممتاز خان قلعه دار پریندہ به عرض رسید که سیوا مقهور جانب کلبرگه رفته بود سرحدی بیجاپوری تاراج نموده بجائے خود آمد —

परिंड्याचा किल्लेदार मुमताजखान याचा अर्ज आला कीं, सीवा मकहूर कलबर्ग्याकडे गेला होता. [तो] विजापुरी सरहद्द लुटून परत आपल्या ठिकाणीं आला आहे.

४६

| | | |
|---|---|---|
| जु. १० शव्वाल २६ गुरु. | اخبارات دربار معلی<br>ماه شوال سنه ۱۰<br>۲۶ ماه یوم الخمس | श. १५८९ चैत्र वद्य १३<br>इ. १६६७ एप्रिल ११ |

( ۱ ) رگهپت گنیش چودهری متوطن سورت قرار مسلمانے نموده بود گرزبردار از حضور رفته مسلمان کرده آمد درین ولا حکم شد که گرزبرداری تعین نمایند که او را بحضور بیاورد —

( ۲ ) به اسد خان حکم شد که عزت خان وغیره تعیناں دکهن روانه نه شده اند محصلے (؟) بوده روانه نمایند —

( ۳ ) قبل ازین به قباد خان حکم شده بود که دو ماه در جاگیر مانده به دکهن برود درین ولا حکم شد یک ماه مانده —

( ۴ ) شیخ عبدل مومن فوجدار بهتور به جمدة الملکے نوشته بود که یکصد پنجاه نفر هندوان را مسلمان کردیم سروپا و نقد داده ایم فرمودند که با او مجری دهند —

( १ ) सुरतेचा रहिवासी रघुपत गणेश चौधरी यानें मुसलमान होण्याचें कबूल केलें होतें. हुजुराहून गुर्जबर्दार जाऊन त्यास मुसलमान करून आला. आतां त्याला आणण्यासाठीं गुर्जबर्दार नेमावा असा हुकूम झाला.

( २ ) असदखानास हुकूम झाला कीं, दख्खनवर नेमलेले इझ्झतखान वगैरे रवाना झाले नाहींत. अधिकारी पाठवून त्यांना रवाना करावें.

( ३ ) ह्यापूर्वी कुबादखानास हुकूम झाला होता कीं, दोन महिने जागीरींत राहून दख्खनला जावें. आतां हुकूम झाला कीं, एकच महिना रहावें.

बिठूरचा फौजदार शेख अब्दुल मोमीन यानें जुम्दतुलमुल्कास लिहिलें होतें कीं, आम्ही १५० हिंदूंना मुसलमान केलें आहे. त्यांना सरोपा व रोख पैसे दिले आहेत. हुकूम झाला कीं, हें मान्य करावें.

४७

| | | |
|---|---|---|
| जु. १० जिल्काद २ मंगळ. | سیاهه اخبارات دربار<br>معلی ماه ذی قعده سنه ۱۰<br>۲ ماه یوم الثلاث | श. १५८९ वैशाख शुद्ध ३<br>इ. १६६७ एप्रिल १६ |

شخصی درویش بعرض رسانید که مسلمانان از زکوة عاجز

بوده اند فرمودند بر مسلمان معاف نمودم جمدة الملکے بعرض رسانید کہ حضرت موافق عرض حکم فرموده اند فرمودند بہ مسلمان معاف از ہند و بگیرند —

एका दरवेशानें अर्ज केला कीं, मुसलमान लोक जकातीमुळें त्रासून गेले आहेत. हुकूम झाला कीं, मुसलमानांस जकात माफ केली आहे. जुम्दतुलमुल्कानें अर्ज केला कीं, बादशाहांनीं अर्जावर हुकूम केला आहे. हुकूम झाला कीं, मुसलमानांस माफ; पण हिंदूपासून जकात घ्यावी.

४८

| जु. १० जिलकाद ६ शनि. | اخبارات دربار معلے ماه ذی قعده سنہ ۱۰ ۶ منہ یوم السبت | श. १५८९ वैशाख शुद्ध ७ इ. १६६७ एप्रिल २० |
|---|---|---|

بہ جمدة الملک فرموده کہ وکیل سیوا را از قید خلاص کرده بدہد و سیوا را نیز خواہد نوشت کہ اگر ضامن معتبری دہد و پسر خود را حضور دارد آنرا تقصیر معاف نموده خواہد شد —

जुम्दतुलमुल्कास हुकूम केला कीं, सीवाच्या वकीलास कैदेंतून सोडावें. सीवास सुद्धा लिहावें कीं, विश्वास् जामीन दिलास आणि स्वतःच्या मुलास हुजूर ठेवलेंस तर तुझे अपराध माफ होतील.

४९

| जु. १० जिलकाद ७ रवि. | اخبارات دربار معلے ماه ذی قعده سنہ ۱۰ ۷ منہ یوم الاحد | श. १५८९ वैशाख ८ इ. १६६७ एप्रिल २१ |
|---|---|---|

(۱) تھکو وغیره چہار نفر قانون گوئی پرگنہ بہوری بروز شنبہ خود مسلمان شده سروپا داده —

(۲) فدای خان عرض رسانید کہ محمد قلے تعینات کابل بود او بے سرانجام است فرمودند موقوف دارند —

(۳) فدای خان عرض رسانید کہ محمد قلے عرف نیتوجی التماس دارد کہ ہمہ مردم سیوا از در قید خلاص دہد بہ بنده عنایت شوند کہ نوکر نگاه دارم فرمودند بہتر است بنظر ممالک [مبارک] گذرانیده نوکر نگاه دارند —

( १ ) परगणे भोरीच्या कानूनगोईकडील ठक्कर वगैरे चार लोक शनिवारीं मुसलमान झाले. त्यांना सरोपा दिला.

( २ ) फिदाईखानानें अर्ज केला कीं, मुहम्मद कुलीस काबुलांत नेमलें होतें. परंतु त्यास सरंजाम नाहीं. हुकूम झाला कीं, स्थगित करावें.

( ३ ) फिदाईखानानें अर्ज केला कीं, 'मुहम्मद कुलीखान उर्फ नेतोजी [ पालकर ] यानें विनंती केली कीं, सीवाच्या सर्व लोकांना कैदेंतून सोडून माझ्या ताब्यांत यावें म्हणजे [ मी ] त्यांस नोकर ठेवीन'. हुकूम झाला कीं, ठीक आहे. बादशाहाच्या नजरेस आणून मग नोकरींत घ्यावें.

५०

| | | |
|---|---|---|
| सितामऊ<br>जु. १० जिल्काद ८<br>शनि. (सोम.) | اخبارات درگاه معلی<br>ماه ذی القعده ۸ سنه<br>یوم السبت سنه ۱۰ | श. १५८९ वैशाख शुद्ध ९<br>इ. १६६७ एप्रिल २२ |

عرضداشت شیواجی آمد نوشته بود که بنده را در بودن بندگی و اطاعت بادشاه جیو نیکی و بزرگی بنده است و بالای من فوج بادشاه هندوستان تعین شد اینطور کسی در تمام عالم نیست که تاب آن فوج آوردن تواند و بنده عرض میکند که سنبهاجی فرزند من با جمعیت چهار صد سوار برکاب حضرت آمده خدمت بکند اگر او را منصب سرافراز شود بهتر و اگر منصب سرافراز نشود تاهم او بغیر منصب از جمعیت چهار صد سوار رکاب مانده همیشه خدمت میکرده باشد و آنچه بساط قلعه حصار پیش بنده بودند قبل از این پیشکش نموده ام و الحال آنچه قلعه حصار پیش اند آن قلعه‌ها هم و جان بنده حضرت را هست حضرت عرضداشت را خوانده حوالے جمدة الملکے نمودند حضرت فرمودند میر حسینی بخشی احدیان بروز عدالت در خلوت خانه می آمده باشد محمد امین خان عرض کرد ابوالضیاء دکهنی و اله افضل بهتیاره و اکرم خان عداوت است فرمودند اکرم خان را همراه شما تعین کرده ایم و ابوالفتح را به دکهن تعین نمایند —

مکرند وغیره چهار نفر مسلمان شدند قانون گوی پرگنه کوهری به آن ها بحال داشته چهار خلعت دادند —

शिवाजीचा अर्ज आला. त्यानें लिहिलें होतें कीं, 'बादशाहाच्या चाकरींत व सेवेंत असणें यांतच माझें कल्याण आहे. माझ्यावर हिंदुस्थानच्या बादशाहाची फौज नेमली आहे. त्या फौजेशीं सामना करूं शकणारी व्यक्ति सबंध जगांत कुठेंही नाहीं. मी अर्ज केला आहे कीं, माझा मुलगा संभाजी यानें चारशे स्वारांच्या जमेतीसह येऊन आपली चाकरी करावी. आपण त्यास मनसब दिली तर फारच छान होईल; मनसब दिली नाहींत तरी सुद्धा तो मनसबीशिवाय ४०० स्वारांसह आपल्याबरोबर राहून चाकरी करीत राहील. जे कांहीं कोटकिल्ले माझ्याजवळ होते ते मी या पूर्वींच पेशकश म्हणून दिले आहेत व सध्या जे कांहीं कोटकिल्ले मजकडे आहेत ते सर्व व माझा प्राण देखील बादशाहाचाच आहे'. बादशाहांनीं अर्ज वाचून जुम्द-तुलमुल्कास दिला व हुकूम केला कीं, अहदीचा बक्षी मीर हुसेनी यानें न्याय-कचेरीच्या दिवशीं खिलअतखान्यांत येत जावे. मुहम्मद अमीनखानानें अर्ज केला कीं, अबुलजिया दखनी वलद अफजल भटियारा व अक्रमखान यांचें शत्रुत्व आहे. हुकूम झाला कीं, अक्रमखानास तुझ्याबरोबर व अबुलफतह यास दक्षिणेंत नेमत आहे.

मकरंद वगैरे चार लोक मुसलमान झाले. परगणे खोहरी येथील कानूनगोई त्यांना दिली. चार खिलअत दिले.

## ५१

| | | |
|---|---|---|
| जु. १० जिल्कद १० बुध. | اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعده ۱۰ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۱۰ | श. १५८९ वैशाख शुद्ध ११<br>इ. १६६७ एप्रिल २४ |

فرمان بہ مرزا راجہ جئے سنگہ صادر شده حوالہ عاقل بیگ گرزبردار شده کہ چون شاہزاده محمد معظم در آنجا رسیده خود را بسرعت تمام یک ساعت آنجا توقف نکرده زود روانہ درگاه شود—

मिर्झा राजा जयसिंगास फर्मान सादर होऊन तो आकिलबेग गुर्जबर्दाराकडे देऊन [ सांगितलें ] कीं, शाहजादा मुहम्मद मुअज्जम तेथें येऊन पोंचतांच एक तासाचाही विलंब न करतां त्यानें स्वतः अतिशय जलदीनें दरबाराकडे रवाना व्हावें.

५२

सितामऊ
जु. १० जिल्काद २०
शनि.

اخبارات درگاه معلے
ماه ذی اقعده ۲۰ سنہ
یوم السبت ۱۰ سنہ

श. १५८९ वैशाख वद्य ७
इ. १६६७ मे ४

مرار کہتری مسلمان شد خلعت دادند پرمانند بقول قانونگو میرتہہ مسلمان شد سروپا دادند موہن داس کہتری مسلمان شد سروپا دادند —

मुरार खत्री मुसलमान झाला. त्यास खिलअत दिली. मेरठच्या कानूनगोच्या सांगण्यावरून परमानंद मुसलमान झाला. त्यास सरोपा दिला. मोहनदास खत्री मुसलमान झाला. त्यास सरोपा दिला.

५३

जु. १० जिल्काद २२
सोम.

اخبارات دربار معلے
ماه ذی قعده ۲۲ سنہ
یوم الاثناء سنہ ۱۰

श. १५८९ वैशाख वद्य ९
इ. १६६७ मे ६

به جمدة الملکے فرمودند کہ وکیل سیوارا طلبیده و دلاسائی نمایند و خرچی داده بواعده دو ماه او را نزد سیوا رخصت نمایند و او را بگویند کہ بہ صاحب خود رفتہ بگوید کہ تقصیر شما معاف فرمودیم و پسرش نوکر داشتہ شد و آنچہ ملک بیجاپوری گرفتہ سوای دیگری میشود بگیرد و الانہ بجاے خود مستقیم باشد و ہر محل کہ باشد بہ شاہزاده رجوع نماید حسب الحکم نوشتہ حوالہ وکیل او نمایند —

जुम्दतुल्मुल्कास हुकूम झाला कीं, "सीवाच्या वकिलास बोलावून त्यास दिलासा द्यावा, खर्चास देऊन दोन महिन्यांत परत येण्याच्या अटीवर सीवाकडे जाण्यास निरोप द्यावा व त्यास सांगावें कीं, स्वतःच्या मालकाकडे जाऊन त्यास कळवावें कीं, 'तुझे अपराध आम्ही माफ केले आहेत. तुझ्या मुलास चाकर ठेऊन घेतलें आहे. जो विजापुरी मुलूख काबीज करशील तो तुला देऊं. स्वतःच्या मुलखांतच कायम रहावें. तुजकडे असलेला प्रत्येक महाल शाहजाद्याकडे रुजू करावा.' असा हुकूम लिहून त्याच्या वकिलाकडे द्यावा."

५४

| | | |
|---|---|---|
| जु. १० जिल्काद २८ रवि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۲۸ سنه<br>یوم الاحد سنه ۱۰ | श. १५८९ वैशाख वद्य ३० इ. १६६७ मे १२ |

تاناجی ولد مهداجی زمیندار منگل بیره آورده داود خان به عبدالرحیم خان فرمودند که به صفخان بنویسند که او را به نظر شاهزاده محمد معظم بگذرانند —

दाउदखानानें मंगळवेढ्याचा जमीनदार तानाजी वलद महादाजी यांस आणलें. अब्दुर्रहीमखान यास हुकूम झाला कीं, सफखानास लिहावें कीं, त्यास मुहम्मद अअजमशाहाच्या नजरेखालून घालावें.

५५

| | | |
|---|---|---|
| जु. १० जिल्हेज १ बुध. | سیاهه اخبارات دربار<br>ماه ذی الحجه غره سنه<br>یوم الاربعه سنه ۱۰ | श. १५८९ ज्येष्ठ शुद्ध २ इ. १६६७ मे १५ |

قبل از این بعرض رسیده بود که یک زناردار ی نزد عبدالرزاق قاضی پرگنه بدایون آمده خوش رضائی مسلمان شده بود بهوده سقدار پرگنه مذکور نیز زناردار ی مذکور بر آمده قاضی را ناسزا گفته (کرده) بود بنا بران یک گرزبردار تعین شده بود گرزبردار مذکور بحضور آورده حواله قاضی عبدالوهاب فرموده بودند چنانچه قاضی مذکور تحقیق نموده و عرض رسانید که شقدار مذکور بواقعی تعدی نموده اظهار می نماید اگر جان بخشی داده چیزی پیدا میدهم (؟) حکم شد اگر مسلمان شود بهتر والا بجان بکشند درین ولا سقدار مذکور مسلمان شد —

داراب خان بعرض رسانید که مختار خان فوجدار پرینده خط به بنده نوشته است که از آن هنگامی که شاهزاده والا گهر محمد معظم از حضور رخصت این جانب شده است مردمان بیجاپوری و نیز مردم سیوا بسوے حد بادشاهی تاخت نمی کشند اگر مردم سیوا می آیند این راه بنده بر سرحدی بیجاپوری

میروند حکم شد اگر مردم سیوا بر بیجاپوری یه آن راه می روند
مزاحم آنها شود تا آن جانب آمد رفت کردن ندهند و از سرحد
خود خبردار باشد —

यापूर्वी अर्ज आला होता कीं, परगणे बदायून येथील एक ब्राह्मणी अब्दुर्रझ्झाक काजी याजकडे येऊन स्वखुशीनें मुसलमान झाली. भूधर शिकदार यानें येऊन काजीबद्दल अयोग्य शब्द काढले म्हणून एक गुर्जबर्दार नेमला होता. त्यानें या इसमास हुजूर आणून काजी अब्दुल् वह्हाब याच्या हवाला केलें. या काजीनें चौकशी करून अर्ज केला कीं, 'या इसमानें खरोखरच जुलूम केला पण तो सांगत आहे कीं 'मला जीवदान दिलें तर कांहीं मिळवून देईन.' हुकूम झाला कीं, 'तो मुसलमान होत असेल तर ठीक; नाहीं तर त्यास ठार करावें.' आतां तो मुसलमान झाला.

दाराबखानानें अर्ज केला कीं, परिंड्याचा किल्लेदार मुख्तारखान याचें मला पत्र आलें आहे. तो लिहितो 'मुहम्मद मुअज्जम हुजुराहून इकडे येण्यास निघाल्यापासून विजापुरी व सीवाचे लोक बादशाही मुलूख उद्ध्वस्त करीत आहेत. सीवाचे लोक या वाटेनें येऊन विजापूरचे सरहद्दीपर्यंत जातात'. हुकूम झाला कीं, सीवाचे लोक या वाटेनें येजा करीत असतील तर त्यांना अडवावें आणि सरहद्दीबद्दल खबरदार असावें.

५६

| | | |
|---|---|---|
| जु. १० जिल्हेज २<br>गुरु. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ذی الحجہ ۲ مذہر<br>یوم الخمس سنہ ۱۰ | श. १५८९ ज्येष्ठ शुद्ध ३<br>इ. १६६७ मे १६ |

جمدة الملکے بعرض رسانید کہ سیوا بوکیل خود خطے نوشتہ
بود و بجنس خطے مذکور پیش بردہ آوردہ مندرج بود کہ
سبحان سنگہ نوکر سیوا در سرحد بیجاپوری طرف تل کوکن قلعہ
انکر [؟] واقعہ است تاخت نمودہ در قبضہ تصرف خود آوردہ
بندگان حضرت شنیدہ خاموش ماندند —

जुम्दतुल्मुल्कानें अर्ज केला कीं, सीवानें स्वतःच्या वकीलास पत्र लिहिलें होतें. तें पत्रच तो घेऊन आला. त्यांत मजकूर असा होता 'त्याचा नोकर सुभानसिंग यानें विजापुरी हद्दींतील तळकोकण मधला अंकर किल्ला उद्ध्वस्त करून स्वतःच्या ताब्यांत घेतला' बादशाह ऐकून गप्प बसला.

५७

जु. १० जिल्हेज ३ शुक्र. | سیاهه اخبارات ماه ذی الحجه ۳ سنه ۱۰ یوم الجمعه | श. १५८९ ज्येष्ठ शुद्ध ४ इ. १६६७ मे १७

بجے سنگه و تمراج مسلمان شد خلعت —

विजयसिंग व तिमराज मुसलमान झाले. त्यांस पोशाख दिले.

५८

जु. १० जिल्हेज १२ रवि. | سیاهه اخبارات ماه ذی الحجه ۱۲ سنه ۱۰ یوم الاحد | श. १५८९ ज्येष्ठ शुद्ध १४ इ. १६६७ मे २६

ایلچی دورگنج باسم رستم خان خنجر شخصی گنگا رام مسلمان شد خلعت انعام

दूरगंज येथील वकील रुस्तुम मलन खंजर गंगाराम हा मुसलमान झाला. त्यास पोशाख दिला.

५९

जु. १० जिल्हेल १६ गुरु. | سیاهه وقایع دربار ماه ذی الحجه ۱۶ سنه ۱۰ یوم الخمس | श. १५८९ ज्येष्ठ वद्य ३ इ. १६६७ मे ३०

حکم معلی صادر شد که مردم چوکے نویسان هندو را برطرف نموده بجائے آنها خدمت مذکور بر مردم مسلمانان مقرر نمایند و خدمت امینی هفت چوکے نیز بر کسے تجویز باید کرد —

हिंदू चौकीलेखक लोकांना बडतर्फ करून त्यांचे जागीं मुसलमानांना नेमावें. हफ्त चौकीच्या अमीनीसाठींही कोणाची तरी तजवीज केली पाहिजे.

६०

जु. १० जिल्हेज १६ गुरु. | سیاهه اخبارات دربار ماه ذی الحجه ۱۶ سنه ۱۰ یوم الخمس | श. १५८९ ज्येष्ठ वद्य ३ इ. १६६७ मे ३०

زناردار پرگنه تهانه سر استغاثه شدند که پسران شیخ میر بوقت

آمدن از لاہور تالاب آنجا را جائے نشستن ہندوان مسمار نمودہ
آمدند پسران شیخ مذکور عرض نمودند کہ ہندوان بسیار بدعت
میکنند فرمودند تالاب را مسمار نمایند کہ آب در آنجا فراز نگیرند
(نگیرد) درین ضمن بختاورخان عرض نمود کہ او جاگیر ہوشدارخان
است وکیل او التماس دارد کہ بغیر از تالاب زراعت کم خواہم
[خواہد] شد نہ جاگیر تبدیل گردید نمیشد —

ठाणेसर परगण्यांतील ब्राह्मणांनीं तक्रार केली कीं, शेख मीर याच्या मुलांनीं लाहोरहून येते वेळीं तेथील तळयावरील हिंदूंच्या बसण्याची जागा उद्ध्वस्त केली. यावर शेखाच्या मुलांनीं अर्ज केला ‘हिंदू लोक फार अधर्माचार करतात, तेव्हां हुकूम झाला कीं, ‘तळें उद्ध्वस्त करावें म्हणजे त्यांत पाणी साठणार नाहीं.’ या बाबत बख्तावरखानानें अर्ज केला कीं, ती होश्दारखानाची जागीर आहे. त्याच्या वकीलाची विनंती आहे कीं, तळें उद्ध्वस्त केल्यास शेतीचें उत्पन्न कमी होईल. जागीर तर बदललेली नाहीं.

६१

| | | |
|---|---|---|
| जु. १० जिल्हेज १८<br>सोम. (शनि.) | سیاہہ وقایع دربار<br>ماہ ذی الحجہ ۱۸ سنہ<br>یوم الاثناء سنہ ۱۰ | श. १५८९ ज्येष्ठ वद्य ५<br>इ. १६६७ जून १ |

دو زناردار ساکن پرگنہ تہانہ سر آمدہ استغاثہ شدند کہ
میر ابراهیم وغیرہ پسران شیخ میر مرحوم بوگاہ کہ از جانب لاہور
برگشتہ می آمدند بر تالاب آنجا رفتہ تعدی بسیار نمودہ و حجرہ
ہائے فقیران را مسمار کنانیدہ بنابران قاضی آنجا را طلب نمودہ
بودند درین ولا قاضی مذکور حسب الحکم آمدہ ظاہر کردہ کہ
کلے بدعت می شود ہرچہ حکم شود حکم جہان مطاع صادر شد کہ
حسب الحکم بہ عبدالعزیزخان فوجدار آنجا بنویسند کہ آب تالاب
مذکور را از ہر چہار طرف بریدہ بدہد کہ پس از این مردم
ہندوان آنجا ہجوم نکنند —

परगणे ठाणेसर येथील दोन ब्राह्मणांनीं येऊन तक्रार केली कीं, शेख मीर मरहूम याच्या मीर इब्राहीम वगैरे मुलांनीं लाहोरहून परत येत असतांना तेथील तळयावर जाऊन जुलूम केला व फकीरांची राहण्याची जागा उद्ध्वस्त केली. म्हणून तेथील काजीस बोलाविलें. त्यानें येऊन जाहीर केलें कीं, तेथें

अधार्मिक कृत्यें होत असतात. तरी हुकूम व्हावा. बादशाहानें हुकूम केला कीं, 'तेथील फौजदार अब्दुल अझीझखान यास हस्बुलहुकूम लिहावा कीं, पाण्याचे तळें चारी बाजूंनीं फोडून टाकावें. म्हणजे यापुढें हिंदू लोक तेथें गोळा होणार नाहींत'.

## ६२

| | | |
|---|---|---|
| जु. १० जिल्हेज १९<br>रवि. | سیاهہ اخبارات<br>ماہ ذی حجہ ۱۹ منہ<br>یوم الاحد سنہ ۱۰ | श. १५८९ ज्येष्ठ वद्य ६<br>इ. १६६७ जून २ |

از واقعہ سورٹہ بعرض رسید کہ تماجی زمیندار کچھ از سی کروہ بر تھانہ کالیر تاخت کردہ بود ہفت کروہ از تھانہ مذکور آمدہ بسردارخان معہ جمعیت خود رخصت کردہ مقہوران را شکست دادہ —

सोरठच्या वृत्तपत्रावरून समजलें कीं, कच्छ येथील जमीनदार तिमाजी यानें तेथून तीन कोसांवर असलेलें कालेरचें ठाणें हल्ला करून उद्ध्वस्त केलें होतें. तेथून सात कोसांवर येऊन सरदारखानास स्वतःच्या लोकांसह रवाना करून शत्रूचा पराजय केला.

## ६३

| | | |
|---|---|---|
| जु. १० जिल्हेज २०<br>गरु. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماہ ذی الحجہ ۲۰ منہ<br>یوم الخمس سنہ ۱۰ | श. १५८९ ज्येष्ठ वद्य ७<br>इ. १६६७ जून ३ |

افتخارخان بعرض رسانید کہ امان اللہ داروغہ برف بہ بندہ خط نوشتہ اند کہ در آنجا امسال برف بسیار کم است در چہار ماہ بایشان خوراک وفا نخواہد کرد و گرد دامن کوہ جہتہ برف بسیار باریدہ اگر از آنجا طلب بود در چہار ماہ شانزدہ ہزار روپیہ خرچ میشود فرمودند براست باو نویسند کہ مبلغ بر آورد خرچ ساختہ در فرستادن برف کم نہ کند —

इफ्तिखारखानानें अर्ज केला कीं, बर्फाचा दारूगा अमानुल्लाह याचें मला पत्र आलें आहे. तो लिहितो 'या वर्षीं इकडे बर्फ अत्यंत कमी आहे. त्यांतून चार महिने देखील खुराकाचें संरक्षण होणार नाहीं. पहाडाच्या आसपास

खूपच बर्फ पडला आहे. तेथून मागवला तर चार महिन्यांत सोळा हजार रुपये खर्च होतील.' हुकूम झाला कीं, त्यास लिहावें 'रकम येत आहे. खर्च करावा. बर्फ पाठवण्यामध्यें कमतरता करूं नये.'

६४

| | | |
|---|---|---|
| जु. १० जिल्हेज २१ मंगळ. | سیاهہ وقایع دربار ماہ ذی الحجہ ۲۱ سنہ یوم الثلث ۱۰ سنہ | श. १५८९ ज्येष्ठ वद्य ८ इ. १६६७ जून ४ |

جمدة الملک جعفرخان بعرض رسانید کہ حضرت رحمت الہی اند و حق سبحانہ' تعالی پروردگار عالم است و شرم مسلمان و ہند و بحضرت است و مردم چوکے نویسان را برطرف نموده اند بے تقصیر اند در باب آنہا ہر چہ حکم شود بندگان حضرت تبسم نموده فرمودند کہ ما بدولت آنہا را از خدمت نہ کہ از نوکری برطرف فرموده ایم بخدمت ہائے دیگر سرافراز خواہیم فرمود و ہر کدام را از نظر اشرف بگذرانند —

जुम्द्तुलमुल्क जाफरखानानें अर्ज केला 'हजरत प्रत्यक्ष परमेश्वरी दया आहेत. सत्य व जग यांचें रक्षण करणारे आहेत. हिंदू व मुसलमान यांची अब्रू त्यांजपाशीं आहे. चोकीवरील लेखक लोकांना बडतर्फ केलें आहे. ते बेगुन्हा आहेत. त्यांचे बाबत हुकूम व्हावा' स्मित करून बादशाहानें 'त्यांना या सेवेंतून दूर केलें आहे. परंतु चाकरींतून नव्हे. दुसरीकडे चाकरीस ठेवावें व प्रत्येकास माझ्या नजरेपुढें आणावें' असा हुकूम केला.

६५

| | | |
|---|---|---|
| जु. १० जिल्हेज २२ बुध. | سیاهہ اخبارات دربار ماہ ذی الحجہ ۲۲ سنہ یوم الاربع سنہ ۱۰ | श. १५८९ ज्येष्ठ वद्य ९ इ. १६६७ जून ५ |

اسدخان عرض رسانید کہ نصرالله قلعہدار سروب گہره بارسیوا بہ بنده خط بوده کہ سہ صدی یک صد سوار سرفراز است امیدوارم کہ بجائے ذات دیگر اضافہ مرحمت شود و جاگیر در وطن تنخواه یابد حکم شد ضابطہ نیست کہ سہ صدی را پنجاہی اضافہ شود بیست سوار اضافہ مرحمت فرموده ایم —

असदखानानें अर्ज केला कीं, सीवाकडे (पूर्वी) असलेल्या सरूपगडाचा किल्लेदार नसरुल्लाह याचें पत्र आलें. त्यांत तो लिहितो 'मला २०० जात व १०० स्वार अशी मनसब आहे. आशा करतों कीं, जातीऐवजीं इतर वाढीची कृपा होईल. तनख्यासाठीं वतनांत जागीर द्यावी.' यावर हुकूम झाला कीं, २०० जात असणाऱ्यांना ५० ची वाढ द्यावी असा नियम नाहीं. २० स्वारांची वाढ फर्माविली.

## ६६

| | | |
|---|---|---|
| जु. १० मोहरम ३<br>रवि. | سیاهه وقایع دربار<br>ماه محرم الحرام ۳ منهه<br>یوم الاحد سنه ۱۰ | श. १५८९ आषाढ शुद्ध ५<br>इ. १६६७ जून १६ |

جمدة الملکے بعرض رسانید کہ تیج رائے امین پرگنات و کان جواہر متعلقہ صوبہ پٹنہ سرکار بدایون بہ بندہ خطے نوشتہ است کہ دریک کان یک الماس بوزن ہشتاد [سرخ] بر آمدہ است ہر چہ حکم شود حکم معلے صادر شدہ کہ حسب الحکم مشارالیہ بنویسید کہ معہ الماس خود را بحضور رساند —

जुम्दतुलमुल्कानें अर्ज केला कीं, पटणा सुभ्यापैकीं बदायून सरकारांतील परगणे व जवाहिराच्या खाणी यांचा अमीन तेजराय यानें मला पत्र लिहिलें कीं, (येथील) एका खाणींत ८० गुंजा वजनाचा हिरा सांपडला. या बाबत हुकूम व्हावा. 'हिरा घेऊन स्वतः हुजुरास यावें' असा हस्बुलहुकूम लिहिण्याची आज्ञा झाली.

## ६७

| | | |
|---|---|---|
| जु. १० मोहरम ५<br>मंगळ. | سیاهه وقایع دربار<br>ماه محرم الحرام ۵ منهه<br>یوم الثلث سنه ۱۰ | श. १५८९ आषाढ शुद्ध ७<br>इ. १६६७ जून १८ |

خواجہ بختاورخان بعرض رسانید کہ ہوشدارخان صوبہ دار اکبرآباد بہ بندہ خطے نوشتہ است کہ بہ عبدالعزیزخان سرہند حکم والا صادر شدہ است کہ تالاب تھانہ سر را بریدہ بدہد بنا بران مردم رعایا آنجا را بسیار بتنگ نمودہ است و مردم خلق اللہ از تالاب مذکور بسیار آرام می یافت ہرچہ حکم شود حکم معلے

صادر شده که سابق بیگم صاحب جیو نیز این معنی التماس نموده
بودند اکثر بدعت هائے که بے شکوه نموده است برطرف نمایند و
تالاب مذکور بحال باشد —

ख्वाजा बख्तावरखानानें अर्ज केला कीं अक्बराबादेचा सुभेदार होश्दारखान यानें मला पत्र लिहिलें आहे कीं, 'सरहिन्द्चा अब्दुल अझीझखान यास हुकूम झाला आहे कीं, ठाणेसरचा तलाव उद्ध्वस्त करावा. या कारणास्तव येथील प्रजा फार हवालदिल झाली आहे. लोकांना या तलावापासून खूपच फायदा मिळतो. म्हणून हुकूम मिळावा' हुकूम झाला कीं, याबाबत बेगम साहेबांनीं सुध्दा पूर्वी अर्ज केला होता. बहुतेक जुलूम तक्रारी शिवायच झाला आहे. त्या दूर कराव्या. तलाव पूर्ववत असावा.

६८

| | | |
|---|---|---|
| जु. १० मोहरम ७ गुरु. | سیاهه وقایع دربار<br>ماه محرم الحرام ۷ منهم<br>یوم الخمس سنه ۱۰ | श. १५८९ आषाढ शुद्ध ९<br>इ. १६६७ जून २० |

دلپت چند وغیره ۳ نفر بدگوجر شرف اسلام مشرف شدند
هر کدام را سروپه مرحمت نمودند —

बडगुजर जमातीचे दलपतचंद वगैरे तिघे मुसलमान झाले. प्रत्येकास सरोपा दिला.

६९

| | | |
|---|---|---|
| जु. १० मोहरम ९ शनि. | سیاهه وقایع دربار<br>ماه محرم الحرام ۹ منهم<br>یوم الثبت سنه ۱۰ | श. १५८९ आषाढ शुद्ध ११<br>इ. १६६७ जून २२ |

سید علے داروغه کتاب خانه بعرض رسانید که شاهنامه عالمگیری
بالفعل تیار نیست که به مهابت خان داده شود حکم شد که شاهنامه
فردوس آشیانے بالفعل بدهند و شاهنامه عالمگیری هرگاه تیار
خواهد شد از عقب فرستاده خواهد شد —

ग्रंथालयाचा अधिकारी सय्यिद् अली यानें अर्ज केला कीं, महाबत खानास देण्याजोगा शाहनामा-इ-आलमगीरी सध्या तयार नाहीं. तेव्हां 'शाहनामा-इ-फिर्दोस आशियानी (शाहजहाननामा) सध्या द्यावा. शाहनामा-इ-आलमगीरी तयार होईल तेव्हां मागाहून पाठविला जाईल.' असा हुकूम झाला.

७०

| | | |
|---|---|---|
| जु. १० मोहरम १८ सोम. | سیاهہ وقایع دربار<br>ماہ محرم الحرام ۱۸ سنہ<br>یوم الاثناء سنہ ۱۰ | श. १५८९ आषाढ वद्य ६<br>इ. १६६७ जुलै १ |

(۱) بہ شیخ نظام فرمودند کہ ما بدولت دعا میکنم ہیچ اثر نمیکند این موجب چیست عرض نمود کہ اگر مردم ہند و اہل خدمت اند و مصاحبت دارند ہمیشہ حضوری باشند بنا بران اثر نمیکند فرمودند کہ بجائے آنہا خدمت بہ مسلمانان باید فرمود —

(۲) عرضداشت رانا راجسنگہ رسید معروضداشتہ بود کہ پسر بندہ با دختر رام سنگہ ولد رتن راٹھور کدخدائی دارد و بنا بران جمعیت چہار ہزار سوار ہمراہ خانہ زاد خواہد رفت امیدواریم کہ درین باب کس از بندہائے بادشاہی مزاحم نشود بندگان حضرت بہ جمدۃ الملکے فرمودند کہ حسب الحکم بمشارالیہ بنویسید کہ این قدر جمعیت چہ درکار است قریب چہار صد یا پانصد سوار کافی است —

शेख निझाम यास हुकूम झाला कीं, 'आम्ही प्रार्थना करितों परंतु त्याचा कांहीं परिणाम होत नाहीं असें कां होते?' त्यानें अर्ज केला 'आपल्या चाकरींत हिंदू लोक आहेत व ते नेहमीं आपल्या बरोबर असतात; म्हणून कांहीं परिणाम होत नाहीं' त्यावर त्यांच्या ऐवजीं मुसलमान चाकरीस ठेवावेत असा हुकूम झाला.

राणा राजसिंगाची अर्जदाश्त आली. त्यांत त्यानें 'माझ्या मुलाचें रामसिंग वलद रतन राठोड याच्या मुलीशीं लग्न ठरलें आहे. त्यासाठीं माझ्या जवळची ४००० जमेत माझे बरोबर जाणार आहे. आशा करितों कीं, याबाबत बादशाही लोक हरकत करणार नाहींत' अशी विनंती केली होती. तेव्हां उपर्युक्तास 'एवढी मोठी जमेत कशासाठीं पाहिजे? चार-पाचशे स्वार पुरे आहेत' असा हस्बुलहुकूम पाठविण्याची जुम्दतुल्मुल्कास आज्ञा झाली.

७१

| | | |
|---|---|---|
| जु. १० सफर २ रवि. | سیاهہ وقایع دربار<br>ماہ صفر ۲ سنہ<br>یوم الاحد سنہ ۱۰ | श. १५८९ श्रावण शुद्ध ३<br>इ. १६६७ जुलै १४ |

یاد داشت منصب تولارام برادر دوارکا داس بعرض مکرر [؟]
میرسید بندگان حضرت فرمودند کہ برادر مشارالیہ کجا است
بعرض رسید کہ ہمراہ محمد امین خان تعینات شدہ رفتہ است
فرمودند کہ آنہا زناردارند بعرض رسید کہ زناردارند و سپاہی
خوب اند درین ضمن بختاورخان بعرض رسانید کہ بہان پروہت
فوجدار بہلیہ نیز زناردار است و اینہا درمیان خود ہا نسبت دارند
فرمودند کہ عمل بہان مذکور چہ طور است بعرض رسانید کہ
مشارالیہ بندوبست واقعی نمودہ است مردم زناردار سپاہی
خوب میشوند فرمودند کہ ما بدولت ہم می دانم کہ زناردار
سپاہی است —

द्वारकादासाचा भाऊ तोलाराम याच्या मनसबीसंबंधीं याददाश्त आली. हुकूम झाला कीं, उपर्युक्ताचा भाऊ कोठें आहे? अर्ज आला कीं, मुहम्मद अमीनखानाबरोबर गेला आहे. हुकूम झाला की, 'तो ब्राह्मण आहे कां?' त्यावर अर्ज आला, 'तो ब्राह्मण आहे व उत्तम शिपाई आहे.' म्हणून या बाबत बख्तावरखानानें अर्ज केला कीं, 'बहिलियाचा फौजदार भान पुरोहीत हाही ब्राह्मण आहे व त्यांचें नातें आहे.' त्यावर बादशाहानें विचारलें, 'त्याचा कारभार कसा आहे.' अर्ज आला. 'उपर्युक्तानें बंदोबस्त उत्तम केला आहे. ब्राह्मण चांगले शिपाई असूं शकतात.' बादशाह म्हणाला, 'ब्राह्मण शिपाई आहेत हें आम्हांस माहीत आहे.'

७२

| जु. १० सफर ७<br>शुक्र. | سیاہہ وقایع دربار<br>ماہ صفر ۷ جلوس<br>یوم الجمعہ سنہ ۱۰ | श. १५८९ श्रावण शुद्ध ९<br>इ. १६६७ जुलै १९ |
|---|---|---|

بہ جمدۃالملک جعفرخان فرمودند کہ شما نیز حسب الحکم
بعمدۃالملک مرزا راجہ بنویسند کہ خود را بہ لاہور رسانند و تا
دیگر مکرر حکم برسد آنجا نماید —

जुम्दतुलमुल्क जाफरखान यास हुकूम झाला कीं 'तू मिर्झा राजा यासही हस्बुलहुकूम लिहावा कीं 'स्वतः लाहोरास जावें व दुसरा हुकूम येईपर्यंत तेथें रहावें.'

७३

जु. १० सफर ८
मंगळ.

سیاهه وقایع دربار
ماه صفر ۸ منهم
یوم الثلث سنه ۱۰

श. १५८९ श्रावण शुद्ध १०
इ. १६६७ जुलै २०

به جمدة الملکی فرمودند که حسب الحکم به امانت خان فوجدار
حضرت اجمیر بنویسند که بعرض اشرف رسیده است که اکثر مردمان
راجپوتان در آن ضلع از تعلقانیان دکهن وقع الوقت نموده در وطن
خودها نشسته اند شما تاکید نماید آنها را روانه دکهن نمایند و
هر کس عذر به آرد اسم او را نوشته ارسال نماید که از منصب
و جاگیر برطرف خواهم فرمود —

जुम्दतुलमुल्कास हुकूम झाला कीं, अजमीरचा फौजदार अमानतखान यास हस्बुलहुकूम लिहावा कीं 'आम्हांला असें समजलें कीं, दक्षिणेंत नेमलेले बरेच रजपूत लोक संधी साधून स्वतःच्या वतनांत बसून राहिले आहेत. त्यांना तुम्ही ताकीद द्यावी व तिकडे पाठवून द्यावें. कोणी कांहीं सबब सांगेल त्याचें नांव लिहून कळवावें. त्याची मनसब व जागीर दूर करूं.'

७४

जु. १० सफर १२
बुध.

سیاهه وقایع دربار
ماه صفر ۱۲ منهم
یوم الاربعه سنه ۱۰

श. १५८९ श्रावण शुद्ध १४
इ. १६६७ जुलै २४

فدای خان عرض رسانیده بود که متعلقان محمد قلی عرف
نیتوجی هرگاه متصل اکبرآباد رسیدند هفت هزار هون بدزدی
رفت هرچه حکم شود حکم معلی صادر شده که حسب الحکم بهوشدار
خان بنویسند در فوجداری هر کسی بدزدی رفته تحقیق نموده
پیدا بکنانند —

فدائی خان بعرض رسانید که محمد قلی خان عرف نیتوجی
را بموجب حکم نزد کوچه‌ها مشارالیه فرستاده بودیم چنانچه
موصی الیه رفته آنها را رضامند ساخته و شرف اسلام شرف شدند
بندگان حضرت فرمودند که بهتر که نکاح کرده بدهد —

फिदाईखानानें अर्ज केला होता कीं, 'मुहम्मद कुली उर्फ नेतोजी याचे नातेवाईक जेव्हां अकबराबादेस पोहोचले तेव्हां सात हजार होन चोरीस गेले. हुकूम व्हावा.' 'ज्यानें चोरी केली असेल त्याचा फौजदारींतून शोध करून पत्ता लावावा व त्यास पकडून आणावें' असा होश्दारखानास हस्बुल-हुकूम लिहिण्याची आज्ञा केली.

फिदाईखानानें कळविलें कीं, मुहम्मद कुलीखान उर्फ नेतोजी यास हुकुमाप्रमाणें त्याच्या बायकांकडे पाठविलें होतें. त्याप्रमाणें जाऊन त्यानें त्यांचें मन वळविलें व मुसलमान केलें. बादशाह म्हणाला 'ठीक झालें त्यांचा निका लावून द्यावा'

७५

| | | |
|---|---|---|
| जु. १० सफर १५<br>मंगळ. | سیاهه وقایع دربار<br>ماه صفر ۱۵ صفره<br>یوم الثلث سنه ۱۰ | श. १५८९ श्रावण वद्य २<br>इ. १६६७ जुलै २७ |

عرض داشت نرسنگ جے دکهنی را روح الله خان بعرض رسانید که مشار الیه معروض داشته است که یک کرورسی ۳۰ لک دام در وجه وطن بنده تنخواه بود و از قدرنی تغیر نموده به داود خان تنخواه فرموده اند أمیدواریم که بحال فرمایند شنیده فرمودند که بعمدة الملکے بگویند که حقیقت مشار الیه بعرض رساند —

नरसिंगजी दखनी याचा अर्ज रूहुल्लाहखानानें गुदरला. त्यांत त्यानें 'माझे वतनाचे बाबतींत एक करोड तीस लाख दाम तनखा होता. माझेकडून बदलून तो दाऊदखान यास दिला आहे. आशा करितों कीं, तो मला बहाल होईल' असें लिहिलें होतें. त्यावर जुम्दतुलमुल्कास चौकशी करून अर्ज करण्याचा हुकूम झाला.

७६

| | | |
|---|---|---|
| जु. १० सफर १७<br>सोम. | سیاهه وقایع دربار<br>ماه صفر ۱۷ صفره<br>یوم الاثناء ۱۰ سنه | श. १५८९ श्रावण वद्य ४<br>इ. १६६७ जुलै २९ |

عرض داشت رندولہ خان دکهنی بمعرفت اسد خان بعرض رسید که بهائی واله افضل خان بیجاپوری بمنصب پانصدی ذات یک صد سوار سرافراز داشت و در جنگ دکهن بکار آمده چون

این اخبار شمشیر برادر مشارالیہ کہ نوکری بیجاپوری بود شنیدہ آزردہ شدہ بہ ارادہ بندگی پیش فقیر آمدہ بود بنابران او را روانہ درگاہ نمودہ ایم چون آن قابل و کار آمدنی است امیدوار است کہ سرافراز شود نیز عرض نمود کہ مشارالیہ بدرگاہ معلی رسیدہ درباب ملازمت ہرچہ حکم شود فرمودند کہ بساعت نیک آمدہ ملازمت نماید —

रणदूलहखान दखनी याचा अर्ज असदखानानें सादर केला. त्यांत त्यानें लिहिलें होतें कीं, 'बहाई वलद् अफजलखान विजापूरी यास ५०० जात, १०० स्वार अशी मनसब होती. तो दक्षिणेंत लढाईत कामास आला. विजापूरच्या नोकरींत असलेल्या त्याच्या भावास जेव्हां ही बातमी समजली तेव्हां तो कष्टी झाला. माझ्याकडे चाकरीसाठीं आला होता. त्यास हुजूर पाठविलें आहे. तो लायक व उपयुक्त आहे. आशा आहे कीं, त्यास मनसब मिळेल.' उपर्युक्त भाऊ दरबारांत पोचला व त्यानें चाकरीसाठीं अर्ज केला. त्यावर योग्य वेळीं येऊन चाकरी करावी असा हुकूम झाला.

७७

| | | |
|---|---|---|
| जु. १० सफर १८ मंगळ. | سیاھہ وقایع دربار<br>ماہ صفر ۱۸ جلوس<br>یوم الثلث سنہ ۱۰ | श. १५८९ श्रावण वद्य ५<br>इ. १६६७ जुलै ३० |

بہ بخشیان عظام حکم شدہ کہ یک فوج ہمراہ داودخان و یک فوج ہمراہ دلیرخان برای مہم بیجاپوری مقرر نمایند و راوبہادر سنگہ را حراول دلیرخان و راو رائی سنگہ را حراول داودخان مقرر نمودیم —

روح اللہ خان بعرض رسانید کہ دلیرخان بہ محمد امین خان خطی نوشتہ است کہ اودئی بہان و بیربہان کور در دکن بجنگ پورندرگدہ تردد تلاش بہ واقعی نمودہ اند و زخم تفنگ خوردہ در وطن ماندہ بودند امیدواریم کہ مطالبہ غیر حاضری بر ذمہ آنہا معاف شود حکم شد کہ آنہا تعیناتِ کابل بودند کہ چہار ماہ است کہ در وطن نشستہ ماندہ اند اگر بہ کابل میرفتند معاف می فرمودیم —

दाऊदखान याजबरोबर एक फौज व दिलेरखान याजबरोबर एक फौज विजापूरच्या मोहिमेसाठीं द्यावी. राव रायसिंग यास दाऊदखान याचा हरावल व राव बहादुरसिंग यास दिलेरखान याचा हरावल नेमावें असा श्रेष्ठ बक्षीला हुकूम झाला.

रूहुल्लाहखानानें अर्ज केला कीं, दिलेरखानानें मुहम्मद अमीनखानास पत्र लिहिलें आहे कीं, 'उदयभान व बीरभान गीर यांनीं दख्खनमध्यें पुरंदरच्या लढाईत खूप कष्ट केले. त्यांना बंदुकीची जखम झाली. स्वतःच्या गांवीं ते राहात होते. आशा आहे कीं, त्यांना गैरहजेरीची माफी होईल.' त्यावर हुकूम झाला कीं, 'त्यांना काबूलावर नेमलें होतें. पण चार महिने झाले ते स्वतःच्या गांवीं रहात आहेत. जर ते काबूलला रवाना झाले तर माफ होईल.'

७८

जु. १० सफर १९
बुध.

سیاہا وقایع دربار معلے
ماہ صفر ۱۹ صفر
یوم الاربعہ سنہ ۱۰

श. १५८९ श्रावण वद्य ६
इ. १६६७ जुलै ३१

درویش بیگ قاقسال معزول قلعدار فتح آباد عرف دہارور بمنصب ہزار و پانصدی ذات ہشت صد سوار سرافرازی داشت دو صد سوار بعد از تغیر خدمت کم نمودہ بودند درین ولا کہ مراتب مشار الیہ بعرض رسید پانصدی ذات دو صد سوار دیگر ہم کم نمودہ ہمراہ شاہزادہ مقرر فرمودند عبدالقدس ولد ہادی خان تعینات دکہن را طلب حضور فرمودند—

फतहाबाद उर्फ धारूरचा काढून टाकलेला किल्लेदार दरवेशबेग काकशाल यास १५०० जात व ८०० स्वार एवढी मनसब होती. पैकीं चाकरी तगीर केल्यामुळें २०० स्वार कमी केले होते. आतां त्याच्या मनसबीविषयीं अर्ज आल्यामुळें ५०० जात व २०० स्वार आणखी कमी करून त्यास शाहजाद्याकडे नेमलें. दख्खनमध्यें नेमलेला अब्दुल कुदस वलद हादीखान यास हुजूर येण्याचा हुकूम झाला.

७९

जु. १० सफर २०
गुरु.

سیاہہ وقایع دربار
ماہ صفر ۲۰ صفر
یوم الخمیس سنہ ۱۰

श. १५८९ श्रावण वद्य ७
इ १६६७ ऑगस्ट १

از واقع دکہن بعرض رسید کہ ترنبک جی دکہنی بہ منصب

هزاری ذات شست صدی سوار سرافرازی داشت بقضای الهی فوت شد —

दखनच्या वृत्तपत्रावरून समजलें कीं, त्रिंबकजी दखनी यास एक हजार जात व सहाशे स्वार अशी मनसब दिली होती. तो मरण पावला.

८०

| | | |
|---|---|---|
| जु. १० सफर २२ शनि. | سیاها وقایع دربار معلے ماه صفر ۲۲ صفر یوم الثبت سنه ۱۰ | श. १५८९ श्रावण वद्य ९ इ. १६६७ ऑगस्ट ३ |

به پرگنه انکوت مواضی یک کرور شصت لک دام در وجه وطن به ترنبک رائے دکھنی تنخواه بود ثانی الحال تغیر نموده بدیگری تنخواه نموده بودند درین ولا بموجب التماس مشارالیه بعرض رسیده بود که بحال شود بنا برآن شصت و هفت لک دام به موصی الیه بحال نموده باقی بدیگران بحال نمودند —

به اسد خان فرمودند که هرگاه فردوس اشیانے آصف خان مرحوم را برائے مهم بیجاپور رخصت نموده بودند چه قدر جمعیت همراه خان مذکور داده بودند نوشته بعرض رسانند —

त्रिंबकराय दखनी यास परगणे अंकोत (अकोट?) मधील गांवांपैकीं तनख्यासाठीं एक कोट साठ लाख दाम दिले जात होते. तदनंतर बदलून दुसऱ्यास दिले. आतां उपर्युक्तानें अर्ज केला कीं, ते पूर्वीप्रमाणें मला द्यावे. त्याप्रमाणें सदुसष्ट लाख दाम उपर्युक्तास बहाल करून बाकी इतरास बहाल केले.

असदखानास हुकूम केला कीं, फिरदोस आशियानीनें (शाहजहान) आसफखानास जेव्हां विजापूरच्या मोहिमेसाठीं पाठविलें होतें तेव्हां त्याच्या बरोबर किती लोक दिले होते तें कळवावें.

८१

| | | |
|---|---|---|
| जु. १० सफर २३ रवि. | سیاهه وقایع دربار ماه صفر ۲۳ صفر یوم الاحد سنه ۱۰ | श. १५८९ आश्विन वद्य १० इ. १६६७ ऑगस्ट ४ |

بموجب التماس وکیل رندولهخان دکھنی بعرض رسید که خان مشارالیه می خواهد که برائے کدخدائی به برهانپور بیاید فرمودند

کہ خان مذکور آمدہ است وکیل آن خبرندارد حسب الحکم او را
بنویسید کہ از کدخدای فارغ گشتہ بعد از برسات خود را پیش
شاہزادہ جیو رساند –

रणदुल्लाहखान दखनी याच्या वकीलाच्या विनंतीवरून समजलें कीं, उपर्युक्त खानास लग्नासाठीं बऱ्हाणपूरला यावयाची इच्छा आहे. हुकूम झाला कीं 'सदरहू खान आला आहे. वकीलास त्याची बातमी नाहीं. लग्नांतून मुक्त झाल्यावर पावसाळा संपला कीं, त्यानें बादशाहजाद्याकडे जावें म्हणून हुकूम द्यावा.'

८२

| जु. १० रवल १० बुध. | سیاہہ وقایع دربار<br>ماہ ربیع الاول ۱۰ منہ<br>یوم الاربعا سنہ ۱۰ | श. १५८९ भाद्रपद शुद्ध १३<br>इ. १६६७ ऑगस्ट २१ |
|---|---|---|

دیورای دکہنی را قبل ازین عمدة الملک مرزا راجہ جی سنگہ
چہار صدی ذات دو صد سوار بقرار ۳ ماہ تجویز کردہ بود در
حضور دوصد پنجاہی ذات یک صد سوار منظور شدہ بود باز
عمدة الملک نیم ماہ کم نمودہ چہار صدی دو صد سوار بحال کردہ
بود درین ولا بعرض رسید اعتراضی نمودہ بالکل برطرف فرمودند –

यापूर्वी उम्दतुलमुल्क मिर्झा राजा जयसिंग यानें देवराय दखनी यास ४०० जात व २०० स्वार तीन महिन्यांसाठीं दिले होते. हुजूरकडे २५० जात व १०० स्वार मंजूर झाले होते. नंतर उम्दतुलमुल्कनें त्यांतील अर्धा महिना कमी करून ४०० जात व २०० स्वार बहाल केले होते. असा अर्ज आला. हुकूम झाला कीं, इतराजी झाल्यामुळें पूर्णपणें बडतर्फ करावें.

८३

| जु. १० रवल ११ गुरु. | سیاہہ وقایع دربار<br>ماہ ربیع الاول ۱۱ منہ<br>یوم الخمس سنہ ۱۰ | श. १५८९ भाद्रपद शुद्ध १४<br>इ. १६६७ ऑगस्ट २२ |
|---|---|---|

بموجب عرضداشت نارو بہگونت دکنی بعرض رسید کہ پرگنہ
بالنبیر از تغیر قطب الدین خان بہ بندہ تنخواہ شدہ بود باز پرگنہ
مذکور بہ خان مشار الیہ تنخواہ گشتہ بنابران متصدیان خانمذکور

برائے مبلغ باز گردانیدن از بندہ طلب می نمایند و آنچہ کہ مبلغ تحصیل کردہ بودیم بہ طلب داران تنخواہ کردہ دادیم درین باب ہرچہ حکم شود حکم معلے صادر شدہ کہ آنچہ نارو مذکور تحصیل کردہ گرفتہ است حوالہ گماشتہائے خانمذکور نماید و آنچہ طلب نارو بہگونت باشد از سرکار والا بدہند—

नारो भगवंत दखनीचा अर्ज आला कीं, 'बाळबीड परगण्याचा तनखा कुत्बुद्दीनखानाकडून बदलून मला दिला होता. पुन्हा तो परगणा उपर्युक्त खानाकडे तनखा म्हणून दिला गेला. त्यामुळें खानाचे मुत्सद्दी पैसा परत मागण्यासाठीं मजजवळ आले व मागणी करीत आहेत. जी कांहीं रक्कम आम्ही गोळा केली होती ती ज्या त्या लोकांना तनखा म्हणून आम्ही दिली. या बाबत हुकूम व्हावा.' त्यावर 'नारो भगवंतानें जमा केलेली रक्कम खानाचे गुमास्त्यास द्यावी व त्याचे मागणीचे पैसे सरकारांतून द्यावे' असा हुकूम झाला.

## ८४

| जु. १० रवल ११ गुरु. | سیاہہ وقایع دربار<br>ماہ ربیع الاول ۱۱ جلوس<br>یوم الخمس سنہ ۱۰ | श. १५८९ भाद्रपद शुद्ध १४<br>इ. १६६७ ऑगस्ट २२ |
|---|---|---|

عبدالرحیم خان بعرض رسانید کہ صفی خان بہ بندہ خطے نوشتہ است کہ سیوا نوشتہ بود کہ بہ بندہ دیس موکی کہ مرحمت شدہ است مردم منصبداران مزاحم میشوند و اکثر رعایا نواحی قلعجات پیشکش بندہ مال واجبی ادا نمیکنند اگر بہ بندہ حکم شود تنبیہ نمودہ عمل بواقعی کردہ بدہد و خانہزاد کہ منصب پنج ہزار ذات پنج ہزار سوار سرافراز شدہ بود امیدوار است کہ جاگیر تنخواہ فرمایند ہرچہ حکم شود ثد کہ حسب الحکم بہ خانمذکور بنویسند کہ بہ سیوا بنویسد کہ گر کسی در حضور یا در صوبہ خدمت کردہ باشد تنخواہ دہند نہ در رکاب نہ در صوبہ حاضر باشد جاگیر و منصب چطور تنخواہ نمایند و برائے دیسموکہی مزاحم نشوند بہ مشارالیہ مرحمت نمودہ اند کہ از جملہ قلعجات پیشکش خود می گرفتہ باشد—

अब्दुर्रहीमखानानें अर्ज केला कीं, 'सफीखानानें मला पत्र लिहिलें आहे, 'सीवानें लिहिलें होतें कीं, मजवर देशमुखीची कृपा झाली आहे

त्यास मुत्सद्दी अडथळा आणीत आहेत. किल्ल्यांच्या भोवतालची बरीचशी प्रजा मला द्यावयाच्या पेशकशीचा योग्य पैसा देत नाहीं. जर मला हुकूम झाला तर त्यांना तंबी देऊन अमल बसवीन, खानेजाद ( मी ) पाच हजार जात व पाच हजार स्वार यांचा मनसबदार झाला होता. तो आशा करतों कीं तनख्याची जागीर मिळेल. तरी काय तो हुकूम व्हावा.' त्यावर 'खान मजकुरास हस्बुलहुकूम लिहावा कीं, त्यानें सीवास लिहावें "जर कोणी हुजुराकडे किंवा सुभ्यामध्यें चाकरी केली तर त्यास आम्ही तनखा देतो. ( तू ) हुजुराकडे चाकरीस नाहींस किंवा सुभ्यांत नाहींस. तेव्हां तुला जागीर आणि मनसब याचा तनखा कसा द्यावा ?" देशमुखींत अडथळा आणूं नये. उपर्युक्तावर तिची कृपा केली आहे. त्यानें एकूण किल्ल्यांची पेशकश स्वतः घेत रहावी ' असा हुकूम झाला.

८५

| | | |
|---|---|---|
| जु. १० रवल १३<br>शनि. | سیاهم وقایع دربار<br>ماه ربیع الاول ۱۳ سنہ<br>یوم السبت سنہ ۱۰ | श. १५८९ भाद्रपद वद्य १<br>इ. १६६७ आगस्ट २४ |

عاقل خان بعرض رسانید کہ اسفندیار منصبدار کہ ہمراہ عمدة الملک مرزا رجہ جئے سنگہ سزاول است بہ بندہ خطے نوشتہ است کہ عمدة الملک بتاریخ سیوم شہر حال از قلعہ اسیرگدہ کوچ نمودہ —

आकिलखानानें अर्ज केला कीं, उम्दतुल्मुल्क मिर्झा राजा जयसिंगा-बरोबर सजावल असलेला इसफंदियार मनसबदार यानें मला पत्र लिहिलें कीं, 'उम्दतुल्मुल्कानें या महिन्याच्या ३ तारखेस किल्ले असीरगडाहून कूच केलें.'

८६

| | | |
|---|---|---|
| जु. १० रवल १६<br>मंगळ. | سیاه وقایع دربار<br>ماه ربیع الاول ۱۶ سنہ<br>یوم الثلث سنہ ۱۰ | श. १५८९ भाद्रपद वद्य ४<br>इ. १६६७ आगस्ट २७ |

از واقعہ اورنگ آباد بعرض رسید کہ درویش بیگ کاکشال معزول قلعہدار دہارور تعینات آنجا بمنصب ہزاری ذات چہارصد سوار سرافرازی داشت بقضائے الہی فوت شد —

दरवेशबेग काकशाल यास १००० जात, ४०० स्वार अशी मनसब

होती. धारूर किल्ल्यावरून काढून टाकून त्यास औरंगबादेस नेमलेलें होतें. तो मरण पावला असें तेथील वृत्तपत्रावरून समजलें.

८७

| | | |
|---|---|---|
| जु. १० रवल २० शनि. | سیاه وقایع دربار<br>ماه ربیع الاول ۲۰ صفر<br>یوم السبت سنه ۱۰ | श. १५८९ भाद्रपद वद्य ८<br>इ. १६६७ आगस्ट ३१ |

هرگاه در خاص عام تشریف آوردند مردم امرایان در خاص عام نشسته بودند وقت برآمدن که از اندرون ایوان مابین عتبه پائین می آمدند درین ضمن بنظر مبارک افتادند بنابران حکم جهان مطاع شرف نفاذ یافت هر کس که در ایوان خاص عام از امرایان عظام بنشیند نه اشرفی جرمانه بگیرند–

बादशाह खास व आम यांमध्यें चालत आला तेव्हां अमीर लोक खास व आम कचेऱ्यांत बसलेले होते. राजवाड्यांतून दिवाणखान्यांत पायीं येतांना बादशाहाच्या हें नजरेस आलें. या कारणास्तव हुकूम झाला कीं, ‘मोठ्या अमीर लोकांपैकीं जो कोणी खास व आम यांमध्यें बसून राहील त्याजकडून ९ अश्रफी दंड घ्यावा.’

८८

| | | |
|---|---|---|
| जु. १० रवल २२ सोम. | سیاهه وقایع دربار<br>ماه ربیع الاول ۲۲ صفر<br>یوم الاثناء سنه ۱۰ | श. १५८९ भाद्रपद वद्य ९<br>इ. १६६७ सप्टेंबर २ |

از واقع دکن بعرض رسید که قلعه چاندور مرمت طلب است و حکم شده بود که باقی خان قلعدار آنجا مرمت نماید درین ولا بموجب نوشته خانمذکور بعرض رسید که یک بنده بادشاهی از حضور پرنور تعین شود که آمده مرمت بکناند بندگان حضرت فرمودند که مگر او بنده بادشاهی نیست که دیگری را تعین نمایند برآن از روئے اعتراضی یکصد سوار از جمله منصب هزاری ذات پانصد سوار کم نمودند–

दक्षिणेंतील वृत्तपत्रावरून समजलें कीं, चांदवडच्या किल्ल्याची दुरुस्ती करणें जरूर आह. त्यावर हुकूम झाला होता कीं, ‘किल्लेदार बाकीखान (?)

यानें दुरुस्ती करावी.' नंतर उपर्युक्त खानाचा अर्ज आला कीं, 'एक बादशाही नोकर त्यासाठीं नेमावा म्हणजे येथें येऊन तो दुरुस्ती करील.' त्यावर हुकूम झाला कीं, 'दुसरा नोकर नेमावयाचा म्हणजे तो बादशाही नोकर नाहीं काय?' यामुळें इतराजी होऊन त्याच्या एक हजार जात व पाचशे स्वार अशा मनसबींतून शंभर स्वार कमी केले.

## ८९

| | | |
|---|---|---|
| जु. १० रवल २३<br>मंगळ. | سیاهه وقایع دربار<br>ماه ربیع الاول ۲۳ سنه<br>یوم الثلاث سنه ۱۰ | श. १५८९ भाद्रपद वद्य १०<br>इ. १६६७ सप्टेंबर ३ |

جمدة الملکے جعفرخان بعرض رسانید که مرزا راجه جئے سنگه از نوکران عمده است و خانه زاد حضرت اند درین سال بمشارالیه بارانی مرحمت نه گشته است بحضرت روشن باشد فرمودند که بدهند باز عرض نمود که در باب خانه زاد کنور رام سنگه نیز سرافرازی ... بندگان حضرت شنیده فرمودند که مشارالیه را بجائے فرزند می خواستیم و درباب مشارالیه بسیار مهربانے هائے میفرمودیم و موصی الیه هیچو کار کرده است خان مشارالیه عرض نمود که آنها این چنین خانه زاد هستند که ازاین ها خطا شود و او بدبخت از بدبختی خود رفت باز به اسد خان فرمودند که مراتب مشارالیه بعرض رسانند چنانچه خان مذکور بعرض والا رسانید که به منصب چهار هزاری ذات چهار هزار سوار سرافرازی داشت و بعد از گریختن سیوا ۳ هزاری ذات ۳ هزاری سوار بحال فرموده بودند باز از روئے نامهربانے و اعتراضی برطرف نمودند فرمودند که الحال نیز ۳ هزاری ذات ۳ هزار سوار مقرر فرمودیم

شریعت پناه قاضی ابوالمکارم بعرض معلے رسانید که شخصے ولا (؟) نزد بنده آمده ظاهر نمود که متصل باره پوله مردم هندوان رفته که آنجا کالکا بتخانه هندوان است هجوم می نمایند و نیز هائے خواجه معین الدین و شاه مدار و سالار مسعود غازی نیز آنجا رفته هجوم می نمایند این تمام بدعت است می باید که شما غور این معنی نماید که درین باب هرچه حکم شود بنا بران به سیدی

فولاد خان فرمودند کہ یکصد بیلدار بفرستید کہ بت خانہ کالکا وغیرہ
کہ متصل بارہ پولہ و در فوجداری خود ہر جا کہ باشد مسمار نمایند
و نیزہا کہ میروند مقام نمی کردہ باشند —

जुम्दतुल्मुल्क जाफरखान यानें अर्ज केला कीं, 'मिर्झा राजा जयसिंग हा उमद्या नोकरांपैकीं आहे व बादशाहाचा खानाजाद आहे. या वर्षीं त्याजवर कृपा केली गेली नाहीं हें बादशाहांच्या लक्षांत यावें. त्यावर हुकूम झाला कीं, कृपा केली जाईल. अर्ज आला कीं, कुवर रामसिंगाचाही बहुमान व्हावा. बादशाहांनीं ऐकून हुकूम केला कीं, 'उपर्युक्तास मी मुलाचे जागीं समजत होतों व त्यावर मेहेरबानगीही पुष्कळ दाखविली. परंतु त्यानें असें कृत्य केलें.' खानानें अर्ज केला कीं, 'हा असा खानाजाद नाहीं कीं तो असलें कृत्य करील. आणि तो दुर्दैवी ( सीवा ) आपल्या दुर्दैवानें गेला.' नंतर आसफखानास हुकूम झाला कीं, 'उपर्युक्ताचे मानमरातिबासंबंधीं अर्ज करावा.' तेव्हां खानानें अर्ज केला कीं, त्याला चार हजार जात व चार हजार स्वार अशी मनसब होती. सीवा पळून गेल्यावर तीन हजार जात व तीन हजार स्वार अशी मनसब बहाल केली होती. नंतर इतराजी व गैरमर्जी होऊन बडतर्फ केला गेला हुकूम झाला कीं, आतां तीन हजार जात व तीन हजार स्वार अशी मनसब मुकर्र केली.

काजी अबुलमुकारम यानें अर्ज केला कीं 'एक मनुष्य आला व मला म्हणाला कीं, बारा पुला येथें हिंदूंचें कालिकेचें देऊळ आहे. हिंदू लोक तेथें एकत्र जमतात. ख्वाजा अमीनुद्दीन शाहमदार व सालार सऊद गाझी हेही भाले घेऊन जाऊन तेथें जमा होतात. हा मोठा जुलूम आहे. आपण याबाबत विचार करून काय तो हुकूम द्यावा.' तेव्हां सीदी फौलादखानास फर्माविलें की, 'बारा पुलाशीं संबंधित व स्वतःच्या फौजदारींतील कालिकेचें व इतर देवळें नष्ट करण्यासाठीं शंभर बेलदार पाठवावे आणि ख्वाजा अमीनुद्दीनाचे भाले ( घेऊन जाणारे लोक ) तेथें जातात त्यांनीं तेथें मुक्काम करूं नये.

९०

| जु. १० रवल २८ रवि. | سیاہہ اخبارات دربار معلی<br>ماہ ربیع الاول ۲۸ سنہ<br>یوم الاحد سنہ ۱۰ | श. १५८९ भाद्रपद वद्य ३०<br>इ. १६६७ सप्टेंबर ८ |
|---|---|---|

رائے لالچند بعرض رسانید کہ ولی بیگ گوندی قلعدار رایسین
بہ بندہ نوشتہ کہ سواری پنج زنجیر فیل از گولکندہ خریدہ طلب
داشتہ ام امیدواریم کہ اگر حکم شود فیلان مذکور پیش خود نگاہ

دارد فربہ کردہ روانہ درگاہ نماید ہرچہ امر شود فرمودند کہ حسب الحکم اورا بنویسید کہ فیلان را پیش خود نگاہ دارد و فربہ نمودہ روانہ درگاہ نماید —

राय लालचंद यानें अर्ज केला कीं, रायसीनचा किल्लेदार वली बेग गौंडी यानें मला लिहिलें तें असें–मी स्वारीच्या उपयोगी पाच हत्ती गोवळकोंड्याहून विकत मागविले आहेत. हुकूम झाला तर ते हत्ती स्वतः पाळीन व चांगले पोसून सरकारकडे पाठवीन. हुकूम व्हावा. हुकूम झाला कीं, ‘स्वतःकडे त्यानें हत्ती ठेवावे व पोसून दरबाराकडे पाठवावे’ असा हस्बुलहुकूम त्यास पाठवावा.

## ९१

| | | |
|---|---|---|
| जु. १० रवल २८ रवि. | سیاہہ اخبارات دربار ماہ ربیع الاول ۲۸ صفر یوم الاحد سنہ ۱۰ | श. १५८९ भाद्रपद वद्य ३० इ. १६६७ सप्टेंबर ८ |

بخشی الملک اسد خان عرض نمود کہ کنور رام سنگہ بہ بندہ رقعہ نوشتہ کہ از خلق اللہ افواہ چنان است کہ مرزا راجہ وفات یافتہ اگر در حضور پرنور خبر بواقعی باشد بہ بندہ آگاہی دہند کہ ماتم نمایم ہرچہ حکم فرمودند کہ گفتہ فرستند کہ مرزا راجہ فوت شدہ و از خواہش خدا چارہ ندارد ماتم نماید دیگر امرایان را حکم شد کہ برائے ماتم پرسی بروند —

बक्षीउलमुल्क असदखानानें अर्ज केला कीं, कुंवर रामसिंगानें मला पत्र लिहिलें आहे कीं, जनतेमध्यें अशी अफवा आहे कीं, मीर्झा राजा मरण पावले. जर हुजूराकडे खरी बातमी असेल तर मला कळवावें. म्हणजे मी सुतक पाळीन. हुकूम व्हावा. हुकूम झाला कीं, ‘त्यास निरोप पाठवावा कीं, मीर्झा राजे मरण पावले. परमेश्वरी इच्छेपुढें इलाज नाहीं.’ इतर उमरावांना हुकूम झाला कीं, त्यांनीं समाचारासाठीं जावें.

## ९२

| | | |
|---|---|---|
| जु. १० रखर ३ गुरु. | سیاہہ اخبارات دربار معلی ماہ ربیع الثانے ۳ صفر یوم الخمس سنہ ۱۰ | श. १५८९ आश्विन शुद्ध ५ इ. १६६७ सप्टेंबर १२ |

سیدی فولاد خان بعرض رسانید کہ ہرگاہ بمردم بیلداران حسب الحکم برائے مسمار ساختن [illegible] بمردم بیلداران حسب الحکم

براے مسمار ساختن ؟ کالکاہی رفتند و مسمار ساختن نمودند یک زناردار از آنجا شمشیر کشیدہ بر یک تماشگیر متصل کہ ایستادہ بود آن را کشت و باز بر سیدی ہم رسید و سہ ۳ زخم دار بودند و سیدی مذکور بر سری گرفتہ —

सीदी फौलादखानानें अर्ज केला कीं, हुकुमाप्रमाणें बेलदार लोक कालिकेचें देऊळ पाडण्यासाठीं गेले व त्यांनीं तें नष्ट केलें. तेव्हां एका ब्राह्मणानें तलवार उपसली व तेथें उभा असलेल्या एका बघ्यास ठार केलें व परत सीदीकडे आला. त्यानें तीन जखमी केले. सीदीनें त्यास डोकें धरून पकडलें होतें.

९३

| | | |
|---|---|---|
| जु. १० रखर ८ मंगळ. | سیاہہ وقایع دربار<br>ماہ ربیع الثانے ۸ سنہ<br>یوم الثلث سنہ ۱۰ | श. १५८९ आश्विन शुद्ध १०<br>इ. १६६७ सप्टेंबर १७ |

کیول رام نامی بوسیلہ شریعت پناہ مسلمان شد یک اشرفی و نہ روپیہ نذر گذرانید سروپا مرحمت نمودہ بخطاب کمال الدین سرافراز نمودند —

केवलराम हा शरीअत पन्हाच्या मध्यस्थीनें मुसलमान झाला. एक अश्रफी व नऊ रुपये नजर केले. त्याच्यावर पूर्णपणें कृपा करून त्यास सरोपा व ‘कमालुद्दीन’ ही पदवी देऊन त्याचा बहुमान केला.

९४

| | | |
|---|---|---|
| जु. १० रखर १७ गुरु. | سیاہہ وقایع دربار<br>ماہ ربیع الثانے ۱۷ سنہ<br>یوم الخمس سنہ ۱۰ | श. १५८९ आश्विन वद्य ४<br>इ १६६७ सप्टेंबर २६ |

از آنچہ نیزہ ہائے شاہ مدار و خواجہ معین الدین و سالار و سرور سلطان و پیر کانون (پیر پابو؟) وغیرہ بہ ہجوم میرفتند مانع حکم شد و ہر کس کہ بخواہد بزیارت برود و طواف نمودہ بیاید وغیرہ بدعت ہا آنچہ کہ باشد برطرف نمایند —

و مردم ہندوان و اکثر مسلمان برائے پرستش دیبی و برائے وظاہریف پیر و پابو بودہ میرفتند و ہجوم میکردند مانع فرمودند و مردم ہندوان بروند ہجوم نکنند و پرستش سیتلا نیز ہر جا کہ باشد دور سازند —

शाह मदार, ख्वाजा मुईनुद्दीन, सालार सुरूर सुलतान व पीर पाबू इत्यादींचे भाले एकत्र जमून जात असतां त्यांना मनाईचा हुकूम झाला. यात्रेसाठीं जाण्याची इच्छा असेल त्यानें प्रदक्षिणा घालून यावें व इतर अधर्माचार करावे असें इच्छितात त्यांस दूर करावें.

हिंदू व मुसलमान लोक देवीची पूजा व पीर पाबूचा जपजाप्य करण्यासाठीं जात व एकत्र जमत. त्यांना मनाई केली. हिंदू लोकांनीं जावें पण एकत्र जमूं नये. तसेंच जेथें जेथें शीतला देवीची पूजा होते तेथें तेथें ती थांबवावी.

९५

| | | |
|---|---|---|
| जु. १० रखर १७<br>गुरु. | اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الثانی ۱۷ سنہ<br>یوم الخمس سنہ ۱۰ | श. १५८९ आश्विन वद्य ४<br>इ. १६६७ सप्टेंबर २६ |

قلعہ ناگپور را نام بھاگپور نهادند رستم را جاگیردار و فوجدار بھاگپور نمودند—

پنجرای کهتری مسلمان شد خلعت دادند—

नागपूरच्या किल्ल्यास भागपूर हें नांव दिलें. रुस्तुमास भागपूरचा जहागीरदार व फौजदार नेमिलें.

पंजराय खत्री मुसलमान झाला. त्यास खिलअत दिला.

९६

| | | |
|---|---|---|
| सितामऊ<br>जु. ११ रखर १८ ?<br>रवि. (मंगळ.) ? | اخبارات درگاه معلی<br>ماه ربیع الثانی ۱۸ سنہ<br>یوم الاحد سنہ ۱۱ | श. १५८९ आश्विन वद्य ५<br>इ. १६६७ सप्टेंबर २७ |

نواب جمدة الملکی جعفرخان مطلب (مطالب) عرض داشت دلیرخان کہ چیزی باقی عرض نمودن مانده بود در این روز معلوم کرد بموجب ذیل دلیر خان نوشتہ بود کہ عقب زمیندار اسلام نگر عرف دیوگده بنده هائی بادشاهی بہ کرویدگی بسیار دستگیر نموده ازاین ممر اسپان امراوان و سپاهیان بسیار مرده اند و آن ها جملہ تردد و تلاش خوب نمودند ازاین ممر امیدواریم کہ چهار صد اسپ ترکی پنجاه اسپ عربی مرحمت نمایند کہ آنها را داده شود

پرسرام وغیره پنج نفر هندوان مسلمان شدند پنج کس را پنج خلعت دادند—

जाफरखानानें दिलेरखानाच्या अर्जापैकीं कांहीं भाग शिल्लक राहिला होता तो आज सांगितला. 'पूर्वी इस्लामनगर उर्फ देवगड येथील जमीनदारानें अनेक बादशाही चाकरांना करवीदगीनें (?) पकडलें होतें. यामुळें उमरावांचे घोडे व अनेक शिपाई मरण पावले. त्यांनीं खूप कष्ट मेहनत केली आहे. या कारणास्तव आशा करितों कीं, ४०० तुर्की व ५० अर्बी घोडे देण्याची कृपा व्हावी; म्हणजे त्यांना दिले जातील' अशी त्यांत दिलेरखानानें विनंती केली होती.

परशराम वगैरे पाच हिंदू मुसलमान झाले; त्यांना पाच खिलअत दिले.

९७

जु. १० रखर २०
रवि.

سیاهہ وقایع دربار
ماہ ربیع الثانے ۲۰ سنہ
یوم الاحد سنہ ۱۰

श. १५८९ आश्विन वद्य ७
इ. १६६७ सप्टेंबर २९

از واقعہ دکھن دیروز بعرض رسید کہ بیرم خان ولد قزلباش خان مرحوم کہ بخدمت قلعہ داری دہارور بمنصب ہزار پانصدی ذات ہفصد سوار سرافرازی داشت بقضائے الہی فوت [شد] بنا بران خدمت مذکور را از انتقال مرحومی بہ اسمعیل خان ولد نجابت خان مرحوم باضافہ سرافراز نمودہ مقرر فرمودند–

فدائی خان بعرض رسانیدہ بود کہ محمد قلے خان عرف نیتوجی را تہانہ داری غوربند مقرر گشتہ و ساہوکاران پانزدہ ہزار روپیہ در ماہ بموجی الیہ میدادند آنہا اظہار مینمایند کہ حالا حضرت خان مشار الیہ را تہانہ داری مذکور مقرر نمودہ اند و جاگیر او از ہندوستان تغیر خواہد شد مبلغ این بندہ چہ طور وصول خواہند شد درین باب ہرچہ حکم شود حکم معلے صادر شدہ کہ جاگیر او را بدستور سابق بحال فرمودیم—

कालच्या दक्षिणेकडील वृत्तपत्रावरून समजलें कीं, धारूरच्या किल्लेदारीवर असलेला आणि १५०० जात व ७०० स्वार यांचा मनसबदार बीरमखान वलद कजलबाशखान हा मरण पावला. म्हणून उपर्युक्त चाकरीवर इस्माईलखान वलद नजाबतखान यास वाढ देऊन नेमलें.

फिदाईखानानें अर्ज केला होता कीं, 'मुहम्मद कुलीखान उर्फ नेतोजी यास घोरबंदची ठाणेदारी दिली. उपर्युक्तास सावकार दरमहा १५०० रुपये देत असतात. त्यांनीं जाहीर केलें कीं, उपर्युक्त खानास ठाणेदारीवर नेमलें

आहे. त्याची हिंदुस्थानांतील जागीर बदलली जाईल. तेव्हां आमची रक्कम वसूल कशी होईल ? या बाबत काय तो हुकूम व्हावा.' त्यावर त्याची जागीर त्यास पूर्वीप्रमाणें बहाल केली आहे असा हुकूम झाला.

## ९८

| | | |
|---|---|---|
| जु. १० रखर २३<br>बुध. | سیاهه وقایع دربار<br>ماه ربع الثانی ۲۳ سنه<br>یوم الاربعه سنه ۱۰ | श. १५८९ आश्विन वद्य १०<br>इ. १६६७ आक्टोबर २ |

چون خدمت قلعه داری فتح آباد عرف دهارور از انتقال بیرم خان مرحوم به اسمعیل خان تجویز نموده بودند درین ولا خان مشار الیه موقوف نموده به جان سپار خان مقرر نمودند —

बीरमखानाच्या मृत्यूमुळें फतहाबाद उर्फ धारूर येथील किल्लेदारीवर इस्माईलखान याच्या नेमणुकीची तजवीज झाली होती. नंतर ती स्थगित करून आतां जानसिपारखान यांस नेमलें.

## ९९

| | | |
|---|---|---|
| जु. १० रखर २४<br>गुरु. | سیاهه وقایع دربار<br>ماه ربیع الثانی ۲۴ سنه<br>یوم الخمس سنه ۱۰ | श. १५८९ आश्विन वद्य ११<br>इ. १६६७ आक्टोबर ३ |

عرضداشت شاهزاده محمد معظم بعرض رسید که سیوا به بنده خطی نوشته است که بنده خانه زاد درگاه است و سنبهاجی خانه زاد بمنصب پنجهزاری ذات پنجهزار سوار سرفرازی یافته بود و تنخواه نیافته الحال امیدواریم که به تقصیر فدوی معاف نموده منصب مشار الیه بحال داشته جاگیر تنخواه فرمایند و خانه زاد را هر جا که حکم شود خدمت نماید چون مشار الیه درین روزها بسیار دلسوزی مینماید امیدواریم که تقصیر مشار الیه معاف گردد و منصب سنبهاجی بدستور سابق بحال شود بندگان حضرت مطالعه نموده حواله جمدة الملکی فرمودند که منصب سنبهاجی بحال خود فرموديم و آنچه قلعه جات ... پیش کش مومی الیه اند در آنجا جاگیر تنخواه نمایند و پیش شاهزاده جیو خدمت نماید —

शाहजादा मुहम्मद मुअज्जम याचा अर्ज आला. त्यांत लिहिलें आहे कीं, सीवाचें मजकडे पत्र आलें त्यांत त्यानें 'मी सरकारचा खानाजाद नोकर आहे. संभास पाच हजार जात व पाच हजार स्वार अशी मनसब मिळाली होती. परंतु तनखा मिळाला नाहीं. आतां आशा करतों कीं, माझ्या चुकीची माफी होऊन उपर्युक्त मनसब बहाल करून तनख्या-संबंधीचा हुकूम होईल. मला जेथें चाकरी करण्याचा हुकूम होईल तेथें मी चाकरी करीन' असें लिहिलें होतें. हल्ली उपर्युक्त दुःखी असल्यानें त्याच्या चुकीची माफी होऊन संभाजीची मनसब पूर्वीप्रमाणें बहाल केली जावी. बादशाहानें पाहणी केल्यानंतर जुम्दतुल्मुल्कास फर्माविलें कीं, संभाजीची मनसब बहाल केली आहे व उपर्युक्ताकडे पेशकश म्हणून जे किल्ले बहाल आहेत तेथील जागीरीतून तनखा द्यावा. त्यानें शाहजाद्याकडे जाऊन चाकरी करावी.

१००

| | | |
|---|---|---|
| जु. १० रखर २४<br>गुरु. | سیاهه وقایع دربار<br>ماه ربیع الثانی ۲۴ صفر<br>یوم الخمس سنه ۱۰ | श. १५८९ आश्विन वद्य ११<br>इ. १६६७ आक्टोबर ३ |

فدائی خان بعرض رسانید که محمد قلی خان عرف نیتوجی
داغ و تصحیحه خود را پوره نه کرده است و محلکه (مچلکه) نداده
و مشار الیه را تعینات غوربند میفرمایند درین باب هرچه حکم
شود حکم شده که آنچه تصحیحه باقی مانده در صوبه لاهور داده
پیشتر برود و قلم را معاف نمودیم و آنچه سند اسناد مومی الیه
بسبب داغ نامه بداند [میدارد] مزاحم نشوند—

फिदाईखानाचा अर्ज आला कीं, मुहम्मद कुलीखान उर्फ नेतोजी यानें आपल्या घोड्यावर डाग देणें व शिक्के मारणें यांचा तपशील व मुचलका दिले नाहींत. आपण उपर्युक्तास घोरबंदवर नेमलें आहे. या बाबतींत हुकूम व्हावा. हुकूम झाला कीं, शिक्के मारण्याचा तपशील राहिला असेल तो त्यानें लाहोर सुभ्यांत देऊन पुढें जावें आणि त्यास घोड्यांची माफी केली आहे. उपर्युक्ताजवळ डागनाम्याबद्दल सनदा असतील त्यांत अडथळा आणूं नये.

१०१

| जु. १० रखर २६ शनि. | سیاهہ وقایع دربار ماه ربیع الثانے ۲۶ سنہ یوم السبت سنہ ۱۰ | श. १५८९ आश्विन वद्य १३ इ. १६६७ आक्टोबर ५ |
|---|---|---|

از روئے واقعہ لشکر محمد امین خان بعرض رسید کہ خان مشار الیہ دیوان نموده نشستہ بود کہ قباد خان نیز در مجلس نشستہ و ہفصدی و ہشتصدی و نہصدی پیش بخشی الملکے ایستاده بودند قباد خان از بخشی الملک گفت کہ اینها ہم بنده ہائے بادشاہی اند و عزت طلب اند بگویند کہ بنشینند خان مشار الیہ بدماغ شده گفت کہ شما را چہ افتاده است شما را جائے نشستن کرده اند قباد خان جواب داد کہ بنده ہمراه سرداران مانده است و راه روشن آنها دیده ایم و از عنایت بادشاہانہ امید واریم کہ جائے نشستن ہم خواہم شد غرض درمیان ہردو نفاق افتاده گفت گوی کرده بدیره خود ہائے رفتند بندگان حضرت شنیده بہ جمدة الملکے فرمودند کہ خان مشار الیہ از مردم ہمراہی بسیار بد سلوکی نموده کہ نا رضامند ساختہ در باب قباد خان فرمان صادر نمایند کہ شما تعینات دکھن اید خود را آنجا رسانند

मुहम्मद अमीनखानाच्या फौजेंतील वृत्तपत्रावरून समजलें कीं, खान मजकूर कचेरी भरवून बसला होता. कुबादखानही तेथें बसला होता. सातशें, आठशें व नउशें स्वारांचे मानकरी बक्षीउलमुल्कासमोर उभे होते. कुबादखान बक्षीउलमुल्कास म्हणाला कीं, 'हे सुद्धा बादशाही चाकर आहेत व आदरायोग्य आहेत. त्यांना बसण्यास सांगावें.' त्यावर खान मजकूर चिडून म्हणाला 'तुम्हांला काय करावयाचें आहे? तुम्हाला बसावयाला जागा दिली आहे.' कुबादखानानें उत्तर दिलें कीं, 'मी सरदारांच्या बरोबर राहिलों आहे व त्यांचें वैभव बघितलें आहे, बादशाही कृपेनें आशा करितों कीं, त्यांनाही बसण्यास जागा द्याल.' यामुळें दोघांमध्यें मतभेद होऊन बाचाबाची झाली. नंतर ते आपआपल्या डेऱ्यांत गेले. बादशाहांनीं ऐकून उम्दतुलमुल्कास हुकूम केला कीं, 'उपर्युक्त खानानें अत्यंत वाईट वर्तन केलें. त्यामुळें इतराजी निर्माण केली.' कुबादखानाबाबत फर्मान सादर करावें कीं, 'तुला दक्षिणेंत नेमलें आहे तिकडे जावें.'

१०२

| | | |
|---|---|---|
| जु. १० जवल २ गुरु. | سیاهه وقایع دربار<br>ماه جمادی الاول ۲ سنه<br>یوم الخمس سنه ۱۰ | श. १५८९ कार्तिक शुद्ध ३<br>इ. १६६७ आक्टोबर १० |

بموجب نوشته شاهزاده محمد معظم بعرض رسید که سابق هم نوکران سیوا بموجب حکم معلی از قید جا بجا خلاصی شدند و سبحان سنگه و بیربهان از نوکران عمده مشار الیه بودند و آنها از قید خلاصی نشده اند امیدواریم که آنها نیز خلاص یابند درین باب هرچه حکم شود حکم شده که حسب الحکم به وزیر خان صوبه دار مالوه بنویسند که آنها را هم از قید خلاص نماید —

शाहजादा मुहम्मद मुअज्जम याच्या लिहिण्यावरून समजलें कीं, ' पूर्वी हुकुमाप्रमाणें ठिकठिकाणीं कैदेंत असलेल्या शिवाजीच्या सर्व नोकरांची सुटका झाली. सुबहानसिंग व वीरभान हे उपयुक्तांपैकीं उत्तम नोकर होते. त्यांना कैदेंतून सोडलेलें नाहीं. आशा करतों कीं, त्यांचीही सुटका होईल. याबाबत हुकूम व्हावा. ' हुकूम आला कीं, ' हुकुमाप्रमाणें माळव्याचा सुभेदार वजीरखान यास हस्बुलहुकूम लिहावा कीं, त्यांनाही कैदेंतून मुक्त करावें. '

१०३

| | | |
|---|---|---|
| जु. १० जवल ४ शनि. | سیاهه وقایع دربار<br>ماه جمادی الاول ۴ سنه<br>یوم السبت سنه ۱۰ | श. १५८९ कार्तिक शुद्ध ६<br>इ. १६६७ आक्टोबर १२ |

به عاقل خان فرمودند که ما بدولت سعادت قدام عدالت میفرمایم و هرچند که کوشش مینمایم و مردم فریادی کم نمی شود موجب نیست و شما هم چیزی اطلاع دارید که این چه سبب است عرض نمود که تمام معاملات حضرت بر شریعت مقرر نموده اند و هر کس که دروغی است در شاهد آورده معامله را درپیش برند و حق بحقدار نمی رسد و مردم حقداران عاجز شده بدرگاه می آید دیگر کجا بروند تا آنکه در توره رجوع نشوند مردم دروغی را چشم نمائی نشود حق به حقدار نمی رسد فرمودند که بواقعی همین طور است حالا همچنان باید کرد —

आकिलखानास हुकूम झाला कीं, ‘ आम्ही पूर्वीपासून न्यायालय भरवतों व खूप प्रयत्न करतों. परंतु फिर्यादी लोकांची संख्या कमी होत नाहीं. प्रत्येक दिवशीं ती वाढतच आहे. हें कसें तें समजत नाहीं. परंतु हें ठीक नाहीं. तुला याचें कांहीं माहीत आहे कां ? ’ त्यानें अर्ज केला ‘ बादशाह सर्व गोष्टी धर्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें करतात. जो कोणी खोटेपणानें वागतो तो पुरावा दाखल करून दावा पुढें माडतो. यामुळें खऱ्या हक्कदारास न्याय मिळत नाही व खरी बाजू असणारे लोक असहाय्यपणें दरबारांत येतात. जोंवर कायद्याप्रमाणें ते वागत नाहींत व खोटेपणास शिक्षा होत नाहीं तोंवर ते दुसरीकडे कुठें जाणार ? बादशाहांनीं फर्माविलें कीं, ‘ खरोखर असें असेल तर आतां असेंच केलें पाहिजे. ’

१०४

जु. १० जवल ८
बुध.

سیاهه وقایع دربار
ماه جمادی الاول ۸ سنه
یوم الاربعه سنه ۱۰

श. १५८९ कार्तिक शुद्ध १०
इ. १६६७ आक्टोबर १६

بموجب نوشته دلیرخان عرض والا رسید که قادرداد خان
پونار و تحصیلدار پیشکش زمیندار چانده وغیره بمنصب هزاری
ذات هشتصد سوار از آنجمله چهارصد سوار دو اسپه سه اسپه
سرافراز است چون مرد قابل و کار آمدنی است امیدوار است
که باضافه دو صد سوار سربلند شود درین باب هرچه حکم شود
حکم معلے شرف نفاذ یافت که منصب سابق کافی است خدائے
تعالی برکت دهد —

दिलेरखानाच्या लिहिल्यावरून समजलें कीं, ‘ चांद्याच्या जमीनदाराच्या पेशकशीचा तहसीलदार व पवनार येथील कादरदादखान यास हजार जात व आठशें स्वार–यांपैकीं चारशें स्वार दोन घोड्यांचे व तीन घोड्यांचे–असा बहुमान आहे. तो अत्यंत लायक व उपयुक्त मनुष्य आहे. त्यास दोनशें स्वारांची वाढ द्याल अशी आशा करितों. याबाबत हुकूम व्हावा. ’ हुकूम झाला कीं, पूर्वींची मनसब पुरेशी आहे. त्यांतच परमेश्वर बरकत देईल.

१०५

जु. १० जवल ९
गुरु.

سیاهه وقایع دربار
ماه جمادی الاول ۹ سنه
یوم الخمیس سنه ۱۰

श. १५८९ कार्तिक शुद्ध ११
इ. १६६७ आक्टोबर १७

محمد قلی عرف نیتوجی بعرض والا رسانید که کوکوجی از
نوکران سیوا پیش رائے بہان فوجدار بہلسہ در قید است مرد قابل
و کار آمدنی است و سپاہی خوب است چنان نشود که پیش سیوا
برود و لائق منصب است بنا بران بجمدة الملک فرمودند که فرمان
بدان مذکور صادر نمایند که او از قید خلاص نموده بدرگاه بفرستند
و دو صد روپیه راه خرچی بدهد و یک گرز بردار نیز تعین نمایند
که تسلی و دلاسائی او نموده بدرگاه بیارد —

मुहम्मह कुली उर्फ नेताजी याचा अर्ज आला कीं, ‘सीवाचा नोकर कोकोजी भेलशाचा फौजदार रायभान याच्या कैदेंत आहे. लायक व उपयुक्त मनुष्य आहे. उत्तम शिपाई आहे. तो सीवाकडे परत जाईल असें होऊं देऊं नये. मनसब देण्यालायक आहे.’ तेव्हां जुम्दतुल्मुल्कास हुकूम झाला कीं, ‘त्याला कैदेंतून सोडून देऊन दरबाराकडे पाठवावें. अशा आशयाचें फर्मान धाडावें. वाटखर्चास दोनशें रुपये द्यावे व त्यास दिलासा देऊन दरबारांत आणण्यासाठीं एक गुर्जबर्दारही नेमावा.’

१०६

जु. १० जवल ११ शनि. } سیاهه وقایع دربار<br>ماه جمادی الاول ۱۱ سنه<br>یوم السبت سنه ۱۰ { श. १५८९ कार्तिक शुद्ध १३<br>इ. १६६७ आक्टोबर १९

محمد قلی خان عرف نیتوجی را بر کابل رخصت فرمودند
سروپا خلعت اسپ معه ساز طلاء زنجیر فیل ماده معه حوده چوبی
علم عدد —

मुहम्मद कुलीखान उर्फ नेतोजी यास सरोपा, पोशाख, सोन्याच्या साजाचा घोडा, लाकडी हौद्यासह हत्तीण व झेंडा देऊन काबूलला जाण्यास निरोप दिला.

१०७

जु. १० जवल २६ रवि. } سیاهه وقایع دربار<br>ماه جمادی الاول ۲۶ سنه<br>یوم الاحد سنه ۱۰ { श. १५८९ कार्तिक वद्य १२<br>इ. १६६७ नोव्हेंबर ३

قاضی حسین قاضی جونپور بعرض رسانید که مردم ہندوان
در راه دکهن وغیره تالاب چاه و بائین غسل مینمایند و در

کوٹھری ہاے رسوئی میکنند بنا بران آب آنجا و کوٹھری ہائے ناپاک میشود بنابران حکم شد کہ متصدیان صوبہ جات بنویسند کہ احتیاط تمام نمایند —

जौनपूरचा काजी हुसेन यानें कळविलें कीं, 'दख्खन वगैरेच्या वाटेवर हिंदू लोक तळयांत व विहिरींत आंघोळ करतात, कोठींत स्वयंपाक करतात, त्यामुळें तेथील पाणी व कोठी अपवित्र होतात,' हुकूम झाला कीं, त्या सुभ्यांतील मुत्सद्दयांस लिहावें कीं त्यांना समज द्यावी.

१०८

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. ११ शाबान २४<br>रवि. | اخبارات درگاہ معلے<br>ماہ شعبان ۲۴ سنہ<br>یوم الاحد سنہ ۱۰ | श. १५९० पौष वद्य १०<br>इ. १६६९. जानेवारी १७ |

مکرمت خان دیوان دکہن طرح قلعہ شولاپور نوشتہ فرستادہ بود بادشاہ جیو نظر خود دیدہ حوالہ جمدۃ الملکے نمودند —

दख्खनचा दिवाण मक्रमतखान यानें सोलापूरचा नकाशा काढून पाठविला होता. बादशाहानें तो पाहून जुम्दतुल्मुल्काच्या स्वाधीन केला.

१०९

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. १२ रज्जब २१<br>सोम. | اخبارات درگاہ معلے<br>ماہ رجب المرجب ۲۱ سنہ<br>یوم الاثناء سنہ ۱۲ | श. १५९१ मार्गशीर्ष वद्य ८<br>इ. १६६९ डिसेंबर ५ |

ہریرام وغیرہ سہ نفر مسلمان شدند ہرسہ را خلعت دادند —

۲۷ سنہ بموجب نوشتہ غیاث الدین خان بخشی دکہن عرض رسید کہ سبحان جیو وغیرہ چہار نفر برادران شیواجی دکہنی ملازم درگاہ والا بودند تعیناتِ دکہن بودند آن چہار کسان از در اینجا فراری شد رفتند اسم آنہا حسب ذیل —

سبحان جیو ہزاری پانصد سوار — نروجیو ہزاری پانصد سوار — بیجوجی ہزاری پانصد سوار — تاجو جیو ہزاری پانصد سوار —

दख्खनचा बक्षी घियासुद्दीनखान याच्या लिहिण्यावरून समजलें कीं, शिवाजी दखनीचे चार भाऊ सुभानजीराव वगैरे येथून पळून गेले. ते बादशाही चाकर असून दक्षिणेंत नेमलेले होते. त्यांची नांवें सुभानजी, नरोजी, बैजोजी व ताजोजी. या प्रत्येकास हजार जात व पांचशें स्वार एवढी मनसब होती.

## ११०

| | | |
|---|---|---|
| सिता | اخبارات درگاه معلی | श. १५९१ माघ शुद्ध १० |
| जु. १३ रमजान ८ | ماه رمضان ۸ سنه | इ. १६७० जानेवारी २० |
| मंगळ. | یوم الثلث جلوس سنه ۱۳ | |

به لطف الله خان فرمودند که شما حسب الحکم به داود خان بنویسند که هرجا که شیوا غنیم بیایند همونجا رفته او را سزا دهند خلعت زمستانے بموجب ذیل مرحمت فرمودند —

लुत्फुल्लाहखानास हुकूम झाला. ‘दाऊदखानास हस्बुलहुकूम लिहावा कीं, सीवा येईल तेथें तेथें जाऊन त्यास शिक्षा करावी. हिवाळी खिलअती दिल्या.

## १११

| | | |
|---|---|---|
| सिता | اخبارات درگاه معلی | श. १५९१ माघ शुद्ध १२ |
| जु. १३ रमजान १० | ماه رمضان ۱۰ سنه | इ. १६७० जानेवारी २२ |
| गुरु. | یوم الخمس سنه ۱۳ | |

یک خشت طلاء دوصد تولچه را و یک خشت نقراء سی صد تولچه را بشریف سلطان ایلچی بخارا را انعام دادند —

बुखारा येथील वकील शरीफ सुलतान यास दोनशे तोळयांची सोन्याची एक वीट व तीनशे तोळयांची चांदीची वीट बक्षीस दिली.

## ११२

| | | |
|---|---|---|
| सिता | اخبارات دربار معلی | श. १५९१ माघ शुद्ध १४ |
| जु. १३ रमजान १२ | ماه رمضان ۱۲ سنه | इ. १६७० जानेवारी २४ |
| शनि. | یوم السبت سنه ۱۳ | |

عرض داشت محمد اشرف دیوان خاندیش آمده نوشته بود که ملک برار فوج سیوا غنیم آمده لوت میدماید و بیست لک سکه پول سیاه بابت خزانه بادشاهی در پرگنه هاے خالصه اند بحضرت روشن باشد بادشاه جیو شنیده باسدخان فرمودند که خانزمان را بنویسد که اگر شما فوج غنیم را در برار آمده شنیدید تا شما اسلام گده عرف دیوگده چرا آمدید و حالا آن بیست لک سکه در برهانپور رساند و اگر آن سکه ها را مردم غنیم خواهند برد آن را جواب شما خواهد کرد از آنجا خبردار شوند

عرضداشت برخوردارخان قلعه‌دار آوسه آمد نوشته بود که سوار [و] پیاده بیست هزار فوج سیوا غنیم در این ملک آمده لوت میکنند و تحصیل مینمایند و حالا متصل این قلعه دو کروه دیره اند میخواهند که این جا هم آمده افتند این خبر بنده شنیده قلعه آوسه را که جابجا شکسته بود مرمت کنانیده و توپخانه را بالای قلعه نهاده تزک نموده هوشیار شدیم بعد آنها به آمدن درگزر کرده رفتند اما جاگیر فدوی جمله تحصیل نموده لوت کرده خراب ساخته رفتند از این ممر بدست بنده چیزی حاصل نیامده پریشان احوال امیدواریم که چیزی پرداخت رعایت نمایند حضرت شنیده فرمودند مشارالیه واجب الرعایت است اما این چنین کسان بسیار اند جمله کسان التماس خواهند شد کدام کدام کسی را رعایت خواهم کرد رعایت کردن نمی توانم -

खानदेशाचा दिवाण मुहम्मद अश्रफ याचा अर्ज आला. त्यानें लिहिलें होतें कीं, ‘ सीवाची फौज वऱ्हाडांत येऊन लुटालूट करीत होती. बादशाही खजिन्यांतील वीस लक्षांचें तांब्याचें नाणें खालसाच्या ( सरकारी ) परगण्यांत आहे तें बादशाहांना माहीतच आहे.’ हें ऐकून बादशाहानें असद्खानास हुकूम केला कीं, ‘ खान झमान यास लिहावें कीं, शत्रूची फौज वऱ्हाडांत येत आहे हें तू ऐकलें होतेंस तर इस्लामगड उर्फ देवगड येथें कां गेलास ? सध्या ती वीस लक्षाची रकम बुर्हानपुरास पोंचवावी. शत्रूनें ती लुटली तर तुला जाब द्यावा लागेल. त्याबद्दल सावध असावें. ’

औशाचा किल्लेदार बर्खूर्दारखान याचा अर्ज आला. त्यांत त्यानें लिहिलें आहे तें असें — सीवाचे वीस हजार स्वार व पायदळ या प्रांतांत येऊन लुटालूट करीत आहेत [ चौथ ] वसूल करीत आहेत. सध्या या किल्लय पासून दोन कोसांवर डेरे दिले आहेत त्यांचा असा विचार आहे कीं, येथें येऊन हल्ला करावा मला ही बातमी समजल्यावर ठिकठिकाणीं पडझड झालेल्या औसा किल्लयाची दुरुस्ती केली. तसेंच तोफखाना किल्ल्यावर नेऊन लढाईच्या तयारीनें ठेवला. मी सावध आहे. त्यानंतर त्यांनीं इकडे येण्याचें सोडून दुसरीकडे पलायन केलें. परंतु माझ्या जहागिरींतला सर्व वसूल लुटून नेऊन व तींत फार खराबी करून गेले. यामुळें माझ्या हातीं कांहीही आलें नाहीं. माझी परिस्थिती बिकट आहे. तेव्हां आशा करितों कीं, माझ्यावर काहीं कृपा होईल.’ बादशाहानें हें ऐकून हुकूम दिला कीं, ‘ उपर्युक्त कृपेस पात्र आहे परंतु याजसारखे अनेक लोक आहेत. सर्व लोकांनीं अशी विनंति केली तर कुणाकुणावर कृपा करावी ? म्हणून मी कृपा करूं शकत नाहीं. ’

...५...

११३

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. १३ रमजान १३<br>रवि. | اخبارات دربار معلی<br>ماه رمضان ۱۳ سنه<br>یوم الاحد سنه ۱۳ | श. १५९१ माघ शुद्ध १५<br>इ. १६७० जानेवारी २५ |

حضرت بدیانت خان فرمودند بنجومیان بگویند که ساعت روانه
شدن دکهن دیده معلوم نمایند در ماه شوال ببینند ماه شوال از
پهاگن شد تیز شروع خواهد شد -

همت خان عرض نمود که اگر دو هزار سوار همراه نیک نام
خان براے کومک او بروند تا او در بگلانه تردد نیک وجه نماید
بادشاه جیو فرمودند که نیک نام خان را بنویسد که اگر هلال خان -
را بکومک خود بخواهند تا اورا بنویسیم که کومک نماید و باز حکم
کردند که یک هزار سوار براے کومک نیک نام خان از حضور
بفرستند -

دو هندو مسلمان شدند دو خلعت دادند —

दियानतखानास हुकूम झाला कीं, 'ज्योतिषांना सांगणें कीं, दक्षिणेस जाण्यासाठीं शव्वाल महिन्यांत चांगली वेळ पहावी. हा फाल्गून शुद्ध तृतीयेपासून सुरू होईल.'

हिम्मतखानानें अर्ज केला कीं, 'नेकनामखानाबरोबर दोन हजार स्वारांची कुमक पाठविली तर तो बागलाणांत अत्यंत चांगली कामगिरी करील.' हुकूम झाला कीं, 'नेकनामखानास लिहावें कीं, त्यास हिलालखानाची कुमक पाहिजे असेल तर त्यास आम्ही तसें लिहू.' शिवाय हुकूम झाला कीं, नेकनामखानास एक हजार स्वारांची कुमक हुजुराहून पाठवावी.

दोन हिंदू मुसलमान झाले. त्यांस दोन खिलत दिले.

११४

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. १३ रमजान १५<br>मंगळ. | اخبارات دربار معلی<br>ماه رمضان ۱۵ سنه<br>یوم الثلث سنه ۱۳ | श. १५९१ माघ वद्य २<br>इ. १६७० जानेवारी २७ |

عرضداشت صف شکن خان که آورده بود گذرانید نوشته بود
که حسب الحکم حضرت سرانجام نموده براے رفتن برار موجود شده
بودیم درین وقت [خط*] شاهزاده جیو بنده آمد نوشته بودند که

فوج غنیم در بگلانہ رفتہ اسپ شما بگلانہ بروند براو نخواہد رفت
از این ممر بطرف بگلانہ روانہ شدیم حضرت شنیدہ [خاموش*]
ماندند و مبلغ پانصد روپیہ بگرزبردار بخشیدند و دو صد روپیہ
بوکیل صف شکن خان سپردند کہ بہ آقاے خود سپارد —

واقعہ نویس سورت بحکم اشرف لوٹ سورت را تحقیق نمودہ
نوشتہ مبلغ ہاے نقد و مروارید وغیرہ جنس مبلغ پنجاہ سہ لک
روپیہ مردمان سیوا بابت سورت لوٹ کردند و سوای این مبلغ
سیزدہ لک روپیہ را لوٹ بابت نول ساہو ہری ساہو و یک موضع
نزدیک سورت بود آنہا را لوٹ شدہ جملہ لوٹ مبلغ شصت شش
لک روپیہ را شدہ —

सफशिकनखानाचा अर्ज आला होता तो नजरेखालून घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, 'हस्बुलहुकुमाप्रमाणें सरंजाम करून वऱ्हाडांत जाण्यासाठीं तयार झालों होतों. त्या वेळीं शाहजाद्यानें मला लिहिलें होतें कीं, शत्रूची फौज बागलाणांत गेली आहे. तू तिकडे जावें. वऱ्हाडांत जाऊं नये. म्हणून मी बागलाणास रवाना झालों' बादशाह ऐकून [ गप्प ] बसला. गुर्जबर्दारास पांचशें रुपये बक्षीस दिले व सफशिकनखानाच्या वकिलास दोनशें रुपये त्याच्या मालकास देण्यासाठीं दिले.

सुरत येथील वाकनिसानें हुकुमाप्रमाणें चौकशी करून कळविलें कीं, तेथील लुटींत रोख रकम व पोवळीं वगैरे जिन्नस मिळून त्रेपन्न लाख रुपयांची रक्कम सीवाच्या लोकांनीं नेली. याशिवाय नवल साहू व हरि साहू तसेंच सुरते-जवळचें एक खेडें यांजकडून तेरा लाख रुपयांची रकम नेली. एकूण लूट सहासष्ट लक्ष रुपये झाली.

६६५

| | | |
|---|---|---|
| सिता | اخبارات دربار معلی | श. १५९१ माघ वद्य ३ |
| जु. १३ रमजान १७ | ماہ رمضان ١٧ سنہ | इ. १६७० जानेवारी २९ |
| गुरु. | یوم الخمس سنہ ١٣ | |

عرضداشت نیک نام خان آمد براے چند التماس واجب العرض
نوشتہ بود بموجب ذیل معلوم شد جواب فرمودند اول آنکہ
سوار پیادہ بیست ہزار بابت شیوا غنیم آمدہ قلعہ سلطان گدہ را
گرد کردند بعدہ قابو یافتہ کمندہا رسہ بر قلعہ انداختہ بالای قلعہ
مردم غنیم رفتند فتح اللہ خان قلعہ دار بدر آمد اورا کشتند بعدہ

خسرپوره او بمردمان غنیم ملاقی شده قلعه بمردم غنیم سپرده اما
حالا اگر قطب الدین خان خویشی که حکم شود از آمدن او قلعه
را از پیش غنیم باز واپس گرفته شود بادشاه جیو شنیده به اسد
خان فرمودند که نیک نام خان را بنویسد داود خان را حکم صادر
شده است او آمده علاج انجا خواهد نمود دویم آنکه از طرف
قلعه اورنگ گده و چولاگده و هول گده هم خاطر جمع نیست بادشاه
جیو شنیده به اسد خان فرمودند که نیک نام خان را بنویسد که
داود خان آمده علاج اینهارا هم خواهد کرد سیوم آنکه رسد
غله در این جا نمی رسد براے رسانیدن رسد غله بمتصدیان
خاندیس حکم صادر شود که رسد غله برسانند بادشاه جیو فرمودند
که بمتصدیان خاندیس بنویسد که رسد غله به نیک نام خان می
رسانیده باشد به محمد اشرف دیوان خاندیس را بنویسد که مبلغ
پنجاه هزار روپیه به نیک نام خان فوجدار بگلانه را بفرستند و همراه
او جمعیت مهاراجه جسونت سنگه بدهند که پیش او برسانند که
سرانجام سپسر باروت و مرمت قلعه سرانجام نماید —

नेकनामखानाचा अर्ज आला. त्यानें विनंती केली होती ती अशी — ( १ ) सीवाचे वीस हजार स्वार व पायदळ यांनीं येऊन सुलतानगडास वेढा दिला होता. माळा लावून सीवाचे लोक वर गेले व त्यांनीं किल्ल्याचा ताबा मिळविला; फतहुल्लाहखान किल्लेदार बाहेर आला तेव्हां त्यास ठार केलें. नंतर त्याच्या मेहुण्यानें शत्रूच्या लोकांची भेट घेऊन किल्ला शत्रूच्या स्वाधीन केला. परंतु सध्या त्याचा नातेवाईक कुत्बुद्दीन यास हुकूम झाला तर तो आल्यावर किल्ला शत्रूकडून परत मिळवू. बादशाहानें हें ऐकलें व असदखानास हुकूम केला कीं, 'नेकनामखानास लिहावें कीं, दाऊदखानास हुकूम झाला आहे. त्यानें येऊन तेथील बंदोबस्त करावा.' ( २ ) औरंगगड, चोलागड व होलगड यांची खात्री नाहीं. बादशहानें हें ऐकलें व असदखानास हुकूम दिला कीं, 'नेकनामखानास लिहावें कीं, दाऊदखानानें येऊन तिथलाही बंदोबस्त करावा.' ( ३ ) येथें अन्नधान्याची रसद पोंचत नाहीं. तरी रसद पोंचविण्याचा खानदेशच्या मुत्सद्द्यांस हुकूम व्हावा. हुकूम झाला कीं, 'खानदेशच्या मुत्सद्द्यांना लिहावें कीं, त्यांनीं नेकनामखानास अन्नधान्याची रसद पोहोंचवत राहिलें पाहिजे. शिवाय खानदेशचा दिवाण मुहम्मद अशरफ यास लिहावें कीं, बागलाणचा फौजदार नेकनामखान यास

पन्नास हजार रुपयांची रकम पाठवावी व त्याजबरोबर महाराजा जसवंतसिंग याचे लोक द्यावे. त्यांनीं तिकडे जाऊन शिसें, दारू व किल्ल्याची दुरूस्ती यांची व्यवस्था करावी.’

११६

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. १३ रमजान १९<br>शनि. | اخبارات دربار معلی<br>ماه رمضان ١٩ سنه<br>یوم السبت سنه ١٣ | श. १५९१ माघ वद्य ५<br>इ. १६७० जानेवारी ३१ |

بعرض حضرت رسید که بهوراج کچهوا و رام سنگه راتهور ولد رتن وغیره پیش راجه رام سنگه برای مهم دکهن طلبیده بودند نزدیک شهر آمده اند هرچه امر شود بادشاه جیو فرمودند که آنها را بنویسد که از همان جا روانه دکهن شوند اول در بگلانه بروند—

हजरतांकडे अर्ज आला कीं, ‘राजा रामसिंगाकडे दक्षिणेच्या मोहिमेसाठीं भूराज कछवा व रामसिंग वलद् रतन राठोड वगैरे बोलाविले होते. ते शहराजवळ आले आहेत. हुकूम व्हावा.’ हुकूम झाला कीं, ‘त्यांना लिहावें कीं, तेथूनच त्यांनीं दक्षिणेकडे रवाना व्हावें. प्रथम बागलाणास जावें.’

११७

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. १३ रमजान २०<br>रवि. | اخبارات دربار معلی<br>ماه رمضان ٢٠ سنه<br>یوم الاحد سنه ١٣ | श. १५९१ माघ वद्य ६<br>इ. १६७० फेब्रुवारी १ |

عرضداشت محمد زمان قلعه دار دهرپ گده آمده نوشته بود که فوج سیوا غنیم آمده قلعه را گرد کرده بودند اما از اقبال بادشاه جیو بالای قلعه سرانجام توپ و باروت نیک وجه بود بنا- بران غنیم خفتن نتوانست بادشاه جیو شنیده به اسد خان فرمودند شما به محمد زمان بنویسد که مجرای شما شده آمیدوار اضافه باشند و داود خان را حکم نوشته است او برای کومک شما خواهد آمد و از این طرف بهادر خان را حکم است او برای کومک شما خواهند آمد شیخ سلیمان عرض کرد که اگر فرنگی عرض مینماید که اگر بادشاه جیو چیزی امداد مایان نمایند تا مایان از فرنگ بالای گرابا سوار شده به سیوا غنیم به خصم تا او را تنگ نمایم بادشاه جیو فرمودند که به سیف الله خان متصدی سورت را

فرمان بنویسد کہ حقیقت گفتار این فرنگے از آنجا تحقیق نموده معروض دارد کسان کہ بسیوا خصمیدن خواہند توانست آنرا فہمیده عرض بنویسد و پنج شش جہاز کہ در آن پانصد آدمی سوار شوند انجا بے مرمت افتاده اند آنہا را مرمت نمایند —

धोडपचा किल्लेदार मुहम्मद झमान याचा अर्ज आला. 'सीवाच्या फौजेनें येऊन किल्ल्यास वेढा दिला होता. पण बादशाही सुदैवानें किल्ल्यावर दारुगोळ्याचा चांगला पुरवठा असल्यानें शत्रू कांहीं करूं शकला नाहीं.' असें त्यांत लिहिलें होतें. त्यावर 'तुझें म्हणणें मान्य आहे व तू मन्सबीच्या वाढीची आशा करावीस. इकडून दाऊदखान व बहादुरखान यांस हुकूम झाले आहेत कीं, त्यांनीं मदतीस जावें.' असें उपर्युक्तास लिहिण्यासाठीं असदखानास हुकूम दिला. 'बादशाह आम्हांस कांहीं मदत करतील तर आम्ही गुराबांतून समुद्र-मार्गें शिवाजीस त्रास देऊं.' अशी फिरंगी विनंति करीत आहेत' असें शेख सुलेमानानें आपल्या अर्जांत कळविलें. त्यावर 'सैफुल्लाहखान या सुरतेच्या मुत्सद्द्यास फिरंग्याच्या म्हणण्याची चौकशी करून कळवावें; तसेंच जे सीवाशीं शत्रुत्व करूं शकतील त्याबद्दल माहिती करून घेऊन लिहावें; पांचशें लोक बसूं शकतील अशीं ५/६ जहाजें तेथें नादुरुस्त होऊन पडलीं आहेत तीं दुरुस्त करावी' म्हणून फर्मान धाडण्यास सांगितलें.

११८

| सिता<br>जु. १३ जिल्काद १३<br>बुध. (शुक्र.) | اخبارات دربار معلے<br>ماه ذی القعده ۱۳ صفر<br>یوم الاربعہ سفر ۱۳ | श. १५९२ चैत्र शुद्ध १४<br>इ. १६७० मार्च २५ |
|---|---|---|

واقعہ از اورنگ آباد آمد نوشتہ بود کہ فوج شیوا غنیم آمده قصبہ چاندوررا تاخت نموده یک زنجیر فیل دوازده اسپ و چہل ہزار روپیہ بابت سرکار خالصہ شریفہ گرفتہ تمامی شہررا لوت کرده برده و باقی خان قلعہدار در قلعہ گرد شده است و لودی خان فوجدار تل کوکن بفوج شیوا جنگ نموده زخمی شده باز ہزیمت خورده گریختہ رفت و فتح جنگ خان فوجدار ناندیر این حقایق را شنیده آن زمان ناندیررا گذاشتہ این طرف برخاستہ آمده بادشاه جیو شنیده فرمودند کہ حالا فتح جنگ خان را بنویسند خطاب جنگے بر طرف نموده —

औरंगाबादेच्या वृत्तपत्रांत मजकूर होता तो असा—सीवानें चांदवडावर

हल्ला केला व सर्व शहर लुटलें. त्यांत सरकारी १ हत्ती, १२ घोडे, ४०००० रुपये नेले. किल्लेदार बाकीखान किल्लयांत वेढला गेला आहे. तळकोंकणचा फौजदार लोदीखान सीवाच्या फौजेशीं लढला; पण पराभूत व जखमी होऊन पळून गेला. नांदेडचा फौजदार फतहजंगखान यास हें कळलें तेव्हां तो नांदेड सोडून निघून आला. हें ऐकून 'सध्या तुझा खान हा किताब काढून घेतला आहे' असें उत्तरोक्ताला कळविण्यास बादशाहानें फर्माविलें.

११९

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. १३ जिल्काद २७<br>गुरु. (शुक्र.) | اخبارات دربار معلے<br>ماه ذی القعده ۲۷ سنه<br>یوم الخمس سنه ۱۳ | श. १५९२ चैत्र वद्य १४<br>इ. १६७० एप्रिल ८ |

فتح ولد افضل خان دکھنی عرض کنانید کہ قبل از شاه ہلال نوکر پدر من بود حالا در سرکار بادشاہی نوکر است و او الحال جملہ حقیقت این جارا آنچہ کہ روی میدہد بہ شیوا مقہور مینویسد حضرت شنیده فرموده کہ مراتب منصب او آورده عرض نماید حسن علے خان فوجدار اسلام پور عرف متھرا بموجب حکم آمده ملازمت نموده مبلغ یک ہزار روپیہ نذر گذرانید از واقعہ شاہجہان-آباد بعرض رسید کہ بروز بیساکہ بد ہشت بای جیو محل از شاہجہان آباد روانہ حضور شدند جملۃ الملکے جعفرخان چون کم کنانیده بود باز دربار آمدند ہزده مہر نذر نمودند و یک مروارید بمعہ دو گہر قیمت مبلغ ہفت ہزار روپیہ را پیش کش کرد جمیل بیگ را روانہ دکہن نمودند فرمودند کہ در ہفت روز سرانجام نموده روانہ دکہن شود—

फतह वलद् अफजलखान दखनी यानें अर्ज केला कीं, 'पूर्वी शाह हिलाल माझ्या वडिलांचा चाकर होता. आतां तो सरकारचा चाकर झाला आहे; पण तो सध्या येथील सर्व हकीकती सीवास लिहितो.' त्यावर बादशाहानें त्याच्या मानमरातिबाबद्दल चौकशी करून अर्ज करण्यास हुकूम दिला. इस्लामपूर उर्फ मथुरा येथील फौजदार हसनअलीखान हा हुकुमाप्रमाणें आला. भेट घेऊन एक हजार रुपये नजर केले. शाहजहानाबादेच्या वृत्त-पत्रावरून समजलें कीं, बाईजीमहल ही वैशाख वद्य ८ या दिवशीं तेथून हुजुराकडे जाण्यास निघाली. जाफरखानास कमी केलें होतें. तो परत दरबारांत आला. त्यानें १८ मोहरा भेट दिल्या; तसेंच सात हजार रु. किंमतीचें

एक पोवळें व दोन मोती पेशकश म्हणून दिले. जमीलबेगास दक्षिणेंत पाठविलें व सात दिवसांत पूर्ण तयारी करून रवाना व्हावें असा हुकूम झाला.

### १२०

| | | |
|---|---|---|
| सिता | اخبارات دربار معلی | श. १५९२ वैशाख शुद्ध ३ |
| जु. १३ जिल्हेज १ | ماه ذی الحجہ ۱ سنہ | इ. १६७० एप्रिल १२ |
| सोम. (मंगळ.) | یوم الاثناء سنہ ۱۳ | |

بعمدة الملکی جعفر خان فرمودند شما حسب الحکم بہ دلیر خان بنویسند کہ کوچ بکوچ روانہ شده پیش شاہزاده جیو برسند بعده از آنجا بسرعت تمام پونہ بروند و آنجا چھاونے نمایند—

بہ عمدة الملکی بہ پرتاپ راے داروغہ ہرکارہا بگویند کہ طرح ملک سیوا و اورنگ آباد و دولت آباد نوشتہ آورده معلوم نمایند —

जाफरखानास हुकूम झाला कीं, ‘ दिलेरखानास हुकूम लिहावा कीं, तावडतोब कूच दर कूच करीत शाहजाद्यापाशीं पोचावें, तेथून तातडीनें पुण्यास रवाना व्हावें व तेथें छावणी करावी. ’

हरकाऱ्यांचा दारूगा प्रतापराय यास ‘ सीवाचा मुलूख, तसेंच औरंगाबाद–दौलताबाद इकडील नकाशे तयार करून पाठवावे ’ असें लिहावें म्हणून जुम्दतुल्मुल्कास फर्माविलें.

### १२१

| | | |
|---|---|---|
| सिता | اخبارات دربار معلی | श. १५९२ वैशाख शुद्ध ५ |
| जु. १३ जिल्हेज ३ | ماه ذی الحجہ ۳ سنہ | इ. १६७० एप्रिल १४ |
| गुरु. | یوم الخمس سنہ ۱۳ | |

خط داود خان بہ عمدة الملکے آمده بود در آن نوشتہ بودند کہ بنده بتاریخ شانزدہم ذی القعده موافق بیساکہ بد پنج در احمد نگر رسیدم ہمراه فتح خان جمعیت داده در احمد نگر گذاشتہ بنده پیشتر از احمد نگر روانہ شدم در جونیر سیونیر و مالنیر و قلعہ ماہولی فوج سیوا غنیم است براے مقابلہ آنہا روانہ شدیم ہفت ہزار سوار ہمراه بنده اند بروز بیساکہ بد نومی از احمد نگر راہی شدیم عمدة الملکی خط داود خان خوانده در محل پیش بادشاه جیو فرستاد حسب الحکم نوشتہ عمدة الملکے بہ حسن علے خان

صادر شد نوشتہ اند کہ بندوبست سورت خوب نمودہ حالا چیزی
جمعیت در سورت گذاشتہ برای کومک منوہرداس در قلعہ
ماہولی بروند —

'जिल्काद १६ वैशाख वद्य ६ रोजीं मी अहमदनगरास पोहोचलों. फतहखानाजवळ लोक देऊन त्यास तेथें ठेवलें व मी पुढें गेलों. सीवाची फौज जुन्नर, शिवनेर, मालनेर व माहुली येथें आहे. मी त्यांशीं सामना देण्यासाठीं निघालों. माझ्याबरोबर सात हजार स्वार आहेत. मी वैशाख वद्य ९ ला अहमदनगरहून मार्गस्थ झालों.' असें दाऊदखानाचें जुम्दतुलमुल्कास पत्र आलें त्यानें तें वाचून बादशाहाकडे महालांत धाडलें. 'तू सुरतेचा बंदोबस्त छान ठेवलास. सध्या कांहीं लोक तेथें ठेवून किल्ले माहुलीस मनोहरदासाच्या मदतीस जा' असा जुम्दतुलमुल्कानें हसनअलीस लिहिलेला हस्बुलहुकूम सादर झाला.

१२२

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. १३ जिल्हेज ५<br>शनि. | اخبارات دربار معلی<br>ماہ ذی الحجہ ۵ سنہ<br>یوم السبت، سنہ ۱۳ | श. १५९२ वैशाख शुद्ध ७<br>इ. १६७० एप्रिल १६ |

سبحان سنگہ مادہو سنگہ را حسب الالتماس دلیر خان تعینات
دکہن نمود فضل اللہ خان نواسہ وزیر خان و نظام الدین خیشگی
را تعینات دکہن نمودند —

दिलेरखानाच्या विनंतीप्रमाणें सुभानसिंग व माधोसिंग यांना आणि वजीरखानाचा नातू फज्लुल्लाहखान व त्याचा नातेवाईक निजामुद्दीन यांनाही दक्षिणेंत नेमलें.

१२३

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. १३ जिल्हेज ८<br>मंगळ. | اخبارات دربار معلی<br>ماہ ذی الحجہ ۸ سنہ<br>یوم الثلث سنہ ۱۳ | श. १५९२ वैशाख शुद्ध १०<br>इ. १६७० एप्रिल १९ |

عرضداشت داود خان آمد نوشتہ بود مردمان سیوا مقہور
کہ متصل جنیر و سونیر و سالیر بودند آنہا از آنجا برخاستند و
رفتند حالا بندہ در سالیر رسیدہ بعدہ سالیر را گذاشتہ در جنیر
آمدیم اکنون بتاریخ ۲۱ ذی القعدہ موافق بیساکہ بد اشتمی از

جلید پیش تر روانہ شدیم ہر جا کہ مردم غنیم را در ملک
بادشاہی خواہم یافت زدہ دور خواہم ساخت—

दाऊदखानानें अर्ज केला कीं, ‘ सीवाचे लोक जे सिवनेर, जुन्नर व साल्हेर येथें होते ते निघून गेले. मी साल्हेरीस पोंचलों आहे. त्यानंतर साल्हेर सोडून जुन्नरला आलों. आतां जिल्काद २१ वैशाख वद्य ८ ला जुन्नराहून पुढें जात आहे. शत्रूचे लोक बादशाही मुलखांत दिसतील तेथें तेथें त्यांना मारून दूर करीन. ’

१२४

| सिता<br>जु. १३ जिल्हेज ९<br>बुध. | اخبارات دربار معلے<br>ماہ ذی الحجہ ۹ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۱۳ | श. १५९२ वैशाख शुद्ध ११<br>इ. १६७० एप्रिल २० |
|---|---|---|

میر خان گرزبردار فرمان عالیشان بہ دلیرخان براے رفتن
مہم شیوا مقہور روانہ ساختن بردہ بود رسانیدہ امد مبلغ پنج
روپیہ نذر نمودہ ملازمت کرد عرضداشت دلیرخان آوردہ بود
بنظر انور گذرانید حضرت خود بدولت مطالعہ نمود نوشتہ بود
کہ بموجب حکم بادشاہجیو زمین دار اسلام گرہ عرف دیوگرہ را
و دو برادران و یک خواہر او را مسلمان نمودیم و زمین داری
دیوگدہ باو دادیم و بموجب ذیل انعام مرحمت کردیم سروپا
و خلعت نقد اسپ راس فیل زنجیر جمدہر مرصع کاری عدد
بعدہ بتاریخ ۱۷ ذیقعدہ موافق بیساکہ بد چوتہ از بہاگپور عرف
ناگپور براے مہم شیوا مقہور روانہ شدیم بتاریخ ا [ ا * ] ذی حجہ
موافق بیساکہ سد بارس ساعت بندہ ملازمت نمودن شاہزادہ
محمد معظم است آن روز ملازمت شاہزادہ جیو خواہم کرد
باز گرزبردار عرض نمود کہ مبلغ پانصد روپیہ ہا را خدمتانہ
دادہ است ہر چہ حکم شود باو معاف کردند امراوانرا
بموجب ذیل بہ دکہن رخصت نمودند زین العابدین سروپا و
بادل بخنیار سروپا و سید یوسف سروپا و یک اسپ فتح
دکہنی را سروپا و رعداندازخان را حکم فرمودند امراوان
کہ تعینات دکہن شدہ اند ڈیرہ آنہا را از شہر بدر بکنانند و محمد
عاقل گرزبردار را فرمودند کہ تعیناتیان دکہن را شما خود تاکید

نموده به دکهن رسانیده بیایند باز حکم کردند اگر آنچه امراوان
جزویی منصب دارند قسط مطالبه آنرا تا مهم دکهن معاف نمودیم
امرایان کلان را حقیقت آنها بخشیان عرض نمایند بعد عرض حکم
نموده خواهد شد –

मीरखान गुजबर्दार दिलेरखानास सीवाच्या मोहिमेवर जाण्याचें बादशाही फर्मान पोंचवून परत आला. भेट घेऊन त्यानें पाच रुपये नजर केले. दिलेरखानाच्या अर्ज आला होता तो बादशाहानें स्वतः पाहिला. त्यानें लिहिलें होतें कीं, ' बादशाही हुकुमाप्रमाणें इस्लामगड उर्फ देवगड येथील जमीनदाराचे दोन भाऊ व एक बहीण यांना मुसलमान केलें. देवगडची जमीनदारी त्याला दिली व पुढें दिल्याप्रमाणें आणखी कृपा केली. सरोपा, खिलअत, नकद, घोडा, हत्ती, जडावाची जमधर. नंतर तारीख १७ जिल्काद वैशाख वद्य चतुर्थी रोजीं भागपूर उर्फ नागपूर येथून सीवाच्या मोहिमेवर रवाना झालों. तारीख ११ जिल्हेज वैशाख शुद्ध १२ या दिवशीं सेवकाची शाहजादा मुहम्मद मुअज्जम याशीं भेट आहे. तेव्हां भेट घेईन.' नंतर गुर्जबर्दारानें विनंती केली कीं, ' पाचशे रुपये खिदमताना दिला आहे. हुकूम व्हावा. ' त्यास तो माफ केला. पुढें दिलेल्या उमरावांना सन्मान करून दक्षिणेंत पाठविलें. झैनुलआबिदीन, बख्तियार, सय्यद युसुफ, फतह दखनी. रअदअंदाजखान यास हुकूम झाला कीं, ' दक्षिणेवर नेमलेल्या उमरावांचे डेरे शहराबाहेर करवावे. मुहम्मद आकिल गुर्जबर्दार यास फर्माविलें कीं, ' दक्षिणेवर नेमलेल्या लोकांना ताकीद करून दक्षिणेंत पोंचव व परत ये. ' नंतर हुकूम झाला कीं, ' ज्या उमरावांना थोडी मनसब आहे त्यांकडून यावयाची रकम ते दक्षिणच्या मोहिमेवर असेतों माफ केली आहे. मोठ्या उमरावांची हकीकत बक्षीनीं कळवीत जावी. तीं कळविल्यावर हुकूम देईन. '

१२५

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. १३ जिल्हेज २८<br>सोम. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی حجه ۲۸ سنه<br>یوم الاثنین سنه ۱۳ | श. १५९२ वैशाख वद्य ३०<br>इ. १६७० मे ९ |

صالح خان عرض نمود مکرمت خان دیوان معزول دکهن
ما را خط فرستاده است هوای این جا مارا موافق نیست همیشه بیمار
میباشم از این ممر این حقیقت را پیش شاهزاده جیو معلوم نموده ام
اگر آنها به بادشاه جیو التماس خواهند نوشت بهتر و الا نه من
برخاسته به درگاه خواهم آمد حضرت فرمودند حالا بجاے آنها

شفیع خان را دیوان دکهن نموده ام وقتی که این در آنجا برسد
مکرمت خان بحضور بیاید و باز نوشته بود تا دیروز سیوا غنیم
متصل احمد نگر و جنیر و پرینده پنجاه یک محل زده تاراج تاخته
است حضرت شنیده ماندند—

از واقع دکهن بعرض رسید که سابق حکم صادر شده بود که
دو توپ کلان از قلعه اسیر زیر آورده همراه دلیر خان بدهند
بالاے اسیر توپها موافق اند زیاده نه اند هرچه حکم شود حضرت
فرمودند به افتخار خان بنویسد که از بجاے دیگر سربراه نموده
بدهد—

सालिहखानानें अर्ज केला. दक्षिणेच्या काढून टाकलेला दिवाण मुक्रमत-खान यानें मला पत्र पाठविलें आहे कीं, 'येथील हवा मला सोसत नाहीं; नेहमीं आजारी पडतों. मी शाहजाद्याला कळविलें आहे; त्यानें तें बादशाहास कळविलें तर ठीकच. नाहींतर मी निघून बादशाहाकडे येईन.' हुकूम झाला कीं, 'आतां त्याच्या ऐवजीं शफीखानास दख्खनचा दिवाण नेमलें आहे. तो तेथें पोहों-चल्यावर मुक्रमतखानानें हुजुरास यावें,' त्यानंतर त्यानें लिहिलें होतें कीं, 'कालपर्यंत सीवानें परिंडा, अहमदनगर, जुन्नर यांच्या जवळचे एकावन महाल नष्ट केले आहेत' बादशाह ऐकून गप्प बसला. दख्खनच्या वृत्तपत्रावरून समजलें कीं, 'असीरगडावरून दोन मोठ्या तोफा खाली आणून दिलेरखाना-बरोबर देण्याचा पूर्वीं हुकूम झाला होता; पण असीरगडावर आवश्यक तितक्याच तोफा आहेत. अधिक नाहीत. तरी हुकूम व्हावा.' हुकूम झाला कीं, इफ्तखारखानास लिहावें कीं, दुसरीकडून सोय करून द्यावी.

१२६

| सिता<br>जु. १३ जिल्हेज ३०<br>बुध. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی حجه ۳۰ سنه<br>یوم الاربعه سنه ۱۳ | श. १५९२ ज्येष्ठ शुद्ध २<br>इ. १६७० मे ११ |
|---|---|---|

عرضداشت داود خان آمد فوج سیوا غنیم سه قلعه را گرد
کرده بودند از این ممر این بنده از جنیر روانه شدیم بنده زاده
حمید و لودی خان را جمعیت همراه داده پیشتر تعین کردیم که
فوج غنیم مقابله نمایند وقتی که آنها خبر یافت فوج بادشاہی
نزدیک آمد آن زمان آنها قلعه ها را گذاشته برخاسته رفتند آن
زمان حمید و لودی خان برگشته آمدند باز خبر شنیده که از

قلعہ ماہولی دہ کروہ بالاے سرحد مردم شیوا غنیم یک حصار
راست می نمایند باز حمید و لودی خان را بالاے آن تعین
کردیم کہ مردم غنیم نیز آنہا را آمدہ شنیدہ گریختہ رفتند ایشان
آنجا رفتہ حصار را مسمار کردند و چند مردم غنیم کہ بدست
آمدند آنرا کشتند و نیز نوشتہ بود کہ در این ولا بندہ روانہ
قلعہ ماہولي خواہد شد جاے کہ مردم غنیم زا خواہم یافت آن
را تنبیہ خواہم کرد بندوبست طرف ماہولی نمود بعد از آن ہر جا
کہ مردم غنیم را خوشنید باقبال حضرت آنجا رفتہ آنہا را نیز
تنبیہ خواہم کرد بملطفت خان فرمودند کہ ہفتاد عرابہ از دارو و
گولی پر نمودہ روانہ دکہن نماید—

दाऊदखानाचा अर्ज आला. ‘सीवाच्या फौजेनें तीन किल्ल्यांस वेढा दिला होता. म्हणून मी जुन्नरहून निघालों. माझा मुलगा हमीद व लूदीखान यांबरोबर जमेत देऊन पुढें पाठवीत आहे. त्यांनीं शत्रूच्या फौजेशीं सामना द्यावा. शत्रूला बादशाही फौज जवळ आल्याचें समजलें तेव्हां तो वेढा उठवून निघून गेला. त्या वेळीं हमीद व लूदीखान परतले. नंतर बातमी समजली कीं, किल्ले माहुलीपासून दहा कोसावर सीवाचें लोक एक किल्ला तयार करीत आहेत. तेव्हां त्यांवर हमीद व लूदीखान यांस मी पाठविलें. ते येत असल्याचें समजल्यावरून ते पळून गेले. (आमचे) लोक तेथें पोहोचले व त्यांनीं किल्ला नष्ट केला. शत्रूचे कांहीं लोक हातीं लागले त्यांना जिवें मारलें.’ त्यानें असेंसुद्धा लिहिलें होतें कीं, ‘मी माहुलीकडे जात आहे व शत्रू आढळेल तेथे त्यास तंबी देईन. माहुलीकडे बंदोबस्त केला आहे. आतां शत्रूचे लोक असतील तेथें जाऊन बादशाही सुदैवानें त्यांना तंबी देत आहे.’ मुल्तफितखानास हुकूम झाला कीं, दारू व कुपी भरून सत्तर तोफांचे गाडे दख्खनकडे पाठवावे.

१२७

| | | |
|---|---|---|
| जु. २३ शव्वाल १० बुध. | سیاہم اخبارات دربار معلی<br>ماہ شوال ١٠ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ٢٣ | श. १६०१ कार्तिक शुद्ध १२<br>इ. १६७९ नोव्हेंबर ५ |

از روے واقع پیدگانون بعرض رسید کہ دلیرخان توپ رہکلہ
از سورت طلب داشتہ بود چنانچہ ہفدہ توپ در آنجا رسید—

पेडगांवच्या वृत्तपत्रावरून समजलें कीं, दिलेरखानानें सुरतेहून गाड्यांवरील तोफा मागविल्या होत्या. सतरा तोफा येऊन पोंचल्या.

१२८

| | | |
|---|---|---|
| जु. २३ शव्वाल ११ गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلی ماہ شوال ۱۱ سنہ یوم الخمیس سنہ ۲۳ | श. १६०१ कार्तिक शुद्ध १३ इ. १६७९ नोव्हेंबर ६ |

از روے واقعہ فوج دلیر خان بعرض رسید کہ خان موصی الیہ پنج کروہ از بیجاپور دیرہ داشت از بیجاپور دو کروہ برای دیرہ جاے تجویز نمودہ بود کہ در آنجا دیرہ نماید —

दिलेरखानाच्या फौजेंतील वृत्तपत्रावरून समजलें कीं, उपर्युक्त खानानें विजापुरापासून पांच कोसांवर डेरा दिला आहे. त्यानें विजापुरापासून दोन कोसांवर डेरा देण्याच्या हेतूनें जागा बघितली होती.

१२९

| | | |
|---|---|---|
| जु. २३ शव्वाल १७ बुध. | سیاهہ اخبارات دربار معلی ماہ شوال ۱۷ سنہ یوم الاربعہ سنہ ۲۳ | श. १६०१ कार्तिक वद्य ५ इ. १६७९ नोव्हेंबर १२ |

محمد یوسف بیجاپوری طرح قلعہ بیجاپور و نلدرگ و گلبرگہ و پینگانون و شولاپور درست نمودہ بنظر گذرانید بندگان حضرت طرح مذکور بہ خانجہان بہادر و سربلند خان و قابل خان نمودہ استفسار فرمودند مشارالیہا نشان کردند —

मुहम्मद यूसुफ विजापुरी यानें विजापूर, नळदुर्ग, कलबर्गा, पेडगांव व सोलापूर या किल्ल्यांचे नकाशे नीट करून बादशाही नजरेखालून घातले. बादशाहानें वरील नकाशे खान जहान बहादुर, सरबुलंदखान व काबिलखान यांना दाखवून चौकशी केली. उपर्युक्तांनीं त्यांवर निशाण्या केल्या.

१३०

| | | |
|---|---|---|
| जु. २३ शव्वाल २१ रवि. | سیاهہ اخبارات دربار ماہ شوال ۲۱ سنہ یوم الاحد سنہ ۲۳ | श. १६०१ कार्तिक वद्य ९ इ. १६७९ नोव्हेंबर १६ |

از روے واقعہ لشکر دلیر خان بعرض رسید کہ خان مذکور از بیجاپور دونیم کروہ این طرف دیرہ نمودہ و درمیان سیدی مسعود خان و بیجاپوری و خانمشارالیہ رد بدل میشود تا حال

چیزی قرار نگرفته است که داخل واقعه نمایم و سیوا مقهور یک سردار خود را بجهته امداد بیجاپوری فرستاده بود چنانچه آمده باز رفته و میانه خان و عزت برادر- زاده خان مذکور با جمعیت ده هزار سوار بر قلعه سهوله [سوپه] رفته محاصره نمودند چنانچه در تصرف بادشاهی در آورده درین ضمن خبر رسید که سیوا مقهور جمعیت چهار هزار سوار بطرف پیدگانون تعین نموده است خان موسی الیه خبر شنیده به عزت مذکور نوشته که با جمعیت پنج هزار سوار به آن طرف خبردار شود و به میانه خان نوشته که در قلعه مذکور سه صد کس بندوقچی گذاشته سرانجام ذخیره وغیره نموده بیاید —

दिलेरखानाच्या फौजेंतील वृत्तपत्रावरून समजलें कीं, 'खान मजकुरानें विजापूरच्या अलीकडे अडीच कोसांवर डेरा दिला. मस्ऊदखान, विजापुरी लोक व उपर्युक्त खान यांमध्यें रदबदल चालू आहे. वृत्तपत्रांत नमूद करण्या-सारखा अजून कोणताच करार झाला नाहीं. सीवानें आपल्या एका सरदारास विजापूरकरांच्या मदतीसाठीं पाठविलें होतें. त्याप्रमाणें तो येऊन परत गेला. मियानहखान व त्याचा पुतण्या इझ्झत यांनीं दहा हजार स्वारांसह सहोला (सुपा) किल्ल्यास वेढा घातला होता. आतां तो बादशाही ताब्यांत आला. या बाबतींत बातमी आली कीं, सीवानें पेडगांवच्या बाजूस चार हजार स्वार नेमले आहेत. उपर्युक्त खानानें ही बातमी ऐकून इझ्झत यास लिहिलें कीं, पांच हजार स्वारांसह त्या बाजूस लक्ष ठेवावें व मियानहखानास लिहिलें कीं, उपर्युक्त किल्ल्यामध्यें तीनशें बंदूकची ठेवून. धान्य वगैरेची व्यवस्था करून परत यावें.'

१३१

| जु. २३ जिलकाद ७ सोम. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۷ سنه<br>یوم الاثناء سنه ۲۳ | श. १६०१ मार्गशीर्ष शुद्ध ९<br>इ. १६७९ डिसेंबर १ |
|---|---|---|

هری پندت داروغه هرکارهای صوبه دکهن صدی ذات بوده سوار اضافه فرمودند —

दक्षिणच्या सुभ्याच्या हरकाऱ्यांचा दारोगा हरी पंडीत यास शंभर जात अशी मनसब होती. तींत १ स्वाराची वाढ फर्माविली.

१३२

| | | |
|---|---|---|
| जु. २३ जिल्काद २० रवि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۲۰ سنه<br>یوم الاحد سنه ۲۳ | श. १६०१ मार्गशीर्ष वद्य ७<br>इ. १६७९ डिसेंबर १४ |

بموجب نوشته خان زمان صوبه دار برهانپور بعرض رسید که بزبانی جاسوسان ظاهر شده که سیوا مقهور میخواهد که جمعیت خود برای تاخت این ضلع بفرستند بحضرت روشن باشد بندگان حضرت شنیده فرمودند که بخان مشارالیه بنویسد از بندوبست آنجا بواقع خبردار باشد —

बुर्‍हानपूरचा सुभेदार खान झमान याच्या लिहिल्यावरून समजलें तें असें— हेरांनीं तोंडीं सांगितलें कीं, ‘सीवा स्वतःच्या लोकांस हा जिल्हा लुटण्यासाठीं पाठविण्याच्या विचारांत आहे. बादशाहास याची माहिती असावी.’ बादशाहानें ऐकून हुकूम केला कीं, उपर्युक्त खानास लिहावें कीं, तेथील बंदोबस्ताबद्दल योग्य तऱ्हेनें खबरदार असावें.

१३३

| | | |
|---|---|---|
| जु. २३ जिल्काद २१ सोम. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۲۱ سنه<br>یوم الاثنا سنه ۲۳ | श. १६०१ मार्गशीर्ष वद्य ८<br>इ. १६७९ डिसेंबर १५ |

اشرف خان عرض رسانید که عسکر خان بخشی واقعه نویس همراه فوج دلیر خان به بنده خطی نوشته بود که راجه سنبهاجی پسر سیوا مقهور آمده بدلیر خان ملاقی شده بود هفت هزاری ذات و هفت هزار سوار بود گریخته بتدبیر خود رفته —

अश्रफखानानें अर्ज केला तो असा—दिलेरखानाच्या फौजेबरोबर असलेला वाकेनविसीचा बक्षी अस्करखान यानें मला पत्र लिहिलें होतें कीं, ‘सीवाचा मुलगा संभाजी येऊन दिलेरखानास भेटला होता. त्यास सात हजार जात व सात हजार स्वार एवढी मनसब होती. तो स्वतःच्या हिकमतीनें पळून गेला.’

१३४

| | | |
|---|---|---|
| जु. २३ जिल्काद २२ मंगळ. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۲۲ سنه<br>یوم الثلاث سنه ۲۳ | श. १६०१ मार्गशीर्ष वद्य ९<br>इ. १६७९ डिसेंबर १६ |

از روے واقعہ فوج دلیر خان بعرض رسید کہ باباجی ولد لکھوجی سہ صد ذات دو صد سوار سرافراز بود بکار آمد —

दिलेरखानाच्या फौजेच्या वृत्तपत्रावरून समजलें कीं, बाबाजी वलद लखोजी यास तीनशें जात व दोनशें स्वार एवढी मनसब होती. तो कामास आला.

१३५

| | | |
|---|---|---|
| जु. २३ जिल्काद २४ गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعده ۲۴ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۳ | श. १६०१ मार्गशीर्ष वद्य ११<br>इ. १६७९ डिसेंबर १८ |

از روے واقعہ فوج دلیر خان بعرض رسید کہ ہرگاه راجہ سنبھاجی پسر سیوا مقہور گریختہ رفت بنابرآن خان مذکور از یساق بیجاپوری بطرف ملک بادشاہی کوچ نموده —

दिलेरखानाच्या फौजेच्या वृत्तपत्रावरून समजलें कीं, सीवाचा मुलगा संभाजी पळून गेला. तेव्हां खानानें विजापुरी प्रांतांतून बादशाही मुलखाकडे कूच केलें.

१३६

| | | |
|---|---|---|
| जु. २३ जिल्काद २६ शनि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعده ۲۶ سنہ<br>یوم السبت سنہ ۲۳ | श. १६०१ मार्गशीर्ष वद्य १३<br>इ. १६७९ डिसेंबर २० |

بختاور خان عرض رسانید کہ خان زمان صوبہ دار برہانپور بہ بنده نوشتہ کہ شاہزاده شاه عالم جیو بہ بنده نوشتہ اند کہ سیوا مقہور جمعیت براے تاخت برہانپور میفرستند شما از بندوبست آنجا خبردار باشد بنابرآن گرد پیش شہر مورچال بندی نموده فوجداران گرد نواحی را نوشتہ ام کہ نصف جمعیت خود ہاے درین جا بفرستند چنانچہ نقل نشان ہم فرستاده است فرمودند خوب کرده کہ خبردار گشت —

बख्तावरखानानें अर्ज केला तो असा— बुर्हानपूरचा सुभेदार खान झमान यानें मला लिहिलें कीं, ' शिवाजी बुर्हानपूर लुटण्यासाठीं लोक पाठवीत आहे. तू तिकडील बंदोबस्ताबद्दल खबरदार असावें, असें मला शाहआलमनें कळविलें. तेव्हां शहराच्या भोंवतालीं मोर्चेबंदी करून भोंवतालच्या

फौजदारांना मीं लिहिलें कीं, त्यांनीं आपले निम्मे लोक इकडे पाठवावे. शाहजाद्याच्या पत्राची नक्कल पाठविली आहे.' हुकूम झाला कीं, खबरदारी घेतली हें छान केलें.

## १३७

| | | |
|---|---|---|
| जु. २३ जिल्काद २९ मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماہ ذی قعدہ ۲۹ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۳ | श. १६०१ पौष शुद्ध १<br>इ. १६७९ डिसेंबर २३ |

یکہ تازخان و ہیرا معمار دیروز طرح بتخانہاے تالاب رانا بنظر گذرانید و بعرض رسید کہ در پنج کروہی دگری تالاب است حکم شد کہ حسن علے خان و روح اللہ خان و یکہ تاز خان و عباد اللہ خان و تہورخان رفتہ بتخانہاے را مسمار سازند —

بموجب نوشتہ خان زمان صوبہ دار برہانپور بعرض رسید کہ ... درین ولا جمعیت سیوا دہرن گانون تاراج کردہ از عسرت آن مقہور ساکنان بہادرپورہ برخاستہ و طرف قلعہ اسیرگدہ رفتند و قلعہ دار آنجا در قلعہ نگرفتہ در باری قلعہ سکونت گرفتہ بنابران جمعیت را براے خزانہ نفرستادہ توقف نمودیم بعد معروض خاموش ماندند —

काल यक्कातालजखान व हिरा गवंडी यांनीं राणाच्या तलावावरील देवळांचे नकाशे बादशाही नजरेखालून घातले व अर्ज केला कीं, 'पांच कोसांवर दुसरा तलाव आहे.' हुकूम झाला कीं, 'हसन अलीखान, रूहुल्लाह-खान, यक्कातालजखान, इबादुल्लाहखान व तहव्वुरखान यांनीं जाऊन देवळें पाडावीं.'

बुर्हानपूरचा सुभेदार खान झमान याच्या लिहिल्यावरून समजलें कीं, 'सध्या सीवाच्या लोकांनीं धरणगांव लुटलें. बहादुरपुरा येथील रहिवासी त्यांच्या त्रासामुळें उठून असीरगडाकडे गेले. तेथील किल्लेदारानें त्यांना किल्ल्यांत घेतलें नाहीं. त्यांनीं किल्ल्याच्या वाडींत मुकाम केला. म्हणून खजाना आणण्यासाठीं लोक पाठविले नाहींत. मीं तें स्थगित केलें आहे.' यावर बादशाह स्तब्ध राहिला.

## १३८

| | | |
|---|---|---|
| जु. २३ जिल्काद ३० बुध. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماہ ذی قعدہ ۳۰ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۳ | श. १६०१ पौष शुद्ध २<br>इ. १६७९ डिसेंबर २४ |

رنمست خان تعینات دکهن چون در کالنا (گالنہ) جنگ سیوا مقہور تردد نموده لہذا چہار ہزاری ذات سہ ہزاری سوار منجملہ پانصدی ذات یک صد سوار بشرط تعیناتی دکهن داشت بلا شرط فرمودند —

दक्षिणेंत नेमलेल्या रणमस्तखानानें सीवाशीं गाळणा येथें झालेल्या लढाईत कष्ट केले. म्हणून त्याच्या चार हजार जात व तीन हजार स्वार एवढ्या मनसबीपैकीं पांचशें जात व शंभर स्वार दक्षिणेंतील नियुक्तीच्या शर्तीवर होते ते बिनशर्त केले.

## १३९

| | | |
|---|---|---|
| जु. २३ सफर १<br>रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه صفر غره صنہ<br>یوم الاحد سنہ ۲۳ | श. १६०१ फाल्गुन शुद्ध ३<br>इ. १६८० फेब्रुवारी २२ |

بعرض رسید کہ صحبت ولد بازید تهانہدار قلعہدار تمس واقعہ صوبہ دکهن بمنصب شش ۶ صدی ذات شش ۶ صدی سوار سرافرازی داشت در جنگ سیوا مقہور بکار آمده شنیده خاموش ماندند —

अर्ज आला कीं, 'सुभे दक्षिणेंतील किल्ला तिमस (?) येथील ठाणेदार तसाच किल्लेदार सहीत (मुहब्बत) वलद बाजीद यास सहाशें जात व सहाशें स्वार एवढी मनसब होती. तो सीवाशीं झालेल्या लढाईत कामीं आला.' बादशाह ऐकून गप्प बसला.

## १४०

| | | |
|---|---|---|
| जु. २३ सफर ८<br>रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۸ صنہ<br>یوم الاحد سنہ ۲۳ | श. १६०१ फाल्गुन शुद्ध १०<br>इ. १६८० फेब्रुवारी २९ |

از وقایع دکهن بعرض رسید کہ قلعہ ہنونت گده را سیوا مقہور نیم شب گذشتہ در قلعہ مذکور یورش نموده چندین کشتہ و زخمی نموده و بعضی را دستگیر ساختہ قلعہ را در تصرف خود آورده بندگان حضرت شنیده جواب نفرمودند —

दक्षिणेंतील वृत्तपत्रावरून समजलें कीं, सीवानें मध्यरात्रीनंतर हनवंत गडावर हल्ला केला; कांहीं लोकांना मारून, कांहींना जखमी करून व कांहींना कैद करून किल्ला हस्तगत केला. बादशाहानें ऐकलें; परंतु उत्तर दिलें नाहीं.

१४१

| | | |
|---|---|---|
| जु. २३ सफर १२ गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلی ماہ صفر ۱۲ سنہ ۲۳ یوم الخمس سنہ ۲۳ | श. १६०१ फाल्गुन शुद्ध १४ इ. १६८० मार्च ४ |

از روے وقایع لشکر دلیر خان بعرض رسید کہ حسین میانہ عموی عبدالکریم بیجاپوری مرحوم [را] سیوا مقہور در جنگ عبدالکریم مذکور دستگیر کردہ بود دریں ولا پسران حسین میانہ مذکور قلعہ کوکل [کوپل ؟] تعلقہ بیجاپوری را بسیوا مقہور دادہ پدرخود را خلاصی کنانیدہ چنانچہ حسین مذکور در آنجا آمدہ گوشہ نشین شدہ دریں ضمن دلیرخان تسلی او نمودہ نزد خود طلبیدہ خلعت و نہ توفیر پارچہ و دو راس اسپ و یک زنجیر فیل از طرف خود دادہ منصب او پنج ہزاری ذات پنج ہزار سوار تجویز کردہ ہمراہ رستم خان بیجاپوری براے تاخت پرگنہ ناندیر وطن سیدی مسعود خان فرستادہ بندگان حضرت شنیدہ خاموش ماندند —

दिलेरखानाच्या लश्करांतील वृत्तपत्रांवरून समजलें कीं, अब्दुलकरीम विजापुरी मरहूम याचा चुलता हुसेन मियाना यास सीवानें अब्दुलकरीम-बरोबर झालेल्या लढाईत कैद केलें होतें. सध्या हुसेन मियाना याच्या मुलांनीं विजापूर तालुक्यांतील किल्ला कोकल ( कापल ? ) देऊन स्वतःच्या बापाची सुटका केली. म्हणून हुसेन मजकूर इकडे येऊन विरागी झाला आहे. दिलेरखानानें त्याचें सांत्वन करून त्यास खिलअत, नौरंगी पोषाक, दोन घोडे व एक हत्ती स्वतः तर्फे देऊन व त्यास पांच हजार जात व पांच हजार स्वार अशा मनसबीची तजवीज करून, रुस्तुमखान विजापुरी याच्या सोबत सीदी मस्ऊदखानाचें वतन परगणे नांदेड लुटण्यासाठीं पाठविलें. बादशाह ऐकून गप्प बसला.

१४२

| | | |
|---|---|---|
| जु. २३ सफर १७ मंगळ. | سیاهہ وقایع دربار ماہ صفر ۱۷ سنہ ۲۳ یوم الثلث سنہ ۲۳ | श. १६०१ फाल्गुन वद्य ४ इ. १६८० मार्च ९ |

روح اللہ خان عرض رسانید کہ سابق حمید خان ضامن مانکوجی برادر سیوا مقہور بود حالا خان مشارالیہ در تعینات صوبہ

احمد آباد شده در باب ضامن مانکوجی ہرچہ امر شود فرمودند
کہ اورا ہمراہ خانجہان بہادر تعینات نموده اند خان مذکور
خود مختیار است —

रूहुल्लाहखानानें अर्ज केला कीं, 'पूर्वी सीवाचा भाऊ माणकोजी याला हमीदखान जामीन होता. सध्या उपर्युक्त खानास अहमदाबाद सुभ्यावर नेमलें आहे. माणकोजीच्या जामीनाबद्दल हुकूम व्हावा.' हुकूम झाला कीं, 'त्यास खानजहान बहादुराबरोबर नेमलें आहे. खान मजकूर मुखत्यार आहे.'

१४३

| | | |
|---|---|---|
| जु. २३ सफर १८<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار<br>معلے ماه صفر ۱۸ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۳ | श. १६०१ फाल्गुन वद्य ५<br>इ. १६८० मार्च १० |

سیلاجی نامی کس دکھنی ساکن مالاپور بحضور آمده بر
قانون گوی مسلمان شد خلعت مرحمت شد —

मालापूरचा रहिवासी सैलाजी नांवाचा दखनी मनुष्य विधिपूर्वक मुसलमान झाला व हुजुराकडे आला. त्यास पोषाख दिला.

१४४

| | | |
|---|---|---|
| जु. २३ सफर २६<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار<br>معلے ماه صفر ۲۶ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۳ | श. १६०१ फाल्गुन वद्य १३<br>इ. १६८० मार्च १८ |

مہدا نامی ساکن جیتارن مسلمان شد خلعت و ده روپیہ انعام
مرحمت شد —

जैतारणाचा रहिवासी महदा मुसलमान झाला. त्यास पोषाख व दहा रुपये इनाम मिळाले.

१४५

| | | |
|---|---|---|
| जु. २३ रवल ३<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الاول ۳ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۳ | श. १६०२ चैत्र शुद्ध ४<br>इ. १६८० मार्च २४ |

از وقایع دکہن بعرض رسید کہ میر قلیچ گرزبردار فرمان
عالی شان در باب طلب حضور بنام دلیر خان برده بود رسید و
خان مشارالیہ نواحی تادری وطن سیوا مقہور و بیجاپوری

وغیره تاخت مینمایند و تا دهم صفر سنه الیه خان مذکور روانه
حضور [خواهد] شد بعد مطالعه فرد وقایع شاهزاده محمد اعظم جیو
نموده شکوه خان مشار الیه فرمودند که ابادانی راه بمطلب خود
تاراج میکنند و نظر بر کار ما بدولت نکرده تا حال روانه حضور
پرنور نشده است —

दख्खनच्या वृत्तपत्रांवरून समजलें कीं, मीर कुलीच गुर्जबर्दारानें हुजुरास बोलाविल्याबद्दलचें फर्मान दिलेरखानाच्या नांवें आणलें होतें तें मिळालें. उपर्युक्त खान सीवाचें वतन तादरीच्या (तावरीच्या?) आसपासचा व विजापुरी मुलूख लुटीत आहे. चालू वर्षीं सफर महिन्याच्या दहा तारखेपर्यंत तो हुजुराकडे रवाना होईल. वृत्तपत्र पाहून झाल्यावर तें मुहम्मद अजम यास दाखविलें. तेव्हां खान मजकुराबद्दल तक्रार करून हुकूम फर्माविला कीं, 'तो मार्गावरील लोकांना स्वतःच्या स्वार्थासाठीं लुटीत आहे. बादशाही कामाकडे दुर्लक्ष करून आजपर्यंत हुजुरास रवाना झाला नाहीं.

१४६

| | | |
|---|---|---|
| जु. २३ रवल १८ गुरु. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول ۱۸ سنه<br>یوم الخمس سنه ۲۳ | श. १६०२ चैत्र वद्य ४<br>इ. १६८० एप्रिल ८ |

محمد سعید قلعه دار دهرپ گده واقع دکهن عرضداشته
ارسال داشته بود بنظر گذشت معروض داشته که چون جمعیت غنیم
برای تاخت باین جانب آمد و رفت دارد تتمه جمعیت
سوای ضابطه نگاه داشته احوال پریشان شده امیدوار خطاب
خانی و پرداخت است بنابرآن شش صدی ذات سه صد سوار
منصب داشت صدی ذات پنجاه سوار اضافه نموده حکم شد که
بمهر خطاب به خانجهان بهادر رجوع نماید —

दक्षिणेंतील धुडप (धोडप) चा किल्लेदार मुहम्मद सईद यानें अर्ज पाठविला होता तो नजरेखालून घातला. त्यांत लिहिलें होतें कीं, 'शत्रूचे लोक लुटालूट करण्यासाठीं येजा करीत आहेत. उरलेल्या जमेतीची जाबत्याशिवाय व्यवस्था ठेविली आहे. माझी परिस्थिती कठीण आहे. खान या किताबाची आशा करतों. त्यावर त्यास सहाशें जात व तीनशें स्वार अशी मनसब असतां तींत शंभर जात व पन्नास स्वार अशी वाढ केली व हुकूम केला कीं, किताबाच्या शिक्क्यासह खानजहान बहादुराकडे रुजू व्हावें.

१४७

| जु. २३ रवल २१<br>रवि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول ۲۱ سنه<br>یوم الاحد سنه ۲۳ | श. १६०२ चैत्र वद्य ७<br>इ. १६८० एप्रिल ११ |
|---|---|---|

سید غلام محی الدین ولد سید شیر محمد قادری که بمنصب پانصدی ذات سیصده ۳ سوار سرافراز است خدمت فوجداری لوندپور واقع صوبه دکهن از تغیر حاتم بیگ مقرر نموده یک صد و چهل سوار و خلعت مرحمت نموده رخصت فرمودند و حاتم بیگ که بمنصب شش صدی ذات سه صدی سوار سرافرازی داشت صدی ذات پنجاه سوار کم فرمودند —

सय्यिद गुलाम मुहीउद्दीन वलद सय्यिद शेर मुहम्मद कादिरी यास चारशें जात व तीनशें स्वार एवढी मनसब आहे. हातिमबेगच्या बदलीमुळें त्यास दक्षिणच्या सुभ्यांतील लोंदपूरच्या फौजदारीवर नेमून एकशें चाळीस स्वार व खिलअत अशी मेहरबानी केली आणि त्यास निरोप दिला. हातिमबेगास सहाशें जात व तीनशें स्वार एवढी मनसब होती. तीपैकीं शंभर जात व पन्नास स्वार कमी केल्याचें फर्माविलें.

१४८

| जु. २३ रवल २५<br>गुरु. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول ۲۵ سنه<br>یوم الخمیس سنه ۲۳ | श. १६०२ चैत्र वद्य ११<br>इ. १६८० एप्रिल १५ |
|---|---|---|

از وقایع دکهن بعرض رسید که چهترسنگه ولد سبل سنگه از تعیناتیان همراه راو انوپ سنگه تعینات تهانه گلشن آباد بمنصب سه صدی ذات دو صد سوار سرافرازی داشت برخاسته بتعلقه رانا بیراج سنگه رفت حکم شد که بر طرف اغیار نمایند —

दक्षिणेंतील वृत्तपत्रांवरून समजलें कीं, गुलशनाबाद येथें नेमलेला राव अनूपसिंग आणि त्याजबरोबर नेमलेला तीनशें जात व दोनशें स्वार एवढी मनसब असलेला छत्रसिंग वलद सबलसिंग राणा बिराजसिंगाच्या तालुक्यास निघून गेला. हुकूम झाला कीं, त्यास बडतर्फ करून दुसऱ्यास नेमावें.

१४९

| जु. २३ रवल ३०<br>मंगळ. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول ۳۰ سنه<br>یوم الثلاث سنه ۲۳ | श. १६०२ वैशाख शुद्ध २<br>इ. १६८० एप्रिल २० |
|---|---|---|

بموجب نوشته داروغه عمارت مسجد میرته بعرض رسید
که دلاورخان موافق حکم دروازه دیوره‌های بتخانه مسدود
نموده حالا خان مشارالیه بطرف چیتور رفته مردم شهر بت پرستی
مینمایند فرمودند که بگماشته خان مذکور بنویسد که بتخانه
مسمار نماید —

मेरठ येथील मशिदीच्या इमारतीच्या दारूग्याच्या लिहिण्यावरून समजलें कीं, हुकुमाप्रमाणें दिलावरखानानें देवळांचे दरवाजे बंद केले. सध्या उपर्युक्त खान चितोडाकडे गेला आहे. शहरांतील लोक मूर्तिपूजा करीत आहेत. हुकूम झाला कीं, 'खान मजकुराच्या गुमास्त्यास लिहावें कीं, देऊळ पाडून टाकावें.'

१५०

| | | |
|---|---|---|
| जु. २३ रवल ३० मंगळ. | سیاه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول ۳۰ سنه<br>یوم الثلث سنه ۲۳ | श. १६०२ वैशाख शुद्ध २<br>इ. १६८० एप्रिल २० |

از وقایع اورنگ آباد بعرض رسید که سیوا مقهور با جمعیت
براے تاخت قلعه ظفرنگر عرف بدر آمده بود در پرگنه پهولمری
چوتهای تحصیل میکند بنابران شاه عالم جیو به سید شیر خان
قلعه دار آنجا نشان صادر نموده که بندوبست قلعه مذکور خبردار
باشد مقهور را تنبیه نماید بعد مطالعه فرمودند که حسب الحکم
بخان مشارالیه بنویسد و آنچه مردم بهرونجی [بندوقچی] دکهنے
در قلعه مذکور اند برطرف نموده بجاے آنها بندوقچے هندوستانی
نگاه دارند —

औरंगाबादेच्या वृत्तपत्रांवरून समजलें कीं, सीवा आपल्या लोकांसह जफरनगर ऊर्फ बीदर किल्ला लुटण्यासाठीं आला होता. तो परगणे फुलमरी येथें चौथ वसूल करीत आहे. म्हणून तेथील किल्लेदार सय्यिद शेरखान यास शाह आलम यानें निशान (प्रतिनिधिपत्र) पाठविलें कीं, किल्ले मजकूरच्या बंदोबस्ताबद्दल खबरदार असावें व सीवास तंबी द्यावी. हें ऐकून हुकूम झाला कीं, 'उपर्युक्त खानास हस्बुलहुक्म लिहावा कीं, जे कोणी दक्षिणी बंदुकधारी (सैनिक) आहेत त्यांना बडतर्फ करून त्यांच्या जागीं हिंदुस्थानी बंदुकधाऱ्यांना नेमावें.'

१५१

| | | |
|---|---|---|
| जु. २३ रखर ८<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع الثانی ۸ صفر<br>یوم الاربعہ سنہ ۲۳ | श. १६०२ वैशाख शुद्ध १०<br>इ. १६८० एप्रिल २८ |

از واقعہ دکہن بعرض رسید کہ نیازبیگ گرزبردار کہ فرمان عالی شان در باب طلب حضور بدلیرخان بردہ چنانچہ بخان مشار الیہ رسانیدہ عرض کرد کہ خان موصی الیہ برائے روانہ شدن حضور مستعد شدہ بادشاہزادہ شاہ عالم نیز برائے سزاولی روانہ شدہ درگاہ معلے دو گرز بردار نزد خان موصی الیہ تعین نمودہ فرستادند چون جمعیت سیوا مقہور قلعہ ظفرآباد عرف بدر را محاصرہ نمودہ بنابران بادشاہزادہ جیو قلیچ خان را با جمعیت برائے کومک سیدی شیر خان قلعہدار ظفرآباد مذکور تعین نمودہ فرستادند —

दक्षिणेंतील वृत्तपत्रांवरून समजलें कीं, नियाझबेग गुर्जबर्दार यानें दिलेरखानास हुजुर बोलावल्याबद्दचें फर्मान आणलें होतें तें खान मजकुरास पोंचविलें. त्यानें अर्ज केला कीं, खान मजकूर हुजुरास रवाना होण्यासाठीं तयार झाला आहे. शाहआलम हा सजावली करण्यास रवाना झाला. दरबारांतून दोन गुर्जबर्दार नेमून उपर्युक्त खानाकडे पाठविले. सीवाच्या लोकांनीं जफराबाद ऊर्फ बीदर यास वेढा घातला होता म्हणून बादशाहजाद्यानें कुलीचखानास आपल्या लोकांसह जफराबादेचा किल्लेदार सीदी शेरखान याच्या मदतीसाठीं नेमून पाठविलें.

१५२

| | | |
|---|---|---|
| जु. २३ रखर १४<br>मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع الثانی ۱۴ صفر<br>یوم الثلث سنہ ۲۳ | श. १६०२ वैशाख वद्य १<br>इ. १६८० मे ४ |

جادو نرائے دکہنی سہ ہزاری ذات دو ہزار پانصدی سوار در جنگ حیدرآباد تردد نمودہ بنابران دلیرخان پانصدی ذات پانصد سوار اضافہ تجویز نمودہ بود منظور نفرمودہ —

तीन हजार जात व पंचवीसशें स्वार एवढी मनसब असलेल्या जादूराय या दख्खनी सरदारानें हैद्राबादेच्या लढाईंत खूप कष्ट केले. म्हणून दिलेरखानानें ( त्यासाठीं ) पांचशें जात व पांचशें स्वार एवढी वाढ व्हावी अशी तजवीज केली होती. पण बादशाहानें हें मान्य केलें नाहीं.

१५३

| | | |
|---|---|---|
| जु. २३ जवल ३<br>शनि. | سیاهہ وقایع دربار معلے<br>ماه جمادی الاول ۳ سنہ<br>یوم السبت سنہ ۲۳ | श. १६०२ ज्येष्ठ शुद्ध ५<br>इ. १६८० मे २२ |

درویش بیگ گرزبردار جہتہ تاکید معہ حسب الحکم بہ نیاز بیگ گرزبردار براے آوردن دلیرخان رفتہ بود چنانچہ رسانیدہ آمدہ بعرض رسانید کہ دلیرخان بتاریخ ۱۶ ربیع الثانے سنہ ۲۳ از پیڈگانو کوچ نمودہ تا بمنزل تیر ہمراہ آمدیم و نیز عرض رسانید کہ طبیعت شاہزادہ شاہ عالم چنان بود بتاریخ بیست پنجم شہر مذکور پیش خانہ خواہد براید و پنجم شہر جمادی الاول سنہ الیہ روانہ حضور خواہد شد خانجہان بہادر بہ منزل پہولمری و رخواد کوچ بکوچ میرود —

दिलेरखानास परतण्याबद्दल ताकीद देण्यासाठीं हस्बुलहुकूम घेऊन दरवेशबेग गुर्जबर्दार, नियाझबेग गुर्जबर्दाराकडे गेला होता. ताकीद करून तो परत आला. त्यानें अर्ज केला कीं, ‘ रखर १६ सन २३ ला दिलेरखानानें पेडगांवाहून कूच केलें. तेरपर्यंत आम्ही बरोबर आलों. शाहआलमची प्रकृती चालू महिन्याच्या २५ तारखेस त्याचा पेशखाना रवाना होईल अशी आहे. ५ जवलला तो हुजुरास येईल. खानजहान बहादूर फुलंब्रीहून निघून पुढें कूच करीत आहे. ’

१५४

| | | |
|---|---|---|
| जु. २३ जखर ३<br>सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه جمادی الثانے ۳ سنہ<br>یوم الاثناء سنہ ۲۳ | श. १६०२ आषाढ शुद्ध ४<br>इ. १६८० जून २० |

جیرام نام ہندو برضاے رغبت خود مسلمان شد خلعت دادند —

जयराम नांवाचा हिंदू स्वखुषीनें मुसलमान झाला. त्यास पोषाक दिला.

१५५

| | | |
|---|---|---|
| जु. २३ जखर २०<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه جمادی الثانے ۲۰ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۳ | श. १६०२ आषाढ वद्य ६<br>इ. १६८० जुलै ७ |

محمد و جمال وغیرہ دو نفر گرزبردار فرمان بنام خان جہان بہادر و فرامین بنام ایرج خان وغیرہ بدین مضمون بردہ بودند

که خان جهان بهادر را صوبه داری دکهن مقرر شد با خان مشار الیه
ملاقی شده برای کار بادشاهی بگویند به عمل آرند درین ولا
رسانیده در جواب عرضداشت هر کدام آورده بنظر گذرانید و
از زبانی آنها بعرض رسید که خان جهان بهادر بطرف دهرپ گده
رفته رنمست خان را با جمعیت چهار هزار سوار برای محاصره
هنونت گده که سیوا مقهور متصرف شده بود فرستاده است بدین
موجب خدمتانه یافته بود معاف فرمودند —

मुहम्मद व जमाल या दोन गुर्जबर्दारांनीं खानजहान बहादूर व इरजखान वगैरेंच्या नांवें खानजहान बहादुरास दक्षिणेच्या सुभेदारीवर नेमलें आहे; उपर्युक्त खानाची भेट घेऊन बादशाही कामाबद्दल विचारविनिमय करून वागावें अशा आशयाचीं फर्मानें आणिलीं होतीं तीं पोंचविलीं. उत्तरादाखल त्यांचे अर्ज आले ते नजरेखालून घातले व तोंडीं अर्ज केला कीं, ‘खानजहान बहादूर धोडपगडाकडे गेला. सीवानें आपल्या ताब्यांत आणलेल्या हनुमंतगडास वेढा देण्यासाठीं रणमस्तखानास चार हजार स्वारांसह पाठविलें आहे.’ खिदमताना मिळाला होता तो माफ फर्माविला.

१५६

| | | |
|---|---|---|
| जु. २३ जखर २३<br>रवि. | سیاهه اخبارات دربار<br>معلی ماه جمادی الثانی<br>۲۳ سنه یوم الاحد سنه ۲۳ | श. १६०२ आषाढ वद्य ९<br>इ. १६८० जुलै १० |

از واقعه دکهن بعرض رسید که سید مصطفے نبیره مرتضی خان
مرحوم هنگام فوجداری جالنه در قید سیوا مقهور بود درین ولا آمده
ملازمت نموده حکم شد پانصدی ذات دو صد سوار بحال شناسند —

दक्षिणेच्या वृत्तपत्रावरून समजलें कीं, मुर्तजाखानाचा नातू सय्यिद मुस्तफा हा जालन्याचा फौजदार असतां सीवाच्या कैदेंत होता, तेथून पळून येऊन त्यानें चाकरी केली. हुकूम झाला कीं, पांचशें जात व दोनशें स्वार एवढी मनसब त्यास दिली असें समजावें.

१५७

| | | |
|---|---|---|
| जु. २३ जखर २५<br>मंगळ. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه جمادی الثانی ۲۵ سنه<br>یوم الثلاث سنه ۲۳ | श. १६०२ आषाढ वद्य ११<br>इ. १६८० जुलै १२ |

قلندر خان قلعه دار نلدرگ دو هزاری ذات دو هزار سوار

منجملہ ہزاری ہزار سوار بلا شرط تتمہ بشرطی بود از روے
مہربانے پانصدی ذات دیگر بلا شرط فرمودند —

नळदुर्गचा किल्लेदार कलन्दरखान यास दोन हजार जात व एक हजार स्वार एवढी मनसब होती. तीपैकीं हजार जात व एक हजार स्वार बिनशर्त व बाकी सशर्त होते. बादशाहानें कृपा करून आणखी पांचशें जात बिनशर्त केल्याचें फर्माविलें.

१५८

| | | |
|---|---|---|
| जु. २३ जखर २८<br>शुक्र. | سیاہم اخبارات دربار معلے<br>ماہ جمادی الثانے ۲۸ سنہ<br>یوم الجمعہ سنہ ۲۳ | श. १६०२ आषाढ वद्य ३०<br>इ. १६८० जुलै १५ |

شیخ عبداللہ بعرض رسانید کہ عبدالسلام درویش در مسجد
کہ جاے بتخانہ بود متصل درگاہ خواجہ معین الدین چشتی می
نمایند فوت شدہ فرمودند کہ جنازہ درویش درست کردہ در
خاص عام بیارید کہ نماز جنازہ خواہیم خواند بنابرآن شیخ مذکور
جنازہ درویش آوردہ مابین چبوترہ خاص عام نہادہ بندگان
حضرت تشریف آوردہ خود بدولت امامت جنازہ خواندہ فرمودند
بردہ دفن نمایند —

शेख अब्दुल्लाहानें अर्ज केला कीं, ‘अब्दुस्सलाम दरवेश हा, ख्वाजा मुईनुद्दीन चिश्तीच्या दर्ग्याजवळ असलेल्या, देवळाच्या जागीं उभारलेल्या मशिदींत मरण पावला.’ हुकूम झाला कीं, ‘दरवेशाचें प्रेत खास व आम-मध्यें आणावें, म्हणजे जनाज्याचा निमाज आम्ही पढूं.’ तेव्हां शेख मजकूर यानें दरवेशाचें प्रेत आणून खास व आम यांमधील चबुतऱ्यावर ठेवलें. बादशाह तेथें आला. त्यानें स्वतः इमामीचें काम करून जनाज्याचा निमाज पढला. नंतर फर्माविलें कीं दफन करावें.

१५९

| | | |
|---|---|---|
| जु. २३ रज्जब ९<br>मंगळ. | سیاہم اخبارات دربار معلے<br>ماہ رجب المرجب ۹ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۳ | श. १६०२ श्रावण शुद्ध १०<br>इ. १६८० जुलै २६ |

بختاور عرف راج سنگہ نو مسلم نبیرہ بدل سنگہ بہدوریہ
سیصدی ذات ہشتاد سوار بود صدی ذات بیست سوار شاہ عالم
جیو اضافہ تجویز نمودہ بود منظور شد —

بدربار خان حکم شد از بندی بابت موضع یاول نزد قاضی
شیخ الاسلام بفرستند کہ مطابق شرع نماید —
مظفر لودی را تھانہ داری گلشن آباد از تغیر انوپ سنگھ معہ
خطاب لودی خان و اضافہ پسران وغیرہ شاہ عالم تجویز نمودہ
بود بعرض رسید حکم شد خانجہان بہادر رجوع نماید —

( १ ) बदलसिंग भदोरिया याचा नुकताच मुसलमान झालेला नातू बख्तावर उर्फ राजसिंग यास तीनशें जात व ऐंशी स्वार एवढी मनसब होती. तींत शंभर जात व वीस स्वार एवढी वाढ करण्याची तजवीज शाह आलम यानें केली होती ती मंजूर झाली.

( २ ) दरबारखानास हुकूम झाला कीं, मौजे यावलचे कैद्यांना काजी शेख-उल्-इस्लाम याजकडे पाठवावें. त्यानें धर्माप्रमाणें कृती करावी.

( ३ ) अनूपसिंगाची बदली झाल्यावर मुजफ्फर लोदी यास गुलशनाबादेच्या ठाणेदारीवर नेमून लोदीखान ही पदवी व त्याचे मुलगे इत्यादींना वाढ मिळण्याची शाह आलम यानें तजवीज केली होती असा अर्ज आला. हुकूम झाला कीं खान जहान बहादुराकडे रुजू करावें.

१६०

| जु. २३ रज्जब १४ शनि. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ رجب المرجب ۱۴ سنہ یوم السبت سنہ ۲۳ | श. १६०२ श्रावण शुद्ध १५<br>इ. १६८० जुलै ३१ |
|---|---|---|

از عرضداشت دیبی سنگھ قلعہ دار مولہیر بعرض رسید مفاصلہ
پنج کروہ انجا مفسدان قلعچہ مرمت نمودہ اذوقہ جمع کردہ بودند
فدوی جمعیت فرستادہ مفسدان را اخراج نمودہ قلعچہ مسمار ساختہ
فرمودند کہ مجری او شد —

मुल्हेरचा किल्लेदार देवीसिंग याच्या अर्जावरून समजलें कीं, 'येथून पांच कोस अंतरावर शत्रू येऊन छोटया किल्ल्याची (किलेचह) दुरुस्ती करून धान्य गोळा करीत होता. तेव्हां किल्लेदारानें लोक पाठवून शत्रूस घालवून दिलें. छोटा किल्ला पाडून टाकला.' हुकूम झाला कीं, पसत आहे.

१६१

| जु. २३ रज्जब २८ | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ رجب المرجب ۲۸ سنہ یوم ... سنہ ۲۳ | श. १६०२ श्रावण वद्य ३०<br>इ. १६८० ऑगस्ट १४ |
|---|---|---|

بدربار خان حکم شده بندی بابت موضع یاول منجمله آنچه عورت و کودکان اند نزد خود نگاه دارد سی و پنج نفر مرد را حواله احتشام خان نماید که مسلمان کرده نماز بیاموزند چنانچه مطابق حکم کوتوال مذکور آنهارا مسلمان ساخت —

दरबारखानास हुकूम झाला कीं, यावल येथील कैद्यांपैकीं बायका व मुलें यांना स्वतःच्या देखरेखींत ठेवून ३५ पुरुषांना इहतशामखानाच्या हवालीं करावें. त्यानें त्यांना मुसलमान करून नमाज शिकवावा. तेव्हां कोतवाल मजकुरानें हुकुमाप्रमाणें त्यांना मुसलमान केलें.

१६२

| जु. २३ शाबान १७ गुरु. | سیاهه اخبارات دربار معلے ماه شعبان المعظم ۱۷ سنه یوم الخمس سنه ۲۳ | श. १६०२ भाद्रपद वद्य ३ इ. १६८० सप्टेंबर १ |
|---|---|---|

از واقع دکهن بعرض رسید که خانجهان بهادر بیست پنج توپ از قلعه شولاپور طلب نموده علی آقا رومی و جگت سنگه هاده و راجه جسونت بوندیله براے توپهاے فرستاده بود چنانچه هنگام شب مردم توپهاے از قلعه فرود آورده ازین اخبار غنیم جمیعت فرستاده توپ بغارت برده ازین خبر خان مشار الیه خواسته بود که خود سواری نماید چون رنمست خان و داود خان ظاهر نمودند که مایان بر چه کار خواهیم آمد خدا نخواسته باشد اگر نوعی دیگر شود مناسب ندارد که صاحب فوج سوار شود اگر همراه مایان جنگ خواهد شد شما کومک خواهد کرد بنا بران خان مذکور رنمست خان و داود خان را جمعیت ده هزار سوار تعین ساخته بدیوان این صوبه گفته که آنچه قیمت توپهاے باشد داخل مطالبه علی اقا و جگت سنگه و جسونت بوندیله نمایند هرچه امر شود حکم شد از هر سه هزده هزار روپیه باز یافتن نمایند —

दक्षिणेच्या वृत्तपत्रावरून समजलें कीं, 'खानजहान बहादुरानें सोलापुराहून २५ तोफा मागविल्या व त्या आणण्यासाठीं अली आका रूमी, जगतसिंग हाडा व राजा जसवंतसिंग बुंदेला यांना पाठविलें होतें. रात्रीं लोकांनीं किल्ल्यांतून तोफा काढून आणल्या. ह्या बातमीमुळें शत्रूनें लोक पाठविलें व तोफा लुटून नेल्या. हें कळल्यावर उपर्युक्त खानास वाटलें कीं,

स्वतः स्वारी करावी. पण रणमस्तखान व दाऊदखान यांनीं जाहीर केलें कीं, मग आम्ही काय कामाचे ! ईश्वर न करो, पण भलतेंच कांहीं झालें तर ! म्हणून फौजेच्या प्रमुखानें स्वार न व्हावें. आमच्याबरोबर लढाई झाली तर तुम्ही आमची कुमक करावी. तेव्हां खान मजकुरानें रणमस्तखान व दाऊदखान या सांगातीं दहा हजार स्वार दिले व त्या सुभ्यांतील दिवाणास कळविलें कीं, ह्या तोफांची किंमत असेल ती अली आका, जगत्सिंग व जसवंत बुंदेला यांच्या मागण्यांत दाखल करावी. हुकूम व्हावा.' हुकूम झाला कीं, तिघांकडून प्रत्येकीं अठरा हजार रुपये वसूल करावे.

१६३

ज़ु. २३ शाबान २० रवि.

سیاهه اخبارات دربار معلی
ماه شعبان المعظم ۲۰ سنه
یوم الاحد سنه ۲۳

श. १६०२ भाद्रपद वद्य ६
इ. १६८० सप्टेंबर ४

علی آقا رومی وغیره بسبب توپها از دکهن مردم غنیم برده بنابران منصب کم نموده —

अली आका रूमी वगैरेकडील दक्षिणेंतील तोफा शत्रूनें नेल्या म्हणून मनसब कमी केली.

१६४

ज़ु. २३ शाबान २२ मंगळ.

سیاهه اخبارات دربار معلی
ماه شعبان المعظم ۲۲ سنه
یوم الثلث سنه ۲۳

श. १६०२ भाद्रपद वद्य ९
इ. १६८० सप्टेंबर ६

غریبداس و رای سنگه فرستاده مان سنگه مسلمان شدند هر دو را هزار روپیه انعام مرحمت فرمودند —

मानसिंगानें पाठविलेले गरीबदास व रायसिंग मुसलमान झाले. प्रत्येकास हजार रुपये देण्याची कृपा केली.

१६५

ज़ु. २४ रमजान ८ बुध.

سیاهه اخبارات دربار معلی
ماه رمضان المبارک ۸ سنه
یوم الاربعه سنه ۲۴

श. १६०२ आश्विन शुद्ध ९
इ. १६८० सप्टेंबर २२

فضایل خان عرض نمود که بهوانی داس ولد راو آنند چند منوهرپوری التماس دارد که بنده مسلمان میشود که چیزی

رعایت فرمایند بنابران بحضور طلبیده کہ مسلمان شده
انعام غریب داس مسلمان شد خلعت —

फजाइलखानानें अर्ज केला तो असा–भवानीदास वलद राव आनंदचंद मनोहरपुरी यानें विनंति केली कीं, 'मी मुसलमान होत आहे तरी माझ्यावर कांहीं कृपा व्हावी.' तेव्हां त्यास हुजुरास बोलावून मुसलमान केलें व इनाम दिलें. गरीबदास मुसलमान झाला त्यास खिलअत दिली.

१६६

| | | |
|---|---|---|
| जु. २४ रमजान १४ मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماه رمضان المبارک ۱۴ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۴ | श. १६०२ आश्विन शुद्ध १५<br>इ. १६८० सप्टेंबर २८ |

غریب داس وغیره نو مسلم نو سرافراز شد دو ہزار روپیہ
مساعدت یافتہ بود فراری شدند حکم شد مساعدت مذکور از ضامن
آنہا بگیرد —

नुकतेच मुसलमान झालेले गरिबदास वगैरे, पळून गेले. हुकूम झाला कीं, त्यांस दिलेलें बक्षीस त्यांच्या जामिनाकडून परत घ्यावें.

१६७

| | | |
|---|---|---|
| जु. २४ रमजान १६ गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماه رمضان المبارک ۱۶ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۴ | श. १६०२ आश्विन वद्य ३<br>इ. १६८० सप्टेंबर ३० |

از واقعہ دکہن عرض رسید کہ مخلص خان تهانہ دار رامگده
دو ہزار پانصدی ذات یک ہزار چہار صد سوار بود فوت شده —

दक्षिणच्या वृत्तपत्रावरून समजलें कीं, रामगडचा ठाणेदार मुखलिसखान यास पंचवीसशें जात व चौदाशें स्वार अशी मनसब होती. तो मरण पावला.

१६८

| | | |
|---|---|---|
| जु. २४ शव्वाल १० सोम. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماه شوال المعظم ۱۰ سنہ<br>یوم الاثناء سنہ ۲۴ | श. १६०२ कार्तिक शुद्ध १२<br>इ. १६८० आक्टोबर २४ |

یعقوب بیگ گرزبردار فرمان در باب قلعداری اوسہ بنام
سید انورخان و فرمان قلعداری پرنده سہراب خان برده بود

رسانیده عرض داشت آورده بنظر گذرانید بعرض رسانید کہ
سیصد ہشتاد روپیہ خدمتانہ یافتہ بود معاف فرمودند—

याकूबबेग गुर्जबर्दार यानें औशाच्या किल्लेदारीबाबत सय्यिद् अन्वरखान यास व परिंड्याच्या किल्लेदारीबाबत सुहराबखान यास फर्मानें पोहोंचवून, त्यांचा अर्ज आणून बादशाही नजरेखालून घातला. ३८० रुपये खिदमताना मिळाला होता तो माफ फर्माविला.

१६९

| जु. २४ शव्वाल २४ सोम. | سیاہہ اخبارات دربار معلے ماہ شوال ۲۴ صفر یوم الاثنا سنہ ۲۴ | श. १६०२ कार्तिक वद्य १२ इ. १६८० नोव्हेंबर ७ |
|---|---|---|

محمد مومن وغیرہ دو نفر گرزبردار فرمان بنام خان جہان بہادر در شانزدہ روز بردہ رسانید چہار روز در آنجا ماندہ در شانزدہ روز عرض داشت آوردہ بنظر گذرانیدہ و سیصد ۳ روپیہ خدمتانہ یافتہ بود معاف نمودہ و زبانی آنہا ظاہر شدہ کہ اکبرابتر در قلعہ پالی گدہ معہ جمعیت قلیل بمردم راتھوران و نوکران سنبہا پسر سیوا مقہور سکونت دارد چنانچہ مقہور اکبرابتررا جاے رفتن نمی دہد—

मुहम्मद मोमीन वगैरे दोन गुर्जबर्दारांनीं खानजहान बहादुराच्या नांवाचें फर्मान सोळा दिवसांत नेऊन पोहोचविलें. ते चार दिवस तेथें राहिले. सोळा दिवसांत अर्ज आणून नजरेखालून घातला तीनशें रुपये खिदमताना मिळाला होता तो माफ केला. त्यांजकडून तोंडीं समजलें कीं, अकबर हा पालीगडांत आपले स्वतःचे थोडे लोक, राठोडाचे लोक व सीवाचा मुलगा संभा याचे लोक यासमवेत रहात आहे. संभाजी अकबरास जाऊं देत नाहीं.

१७०

| जु. २४ शव्वाल २४ सोम. | سیاہہ اخبارات دربار معلے ماہ شوال ۲۴ صفر یوم الاثنا سنہ ۲۴ | श. १६०२ कार्तिक वद्य १२ इ. १६८० नोव्हेंबर ७ |
|---|---|---|

دیروز آخر وقت دو گہری شب گذشتہ خلوت فرمودند دلیرخان حسب الحکم آمدہ حاضر شد و جملۃ الملک اسد خان و بخشی الملک روح اللہ خان نیز حاضر بودند بندگان حضرت بدلیرخان

...७...

پرسیدند شما قلعه بیجاپوررا محاصره کرده بود بتصرف بادشاهی نیامده باعث چه بوده بعرض رسانید که فدوی در تلاش تردد بود که خبر رسید صوبه‌داری دکهن به خان جهان بهادر سرافراز شده بنابران کم طالعی بنده که قلعه مذکور بدست نه آمده باز فرمودند که ما بدولت سعادت سه ۳ فوج مقرر نموده یک فوج شاهزاده محمد اعظم شاه بجهته خبرداری اورنگ‌آباد و دو فوج در ملک سنبها درآمد نماید عرض نموده حضرت کرامات کردند اگر همگین دو فوج شوند و پرداخت آنها کردد بجهه تنبیه غنیم کافی است و دیگر مذکورات پرسیده پنج گهری شب گذشته بدیره رخصت نموده یک پهر دو گهری روز بر آمده در غسل خانه تشریف فرمودند —

काल दोन घटका रात्र झाल्यावर बादशाहानें एकांत केला. दिलेरखान हुकुमाप्रमाणें येऊन हजर झाला. जुम्लतुल्मुल्क असदखान व बक्षीउल्मुल्क रूहुल्लाहखान हेही हजर होते. दिलेरखानास बादशाहानें विचारलें, 'तू विजापूरच्या किल्ल्यास वेढा दिला होतास; परंतु तो हस्तगत झाला नाहीं; याचें कारण काय?' त्यानें अर्ज केला कीं, 'मी अत्यंत कष्ट करीत होतों; पण बातमी आली कीं, दक्षिणची सुभेदारी खानजहान बहादुरास दिली; तेव्हां या कमनशीबी चाकराच्या हातीं किल्ला आला नाहीं.' बादशाह म्हणाला, 'आम्ही तीन फौजा केल्या; पैकीं औरंगाबादेच्या खबरदारीसाठीं एक फौज मुहम्मद अअजमशाहाबरोबर व दोन फौजा संभाच्या प्रांतांत घुसण्यासाठीं नेमल्या.' त्यानें अर्ज केला कीं, 'बादशाहांनीं फारच मोठी कृपा केली. दोन फौजा असतील व काम करतील तर शत्रूस तंबी देण्यास पुरेशा आहेत.' बादशाहानें इतर मजकूर विचारून पांच घटका संपल्यावर त्यास डेऱ्यास जाण्यास निरोप दिला. एक प्रहर व दोन घटका दिवस निघाल्यावर बादशाह घुसलखान्यांत आला.

१७१

| | | |
|---|---|---|
| जु. २४ जिल्काद ३ सोम. | سیاهه اخبارات دربار<br>ماه ذی قعده ۳ مه<br>یوم الاثناء سنه ۲۴ | श. १६०२ मार्गशीर्ष शुद्ध ४<br>इ. १६८० नोव्हेंबर १५ |

خلعت انعام مرلیدهر قانون‌گوی علی‌پور مسلمان شد

امرسنگه ولد راجه هردیو صدی ذات ده سوار سرافراز نموده همراه پدر تعینات دکهن حکم شد —

अलीपूरचा कानूनगो मुरलीधर मुसलमान झाला; त्यास इनाम दिलें. अमरसिंग वलद राजा हरदेव यास शंभर जात व दहा स्वार अशी मनसब देऊन बापाबरोबर दक्षिणेंत नेमल्याचा हुकूम झाला. त्यास खिलअत दिली.

१७२

| | | |
|---|---|---|
| जु. २४ जिल्काद ३० रवि. | سیاهہ اخبارات دربار<br>ماه ذی قعده ۳۰ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۴ | श. १६०२ पौष शुद्ध १<br>इ. १६८० डिसेंबर १२ |

یک بندوقچی نوکر سرکار والا استغاثہ شده کہ یک جاسوس رانا نزد بنده آمده ظاہر مینماید کہ پسر رانا راج سنگہ خیلی بہ تنگ آمده اقرار نموده اگر حضرت جان بخشی فرمایند پسر خودرا بحضور فرستند بہ عبدالرحیم خان حکم شده کہ حقایق بندوقچی و جاسوس فہمیده بعرض رسانند —

बादशाही नोकरांपैकीं एका बंदूकधाऱ्यानें तक्रार केली कीं, राण्याचा एक हेर माझ्याजवळ येऊन सांगत आहे कीं, 'राणा राजसिंगाचा मुलगा अतिशय त्रासलेल्या परिस्थितींत आहे. तो म्हणतो कीं, बादशाह मला जीवदान देतील तर स्वतःच्या मुलास हुजुरास पाठवीन. तेव्हां अब्दुर्रहीम-खानास हुकूम झाला कीं, बंदुकधाऱ्याची व हेराची माहिती तपासून अर्ज करावा.

१७३

| | | |
|---|---|---|
| जु. २४ जिल्हेज ८ सोम. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماه ذی الحجہ ۸ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۴ | श. १६०२ पौष शुद्ध १०<br>इ. १६८० डिसेंबर २० |

خانجہان بہادر عرضداشتہ ارسال داشتہ بود بنظر گذشت معروض داشتہ کہ پسر سیوا مقہور این جانب شولاپور آمده بود رنمست خان وغیره بندہاے بادشاہی را بان جانب تعین نموده بود چنانچہ جنگ واقع شده از اقبال حضرت مقہوران را شکست داده بسیاری جانبین کشتہ شده از روے واقعہ مفصل بعرض والا خواہند رسید —

खानजहान बहादुरानें अर्ज पाठविला होता (तो) नजरेखालून घातला. लिहिलें होतें कीं, सीवाचा मुलगा सोलापूरच्या अलीकडे आला होता. रणमस्तखान वगैरे बादशाही लोकांस तिकडे नेमलें होतें. लढाई झाली.

बादशाही सुदैवामुळें त्याचा मोड झाला. दोन्हीकडील बरेच लोक मारले गेले. घटनेची तपशीलवार माहिती आपणांकडे येईल.

१७४

| | | |
|---|---|---|
| जु. २४ जिल्हेज १२ शुक्र. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه ذی الحجه ۱۲ سنه<br>یوم الجمعه سنه ۲۴ | श. १६०२ पौष शुद्ध १४<br>इ. १६८० डिसेंबर २४ |

راجه دیبی سنگه فوجدار مولهیر عرضداشت در تلوه نقره ارسال داشته بود بنظر گذشت معروض داشته بود که بیست لک دام جاگیر بنده تنخواه نموده متصدیان حضور تغیر کرده از حکم معلے عذر نیست التماس دارد که عوض آن در جاے دیگر شود حکم شده که اسد خان بعرض رساند

मुल्हेरचा फौजदार राजा देवीसिंग यानें चांदीच्या नळयामध्यें अर्ज पाठविला होता तो नजरेखालून घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, 'जहागिरींतून मला वीस लाख दाम तनखा मिळतो. हुजूरच्या अधिकाऱ्यांनीं ते दूर केले आहेत. मी बादशाही हुकुमाविरुद्ध नाहीं, परंतु विनंति करतों कीं, ह्याऐवजीं दुसऱ्या जागीं तनखा द्यावा.' हुकूम झाला कीं, असदखानानें अर्ज करावा.

१७५

| | | |
|---|---|---|
| जु. २४ जिल्हेज १५ सोम. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه ذی الحجه ۱۵ سنه<br>یوم الاثناء سنه ۲۴ | श. १६०२ पौष वद्य २<br>इ. १६८० डिसेंबर २७ |

بعرض رسید که اباجی وغیره زمینداران بگلانه را سابق دلیرخان منصب تجویز نموده بود حکم شده خانجهان بهادر رجوع نماید درین ولا خان مشارالیه منصب آنها تجویز نموده فرمودند که به خانجهان بهادر بنویسد که سابق معروض داشته بود جمع و خرچ صوبه مذکور برابر است درین ولا مردم تجویز نموده بحضور منظور داشته تنخواه از کجا خواهد داد سه ۳ و شش ۶ نفر مشارالیه بهوج ملجی سونجی وغیره سه ۳ نفر بوده جی —

अर्ज आला कीं, पूर्वी दिलेरखानानें बागलाणांतील आबाजी वगैरे जमीनदारांना मनसबीची तजवीज केली होती हुकूम झाला कीं, खानजहान बहादुरानें तें काम पुरे करावें. सध्या उपर्युक्त खानानें मनसबीची तजवीज केली आहे यावर हुकूम झाला कीं, खानजहान बहादुरास लिहावें कीं, पूर्वी अर्ज

आल्याप्रमाणें उपर्युक्त सुभ्याचा जमा व खर्च सारखा आहे. नंतर लोकांसाठीं केलेली तजवीज मंजूर केली. आतां त्यांना तनखा कोठून द्यावा? उपर्युक्ताचे ३ व ६ लोक, बोधजीचे भोजमलजी, सोनजी, मानजी वगैरे तीन लोक.

१७६

जु. २४ मोहरम २५ शनि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه محرم الحرام ۲۵ سنه<br>یوم السبت سنه ۲۴ | श. १६०२ माघ वद्य १२<br>इ. १६८१ फेब्रुवारी ५
--- | --- | ---

بچھترمل واقعه نویس فرمودند که گهاتی راه چانده در راه
دکهن است از آن جا چه مفاصله است تحقیق نموده بعرض رساند
بموجب نوشته خانجهان بهادر بعرض رسید که شش هزار من
شوره پخته باروت درکار است امیدواریم که از حضور مرحمت
شود فرمودند خان مشار الیه شوره از این جا طلبیده و سیوا مقهور
از کجا بهم می رساند مگر در صوبه دکهن این قدر شوره نیست
بعرض رسید که مقهور مذکور از نواحی کرناتک وغیره جاے ها
میطلبید و در صوبه دکهن یک جاے بالاپور است جزوی پیدا
میشود چنانچه در قلعجات خرچ میگردد فرمودند که سابق هم گاه
شوره از حضور فرستاده اند بعرض رسید که هرگاه تودرمل
بیوتات دکهن بوده آن زمان شش هزار من شوره فرستاده بودند
تا حال خرچ شده فرمودند که حالا هم بمتصدیان اکبرآباد بنویسند
که پنج هزار من شوره سربراه کرده به دکهن بفرستند —

वाकेनवीस छत्रमल यास हुकूम झाला कीं, दक्षिणच्या वाटेवर चांद्याची घाटी आहे ती येथून किती अंतरावर आहे तें चौकशी करून कळवावें. खानजहान बहादुराच्या लिहिल्यावरून समजलें कीं, 'पक्क्या दारूसाठीं सहा हजार मण सोऱ्याची आवश्यकता आहे. आशा आहे कीं, हुजुराकडून पाठविला जाईल.' हुकूम झाला कीं, 'खान मजकूर यानें इकडून सोरा मागविला; मग सीवा कुठून मिळवितो?' दख्खनच्या सुभ्यांत इतका सोरा नाहीं? अर्ज केला 'सीवा कर्नाटकच्या आसपासचीं व इतर ठिकाणें येथून सोरा मागवितो. दक्षिणच्या सुभ्यांत फक्त बाळापूर येथेंच थोडासा सोरा मिळतो. तो किल्ल्यांमध्यें खर्ची पडतो' हुकूम झाला कीं, 'पूर्वींही एकदां हुजुराकडून सोरा पाठविला होता.' अर्ज केला कीं, 'तोडरमल दक्षिणच्या घराऊ कामावर होता तेव्हां सहा हजार मण सोरा पाठविला होता. तो आतां-

पर्यंत खर्च झाला.' हुकूम झाला कीं, 'अकबराबादच्या सर्व मुतसद्द्यांना लिहावें कीं, पांच हजार मण सोन्याची व्यवस्था करून तो दक्षिणेस पाठवावा.'

१७७

| | | |
|---|---|---|
| जु. २४ मोहरम २६<br>रवि. | سیاهه اخبارات دربار<br>ماه محرم الحرام ۲۶ منه<br>یوم الاحد سنه ۲۴ | श. १६०२ माघ वद्य १३<br>इ. १६८१ फेब्रुवारी ६ |

چهترمل واقعه‌نویس بموجب حکم بعرض رسانید که از گهاٹے چانده دوازده کروه این جانب رام‌پور است فرمودند که از اجمیر بوندی چه قدر مسافت دارد عرض نموده که چهل کروه —

हुकुमाप्रमाणें वाकेनवीस छत्रमल यानें अर्ज केला कीं, चांद्याच्या घाटीपासून रामपूर या बाजूस बारा कोस आहे. हुकूम झाला कीं, अजमेराहून बूंदी किती अंतरावर आहे? अर्ज केला कीं, चाळीस कोस आहे.

१७८

| | | |
|---|---|---|
| जु. २४ सफर ४<br>रवि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه صفر ۴ منه<br>یوم الاحد سنه ۲۴ | श. १६०२ फाल्गुन शुद्ध ५<br>इ. १६८१ फेब्रुवारी १३ |

عرضه‌داشت نوکران شاه عالم شاهزاده جیو آورده حاجی عبدالله وکیل بنظر گذرانیده عرضه‌داشت روح‌الله خان و عزیزالله خان نیز بنظر گذرانیده بزبانے بعرض رسید که شاهزاده جیو به بدگانون رسیده خبر یافته محمد امین خان صوبه‌دار احمد آباد به پٹن رسیده ازین ممر محمد اکبر بجانب تهل هاے جسلمیر رفته عقب ایشان قلیچ خان و راجه اندر سنگه و غیره فوج بادشاهی رفته اند حکم شده در جواب عرضه‌داشت فرمان به شاهزاده جیو قلمی نمایند —

शाहआलमची अर्जदाश्त त्याच्या नोकरांनीं आणिली. हाजी अब्दुल्लाह वकीलानें ती बादशहाच्या नजरेखालीं घातली. रूहुल्लाहखान व अझीझुल्लाहखान वगैरेंची अर्जदाश्त बादशहाच्या नजरेखालीं घातली. तोंडीं अर्ज केला कीं, शाहजादा पेडगावास पोहोंचला. बातमी मिळाली कीं, अहमदाबादचा सुभेदार मुहम्मद अमीनखान हा पटण (पाटण) ला पोहोंचला म्हणून मुहम्मद अकबर जेसलमेरमधील ठिकाणांकडे गेला. तेव्हां कुलीच-

खान, राजा इंदरसिंग व इतर बादशाही फौज त्याचा पाठलाग करीत गेली आहे. हुकूम झाला कीं, उत्तरादाखल शाहजाद्यास फर्मान लिहावें.

१७९

| | | |
|---|---|---|
| जु. २४ सफर १० शनि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه صفر ١٠ سنه<br>یوم السبت سنه ٢٤ | श. १६०२ फाल्गुन शुद्ध १२<br>इ. १६८१ फेब्रुवारी १९ |

از واقع برهانپور بعرض رسید که مردم غنیم فراهم شده آمده ازین ممر کاکرخان بابت خانجهان بهادر که در آنجا بود قلعه بند شده خبردار مانده مفسدان بر کرن پوره و غیره رجپوتان بیرق نهاده دیگر تمام شهر را تا سه ٣ روز مانده تاراج نموده رفتند —

बुर्हानपूरच्या वृत्तपत्रावरून समजलें कीं, शत्रुसैन्य एकत्र जमून आलें या बातमीमुळें खानजहान बहादूरकडून काकरखान येथें आला होता. त्यानें किल्ला बंद करून घेऊन खबरदारी बाळगली. शत्रू करणपुऱ्यावर तुटून पडला, रजपुतांना निःशस्त्र केलें व तीन दिवस शहरांत राहून तें लुटून गेला.

१८०

| | | |
|---|---|---|
| जु. २४ सफर १४ बुध. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه صفر ١٤ سنه<br>یوم الاربعه سنه ٢٤ | श. १६०२ फाल्गुन वद्य १<br>इ. १६८१ फेब्रुवारी २३ |

ده هزار روپیه خیرات بمردم برهانپور که متاع آنها پسر سیوا مقهور تاراج نموده از خزانه صرف خاص حواله محمد اشرف ولد بخت کمال نموده فرمودند که رفته قسمت نمایند —

رشید خان دیوان خالصه موافق حکم بحصول سایر که در عهد حضرت فردوس اشیانی مقرر بود مفصل بعرض رسانید حکم شده چهل دو روپیه از هنود میگرفتند چهل یک روپیه از مردم مسلمان نیز میگرفته باشند —

दहा हजार रुपये खैरात म्हणून खाशाच्या खजिन्यांतून मुहम्मद अश्रफ वलद बख्तकमाल याचे हवाला करून बादशाहानें फर्माविलें कीं, बुर्हानपूरच्या लोकांपैकीं ज्यांची मालमत्ता सीवाच्या मुलानें लुटली त्यांना जाऊन वाटावे.

खालसाचा दिवाण रशीदखान यानें हुकुमाप्रमाणें तपशीलवार अर्ज केला कीं, शाहजहान बादशाहाच्या वेळेस सायर म्हणून कर बसविला होता. हुकूम झाला कीं, हिंदूकडून ४२ रुपये व मुसलमानाकडून ४१ रुपये घेत जावे.

१८१

| | | |
|---|---|---|
| जु. २४ सफर २८ बुध. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۲۸ صفر<br>یوم الاربعه سنه ۲۴ | श. १६०२ फाल्गुन वद्य १४<br>इ. १६८१ मार्च ९ |

به پرگنه دامری واقع صوبه دکهن به جاگیر سید مبارک خان قلعه دار دولت آباد تنخواه نموده بنابران محمد ابراهیم ولد غضنفر خان فوجدار پرگنه مذکور ۳ سه صدی ذات یک صد سوار بود صدی ذات هشتاد سوار کم نمودند —

दौलताबादचा किल्लेदार सय्यिद मुबारकखान यास दक्षिणच्या सुभ्यांतील परगणे दामरीच्या जागीरींतून तनखा मिळत असे. म्हणून परगणे मजकूरचा फौजदार मुहम्मद इब्राहीम वलद गजनफरखान यास तीनशें जात व शंभर स्वार अशी मनसब होती तीपैकीं शंभर जात व ऐंशी स्वार कमी केले.

१८२

| | | |
|---|---|---|
| जु. २४ रवल २ रवि. | اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الاول ۲ صفر<br>یوم الاحد سنه ۲۴ | श. १६०३ चैत्र शुद्ध ४<br>इ. १६८१ मार्च १३ |

لطف الله خان عرض نموده که سید افضل کیمیاگر را امیر الامرا از بنگاله بحضور فرستاده از سرب نقره میکند حکم شد که بنظر بگذرانید چنانچه بنظر گذرانیده ظل سبحانی پرسید که تو نقره میکند عرض نمود که میکنند به خواجه دربار خان فرمودند که بحضور خود از سرب نقره بکنانند چنانچه ۳ سه توله سرب و شش ۶ ماسه سیماب را گداز نموده یک توله بر آمده بنظر گذرانیدند بندگانحضرت زرگر را طلبیده نموده زرگر مذکور ظاهر نموده که نقره خوب اول شده است بنا بران کیمیاگر را خلعت داده حواله ملا مخدوم نموده که نزد خود نگاه دارد —

سید عبد الله عرض نموده که بنده پیش دست خود به جهته تحقیقات معامله بهادر علی در موضع دانکو جاگیر مان سنگه فرستاده بود چنانچه تحقیق نموده آمده که بهادر علی دیوهره ستی در آنجا بود مسمار نموده فرمودند که وکیل مان سنگه ظاهر می کرد

که او دختر یک جت را میخواست چنانچه خلاف ظاهر کرده به
اسد خان پروانگی بدهند که یک هزار روپیه جرمانه از وکیل به
بهادر علی بدهند و بهادر علی دزدی خود اثبات نموده بگیرد —

लुत्फुल्लाहखानानें अर्ज केला कीं 'अमीरुल उमरानें बंगाल्याहून सय्यिद अफजल किमयागर यास हुजुरास पाठविलें आहे, तो शिश्यापासून चांदी तयार करतो'. हुकूम झाला कीं, त्यास नजरेखालून घालावें. म्हणून बादशाहासमोर आणलें (नजरेखालीं घातलें). बादशाहानें विचारिलें 'तू चांदी करतोस.' त्यानें अर्ज केला 'करतों' ख्वाजा दरबारखानास हुकूम झाला कीं, त्यास हुजुरासमोर शिश्यापासून चांदी करावयास लावावी. त्याप्रमाणें तीन तोळे शिसें व सहा मासे पारा एकत्र करून एक तोळा रुपें काढलें. तें बादशाही नजरेखालून घातलें. बादशाहानें सोनारास बोलावून तें दाखविलें. सोनारानें जाहीर केलें कीं, ही पहिल्या दर्जाची चांदी आहे. तेव्हां किमयागरास खिलअ देऊन व मुल्ला मखदुमाच्या हवाला करून स्वतःजवळ ठेवण्यास सांगितलें

सय्यिद अब्दुल्लाह यानें अर्ज केला कीं, 'मला मानसिंगाच्या जहागिरींतील मौजे दानकर येथें बहादूर अलीच्या कामाची चौकशी करण्यासाठीं पाठविलें होतें. चौकशी करून आलों. बहादूर अलीनें तेथें सतीचा देव्हारा होता तो पाडून टाकला आहे.' हुकूम झाला कीं, 'मानसिंगाचा वकील सांगत आहे कीं, त्यास एका जाटाची मुलगी पाहिजे म्हणून त्यानें चुकीचें सांगितलें. तेव्हां असद्खानास परवानगी द्यावी कीं, वकीलापासून एक हजार रु. दंड घेऊन बहादूर अलीस द्यावा व बहादूर अलीनें त्यांतून चोरीस गेलेलें सामान घ्यावें.'

१८३

| | | |
|---|---|---|
| जु. २४ रवल ८<br>शनि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول ۸ سنه<br>یوم السبت سنه ۲۴ | श. १६०३ चैत्र शुद्ध १०<br>इ. १६८१ मार्च १९ |

اسد خان عرض نموده که رایاجی سنگه مچلکه بمهر خود نزد
دلیر خان فرستاده چنانچه بنظر گذرانیده بندگان حضرت مطالع
نموده خوش فرمودند در تمام ممالک محروسه جزیه مقرر است
فدوی چهار لک روپیه قبول نموده چهار محال از سرکار والا
بگیرند —

असद्खानानें अर्ज केला कीं, 'रायाजीसिंग यानें स्वतःच्या शिक्क्याचा मुचलका दिलेरखानाकडे पाठविला तो खानानें मजकडे पाठविला.' तो नजरे-

शाह आलम याच्या अर्जावरून समजलें तें असें ‘ विजापूरकर सिकंदर आदिल यानें पांच लाख व गोवळकोंडेकर अबुल हसन यानें दहा लाख रुपये मला पेशकश म्हणून दिले.’ त्याचे हिशेबाचे कागद लिहून पाठविले होते. यांपैकीं तीस हजार रुपये वसूल झाले शाहजाद्याच्या मागण्या संमत आहेत असें समजून हिशेबाचे कागद विजापूर व गोवळकोंडें यांच्या हेजिबांकडे पाठविण्यासाठीं असदखानाजवळ दिले. हुकूम झाला कीं, त्यानें उपर्युक्त रकम सरकारे खालसामध्यें भरणा करावी ’.

१३७

सिता<br>जु. २४ शाबान १५<br>सोम (जं. शनि).

سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه شعبان المعظم ۱۵ سنه<br>یوم الاثنا سنه ۲۴

श. १६०३ भाद्रपद वद्य १<br>इ. १६८१ ऑगस्ट २०

بموجب التماس سترسال بوندیله تعینات دکهن بعرض رسید که اگر پرگنه کهوله از تغیر اخلاص خان فوجدار دهاموتی (نی) به بنده تنخواه شود شش صد پیاده و پانصد سوار جمعیت در یساق موجود دارند منظور نموده فرمودند که در باب نگاه داشت جمعیت از وکیل مشار الیه مچلکه بگیرند —

दख्खनमधें नेमलेल्या सत्रसालाच्या विनंतीवरून समजलें तें असें— ‘धामोती (नी) चा फौजदार इखलासखान याजकडून परगणे खोला तगीर होऊन मला तनख्यासाठीं मिळाला तर मी ६०० पायदळ व ५०० स्वार अशी जमेत या प्रांतांत ठेवीन. तें मंजूर झालें. हुकूम झाला कीं, उपर्युक्ताच्या वकिलाकडून जमेत ठेवण्याबद्दल मुचलका घ्यावा.

१३८

सिता<br>जु. २४ शाबान १८<br>मंगळ.

اخبارات درباز معلے<br>ماه شعبان المعظم ۱۸ سنه<br>یوم الثلث سنه ۲۴

श. १६०३ भाद्रपद वद्य ४<br>इ. १६८१ ऑगस्ट २३

بعرض رسید که راجه دیوی سنگه بوندیله قلعه دار مولهیر ... و یک دست سپر و یک دست برچی و یک شمشیر و یک آهنه بابت اکبر ابتر بحضور ارسال داشته است حکم شد که محمد علے خان بنظر بگذرانند —

अर्ज आला कीं, मुल्हेरचा किल्लेदार राजा देवीसिंग बुंदेला यानें अकबराकडील...एक ढाल, एक बर्ची, एक तलवार, एक अहना (?) हुजूर पाठविलीं आहेत. हुकूम झाला कीं, मुहम्मद अलीखानानें नजरेखालून घालावी.

२३९

सिता
जु. २४ शाबान २० } اخبارات دربار معلی ماه شعبان ۲۰ سنه { श. १६०३ भाद्रपद वद्य ७
इ. १६८१ ऑगस्ट २५

ابوالقاسم خویش سرافراز خان دکهن هزار پانصدی ذات هزار سوار است خطاب اکرام خان سرافراز فرمودند—

सराफराझखानाचा दख्खनमधें असलेला नातेवाईक अबुल कासिम १५०० जात, १००० स्वार असा मनसबदार आहे. त्यास इकरामखान किताब देण्याचा हुकूम झाला.

२४०

सिता
जु. २४ शाबान २३
रवि. } اخبارات دربار معلی ماه شعبان ۲۳ سنه یوم الاحد سنه ۲۴ { श.१६०३ भाद्रपद वद्य १०
इ. १६८१ ऑगस्ट २८

سرافرازخان را تعینات کومکی صوبه دکهن نموده فرمودند که بیست پنج هزار روپیه مساعدت بدهند ازآن جمله ده هزار روپیه از رکاب تنخواه دهند و پانزده هزار روپیه را پروانه بنام امانت خان دیوان دکهن بدهند که او در آنجا تنخواه دهد حکم شد بموجب شاگرد پیشه سرکار والا لغایت شعبان بطلب تنخواه دهند از نوشته راجه جسونت بوندیله تعینات دکهن بعرض رسید که کلیانداس مشرف دیوڑهی سرکار راجه سبحان سنگه متوفی بعد از رانی مذکوره سبحان سنگه متفق شده بیست لک روپیه از اموال تغلب نموده درین ولا بجهت منصب خود نزد صدرالدین رجوع شده—

दख्खनच्या कुमकेसाठीं सराफराझखानास नेमलें. हुकूम झाला कीं, त्यास पंचवीस हजार रुपये मदत म्हणून द्यावे. पैकीं दहा हजार रुपये बरोबर असलेल्यांना तनख्यासाठीं द्यावे व दख्खनचा दिवाण अमानतखान याच्या नांवें पंधरा हजार रुपये परवाना लिहून द्यावे. त्यानें त्यांतून तेथील तनखा द्यावा. सरकारांतील शागिर्दांना त्यांच्या मागण्याप्रमाणें ११ शाबान पर्यंतचा तनखा द्यावा. दख्खनमधें नेमलेला राजा जसवंतसिंग बुंदेला याच्या लिहिल्यावरून समजलें कीं, वारलेल्या राजा सुभानसिंगाच्या देवडीवरचा मुशरीफ कल्याणदास याशीं सुभानसिंगाची राणी मनकूहानें संगनमत करून मालमत्तेपैकीं वीस लाख रुपये लांबविले. नंतर ती मनसबीसाठीं सद्रुद्दीनजवळ रुजू झाली.

२४१

सिता
जु. २४ शाबान २४
सोम.

اخبارات دربار معلی
ماه شعبان ۲۴ سنه
یوم الاثنا سنه ۲۴

श. १६०३ भाद्रपद वद्य ११
इ. १६८१ ऑगस्ट २९

مطالب دلیرخان جملة الملک اسدخان بعرض رسانیده اول آنکه کمال الدین خان خانزادخان تعینات بود (شود) منظور فرمودند دویم آنکه آنچه مطالبه ذمه بنده است از آن جمله بعضی بابت سختی اند حقایق مطالبه عرض شود حکم شد اسدخان بعرض رساند سوم آنکه طلب بنده در سرکار است مجرا شود حکم شد طلب برین نقدی و از حریف جاگیر تنخواه دهند محمد مومن وغیره گرزبردار فرمان بنام خانجهان بهادر شانزده روز برده رسانیده چهار روز در آنجا مانده در شانزده روز عرضداشت آورده بنظر گذرانید و سه صد روپیه خدمتانه یافته بود معاف نموده و زبانی آنها ظاهر شده که اکبر ابتر در قلعه مالی (پالی) گده معه جمعیت قلیل مردم راتهوران و نوکران سنبها پسر شیوا مقهور سکونت داده چنانچه مقهور ابتر را جای رفتن نمی دهد—

असदखानानें दिलेरखानाच्या मागण्यांबद्दल अर्ज केला. (१) कमालुद्दीनखान व खानाजादखान हे नेमले जावे. तें मान्य झालें. (२) माझ्यावर जबाबदाऱ्या आहेत त्यांपैकीं कांहीं अत्यंत कठीण आहेत. त्याबद्दल चौकशी व्हावी. हुकूम झाला कीं, असदखानानें त्याबद्दल अर्ज करावा. (३) माझी सरकारकडे येणीं आहेत तीं मान्य व्हावी. हुकूम झाला कीं, त्यास येण्यासंबंधीं रोख व जहागिरींतून तनखा द्यावा. मुहम्मद मोमीन वगैरे गुर्जबर्दारांनीं खान जहान बहादुराच्या नावचें फर्मान नेऊन पोहोचविलें. त्यांनीं तेथें चार दिवस राहून सोळा दिवसांत त्याचा अर्ज आणून नजरेखालून घातला. तीनशें रुपये खिदमताना मिळाला होता तो माफ केला. त्यांनीं तोंडीं कळविलें कीं, अकबर हा थोडे राठोड व सीवाचा मुलगा संभा याचे चाकर यांसह पाली गडांत राहात आहे. संभा त्यास जाऊं देत नाहीं.

२४२

सिता
जु. २४ शाबान २६
बुध.

اخبارات دربار معلی
ماه شعبان ۲۶ سنه
یوم الاربعا سنه ۲۴

श. १६०३ भाद्रपद वद्य १३
इ. १६८१ ऑगस्ट ३१

اسدخان عرض نموده که گماشته راو بهاوسنگه راو انروده

سنگه پسر خوانده که در بوندی است خطی نوشته که فدوی
بموجب حکم تسلی دلاسای رعایا نموده که بخاطر جمع آباد باشند
قبول میکنند از آمد و رفت لشکر ویران خواهد شد فرمودند که
ما بدولت سعادت بان راه نمی روند تحقیق نموده بعرض رسانید
که سوای راه بوندی دیگر هم هست یا نه —

असद्खानानें अर्ज केला तो असा– अनिरुद्धसिंगाचा मानलेला पुत्र राव भाऊसिंग याच्या बुंदी येथील गुमास्त्यानें असें पत्र पाठविलें आहे कीं, 'मी हुकुमाप्रमाणें प्रजेस दिलासा दिला व खातरजमा ठेऊन वस्ती करण्यासाठीं सांगितलें. ते कबूल करीत आहेत. परंतु बादशाही लश्कराच्या जायेमुळें मुलूख वैराण होतो. हुकूम झाला कीं, बादशाही लश्करानें त्या मार्गानें जाये करूं नये. बुंदीच्या या वाटेशिवाय दुसरी वाट आहे किंवा नाहीं याची चौकशी करून अर्ज करावा.

२४३

सिता
जु. २५ रमजान २

سیاهه اخبارات دربار معلی
ماه رمضان ۲ صنه سنه ۲۵

श. १६०३ अ. आश्विन शुद्ध ३
इ. १६८१ सप्टेंबर ५

امروز رخصت دلیرخان است خان مشارالیه بسبب بیماری
نیامده بنابران خان مذکوررا موقوف نموده کمال الدین پسرش
را خلعت و اسپ معه ساز نقره ملمع طلا انعام داده فرمودند که
جمعیت پدر پانصد سوار باقی جمعیت را همراه خود برکاب شاهزاده
محمد اعظم شاه برود —

आज दिलेरखानास निरोप देण्याचा दिवस आहे. उपर्युक्त खान आजारी असल्यामुळें येऊं शकला नाहीं. म्हणून त्याचें जाणें स्थगित करून त्याऐवजीं त्याचा मुलगा कमालुद्दीन यास खिलअत व चांदीवर सोन्याचा मुलामा असलेल्या साजाचा घोडा बक्षीस देऊन वडिलाचे पांचशें स्वार सोडून बाकी लोकांसह मुहम्मद अअजमशाहकडे जाण्याचा हुकूम झाला.

२४४

सिता
जु. २५ रमजान ३
(जं. ४) बुध.

اخبارات دربار معلی
ماه رمضان ۳ صنه
یوم الاربعه سنه ۲۵

श. १६०३ अ. आश्विन
शुद्ध ५
इ. १६८१ सप्टेंबर ७

واجب العرض نول سنگه قلعه دار راجگده واقع دکهن بعرض

رسید اول آنکہ امیدوار اضافہ ایم منظور شد اصل دو صد پنجاہی اضافہ ...... ...... دوم آنکہ دو ضرب توپ اہتمام سرب و باروت مرحمت شود حکم شد بہ خان بہادر بنویسد انجام دہد سوم آنکہ طلب مابین نقدی مرحمت شود و جاگیر تبدیل شود حکم شد بہ صوبہ دار رجوع نماید حکم شد پنجاہ ہزار اشرفی و پنج لک روپیہ حوالہ کمال الدین خان نماید کہ نزد شاہزادہ اعظم شاہ رساند —

दख्खनमधील राजगडचा किल्लेदार नवलसिंग याचा अर्ज आला तो असा– (१) मी वाढीची आशा करितों. तें मान्य झालें. मूळ २५० + वाढ...... (२) शिसें व दारू यांसह दोन तोफा दिल्या जाव्या. हुकूम झाला कीं, खानबहादुरास लिहावें कीं, त्यास तोफा द्याव्या. (३) माझी येणीं रोख मिळावीं व जागीर बदलून मिळावी. हुकूम झाला कीं, सुभेदाराकडे रुजू करावें आणि पन्नास हजार अश्रफ्या व पांच लाख रुपये अअजमशाहकडे पोहोचविण्यासाठीं कमालुद्दीन खानाजवळ द्यावे.

२४५

| | | |
|---|---|---|
| सिता | اخبارات دربار معلے | श. १६०३ अ. आश्विन |
| जु. २५ रमजान ८ | ماہ رمضان ۸ سنہ | शुद्ध ९ |
| रवि. | یوم الاحد سنہ ۲۵ | इ. १६८१ सप्टेंबर ११ |

بموجب نوشتہ بیوتات دکہن بہ عرض رسید کہ حکم والا صادر شد کہ قلعہ شہر پناہ اورنگ آباد احداس نمایند عرابہ باربرداری مصالح مطلوب اند امیدواریم کہ از حضور مرحمت شود حکم شد کہ آنچہ ضرور داند ہمانجا خرید نمایند —

दख्खनच्या मालमत्तेचा अधिकारी (बुयूतात) याचा अर्ज आला. त्यावर बादशाही हुकूम सादर झाला कीं, औरंगाबादेच्या किल्ल्याची दुरुस्ती करावी. तोफांच्या गाड्यांस सामानाची आवश्यकता आहे. तें सरकारांतून मिळेल अशी आशा करतों. हुकूम झाला कीं, जें कांहीं आवश्यक वाटेल तें तेथेंच विकत घ्यावें.

२४६

| | | |
|---|---|---|
| सिता | سیاهہ اخبارات دربار معلے | श. १६०३ अ. आश्विन |
| जु. २५ रमजान १३ | ماہ رمضان ۱۳ سنہ | शुद्ध १४ |
| शुक्र. | یوم الجمعہ سنہ ۲۵ | इ. १६८१ सप्टेंबर १६ |

بہ بہادر علی خوش منزل فرمودند کہ درہ مکند گدہ چہ طور است عرض نمودہ کہ پاو کروہ عرض دارد —

बहादुर अली खुशमंझील यास हुकूम झाला कीं, मुकुंदगडाचें खोरें केवढें आहे ? अर्ज आला कीं, पाव कोस रुंद आहे.

२४७

| | | |
|---|---|---|
| सिता | سیاهہ اخبارات دربار | श. १६०३ अ. आश्विन |
| जु. २५ रमजान १८ | ماہ رمضان ۱۸ سنہ | वद्य ४ |
| बुध. | یوم الاربعہ سنہ ۲۵ | इ. १६८१ सप्टेंबर २१ |

بہ جواہرچند داروغہ بیلداران فرمودند کہ آنچہ بتخانہ ہا
در راہی آیند شمار (مسمار) می نمودہ باشند —

बेलदारांचा दारूगा जवाहरचंद यास हुकूम झाला कीं, वाटेंत देवळें लागतील तीं सर्व पाडून टाकावीं.

२४८

| | | |
|---|---|---|
| सिता | اخبارات دربار معلے | श. १६०३ अ. आश्विन |
| जु. २५ रमजान १९ | ماہ رمضان ۱۹ سنہ | वद्य ५ |
| गुरु. | یوم الخمس سنہ ۲۵ | इ. १६८१ सप्टेंबर २२ |

بموجب نوشتہ خان زمان صوبہ دار برہانپور بعرض رسید کہ
شاہزادہ محمد اعظم شاہ رخصت وطن شد —

बुऱ्हानपूरचा सुभेदार खान झमान याचा अर्ज आला कीं, मुहम्मद अअजमशाह वतनाकडे निघाला आहे.

२४९

| | | |
|---|---|---|
| सिता | سیاهہ اخبارات دربار معلے | श. १६०३ अ. आश्विन |
| जु. २५ रमजान २१ | ماہ رمضان ۲۱ سنہ | वद्य ७ |
| शनि. | یوم السبت سنہ ۲۵ | इ. १६८१ सप्टेंबर २४ |

عرضداشت راجہ دیوی سنگہ قلعہ دار مولہیر واقع دکہن بنظر
گذشت معروضداشتہ بود کہ در باب بندہ حکم شدہ بود کہ از
بندوبست قلعہ داری خبردار باشد چنانچہ فدوی از بندوبست
قلعہ خود خبردار است خاطر شریف جمع دارند بعد مطالعہ
خاموش ماندند —

दख्खनमधील मुल्हेरचा किल्लेदार राजा देवीसिंग याचा अर्ज नजरेखालून घातला. त्यानें विनंति केली होती कीं, ‘माझ्याबाबत हुकूम झाला होता कीं, किल्ल्याच्या बंदोबस्ताबद्दल सावध असावें. तरी मी किल्लेदारीबाबत अत्यंत सावध आहे. त्याची खात्री ठेवावी.’ यावर बादशाह गप्प बसला.

२५०

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ रमजान २२<br>रवि. | اخبارات دربار معلے<br>ماه رمضان ۲۲ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۵ | श. १६०३ अ. आश्विन<br>वद्य ८<br>इ. १६८१ सप्टेंबर २५ |

از واقعہ اورنگ آباد بعرض رسید خان جہان بہادر از این جا کوچ نموده روانہ بیدگانو شده —

औरंगाबादेच्या घटनांवरून समजलें कीं, खान जहान बहादुरानें येथून कूच केलें असून तो पेडगांवाकडे गेला.

२५१

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ रमजान २३ | اخبارات دربار معلے<br>ماه رمضان ۲۳ سنہ<br>سنہ ۲۵ | श. १६०३ अ. आश्विन<br>वद्य १०<br>इ. १६८१ सप्टेंबर २६ |

فضایل خان عرض نموده شش نفر بندنوایان از قید رنتھمبور جمعیت نربرخان بموجب حکم بحضور آورده ہرچہ امر شود حکم شد کہ عنایت برادرزاده دلیرخان وغیره چہار نفر دیگورا بہ قلعہ رنتھمبور بفرستند و آنچہ دیگر مردم مسلمان اند خلاص نمایند و آنچہ مردم نہود اند اگر مسلمان شوند خلاص نمایند و الانہ در قید نگاه دارند —

फजाइलखानानें अर्ज केला कीं, ‘ नरबरखानाच्या जमेतीपैकीं सहाशें कैदी रणथंबोर येथून हुकुमाप्रमाणें हुजूर आणले. त्याबाबत हुकूम व्हावा. ’ हुकूम झाला कीं, ‘ दिलेरखानाचा पुतण्या इनायत वगैरे चार लोकांना किल्ले रणथंबोरास परत पाठवावें व मुसलमान आहेत त्यांना सोडावें व हिंदू आहेत ते मुसलमान झाले तर त्यांनाही सोडावें. नाहीं तर कैदेंत ठेवावें. ’

२५२

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ शव्वाल १०<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه شوال ۱۰ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۵ | श. १६०३ आश्विन शुद्ध ११<br>इ. १६८१ आक्टोबर १३ |

قمرالدین خان بعرض رسانید کہ درین ملک (اطراف برہانپور) بتخانہ ہای بسیار اند لیکن دروازه ہای بند نموده اند بیکی بنده حکم شد کہ رفتہ مسمار نماید فرمودند کہ مردم مسلمانان دراین

ضلع آباد نہ ہستند کہ بتخانہ را مسمار نمودہ مسجد صورت نمایند
کہ نماز ادا نمایند از مسمار نمودن بتخانہ ہاے بند نمودن خوب
است از واقعہ اورنگ آباد بعرض رسید کہ خان جہان بہادر
انوپ سنگہ را جہت خبرداری در این جا گذاشتہ بہ پید گانو
روانہ شد —

कमुद्दीनखानानें अर्ज केला कीं, 'बुर्हानपूरच्या आसपास अनेक देवळें आहेत; परंतु त्यांचीं दारें बंद असतात. एका बादशाही चाकरास तीं पाडून मुसलमानांना नमाज पढण्यासाठीं मशीदी करण्याचा हुकूम झाला. परंतु ह्या जिल्ह्यांत मुसलमानांची वसाहत नाही.' हुकूम झाला कीं, देवळें पाडून टाकण्यापेक्षां बंद ठेवणें जास्त बरें. औरंगाबादेच्या घटनांवरून समजलें कीं, खान जहान बहादुरानें येथील सावधतेसाठीं अनूपसिंगास ठेवलें व तो स्वतः पेडगांवास गेला.

२५३

| सिता<br>जु. २५ शव्वाल १३<br>रवि. | اخبارات دربار معلے<br>ماہ شوال ۱۳ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۵ | श. १६०३ आश्विन शुद्ध १४<br>इ. १६८१ आक्टोबर १६ |
|---|---|---|

شاہ عالم جیو بعرض رسانید کہ شخصی سنبھا جی پسر سیوا
مقہور در لشکر معلی آمدہ خطہای بنام امان اللہ وغیرہ نوکران
عمدہ بندہ آوردہ بہ امان اللہ مذکور ملاقی شدہ چنانچہ موصی
الیہ اورا در دیرہ خود نگاہ داشتہ خطوط ہای بہ بندہ گذرانیدہ
حقایق او ظاہر نمودہ کہ ہرچہ امر شود حکم شد وکیل مقہور را قید
نمودہ حوالہ اہتمام خان کوتوال نمایند کہ در محبوس نگاہ دارد —

शाह आलम यानें अर्ज केला कीं, 'सीवाचा मुलगा संभाजी याचा मनुष्य, अमानुल्लाह वगैरे माझ्या चाकरांसाठीं पत्रें घेऊन आला. त्यांची भेट घेतली. नंतर उपर्युक्तांनीं त्यास आपल्या तंबूंत ठेवलें. तीं पत्रें मला दाखविलीं त्यावरून सर्व गोष्टी समजल्या. याबाबत हुकूम व्हावा.' हुकूम झाला कीं, 'मकहूराच्या (संभाच्या) वकिलास कैद करून इहतमामखान कोतवाल याच्या हवाली करावें. त्यास कैदेंत ठेवावें.'

२५४

| सिता<br>जु. २४ शव्वाल १६<br>बुध. | اخبارات دربار معلے<br>ماہ شوال ۱۶ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۴ | श. १६०३ आश्विन वद्य ३<br>इ. १६८१ आक्टोबर १९ |
|---|---|---|

تولارام قانونگوی بنگال آمده مسلمان شده خلعت مرحمت فرمودہ حکم شدہ کہ بہ امیرالامرا بنویسد کہ مشارالیہ را برادران از قانون گوی بے دخل نمودہ اند باید کہ دخل موی الیہ نمودہ بدہاند —

बंगालमधील कानूनगो तोलाराम आला. तो मुसलमान झाला. त्यास खिलअत दिली व हुकूम झाला तो असा– अमीरुल उमरा यास लिहावें कीं, उपर्युक्तास त्याचे भाऊबंद यांनीं कानुनगोईतून काढून टाकलें आहे. तरी त्यास कानूनगोईत दाखल करून घ्यावें.

२५५

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ शव्वाल १७<br>गुरु. | اخبارات دربار معلی<br>ماہ شوال ۱۷ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۵ | श. १६०३ आश्विन वद्य ४<br>इ. १६८१ आक्टोबर २० |

بخشی الملک روح اللہ خان مطالبہ دلیر خان بموجب ذیل بعرض رسانید اول آنکہ منورخان فدوی قلعہ دہارور جاگیر اند درین ولا قلعدار از حضور تعین شدہ امیدواریم کہ قلعہ مذکور بہ عہدہ بندہ باشد منظور کردہ فرمودند —

रूहुल्लाहखानानें दिलेरखानाच्या खाली दिलेल्या मागण्या सादर केल्या. मुनव्वरखान व मी यांची किल्ले धारूर येथें जहागीर आहे. सध्या हुजूरकडून किल्लेदार नेमला आहे. विनंति करितों कीं, उपर्युक्त किल्ला माझ्या स्वाधीन व्हावा. मंजूरीचा हुकूम झाला. [ उरलेल्या मागण्या दक्षिणेच्या इतिहासाशीं निगडीत नाहींत ]

२५६

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ शव्वाल १९ | اخبارات دربار معلی<br>ماہ شوال ۱۹ سنہ<br>سنہ ۲۵ | श. १६०३ आश्विन वद्य ६<br>इ. १६८१ आक्टोबर २२ |

فیروز خان دکہن کہ بمنصب چہار ہزار ذات چہار ہزار سوار سرافراز است حسب التماس خانجہان بہادر الم و نقارہ مرحمت فرمودند بعرض رسید کہ خسرو بیگ صوبہ یساول از سکندر خان عادل والی بیجاپور وغیرہ خدمتانہ یافتہ ہرچہ امر شود معاف فرمودند —

दख्खनमधील फीरुझखानास चार हजार जात व चार हजार स्वार अशी मनसब होती. खानजहान बहादुराच्या विनंत्यनुसार त्यास झेंडा व नगारा देण्याची कृपा झाली. अर्ज आला कीं, 'खुस्रवबेग यसावल वगैरेंना विजापूरच्या सिकंदर आदिलखानाकडून खिदमताना मिळाला. त्याबाबत हुकूम व्हावा.' तो माफ केल्याचा हुकूम झाला.

२५७

सिता<br>
जु. २५ शव्वाल २०<br>
रवि.

اخبارات دربار معلی<br>
ماه شوال ۲۰ سنه<br>
یوم الاحد سنه ۲۵

श. १६०३ आश्विन वद्य ७<br>
इ. १६८१ आक्टोबर २३

از عرضداشت خان جهان بهادر به عرض رسید که مردم جاسوسان خبر آوردند که سه هزار جمعیت سنبهاجی پسر سیوا مقهور براے تاخت پونه‌گده فرستاده است بنابران فدوی رنهست (رغبت ؟) خان‌را دو فوج دو هزار سوار براے تنبیه تعین نموده بود چنانچه مقابله شد از اقبال حضرت بسیار مردم‌را قتیل رسانیده شکست داده اکثر مواضعات مقهوررا اتش داده سند (بند) و مویشی بسیار آورده فتح بادشاهی شد متصل (مفصل) از این واقع بعرض خواهد رسید بعد مطالعه فرمودند که مجرای کلی شده —

खानजहान बहादुराच्या अर्जावरून समजलें कीं, 'सीवाचा मुलगा संभाजी यानें पुनागड ( पुरंधर ) उद्ध्वस्त करण्यासाठीं तीन हजार लोक पाठविले आहेत अशी बातमी हेरांनीं आणली. म्हणून मी रणमस्तखानास दोन हजाराच्या दोन फौजा देऊन शत्रूस तंबी देण्यासाठीं नेमिलें. नंतर सामना झाला. बादशाही सुदैवानें अनेकांना मारलें व पराजय केला. शत्रूच्या बहुतेक खेड्यांना आगी लावल्या; तसेंच अनेक बंदी व जनावरें हातीं आलीं. बादशाही फत्ते झाली. या घटनेबद्दल संपूर्ण हकीकतीचा अर्ज करीत आहे'. अर्ज पाहिल्यावर हुकूम झाला कीं, हें मान्य आहे.

२५८

सिता<br>
जु. २५ शव्वाल २१

اخبارات دربار معلی<br>
ماه شوال ۲۱ سنه<br>
سنه ۲۵

श. १६०३ आश्विन वद्य ८<br>
इ. १६८१ आक्टोबर २४

عبدالرحیم برادر عبدالکریم میانه از دکهن از خان جهان بهادر

ازرده شده همراه رکاب شاهزاده اعظم شاه تعیینات فرمودند اوتم-
رام نبیره راجه منوهرداس گور بموجب حکم از دکهن آمده......
روپیه انعام خدمات سرافراز فرمودند—

अब्दुलकरीम मियानाचा भाऊ अब्दुर्रहीम हा दख्खनमध्यें खानजहान बहादुरावर नाराज झाला. त्यास अअजमशाहाबरोबर नेमण्याचा हुकूम झाला. राजा मनोहरदास गौड याचा नातू उत्तमराम हा हुकुमाप्रमाणें दख्खनमधून आला. ... त्यास बक्षिसी देऊन चाकरींत ठेवण्याचा हुकूम झाला.

२५१

| सिता<br>जु. २५ शव्वाल २१ | اخبارات دربار معلی<br>ماه شوال ۲۱ سنه<br>سنه ۲۵ | श. १६०३ आश्विन वद्य ८<br>इ. १६८१ आक्टोबर २४ |
|---|---|---|

بعرض رسید که نیازبیگ گرزبردار فرمان به قطب الملک والی
حیدرآباد برده بود پنج هزار روپیه خدمتانه یافته معاف فرمودند
به روح الله خان فرمودند که به امانت خان دیوان دکهن بنویسد
که آنچه منصبداران دکهن سرافرازی دارند بشرط دادن تصحیحه
طلب تابینان ذات (جات) را تمام کل تنخواه دهد—

عبدالرحیم خان عرض نموده که راو انوپ سنگه تعیینات دکهن
خطی نویسد که فدوی در جنگ سنبهاجی پسر سیوا مقهور در
اورنگ آباد تردد بواقعه نموده بود بحضور مفصل بعرض برسد
آمیدوار رعایت بود درین ولا خان جهان بهادر پانصدی ذات
پانصد سوار بابت کمی اضافه تجویز نموده پذیرای شود منظور
نموده دو هزار پانصدی ذات دو هزار سوار از آنجمله پانصد
سوار دو اسپه سرافراز بود درین ولا پانصد سوار جمله بر راو
راے سابق دو اسپه اضافه فرمودند—

अर्ज आला कीं, ' नियाझबेग गुर्जबर्दारानें हैद्राबादेचा मालक कुत्बुल्मुल्क याच्या नांवें फर्मान नेलें होतें. त्यास पाच हजार रुपये खिदमताना मिळाला तो माफ फर्माविला. रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा—दख्खनचा दिवाण अमानतखान यास लिहावें कीं, 'दख्खनच्या मनसबदारांनीं आपल्या जातीच्या लोकांची द्रव्याची मागणी तपास करून पुरी करावी अशा अटीवर त्यांना मनसब दिली होती. '

अब्दुर्रहीमखान यानें अर्ज केला तो असा — दख्खनमधें नेमलेला राव अनूपसिंग यानें पत्र लिहिलें आहे कीं, 'मी संभाजीशीं औरंगाबादेस झालेल्या लढाईत अत्यंत कष्ट घेतले. हुजुरास याचा पूर्ण अर्ज येत आहे. कृपेची आशा करितों. त्यानंतर खानजहान बहादुरानें पांचशें जात व पाचशें स्वार कमी केले होते त्यांच्या वाढीबाबत तजवीज केली आहे, ते मिळावे.' तें मान्य झालें. त्याला अडीच हजार जात, दोन हजार स्वार, पैकीं पांचशें स्वार दुघोडी अशी मनसब होती. आतां पूर्वीप्रमाणें पांचशें स्वार दुघोडी अशी वाढ फर्माविली.

२६०

| सिता<br>जु. २५ शव्वाल २३<br>बुध. | اخبارات دربار معلی<br>ماه شوال ۲۳ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۵ | श. १६०३ आश्विन वद्य १०<br>इ. १६८१ आक्टोबर २६ |
|---|---|---|

کامیاب خان بخشی واقعہ نویس صوبہ دکہن ہزار پانصدی ذات چہار صد سوار سرافراز است اہتمام زراعت فوج خان جہان بہادر مقرر نمودہ حکم شد کہ میر وحدت گرزدار بمعہ دہ نفر گرزدار جہتہ سزاولی فوج عمدۃ الملک ہمراہ خان مذکور تعین نمایند عرض داشت جانسپار خان قلعدار ظفرآباد عرف بدر بنظر گذشت معروض شد کہ فدوی بہ ظفرآباد رسید از بندوبست خبردار شد عرضہ داشت شیرخان قلعہ دار آنجا نیز بنظر گذشت کہ فدوی بموجب حکم قلعہ را حوالہ جانسپار خان نمودہ بجہت ہمراہی خان جہان بہادر روانہ شدیم بمطالعہ خاص در آوردند —

दख्खनच्या वाकेनविसीचा बक्षी कामयाबखान यास पंधराशें जात व चारशें स्वार एवढी मनसब आहे. त्यास खानजहान बहादुराच्या फौजेत नेमिलें होतें. हुकूम झाला कीं, 'मीर वहदत गुर्जबर्दारानें इतर दहा गुर्जबर्दारांसह उपर्युक्त खानाबरोबर जावें व त्यांनीं उम्दतुलमुल्काच्या फौजेची सजावली करावी.' जफराबाद उर्फ बीदरचा किल्लेदार जानसिपारखान याचा अर्ज नजरेखालून गेला. त्यानें विनंति केली होती कीं, 'मी जफराबादेस पोहोंचलों असून बंदोबस्ताबद्दल अत्यंत सावधगिरी बाळगीत आहे. तेथील किल्लेदार शेरखान याचा अर्ज सुद्धा नजरेखालून गेला. त्याची विनंति होती कीं, 'मी हुकुमाप्रमाणें किल्ला जानसिपारखानाच्या हवाला केला असून, खानजहान बहादुराबरोबर जाण्यासाठीं निघत आहे.'

२६१

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ शव्वाल २८ | اخبارات دربار معلی<br>ماه شوال ۲۸ سنه<br>سنه ۲۵ | श. १६०३ आश्विन वद्य ३०<br>इ. १६८१ आक्टोबर ३१ |

میر اسماعیل و زاهد بیگ گرزدار فرمان بنام خان جهان بهادر برده بودند عرضداشت آورده بنظر گذرانیده و زبانی به عرض رسانیدند که سنبها پسر سیوا مقهور جمعیت جانب اورنگ آباد و پید گانو و شولاپور تعین نموده بود و خان جهان بهادر نیز پیشخانه خود بر آورده لیکن انتظار شاهزاده محمد اعظم شاه بوده هرگاه شاهزاده جیو به صوبه اورنگ آباد خواهند رسید خان مذکور برای تنبیه مقهور کوچ خواهد کرد شاهزاده نیز بروز یکشنبه از برهانپور کوچ نموده بودند سیصد روپیه خدمتانه یافته معاف فرمودند سابق خان زمان صوبه دار برهانپور طلب حضور نموده درین ولا موقوف نموده فرمودند که همون طرف فوج جانب شولاپور برود و فرمان و خلعت خاصه و یک فیل برای خان مشار الیه حوالة نیاز بیگ فرمودند—

मीर इस्माईल व जाहिदबेग गुर्जबर्दारांनीं खानजहान बहादुराच्या नांवें फर्मान नेलें होतें. त्याचा अर्ज आणून नजरेखालून घातला. त्यांनीं तोंडीं सांगितलें कीं, ‘सीवाचा मुलगा संभा यानें औरंगाबाद, सोलापूर व पेडगांव येथें लोक नेमिले होते. खानजहान बहादुरानें देखील आपला पेशखाना पुढें नेला होता. परंतु त्यास मुहम्मद अअजमशाहाची वाट पहावी लागली होती. शाहजादा औरंगाबादेस पोहोंचल्यावर उपर्युक्त खान शत्रूस तंबी देण्यासाठीं कूच करील. शाहजाद्यानें रविवारीं बुर्हानपुराहून कूच केलें.’ तीनशें रुपये खिदमताना मिळाला होता तो माफ फर्माविला. पूर्वीं बुर्हानपूरचा सुभेदार खान झमान यास हुजूर बोलाविलें होतें. तें आतां स्थगित केलें. हुकूम झाला कीं, त्यानें तेथून फौजेसह सोलापुराकडे जावें. उपर्युक्त खानासाठीं फर्मान, खासा खिलअत व एक हत्ती नियाझबेगाजवळ देण्याचा हुकूम झाला.

२६२

| | | |
|---|---|---|
| तिता<br>जु. २५ जिल्काद २ | اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده<br>۲ سنه سنه جلوس ۲۵ | श. १६०३ कार्तिक शुद्ध ३<br>इ. १६८१ नोव्हेंबर ३ |

به سلابت خان داروغه توپخانه فرمودند که لوازمه توپخانه
در برهانپور چه قدر موجود است عرض نمود که پنج هزار باره
و یک هزار حقه پر از باروت و چهار صد من باروت موجود بودند
از آن جمله دو صد من باروت به اورنگ آباد فرستاد باقی
دو صد من از آتش سوخته شد —

तोफखान्याचा दारूगा सलाबतखान यास विचारलें कीं, ‘बुर्हानपुरांत किती तोफखाना आहे?’ त्यानें अर्ज केला कीं, ‘पांच हजार बाडे (बारह) दारू भरलेलें एक हजार हुक्के व ४०० मण दारू तेथें होती. पैकीं २०० मण दारू औरंगाबादेस पाठविली व २०० मण दारू आगीमध्यें जळून गेली.

## २६३

सिता<br>ज़ु. २५ जिल्काद ६.

اخبارات دربار معلی<br>ماه ذی القعده ۶ منه<br>سنه ۲۵

श. १६०३ कार्तिक शुद्ध ७<br>इ. १६८१ नोव्हेंबर ७

حسن علی خان بهادر عالمگیر شاهی را بمعه فوج چهارده هزار
سوار بطرف تلکوکن صوبه دکن رخصت نموده فاتحه نیت خیر
خوانده خلعت و یک زنجیر فیل قیمت ده هزار روپیه و یک
راس اسپ قیمت سیصد مهر با ساز طلا مرحمت نمود چهار هزاری
ذات سه هزار سوار از آن جمله پانصد سوار دو اسپه سرافراز
بود از روے عنایت هزاری ذات اضافه نموده و حسین علی پسر
وغیره را اضافه و انعام داده همراه پدر رخصت فرمودند —

हसन अलीखान बहादुर आलमगीरशाही यास चौदा हजार फौजेसह दक्षिणेंतील तळकोंकणांत रवाना केलें. त्यासाठीं निय्यते खैरचा फातिहा पढून, त्यास खिलअत, दहा हजार रुपये किमतीचा एक हत्ती व तीनशें मोहरा किमतीच्या सोन्याच्या साजासह एक घोडा बक्षीस दिला. त्यास चार हजार स्वार जात, तीन हजार स्वार, पैकीं पांचशें स्वार दुघोडी अशी मनसब होती. त्यावर कृपा करून तींत एक हजार जात वाढ फर्माविली. त्याचीं मुलें हुसैन अली वगैरेंना वाढ व बक्षीस देऊन बापाबरोबर रवाना होण्याचा हुकूम झाला.

## २६४

सिता<br>ज़ु. २५ जिल्काद ८

اخبارات دربار معلی<br>ماه ذی القعده ۸ منه<br>سنه ۲۵

श. १६०३ कार्तिक शुद्ध ९<br>इ. १६८१ नोव्हेंबर ९

میر رحمت الله تعیناتِ دکن را خدمت تهانه داری تهالنیر از
تغیر میر نور الله مقرر نموده دو صد پنجاهی ذات پنجاه سوار
بود پنجاهی ذات دو صد سوار اضافه فرمودند و میر ابراهیم
تهانه دار تهالنیر موقوف فرمودند —

मीर नूरुल्लाह याच्या बदलीमुळें दक्षिणेंत नेमलेला मीर रहमतुल्लाह यास थाळनेरच्या ठाणेदारीवर नेमून त्याच्या अडीचशें जात व पन्नास स्वार या मनसबींत पन्नास जात व दोनशें स्वार एवढी वाढ केल्याचा हुकूम झाला. थाळनेरचा ठाणेदार मीर इब्राहीम यास दूर केल्याचा हुकूम झाला.

२६५

सिता<br>जु. २५ जिल्काद ११

اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۱۱ سنه<br>سنه ۲۵

श. १६०३ कार्तिक शुद्ध १४<br>इ. १६८१ नोव्हेंबर ११

به روح الله خان فرمودند که به خان زمان بنویسد که بالفعل
شما به اورنگ آباد رفته ملازمت شاهزاده محمد اعظم شاه نماید
هرگاه شاهزاده از آنجا روانه گلشن آباد شوند از حراست شهر
خبردار باشد و هر وقتی که جمعیت از حضور برای خبرداری
راورنگ آباد تعین نمایند آن زمان خودرا معه فوج به شولاپور
رساند هری پنڈت داروغه هرکاره هاے از دکن آمده —

रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा— खान झमानास लिहावें कीं, 'तू ताबडतोब औरंगाबादेस जाऊन मुहम्मद अअजमशाहाची भेट घ्यावी व तो गुलशनाबादेस जाईल तेव्हां शहराच्या संरक्षणाबद्दल खबरदार असावें. औरंगाबादेच्या संरक्षणासाठीं हुजुराहून लोक पाठविले जातील तेव्हां आपल्या फौजेसह तू सोलापुरास जावें.' हरकाऱ्यांचा दारूगा हरि पंडीत हा दक्षिणेंतून आला.

२६६

सिता<br>जु. २५ जिल्काद १३

اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۱۳ سنه<br>سنه ۲۵

श. १६०३ कार्तिक शुद्ध १४<br>इ. १६८१ नोव्हेंबर १४

عرضداشت شاهزاده عالم شاه بداک چوکے آمده بنظر گذشت
معروض این بود که بتاریخ نهم شهر حال بمعه فوج داخل
اورنگ آباد شده بعد مطالعه فرمان بدستخط خاص به شاهزاده-

چیو صادر نموده حوالہ محمد سعید وغیره دو نفر گرز برداران نموده کہ بڈاک چوکی رسانند —

डाक चौकीनें आलेला शाह आलमचा अर्ज नजरेखालून घातला. त्यानें अर्ज केला कीं, 'चालू महिन्याच्या ९ तारखेस फौजेसह औरंगाबादेस दाखल झालों'. पाहिल्यानंतर स्वतःच्या सहीचें फर्मान शाहजाद्यास लिहिलें व तें मुहम्मद सईद वगैरें दोन गुर्जबर्दारांजवळ देऊन डाकचौकीनें पोहोंचविण्याचा हुकूम झाला.

२६७

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिलकाद १५<br>बुध. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۱۵ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۵ | श. १६०३ कार्तिक वद्य १<br>इ. १६८१ नोव्हेंबर १६ |

مردم متوطنان شهر برهانپور استغاثہ نمودند کہ محمد رشید قاضی این جا از بندہاے رشوت گرفتہ و معاملہ بندہاے فیصل نداده دریں باب باعث خرابی بندہاے است حکم شد کہ اہتمام خان قاضی مذکوررا قید نموده نزد قاضی شیخ الاسلام بفرستند کہ موافق شرح نمایند —

बुर्हानपूरच्या लोकांनीं तक्रार केली कीं, 'येथील काजी मुहम्मद रशीद लोकांकडून लांच घेतो व लोकांच्या कामाचा निर्णय करीत नाहीं. ह्यामुळें लोकांचें नुकसान होत आहे.' हुकूम झाला कीं, इहतमामखानानें उपर्युक्त काजीस कैद करून काजी शेखुलइस्लामकडे पाठवावें. म्हणजे धर्माप्रमाणें निर्णय केला जाईल.

२६८

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिलकाद १६<br>गुरु. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۱۶ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۵ | श. १६०३ कार्तिक वद्य २<br>इ. १६८१ नोव्हेंबर १७ |

بہروزخان را فوجداری شاه آباد دهندیره موقوف نموده تهانه داری بهالیز از تغیر میر نور الله مقرر نموده خلعت داده رخصت فرمودند —

बहरोझखानास शाहाबाद ढंडेराच्या फौजदारीवरून स्थगित करून मीर नूरुल्लाह याच्या बदलीमुळें थाळनेरच्या ठाणेदारीवर नेमलें. त्यास खिलअत देऊन पाठविलें.

२६९

| सिता<br>जु. २५ जिलकाद १७<br>शुक्र. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۱۷ سفر<br>یوم الجمعه جلوس سنه ۲۵ | श. १६०३ कार्तिक वद्य ३<br>इ. १६८१ नोव्हेंबर १८ |
|---|---|---|

به خان جهان بهادر در خبر آوردند که بیست پنج هزار سوار [و*] پیاده سنبهاجی پسر سیوا مقهور جهت تاخت احمدنگر رسیده و مفسدان طرح داده بیجاپور جهته تاخت ملک بادشاهی رفته یازده کروه این طرف بیجاپور بمنزل پلندر خان مذکور رفته مقابله نموده به آخر روز جنگ واقعه شده از اقبال حضرت بسیاری مقهوران بقتل رسانیده شکست داده فتح بادشاهی شده و اسلحه وغیره متاع مقهوران بدست آورده و اکثر بندهای بادشاهی به کار آمده و زخمی شدند مفصل از روی واقعه بعرض خواهد رسید سیصد روپیه خدمتانه یافته بود معاف فرمودند به روح الله خان فرمودند که حسب الحکم بمقیم خان قلعه دار احمد نگر بنویسد که از واقعه آن جا بعرض رسید که افواج غنیم بجهته تاخت قلعه آمده بودند و چندی مردم مقهوران اندرون قلعه رفته آن زمان شما خبردار شده مفسدان را بجان کشته و دیگر مردمان را شکست داده از قلعه خبردار شده بنابرآن از روی عنایت پانصدی ذات و یکصد سوار اضافه نموده ایم باید که از آینده چنان خبردار خواهد ماند که مفسدان مذکور را در سرحد قلعه آمدن ندهند خبردار باشد —

खानजहान बहादुराकडे बातमी आली कीं, ‘सीवाचा मुलगा संभाजी याचे पंचवीस हजार स्वार अहमदनगर लुटण्यासाठीं आले. पण ते तें काम सोडून विजापुराकडे बादशाही मुलूख लुटण्यासाठीं गेले. विजापूरच्या अलीकडे अकरा कोसावर पुलंदर ( पुरंधर? ) येथें उपर्युक्त खानानें जाऊन सामना दिला. दिवस मावळण्याच्या वेळेस लढाई झाली. बादशाही सुदैवानें अनेक शत्रूंना मारलें व त्यांचा पराजय केला. बादशाही फत्ते झाली, शत्रूचीं हत्यारें वगैरे हातीं आलीं. बहुतेक बादशाही लोक कामास आले व जखमी झाले. या घटनेची सविस्तर माहिती कळवीत आहे.’ [गुर्जबर्दारांना*] तीनशें रुपये खिदमताना मिळाला होता तो माफ केल्याचा हुकूम झाला. रूहुल्लाह-खानास हुकूम झाला तो असा — अहमदनगरचा किल्लेदार मुकीमखान यास

हस्बुलहुकूम लिहावा कीं, ‘ तेथील घटनांबद्दल समजलें कीं, शत्रूच्या फौजा किल्ला लुटण्यासाठीं आल्या होत्या. तसेंच शत्रूचे कांहीं लोक किल्ल्यांत घुसले असतां तू सावधगिरी बाळगून शत्रूंना जिवें मारलेंस, इतरांचा पराभव केलास व किल्ल्यांत सावधपणें राहिलास. म्हणून तुझ्यावर कृपा करून तुला पाचशें जात व शंभर स्वार एवढी वाढ दिली आहे. येथून पुढें असेंच सावध असावें व शत्रूला किल्ल्याच्या हद्दींत येऊं देऊं नये. ’

२७०

| सिता<br>जु. २५ जिलकाद १८ | اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۱۸ سنه<br>سنه ۲۵ | श. १६०३ कार्तिक वद्य ४<br>इ. १६८१ नोव्हेंबर १९ |
|---|---|---|

عرضداشته بادشاهزاده اعظم شاه بداک چوکی آمده بنظر
در شت معروضداشته بود که از اورنگ‌آباد کوچ نموده بمنزل
چمارده‌کهری پیشتر پنج کروه رسیده بمطالعه خاص درآوردند —

अअजमशाहाचा डाक चौकीनें आलेला अर्ज नजरेखालून घातला. त्यानें विनंती केली होती कीं, ‘ मी औरंगाबादेहून कूच करून पांच कोसावर असलेल्या चमार धखडी ( चांभारटेकडी ) मुक्कामी पोहोंचलों. बादशाहानें तो अर्ज पाहिला.

२७१

| सिता<br>जु. २५ जिलकाद १९<br>रवि. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۱۹ سنه<br>یوم الاحد سنه ۲۵ | श. १६०३ कार्तिक वद्य ५<br>इ. १६८१ नोव्हेंबर २० |
|---|---|---|

بموجب نوشته مقیم خان قلعه دار احمد نگر بعرض رسیده
بود که افواج سنبهاجی پسر سیوا مقهور درین جا آمده بود چنانچه
بنده از حراست قلعه خبردار شد مردم مفسدان را تنبیه نموده
بنابران پانصدی ذات یکصد سوار بخان مذکور و عبدالرحمن وغیره
پسران خان مذکوررا اضافه سرافراز نموده بودند درین ولا از
روی واقعه بعرض رسید که مردم غنیم تمام نواحی این جا تاخت
تاراج نموده آتش زده رفتند خان مشارالیه در حراست نواحی
شهر کردن نتوانست از قلعه خبردار شده ماند بنا برآن حکم شده
خان مذکوررا که بمعه پسران اضافه نموده اند موقوف دارند —

अहमदनगरचा किल्लेदार मुकीमखान याच्या लिहिल्यावरून समजलें कीं, ‘ सीवाचा मुलगा संभाजी याच्या फौजा येथें आल्या होत्या. म्हणून किल्ल्याच्या संरक्षणाबाबत सावध राहिलों. शत्रूच्या लोकांना तंबी दिली. ’ या कारणास्तव उपर्युक्त खान व त्याचीं मुलें अब्दुर्रहमान वगैरे यांना वाढ दिली होती. आतां आलेल्या वाक्यावरून समजलें कीं, ‘ शत्रूच्या लोकांनीं आसपासचा प्रदेश उद्ध्वस्त करून जाळून टाकला. उपर्युक्त खान शहराचें रक्षण करूं शकला नाही. तो किल्ल्यांत सावधानतेनें राहिला. ’ म्हणून हुकूम झाला कीं, उपर्युक्त खानास त्याच्या मुलांसह वाढ दिली आहे ती स्थगित करावी.

२७२

| सिता<br>जु. २५ जिल्काद २०<br>मंगळ. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۲۰ سنه<br>یوم الثلث سنه ۲۵ | श. १६०३ कार्तिक वद्य ८<br>इ. १६८१ नोव्हेंबर २२ |
|---|---|---|

از وقایع ملهیر بعرض رسید که افواج سنبهاجی پسر سیوا مقهور بجهته تاخت درین جا آمده قصد چنان دارند که راجه دیبی سنگه قلعه دار ملهیر را محاصره نمایند بنابران فرمان بنام شهاب الدین خان صادر نموده حواله سید اوغلان نموده که بفرستند که مضمون آنکه سابق شما را طلب حضور نموده بودند بجلدی تمام بیایید باید که حالا خود را بمعه فوج از همون طرف بقلعه ملهیر رسانیده مفسدان را تنبیه رساند به روح الله خان فرمودند که افواج غنیم سابق در نواحی برهانپور چوتهای تحصیل کرده میبرد باید که سه فوج پانصد پانصد سوار تیار نمایند یک فوج همراه بهروز خان برای حراست تهالنیر تعینات نموده همراه اتش خان و عابدی حسین منیر جای رخصت خواهند نمود —

मुल्हेरच्या घटनांवरून समजलें तें असें—सीवाचा मुलगा संभाजी याच्या फौजा येथें लुटालूट करण्यासाठीं आल्या. त्यांचा विचार मुल्हेरचा किल्लेदार राजा देबीसिंग यास वेढावें असा होता. त्यावरून शिहाबुद्दीनखानाच्या नांवें फर्मान सादर झालें व सय्यिद ओगलान याच्याजवळ पाठविण्यासाठीं दिलें. त्यांतील आशय असा— ‘ पूर्वी तुला त्वरेनें हुजूर बोलाविलें होतें. आतां तू फौजेसह तेथून किल्ले मुल्हेरकडे जावें व शत्रूला तंबी द्यावी.’ रूहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, ‘शत्रूच्या फौजा पूर्वी बुर्‍हानपूरच्या आसपासच्या भागांतून चौथाई वसूल करून नेत असत. आतां पाचशें पाचशें स्वारांच्या तीन फौजा

तयार करून, त्यांपैकीं एक फौज थाळनेरच्या संरक्षणासाठीं बहरोझखाना-बरोबर नेमावी व ती आतिशखान व आबिदी हुसैन मुनीर यांसांगातीं पाठवावी.

२७३

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिल्काद २२<br>बुध. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۲۲ سنه<br>یوم الاربعه سنه ۲۵ | श. १६०३ कार्तिक वद्य ९<br>इ. १६८१ नोव्हेंबर २३ |

محمد سلیم منصب فوجدار گاندا پور همراه شمس الدین خان تعینات نموده اصل ششصدی ۱۰۰ سوار کمی شد صدی سوار انعام و خدمات سنگرام غوری معزول تهانه دار سنگمنیر بعد تغیر خدمت هزاری ذات هفتصد سوار بحال داشته بود درین ولا پانصدی ذات یکصد سوار اضافه نمودند —

गांडापूरचा फौजदार मुहम्मद सलीम यास शम्सुद्दीनखानाबरोबर नेमलें. मूळ सहाशें पैकीं १०० स्वार कमी केले होते, ते बक्षीस दिले. संगमनेरहून बदललेला ठाणेदार संग्राम घोरी याच्या चाकरींत बदल केल्यानंतर त्यास सतराशें स्वार बहाल केले होते. आतां त्यांत पाचशें जात व शंभर स्वार एवढी वाढ फर्माविली.

२७४

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिल्काद २४<br>शुक्र. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۲۴ سنه<br>یوم الجمعه سنه ۲۵ | श. १६०३ कार्तिक वद्य ११<br>इ. १६८१ नोव्हेंबर २५ |

شاهزاده محمد اعظم شاه را سزاولی نموده نزد خان زمان رسانیده بیاید خسرو بیگ یساول را رخصت نموده بهروزخان را بمعه همراهیان از تهانیسر سزاولی نموده نزد شهاب الدین خان بقلعه ملهیر براے تنبیه مفسدان رسانیده بیاید —

عرضه داشته بادشاهزاده محمد اعظم شاه آمده بنظر گذشت که فدوی بموجب حکم از طرف گلشن آباد برگشته آمده داخل اورنگ آباد شدیم بندگان حضرت بمطالعه خاص در آوردند —

अअजमशाह यास सजावली करून खान झमानकडे [ तसेंच ] बहरोझ-खानास त्याच्या बरोबरच्या लोकांसह थानेश्वराहून सजावली करून शत्रूला तंबी देण्यासाठीं किल्ले मुल्हेर येथें शिहाबुद्दीनखानाजवळ पोहोंचविण्यासाठीं खुस्रुवबेग यसावल यास आज्ञा देण्यांत आली.

अअजमशाह याचा अर्ज आला तो नजरेखालून घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, मी हुकुमाप्रमाणें गुलशनाबादेहून सडा होऊन औरंगाबादेंत दाखल झालों. बादशाहानें अर्ज पाहिला.

२७५

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिल्काद २५<br>शनि. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۲۵ سنہ<br>یوم السبت سنہ ۲۵ | श. १६०३ कातिक वद्य १२<br>इ. १६८१ नोव्हेंबर २६ |

عبدالنبی روز بہانی داروغہ توپخانہ دکن را خطاب خانی مرحمت فرمودند—

दख्खनच्या तोफखान्याचा अधिकारी अब्दुन्नबी रोझभानी यास खानाचा किताब देण्याची कृपा झाली.

२७६

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिल्काद २६<br>रवि. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۲۶ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۵ | श. १६०३ कातिक वद्य १३<br>इ. १६८१ नोव्हेंबर २७ |

سید مبارک خان قلعہ دار دولت آباد بہ عرض رسید کہ سید لطف اللہ کوکہ متصل لال باغ فرود آمده بود ہنگام شب بخانہ مشارالیہ داکہ دزدان افتاد انچہ متاع نقد و جنس بود بتاراج برده پنج نفررا کشتہ و یازده نفررا زخمی کرده گریختہ رفتند بنابران بہ اہتمام خان کوتوال فرمودند کہ مفسدان را پے نموده بعرض رساند بہ محمد علی خان فرمودند کہ پانصد بیلدار مقرر نماید کہ اندرون قلعہ مبارک انچہ باورچی خانہ ہاے و کوٹھری مرمت طلب باشند بہ زودی طیار نموده صاف نمایند—

روح اللہ خان عرض نموده کہ مقیم خان قلعہ دار احمدنگر خطی نوشتہ کہ یک کوچ و ہمشیره سنبہا پسر سیوا مقہور را سابق دلیر-خان قید نموده در این قلعہ نگہداشتہ است چنانچہ جمعیت مقہور درین نواح آمده قصد چنان دارد کہ از اندرون قلعہ برآرند و ہمراه فدوی جمعیت قلیل است ہرچہ امر شود فرمودند کہ بخان مشارالیہ بنویسند کہ بخاطر جمع خبردار باشد بادشاہزاده محمد اعظم شاه سید منور خان را براے کومک شما تعین نموده است رسیده باشد—

दौलताबादेचा किल्लेदार सय्यिद मुबारकखान यानें अर्ज केला कीं, 'सय्यिद लुत्फुल्लाह कोका हा लालबागेजवळ आला होता. रात्रीच्या वेळीं चोरांनीं उपर्युक्ताच्या घरावर डाका घातला. आणि रोकड व जिन्नस होते ते लुटून नेले. त्यांनीं पांच लोकांना मारलें व अकरा लोकांना जखमी केले. नंतर ते पळून गेले.' तेव्हां इहतमामखान कोतवालास हुकूम झाला कीं, 'बंडखोरांचा पाठलाग करून अर्ज करावा'. व मुहम्मद अलीखानास हुकूम झाला कीं, 'पांचशें बेलदार नेमून किल्ल्यांतील मुदपाकखाना व कोठडी यांची लवकर दुरुस्ती करून स्वच्छ करावी.'

रूहुल्लाहखानानें अर्ज केला कीं, अहमदनगरचा किल्लेदार मुकीमखान यानें मला लिहिलें तें असें—'सीवाचा मुलगा संभा याची एक बायको व बहीण यांना पूर्वीं दिलेरखानानें कैद केलें होतें. त्यांना ह्या किल्ल्यात ठेवलें आहे. म्हणून शत्रूचे लोक ह्या किल्ल्याभोवतीं आले. त्यांचा त्यांना किल्ल्यांतून बाहेर काढण्याचा विचार आहे. माझ्या बरोबर लोक थोडे आहेत. याबाबत हुकूम व्हावा.' हुकूम झाला कीं, उपर्युक्त खानास त्यानें खातरजमा ठेवून सावध असावें, अअजमशहानें सय्यिद मुनव्वरखानास तुझ्या कुमकेसाठीं नेमलें आहे, तो पोहोंचेलच असें लिहावें.'

२७७

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिल्काद २७<br>सोम. | اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعده ۲۷ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۵ | श. १६०३ कार्तिक वद्य १४<br>इ. १६८१ नोव्हेंबर २८ |

اوتم رام نبیره راجہ منوہرداس گور قلعدار شولاپوررا خلعت داده نزد راجہ مذکور رخصت فرمودند سید کرم الله خان تعینات دکن نہ صدی ذات پانصد سوار بود خان جہان بہادر خان مذکوررا فوجداری پتن معہ اضافہ صدی ذات چہارصد سوار تجویز نموده بعرض رسید منظور نشد—

بہ محمد علی خان حکم شد کہ بہ متصدیان دولت آباد بنویسد کہ متصل قلعہ آنجا سہ دمدمہ طیار نماید بہ محمد علی خان فرمودند کہ پنجاه سنگ تراش و پنجاه جہمره جہتہ تعینات فوج خان جہان بہادر تعینات نمایند—

فرمان بنام شاہزاده محمد اعظم شاه و خان جہان بہادر صادر شد حوالہ میرعوض گرزدار نمودند بیست ہزار روپیہ برآورده

صاف نمودن خندق قلعہ احمد نگر بعرض رسید حکم شد کہ یک معمار
از حضور رفتہ برآوردہ ان نمودہ صاف بکنانند —

सोलापूरचा किल्लेदार राजा मनोहरदास गौड याचा नातू उत्तमराम यास खिलअत देऊन उपर्युक्त राजाकडे पाठविलें.

दख्खनमधें नेमलेला सय्यिद करमुल्लाह यास नऊशें जात व पांचशें स्वार एवढी मनसब होती. खानजहान बहादुरानें उपर्युक्त खानास शंभर जात व चारशें स्वार एवढ्या वाढीसह पट्टणच्या फौजदारीवर नेमण्याची तजवीज केली असा अर्ज आला. तें अमान्य झालें.

दौलताबादेच्या मुत्सद्यांना कळविण्याबद्दल मुहम्मद अलीखानास हुकूम झाला तो असा – तेथील किल्ल्याजवळ तीन धमधमे तयार करावे. मुहम्मद अलीखानास हुकूम झाला कीं, ५० गवंडी ( दगड फोडे ) व ५० झुमरे खानजहान बहादुराच्या फौजेंत नेमावे.

अअजमशाह व खानजहान बहादुर यांच्या नांवाचीं फर्मानें मीर अवज गुर्जबर्दार याच्या हवाला केलीं. वीस हजार रुपयांत अहमदनगरचा खंदक स्वच्छ करण्याविषयीं अर्ज आला. हुकूम झाला कीं, हुजूरकडून एका शिल्प्यानें जाऊन साफ करावा.

२७८

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिल्काद २९<br>बुध. | اخبارات دربار معلے<br>ماہ ذی قعدہ ۲۹ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۵ | श. १६०३ मार्गशीर्ष शुद्ध १<br>इ. १६८१ नोव्हेंबर ३० |

بہ محمد علی خان فرمودند کہ سیصد پنجاہ ہرکارہ نو نوکر نگاہ
داشتہ بہ صوبہ دکن تعین نمایند کہ خبر جا بجای می آوردہ باشد —

मुहम्मद अलीखानास हुकूम झाला कीं, ३५० नवीन हरकारे चाकरींत ठेवावे व त्यांना दख्खनमधें नेमावे. त्यांनीं ठिकठिकाणच्या बातम्या आणाव्या.

२७९

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिल्काद ३०<br>गुरु. | اخبارات دربار معلے<br>ماہ ذی قعدہ ۳۰ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۵ | श. १६०३ मार्गशीर्ष शुद्ध २<br>इ. १६८१ डिसेंबर १ |

عزیز بیگ و غیرہ دو نفر گرز برداران را تعین نمودہ کہ راو
انوودہ سنگہ را از اورنگ آباد بہ معہ (بمعہ) خزانہ سزاولی نمودہ
نزد خان جہان بہادر بہ پید گانو رسانیدہ بیاید —

از واقعہ ہمراہی خان جہان بہادر بعرض رسید کہ سنبہا پسر
سیوا مقہور قریب شش ہزار سوار بجہت تاخت قلعہ شولاپور فرستادہ
بود ہرگاہ درین جا رسید راجہ منوہرداس گور از قلعہ جہت مقابلہ
مستعد شد ازین ممر خان جہان بہادر رغبت خان ہراول فوج خود
معہ جمعیت بہ کومک راجہ مذکور فرستاد چنانچہ جنگ واقعہ شد
بسیار مردم غنیم را کشتہ و زخمی نمودہ فتح بادشاہی شد مفسدان
[یوم الخمس ۳۰ از واقعہ ہمراہی خان جہان بہادر بعرض رسید]
گریختہ رفتند بعد مطالعہ فرمودند کہ مجرای کلی شد —

अझीझबेग वगैरे गुर्जबर्दारांनीं अनिरुद्धसिंगास औरंगाबादेहून खजिन्यासह सजावली करून पेडगांवास खानजहान बहादुराकडे पोहोंचवावे असा हुकूम झाला.

खानजहान बहादुराच्या बातमीपत्रावरून समजलें तें असें — सीवाचा मुलगा संभा यानें सोलापूर उद्ध्वस्त करण्यासाठीं सहा हजार स्वार पाठविले. तेव्हां राजा मनोहरदास गौड हा किल्ल्यांतून तयारीनिशी बाहेर आला. या बातमीमुळें खानजहान बहादुरानें रघबत (रणमस्त) खानास फौजेच्या हरावलीस नेमून स्वतःच्या लोकांस उपर्युक्त राजाच्या कुमकेस पाठविलें. नंतर लढाई झाली. शत्रूच्या अनेक लोकांना मारलें व जखमी केलें. बादशाही फत्ते झाली. शत्रू पळून गेला. अर्ज पाहिल्यावर हुकूम झाला कीं, मान्य आहे.

२८०

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिल्हेज ३<br>रवि. | اخبارات دربار معلے<br>ماہ ذی الحجہ ۳ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۵ | श.१६०३ मार्गशीर्ष शुद्ध ४<br>इ. १६८१ डिसेंबर २८ |

داراب ولد قلعدار خان قلعدار دہارور آوردہ امانت خان
دیوان دکن ملازمت نمودہ چہار اشرفی و پانصد روپیہ نذر
گزرانیدہ —

سید اوغلان عرض نمودہ کہ شہاب الدین خان خطی نوشت کہ
مردم جاسوسان خبر آوردند کہ فوج غنیم بطرف سالہیر آمدہ است
بنابران فدوی اسباب زیادتی و مردم نیز (بہیر) را درگاہ
گذاشتہ اسپ قمچی براے تنبیہ مفسدان سواری نمودہ ایم شنیدہ
خاموش ماندند —

धारूरचा किल्लेदार दाराब वलद किलअदारखान आला. त्यानें दख्खनचा दिवाण अमानतखान याची भेट घेतली आणि ४ अश्रफ्या व ५०० रुपये नजर केले.

सय्यिद ओघलान यानें अर्ज केला तो असा — शिहाबुद्दीनखानानें पत्र लिहिलें आहे कीं, 'साल्हेरकडे शत्रूची फौज आली आहे अशी बातमी हेरांनीं आणली. म्हणून मी जास्तीचें सामान व बुणगे यांना जालना येथें सोडून शत्रूस तंबी देण्यासाठीं स्वारी केली.' ऐकून बादशाह गप्प बसला.

२८१

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिल्हेज ४<br>सोम. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی الحجہ ۴ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۵ | श. १६०३ मार्गशीर्ष शुद्ध ५<br>इ. १६८१ डिसेंबर ५ |

نوروز بیگ منصبدار عرض داشت شہاب الدین خان آورده در عدالت ظہر بنظر گذرانیده و زبانی منصبدار بعرض رسید کہ خان مذکور از گالنہ اسپ قمچی بجہتہ تنبیہ قوم غنیم بجانب سالہیر ملک غنیم سواری نموده بود چنانچہ ہفت کروه آن طرف با مقہوران جنگ واقع شد از اقبال حضرت نہ صد کس بقتل رسانیده و بسیاری مردم را زخمی نموده بیست کس زنده دستگیر کرده و اکثر بنده ہای بادشاہی بکار آمده و زخمی شدند مفصل از روے وقایع بعرض خواہد رسید و مقہوران گریختہ رفتہ خان مذکور تا دو کروه تعاقب نموده پانزده کروه در سالہیر آن طرف رسیده دیره خود مقرر کرده بندگان حضرت بعد مطالعہ فرمودند کہ مجرای مشار الیہ کلی بظہور پیوست اضافہ نوسرافرازی فرمودند۔

سید کرم اللہ خان تعینات دکن را فوجداری پتن حسب التماس امانت خان مقرر شد۔

رضا الدین داروغہ توپخانہ دکن را حسب التماس امانت خان فوجداری سیرادہون مقرر شده —

शिहाबुद्दीनखानाचा अर्ज नौरोझबेग मनसबदारानें आणला. न्यायालयांत बादशाहाच्या नजरेखालून घातला व तोंडीं सांगितलें कीं, 'उपर्युक्त खान शत्रूला तंबी देण्यासाठीं जालन्याहून साल्हेरकडे शत्रूच्या मुलखांत स्वार होऊन गेला होता. नंतर सात कोस इकडील बाजूस शत्रूशीं लढाई झाली. बादशाही सुदैवानें नऊशें लोकांना मारलें व अनेकांना जखमी करून वीस लोकांना

जिवंत पकडलें. त्याचा पराजय केला. बादशाही फत्ते झाली. बहुतेक बादशाही लोक कामास आले व जखमी झाले. या घटनेबद्दलचा तपशीलवार अर्ज करीत आहे. शत्रूचे लोक पळून गेले. त्यांचा उपर्युक्त खानानें दोन कोसपर्यंत पाठलाग केला. तो साल्हेरच्या अलीकडे पंधरा कोसांवर पोहोंचला असून त्यानें आपला तंबू तेथें ठोकला आहे.' अर्ज पाहिल्यावर हुकूम झाला कीं, उपर्युक्तखानाचें म्हणणें मान्य आहे. त्यास नवीन वाढीचा हुकूम झाला.

अमानुल्लाहखानाच्या विनंत्यनुसार दख्खनमधें नेमलेल्या सय्यिद करमुल्लाहखानास पट्टणच्या फौजदारीवर नेमलें. अमानतखानाच्या विनंत्यनुसार दख्खनच्या तोफखान्याच्या अधिकारी रिजाउद्दीन यास सिराढोणच्या फौजदारीवर नेमलें.

२८२

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिल्हेज ५<br>मंगळ. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی الحجه ۵ سنه<br>یوم الثلث سنه ۲۵ | श. १६०३ मार्गशीर्ष शुद्ध ६<br>इ. १६८१ डिसेंबर ६ |

سید اوغلان معلم بادشاهزاده محمد کام بخش عرض نموده که قلیچ خان خطی نوشته که شاهزاده جیو سید منورخان را بطرف احمدنگر بمعه جمعیت تعین نموده بود چنانچه مردم غنیم آمده از خان مشارالیه مقابله نموده چون این خبر بنده شنید کومک خان مزکور رسیده و مردم غنیم با نصف جمعیت از بنده هم مقابله کرده انچه فدوی اسپان انداخته الا ان طرف سید منورخان اسپان انداخته جنگ واقع شد از اقبال حضور بسیار مردم غنیم بقتل رسانیده و زخمی نموده فتح بادشاهی شد متمردان گریخته رفتند و انچه تابینان بندهای بادشاهی بکار امده و زخمی شدند از وقایع بعرض والا خواهد رسید محمد شفیع مشرف توپخانه قلعجات دکن را بدستور سابق بحال فرمودند —

मुहम्मद कामबक्षाचा शिक्षक सय्यिद ओघलान यानें अर्ज केला तो असा — कुलीचखानानें मला पत्र लिहिलें आहे कीं, 'शाहजाद्यानें मुनव्वरखानास अहमदनगरकडे फौजेसह नेमिलें होतें. नंतर शत्रूचे लोक आले. उपर्युक्त खानाशीं त्यांचा सामना झाला. मला ही बातमी मिळतांच मी उपर्युक्त खानाच्या कुमकेस धावून गेलों. शत्रूच्या निम्या लोकांनीं माझ्या लोकांशीं सामना दिला. एका बाजूनें मी माझे घोडे व दुसऱ्या बाजूनें सय्यिद मुनव्वरखानानें आपले घोडे घातले. लढाई झाली. बादशाही सुदैवानें शत्रूचे अनेक

लोक मारले व जखमी केले. बादशाही फत्ते झाली. शत्रूचे लोक पळून गेले. बादशाही लोकही कामास आले व जखमी झाले तें या घटनेच्या अर्जावरून कळेल.' दख्खनमधील किल्ल्यांच्या तोफखान्याचा मुशरीफ मुहम्मद शफी यास पूर्वीप्रमाणें काम बहाल फर्मोविलें.

२८३

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिल्हेज ६<br>बुध. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی الحجه ۶ سنه<br>یوم الاربعه سنه ۲۵ | श. १६०३ मार्गशीर्ष शुद्ध ७<br>इ. १६८१ डिसेंबर ७ |

میر نورالله ولد دیانت خان مرحوم تهانه دار تهالیه (تهالنیر؟) مقرر نموده خلعت داده رخصت نمودند -

به امانت خان دیوان دکن فرموده بودند که مطالبهاے صوبه دکن به عرض رسانیده مهر دستخط خود نموده باشد درین ولا فرمودند که طوریق (؟) رشید خان دیوان خالصه و اعتماد خان دیوان تن پیش دستان جمله الملک اسد خان مطالبهای بعرض میرسانند و مهر و دستخط جمله الملک بهره مند خان نایب میکند بمنظور شما هم بعمل می آورده باشد و شمارا سیوم پیش دست جمله الملک مقرر نمودیم -

عرض داشته سهراب خان قلعه دار پرینده بنظر گذشت معروض نوشته بود که جاگیرهاے فدوی نواحی پرینده تنخواه شده اند از سبب فساد جمعیت سنبها پسر سیوا مقهور به بنده چیزی نمی رسد احوال پریشان داریم اگر حکم شود خانزادرا در قلعه گذاشته بنده آمده قدم مبارک بیند ویا فدوی در قلعه بماند خانزاده بحضور آمده حقایق جاگیر نماید حکم شد که حقایق جاگیر خان مشارلیه امانت خان بعرض رساند و بخان مذکور بنویسد که هرگاه مابدولت سعادت باورنگ آباد تشریف خواهم آورد ان زمان شمارا طلب حضور نموده خواهد شد -

मर्हूम दियानतखानाचा मुलगा मीर नूरुल्लाह यास थालिया (थालनेर ?) येथें ठाणेदार नेमलें व खिलअत देऊन रवाना केलें.

दख्खनचा दिवाण अमानतखान यास हुकूम झाला होता कीं, दख्खनमधील मागण्यांबद्दल त्यानें स्वतःच्या सहीशिक्क्याचा अर्ज करावा. आतां

हुकूम झाला कीं, 'खालसाचा दिवाण रशीदखान व तनपेशदस्तानचा दिवाण अअतमादखान यांजप्रमाणें असदखानानें मागण्यांचा अर्ज करीत रहावें. बहरामंदखान नायब यानें त्यांवर सहीशिक्का करावें व तें मंजूर करून त्याप्रमाणें अमल करावा. तुला जुम्लतुल्मुल्काचा तिसरा पेशदस्त म्हणून नेमलें आहे.'

परिंड्याचा किल्लेदार सुहराबखान याचा अर्ज नजरेखालून गेला. त्यानें विनंति केली होती कीं, 'मला तनख्यासाठीं परिंड्याजवळ जहागीर दिली आहे. परंतु सीवाचा मुलगा संभा याच्या लोकांच्या त्रासामुळें मला कांहींच मिळत नाहीं. माझी परिस्थिति अत्यंत बिकट आहे. हुकूम होईल तर मी माझ्या मुलास येथें ठेवून सरकारच्या भेटीस येईन किंवा मी किल्ल्यांत राहून माझ्या मुलास हुजूर पाठवीन.' यावर हुकूम झाला कीं, 'त्याच्या जागिरीबद्दल अमानतखानानें अर्ज करावा व उपर्युक्त खानास लिहावें कीं, बादशाह औरंगाबादेस येतील तेव्हां तुला हुजूर बोलाविलें जाईल.

२८४

| | | |
|---|---|---|
| सिता | اخبارات دربار معلی | श. १६०३ मार्गशीर्ष शुद्ध ८ |
| जु. २५ जिल्हेज ७ | ماه ذی الحجه ۷ سنه | इ. १६८१ डिसेंबर ८ |
| गरु. | یوم الخمس سنه ۲۵ | |

بعرض رسید که خان جهان بهادر توپهای از قلعه احمدنگر بر آورده در بهادرگده نگاهداشته بنابران کوچک علی را رخصت نمود که توپهاے مذکوررا از بهادرگده به قلعه احمدنگر رسانیده بیاید —

अर्ज आला कीं, खानजहान बहादुरानें अहमदनगरहून तोफा आणून पेडगांवांत ठेवल्या. म्हणून कूचकअली यास त्या तोफा बहादुरगडाहून अहमदनगर येथें पोहोंचवून परतण्यासाठीं पाठविलें.

२८५

| | | |
|---|---|---|
| सिता | اخبارات دربار معلی | श. १६०३ मार्गशीर्ष शुद्ध १३ |
| जु. २५ जिल्हेज १२ | ماه ذی الحجه ۱۲ سنه | इ. १६८१ डिसेंबर १३ |
| मंगळ. | یوم الثلث سنه ۲۵ | |

حسب الحکم بمهر روح الله خان بنام راو انروده سنگه پسر خوانده راو بهاو سنگه متوفی بداک چوکی صادر نموده حواله محمد بیگ وغیره دو نفر گرزداران نموده که راو مذکور را او اورنگ آباد سزاولی نموده نزد خان جهان بهادر به پیدگانو رسانیده بیاید —

स्व. राव भाऊसिंग याचा मानीव मुलगा राव अनिरुद्धसिंग याच्या नांवें रूहुल्लाहखानाच्या शिक्क्याचा हस्बुलहुकूम डाकचौकीनें पाठविण्यासाठीं मुहम्मदबेग वगैरे दोन गुर्जबर्दारांच्या जवळ दिला. त्यांनीं उपर्युक्त रावास औरंगाबादेहून सजावली करून पेडगांवास खानजहान बहादुराकडे पोहोंचवून यावें असें फर्माविलें.

२८६

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिल्हेज १३<br>बुध. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی الحجہ ۱۳ سنہ<br>جلوس یوم الاربعہ سنہ ۲۵ | श.१६०३ मार्गशीर्ष शुद्ध १४<br>इ. १६८१ डिसेंबर १४ |

بہ روح اللہ خان فرمودند کہ حسب الحکم بخان جہان بہادر بنویسد کہ مکرند زمیندار گالنہ پیٹھ در قید است خلاصی سازد۔

از وقایع دکن بعرض رسید کہ مکرم پتنگ راو زمیندار جو در (جوار) تجویز دلیرخان دو ہزاری ذات ہزار سوار منصب نوسرافراز و تعینات گلشن آباد حکم شدہ بود ثانی الحال خان جہان بہادر پانصدی ذات کم تجویز کردہ منظور نمودہ بودند درین ولا کمی جمعیت مشارالیہ بخان جہان بہادر ظاہر شد بنابران از منصب برطرف نمودہ است ہرچہ امر شود حکم شد دو ہزار ذات ہزار سوار بدستور سابق بحال شناسند دی روز شیخ سعادت مند برادر احمد مکرند کہ بخشی واقعہ نویس بگلانہ مقرر شدہ دستک خدمت گرفتہ بکچہری دیوان علی آمدہ بود —

रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा — खानजहान बहादुरास हस्बुल-हुकूम लिहावा कीं, 'गाळणापेठचा जमीनदार मकरंद कैदेंत आहे त्यास सोडावें.'

दख्खनच्या घटनापत्रांवरून समजलें तें असें — जोदर (जवार) चा जमीदार मुकर्रम (मकरंद) पतंगराव यास दिलेरखानाच्या तजविजीनें दोन हजार जात व हजार स्वार एवढी मनसब दिल्यावर त्यास गुलशनाबादेस नेमल्याचा हुकूम झाला होता. त्यानंतर खानजहान बहादुरानें पांचशें जात कमी करण्याबद्दल तजवीज केली होती ती मान्य केली. नंतर उपर्युक्ताची जमेत कमी आहे असें खानजहान बहादुरास दिसल्यावरून त्यानें त्याची मनसब बडतर्फ केली. याबाबत हुकूम व्हावा. हुकूम झाला कीं, पूर्वींप्रमाणें दोन हजार जात, हजार स्वार बहाल केल्याचें समजावें

काल शेख सआदतमंदाचा भाऊ अहमद मकरंद यास बागलाणच्या वाकेनविसाचा बक्षी नेमलें होतें त्यानें दस्तक घेऊन कचेरींत प्रवेश केला.

२८७

सिता<br>जु. २५ जिल्हेज १४<br>गुरु.

اخبارات دربار معلے<br>ماه ذی الحجہ ۱۴ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۵

श.१६०३ मार्गशीर्ष शुद्ध १५<br>इ. १६८१ डिसेंबर १५

سید شیرخان تعیناتت فوج بادشاہزاده محمد اعظم شاه را خدمت قلعہداری سوارپور (شولاپور؟) از تغیر راجہ منوہرداس مقرر نموده۔

راجہ منوہرداس قلعدار معزول شولاپور ہزار پانصدی ذات ہزار سوار منجملہ پانصد سوار دو اسپہ ازان جملہ پانصدی ذات ہزار سوار بر اورای بشرط قلعہداری سرافراز بود بعرض رسید حکم شده کہ بشرط یساق رکاب بحال داشتہ طلب حضور نمایند۔

از واقع فوج ہمراہی بادشاہزاده محمداعظم شاه بعرض رسید کہ بادشاہزادهجیو حسن علی خان بہادررا خلعت و یک راس اسپ و یک زنجیر فیل و یک قبضہ شمشیر انعام مرحمت نموده بمعہ فوج ده ہزار سوار برائے تنبیہ غنیم بہ جانب پونادہر رخصت فرمودند۔

بعرض رسید کہ متصدیان اورنگ آباد سرب و باروت وغیره از قلعہ دولت آباد جہتہ کار بادشاہی طلب می نمایند سید مبارک خان قلعہدار انجا بغیر از حکم نمی دہد ہر چہ امر شود حکم شده بخان مذکور بنویسد کہ بموجب ذیل از قلعہ مذکور بدہند کہ برآورده بہ اورنگ آباد بفرستند۔

अअजमशाहाच्या फौजेंत नेमलेला सय्यिद् शेरखान यास राजा मनोहर-दासाच्या बदलीमुळें सोलापूरच्या किल्लेदारीवर नेमलें.

सोलापूरहून बदललेला किल्लेदार मनोहरदास यास पंधराशें जात व हजार स्वार एवढी मनसब होती. पैकीं पांचशें स्वार दुघोडी होते. त्यांपैकीं पांचशें जात, हजार स्वार त्यास किल्लेदारीच्या अटीवर दिले होते. त्याचा अर्ज आला. हुकूम झाला कीं, सशर्त असलेले स्वार बहाल समजून त्यानें हुजूर यावें.

अअजमशाहाच्या फौजेंतील वाक्यावरून समजलें तें असें–शाहजाद्यानें हसन अलीखानास खिलअत, घोडा, हत्ती व तलवार बक्षीस देऊन दहा हजार स्वारांच्या फौजेसह पुरंधरकडे शत्रूला तंबी देण्यासाठीं पाठविलें.

अर्ज आला कीं, 'औरंगाबादेचे मुतसद्दी बादशाही कामासाठीं दौलताबादेहून शिसे, दारू वगैरे मागवितात. परंतु तेथील किल्लेदार सय्यिद मुबारकखान हा हुकुमाशिवाय तें देत नाहीं. तरी हुकूम व्हावा.' हुकूम झाला कीं, उपर्युक्त खानास लिहावें कीं, खालील प्रमाणें द्यावें म्हणजें तें घेऊन औरंगाबादेकडे पाठवितां येईल. [ येथें तपशील* ]

२८८

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिल्हेज १६<br>सोम. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی الحجہ ۱۶ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۵ | श. १६०३ मार्गशीर्ष वद्य ३<br>इ. १६८१ डिसेंबर १७ |

فرمان عالی شان بنام شاہزادہ محمد اعظم شاہ و فرمان خدمت قلعہ داری شولاپور بہ سید شیرخان و فرمان درباب طلب حضور براجہ منوہرداس قلعہ دار معزول صادر نمودہ حوالہ خسرو بیگ یساول نمودہ حکم شد کہ انچہ بندہ ہای بادشاہی از ہمراہی شاہزادہ جیو تعینات فوج خان جہان بہادر کردہ اند انہا تا حال روانہ نشدہ اند باید کہ انہارا از اورنگ آباد سزاولی نمودہ نزدیک خان جہان بہادر بہ پیدگانو رسانیدہ بیاید —

अअजमशाह यास व सोलापूरच्या किल्लेदारीच्या चाकरीचें सय्यिद शेरखान यास तसेंच बदललेला (सोलापूरचा) किल्लेदार मनोहरदास यास हुजूर बोलावण्याचें अशीं फर्मानें सादर झालीं तीं खुस्रवबेग यसावल याजवळ दिलीं. हुकूम झाला कीं, 'शाहजाद्याबरोबरचे जे लोक खानजहान बहादुरच्या फौजेंत नेमले आहेत व जे अजूनपर्यंत रवाना झाले नाहींत, त्यांना औरंगाबादेहून सजावली करून पेडगांवास खानजहान बहादुराजवळ पोहोंचवून यावें.'

२८९

| | | |
|---|---|---|
| सिता<br>जु. २५ जिल्हेज २१<br>गुरु. | اخبارات دربار معلی<br>ماه ذی الحجہ ۲۱ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۵ | श. १६०३ मार्गशीर्ष वद्य ८<br>इ. १६८१ डिसेंबर २२ |

مطالبہ دولت مند خان زمیدار تہانہ دار پرگنہ ماحل واقع بگلانہ بعرض رسید اول انکہ دہ ہزار سوار غنیم سہ فوج مقرر کردہ موضع کو ذخ را تاراج نمودہ بہ مطوطنان این جا مقابلہ می شود و حضرت بدولت خبر نگیرند حکم شد کہ بہروزخان و اتش خان رفتہ از

تهانه خبردار باشد دوم اکثر سرب و بان و باروت درکار است
حکم شد پنج من باروت سرب و یک صد بان بدهند —
مردمان بهادرپوره استغاثه نموده که احوال بندهای پریشان
است جزیه تا یساق معاف شود حکم شد تعین (تحقیق) بعرض
رسانند —

बागलाणांतील जमीनदार व परगणे माहलचा ठाणेदार दौलतमंदखान याच्या मागण्यांचा अर्ज आला तो असा—(१) शत्रूनें दहा हजार स्वारांच्या तीन फौजा केल्या आहेत. त्यांनीं मौजे कोजख (कोहज?) लुटलें आहे. तेथील रहिवाशांनीं सामना केला; परंतु तें हुजूर समजलें नव्हतें. आतां हुकूम झाला कीं, बहरोझखान व आतिशखान यांनीं जाऊन थाळनेरबद्दल सावध असावें. (२) 'शिसें, बाण व दारू यांची आवश्यकता आहे.' हुकूम झाला कीं, पांच मण दारू, शिसें व शंभर बाण द्यावे.

बहादुरपुऱ्याच्या लोकांनीं तक्रार केली कीं, 'आमची परिस्थिति बिकट आहे; जिझिया माफ व्हावा.' हुकूम झाला कीं, चौकशी करून अर्ज करावा.

२९०

| | | |
|---|---|---|
| सिता | اخبارات دربار معلی | |
| जु. २५ जिल्हेज २३ | ماه ذی الحجه ۲۳ سنه | श. १६०३ मार्गशीर्ष वद्य १० |
| सोम. | یوم الاثنا سنه ۲۵ | इ. १६८१ डिसेंबर २४ |

بروح الله خان فرمودند که حسب الحکم به ایرج خان صوبه دار
برار بنویسد که شما درباب امدن حضور معروض داشته بود بعرض
رسید [حکم شد*] که احتیاج امدن حضور نیست از تعلقه صوبه-
داری رفته خبردار باشد —

रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा— वऱ्हाडचा सुभेदार ईरजखान यास हस्बुलहुकूम लिहावा कीं, 'तू हुजूर येण्याबद्दल अर्ज केला होतास. परंतु तुझी हुजूर येण्याची गरज नाहीं. तू सुभेदारीच्या प्रदेशांत सावध असावेंस.'

२९१

| | | |
|---|---|---|
| सिता | اخبارات دربار معلی | |
| जु. २५ जिल्हेज २९ | ماه ذی الحجه ۲۹ سنه | श. १६०३ माघ शुद्ध १ |
| बुध. | یوم الاربعا سنه ۲۵ | इ. १६८१ डिसेंबर ३० |

راجه رام سنگه از تهانه داری و راه داری از غریب خانه تا
جمرود مقرر شد —

राजा रामसिंग यास घरीबखाना (घर?) ते जमरूदपर्यंत राहदारी व ठाणेदारी दिली.

२९२

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रमजान २ शनि. | اخبارات دربار معلی ماه رمضان المبارک ۲ سنه یوم السبت سنه ۲۶ | श. १६०४ भाद्रपद शुद्ध २ इ. १६८२ ऑगस्ट २६ |

بعد برطرفی بحالی فرمودند نواس راو وغیره بتجویز خان جهان بهادر-

| | | |
|---|---|---|
| مشارالیه | باباجی (ناناجی ؟) | اودهوت راو |
| هزاری | پانصدی | پانصدی |
| سوار | سوار | سوار |
| درین ولا | درین ولا | درین ولا |
| سیصدی | سیصدی | دوصدی |
| سوار | سوار | سوار |

बडतर्फीनंतर खानजहान बहादुर याच्या तजविजीनें मनसब बहाल केली ती अशी–

| | | |
|---|---|---|
| निवासराव | पूर्वी एक हजार स्वार | आतां ३००; |
| बाबाजी (नानाजी?) | ,, पाचशें स्वार | ,, ३००; |
| अवधूतराव | ,, पाचशें स्वार | ,, २००. |

२९३

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रमजान २ शनि. | اخبارات دربار معلی ماه رمضان المبارک ۲ سنه یوم السبت سنه ۲۶ | श. १६०४ भाद्रपद शुद्ध २ इ. १६८२ ऑगस्ट २६ |

بموجب نوشته عبدالعزیز خان قلعه جونیر بعرض رسید

اول آنکه هنگام قلعه داری مخلص خان شش ۶ هفت هزار سوار جمعیت درین جا بود همراه فدوی قلیل است امدرفت غنیم است حکم شد که حقایق جمعیت بعرض رسانند -

دویم آنکه جاگیر در صوبه مالوه متفرقه است چیزی خرچی نمی رسد عوض هر دو صوبه برار و خاندیس تنخواه شود حکم شد امانت خان بعرض رسانند —

जुन्नरचा किल्लेदार अब्दुल अझीझखान यानें लिहिलें होतें तें असें — (१) प्रथम मुखलिसखान येथें किल्लेदार होता तेव्हां सहासात हजार स्वारांची जमेत इथें होती. माझ्याबरोबर थोडी आहे. शत्रूची येजा आहे. हुकूम झाला कीं, जमेतीबद्दल चौकशी करून अर्ज करावा. (२) माझ्या खर्चासाठीं माळव्यांत जहागीर आहे. तेथून मला खर्चासाठीं कांहींच मिळत नाहीं. त्याऐवजीं वऱ्हाड व खानदेश यांतून तनखा मिळावा. हुकूम झाला कीं, अमानतखानानें अर्ज करावा.

२९४.

| जु. २६ रमजान ४ सोम. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماہ رمضان المبارک ۴ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۶ | श. १६०४ भाद्रपद शुद्ध ६<br>इ. १६८२ ऑगस्ट २८ |
|---|---|---|

روح اللہ خان عرض نمودہ قاسم خان خطی نوشتہ کہ چون از توپ دیوار برج قلعہ رام سیج سابق مسمار شدہ بود بنابران فدوی مقرر کردہ کہ مردم بندہ‌ہای وغیرہ ازان راہ بالا کمندہای انداختہ اندرون قلعہ بروند چنانچہ بتاریخ ۲۷ شعبان ہنگام شب قریب پانصد شش صد کس مردم میواتی بندہای را بہ ارادہ رفتن اندرون قلعہ مستعد نمودہ یورش کردہ آخرش چند کس مردم برادری خنجر خان و بندہ بہ دروازہ قلعہ رسیدہ بہ آواز بلند گفتہ کہ بیداران بیایند بنابران آواز انہا مردم غنیم بیدار شدہ سنگ ہای تفنگ اندازی نمودہ اکثر بندہای بادشاہی بکار آمدہ و زخمی شدند و چیزی تردد پیش نہ رفتہ حالا این کار از دست رفتہ و کسے بندہ بادشاہی گفتہ بندہ قبول نمی کند بے استحاق (بے انتحال؟) در باب بندہ بموجبی کہ حکم شود بہ عمل آرند حکم بہ خان مذکور بنویسند کہ ہمراہیان خودرا نزد شہاب الدین خان گذاشتہ بحضور بیاید —

रूहुल्लाहखानानें अर्ज केला तो असा—'कासिमखानानें पत्र लिहिलें कीं, पूर्वीं तोफांच्या माऱ्यानें रामसेजच्या किल्ल्यांतील बुर्जांची भिंत पाडली होती; म्हणून त्या वाटेनें माझ्या माणसांनीं वर बाण फेकून किल्ल्यांत जावें असें मी ठरविलें व तारीख २७ शाबानला रात्रीच्या वेळीं पांच सहाशें मेवाती व माझे लोक यांना किल्ल्यांत जाण्यासाठीं तयार करून हल्ला केला. शेवटीं खंजरखानाच्या भाऊबंदांपैकीं कांहीं व माझे लोक किल्ल्याच्या दरवाज्यापाशीं पोहोंचून

मोठयानें ओरडले कीं, "बेलदारांनीं यावें". त्या आवाजानें गनिमाचे लोक जागे होऊन त्यांनीं दगड व बंदुकी यांचा मारा केला. बहुतेक सर्व बादशाही लोक कामास आले व जखमी झाले. कांहीं प्रगती झाली नाहीं. सध्या हें काम हातचें गेलें असें बादशाही लोक बोलतात. परंतु मला तें मान्य नाहीं. माझ्याबाबत हुकूम होईल त्याप्रमाणें करीन.' हुकूम झाला कीं, खान मजकुरास लिहावें कीं, बरोबरच्या लोकांना शिहाबुद्दीनाकडे सोडून स्वतः हुजुरास यावें.

२९५

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रमजान ५<br>मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماه رمضان المبارک ۵ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۶ | श. १६०४ भाद्रपद शुद्ध ७<br>इ. १६८२ ऑगस्ट २९ |

نذر ملازمت

راماجی ولد چندرراو بابت سنبها مقہور امید بندگی دو مہر... محمد تقی ولد سادات معزول بخشی فوج قاسم خان آمده ... مہر —

محمد شفیع گرزبردار حسب الحکم بہ مہر روح الله خان بنام بہروز خان برده بود کہ سابق بعرض رسید کہ پرسرام نامی جوگی ظاہر می نماید اگر افواج بادشاہی ہمراه بنده شود برادر فدوی از طرف سنبها مقہور در قلعہ سالہیر است قلعہ را در تصرف بادشاہی بیارم و جوگی مذکور را بحضور بفرستند درین ولا جواب آن خط و جوگی مذکور آورده بہ عرض رسانید حکم شد بہ روح الله خان رجوع شوند —

संभाजीकडील रामाजी वलद चंदरराव चाकरीच्या अपेक्षेनें आला व त्यानें दोन मोहरा नजर केल्या. कासिमखानाच्या फौजेचा बदललेला बक्षी मुहम्मद तकी वलद सादात आला. त्यानें एक मोहर नजर केली.

मुहम्मद शफी गुर्जबर्दारानें रूहुल्लाहखानाच्या शिक्क्याचा हस्बुलहुकूम बहरोझखानाच्या नांवें आणला होता. पूर्वीं अर्ज आला होता कीं, परशुराम जोगी सांगत होता की, 'बादशाही फौजा माझ्याबरोबर दिल्या तर साल्हेरचा किल्ला बादशाही अमलाखालीं आणीन. माझा भाऊ संभाच्या बाजूनें तेथें त्या किल्ल्यांत आहे.' हुकूम झाला कीं, जोगी मजकुरास हुजुरास पाठवावें. नंतर त्या पत्राचें उत्तर व जोगी यास आणलें व तसें कळविलें. हुकूम झाला कीं, त्यास रूहुल्लाहखानाकडे रुजू करावें.

२९६

जु. २६ रमजान ६ बुध. | سیاهه اخبارات دربار معلی ماه رمضان المبارک ۶ سنه یوم الاربعا سنه ۲۶ | श. १६०४ भाद्रपद शुद्ध ८ इ. १६८२ ऑगस्ट ३०

شیخ محمد بخشی واقعه‌نویس قلعه دندان راجپوری را بخشی گری جهازات همراهی سیدی یاقوت خان و سیدی خیریت‌خان مقرر نموده سیصدی بیست سوار —

दंडाराजपुरीच्या किल्लयाचा वाकेनवीस शेख मुहम्मद बक्षी यास जहाजांच्या बक्षीगिरीवर नेमून सीदी याकूतखान व सीदी खैरियतखान यांबरोबर नेमलें. तीनशें स्वार वीस जात अशी मनसब दिली.

२९७

जु. २६ रमजान ७ गुरु. | سیاهه اخبارات دربار معلی ماه رمضان المبارک ۷ سنه یوم الخمس سنه ۲۶ | श. १६०४ भाद्रपद शुद्ध ९ इ. १६८२ ऑगस्ट ३१

یک پهر و سه ۳ گهری روز برآمده غسل خانه فرمودند —

نذر ملازمت

سید نورالله ولد سید شیر خان قلعه‌دار شولاپور امید بندگی از نزد پدر آمده بود —

جگدیوراو از برادران جادون رای همراهی خان جهان بهادر آمده —

बादशाहानें एक प्रहर तीन घटका दिवस निघाल्यावर गुसलखाना फर्माविला. चाकरीबाबत भेट आली. सय्यिद नूरुल्लाह वलद सय्यिद शेरखान सोलापूरचा किल्लेदार हा चाकरीच्या अपेक्षेनें आपल्या बापाजवळून आला. जाधवरायाच्या भाऊबंदांपैकीं खानजहान बहादुराबरोबरचा जगदेवराव आला.

२९८

जु. २६ रमजान ७ गुरु. | سیاهه اخبارات دربار معلی ماه رمضان المبارک ۷ سنه یوم الخمس سنه ۲۶ | श. १६०४ भाद्रपद शुद्ध ९ इ. १६८२ ऑगस्ट ३१

جگدیوراو را حسب التماس خان جهان بهادر خطاب رای سرافراز نموده هزار پانصدی هزار سوار از آنجمله هفصد سوار

دو اسپہ بود پانصدی ذات سیصد سوار براوردی سابق دو اسپہ
اضافہ و خلعت دادہ ہمراہ خان مشارالیہ رخصت فرمودند —

खानजहान बहादुराच्या विनंतीप्रमाणें जगदेवरावास राय पदवी दिली. त्याची जुनी मनसब १५०० जात, १००० स्वार, पैकीं ७०० स्वार दुघोडी होती. पूर्वीप्रमाणें पांचशें जात व तीनशें स्वार दुघोडी एवढी वाढ व खिलअत देऊन उपर्युक्त खानाबरोबर जाण्यासाठीं रजा दिली.

२९९

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रमजान १० रवि | سیاهم اخبارات دربار معلی<br>ماه رمضان المبارک ۱۰ منہ<br>یوم الاحد سنہ ۲۶ | श. १६०४ भाद्रपद शुद्ध १२<br>इ. १६८२ सप्टेंबर ३ |

از واقعہ سنگمنیر بعرض رسید کہ دو صد سوار پانصد پیادہ
مردم غنیم یک کروہ از قصبہ سونیر یک ہزار پانصد مویشی متصرف
شدہ چنانچہ از استماع این خبر ناروجی تہانہدار سوار می کرد
بسبب جمعیت قلیل برگشتہ آمدہ و یک صد درعہ دیوار قلعہ بہ
سبب طغیانی باران مسمار شدہ افتاد ہرچہ امر شود فرمودند
محمد علی خان بہ بیلداران فرستادہ احداث نمایند —

संगमनेरच्या घटनांवरून समजलें तें असें— कसबे सुनेर ( सिन्नर ) पासून एका कोसावर गनिमाचे २०० स्वार व ५०० प्यादे यांनीं १५०० जनावरें ताब्यांत घेतलीं. ही बातमी ऐकून तेथील ठाणेदार नारोजी यानें स्वारी केली. परंतु त्याचे लोक थोडे असल्यामुळें तो परत आला. किल्ल्याची १०० गज भिंत अतिवृष्टीमुळें पडली. हुकूम व्हावा. हुकूम झाला की, 'मुहम्मद अलीखानानें गवंड्यांना पाठवून दुरुस्ती करावी.'

३००

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रमजान ११ सोम. | سیاهم اخبارات دربار معلی<br>ماه رمضان المبارک ۱۱ منہ<br>یوم الاثنا سنہ ۲۶ | श. १६०४ भाद्रपद शुद्ध १३<br>इ. १६८२ सप्टेंबर ४ |

بہ اخلاص خان ولد سعیداللہ خان مرحوم فرمودند کہ براہ
احمدانگر و پیدگانو رفتہ از سنگمنیر براہ نیوسہ بحضور بیایند و
جمعیت تہانہداران ملاحظہ نمودہ ہر جا کہ قلعچہ ہای شکست ریختہ
باشد مرمت کردہ بدہد و آنچہ بند ہاے بادشاہی را لوازمہ

دادن قلعچہ مطلوب باشد از ہمراہی خود بگذارند و از تھانہ۔
داران مذکور مچلکہ بگیرد اگر کسی سوار پیادہ غنیم بجہتہ تحصیل
چوتھای بیاید تنبیہ نماید و الانہ این باز خواست بہ عہدہ شمایان
است و نیز بہ آتش خان داروغہ توپخانہ دکہن حکم شد یک کس
را براے دیدن تصحصہ مردم احشام قلعچہ ہای تعین نماید
بموجب ذیل ہمراہ خان مذکور تعینات فرمودند۔

تابینان لطف الله خان بندوقچی ۴۰ برقنداز ۴۰ احدی
۱۰۰ سوار ۵۰ نفر
۱۵۰ سرب باروت ۱۰۰ بان ۱۰۰ بیلدار

इखलासखान वलद सईदुल्लाहखान मरहूम यास हुकूम झाला कीं, ‘अहमदनगर व पेडगांवच्या वाटेनें जाऊन संगमनेराहून नेवस्या ( नेवाश्या) च्या वाटेनें हुजुरास यावें. ठाणेदारांच्या जमेतीची तपासणी करून ज्या कांहीं छोट्या किल्लयांची पडझड झाली आहे त्यांची दुरुस्ती करावी. छोट्या किल्लयांमध्यें बादशाही चाकरांना आवश्यक त्या गोष्टींचा पुरवठा स्वतः बरोबरच्या सामानांतून करावा. ठाणेदार मजकुरांकडून मुचलका घ्यावा कीं, गनिमाचे प्यादे किंवा स्वार चौथ वसूल करण्यासाठीं आले तर त्यानें त्यांस तंबी द्यावी. नाहीं तर आपल्या हुद्याच्या आशेवरच राहावें.’ दक्षिणच्या तोफखान्याचा दारूगा आतिशखान यास हुकूम झाला कीं, एक मनुष्य छोट्या किल्लयांतील हशमांसाठीं ठेवलेलें हजेरी पुस्तक पाहण्यासाठीं नेमावा. खालीलप्रमाणें लोक खान मजकुराबरोबर नेमलें. लुत्फुल्लाहखानाकडील बंदूकधारी, बरकंदाज, अहदी लोक शिसें दारुगोळा, बाण, बेलदार [ याचा तपशील* ]

३०१

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रमजान ११<br>सोम. | سیاہہ اخبارات دربار معلے<br>ماہ رمضان المبارک ۱۱ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۶ | श. १६०४ भाद्रपद शुद्ध १३<br>इ. १६८२ सप्टेंबर ४ |

از زبانی ہرکارہ ہای بعرض رسید کہ سنبہا مقہور مقرر نمودہ
کبر باغی را از ملک خود براہ دریا یا راہ احمدآباد بملک
راتہوران روانہ نماید بنابران بہ روح الله خان فرمودند کہ حسب۔
الحکم بجماعہ ذیل بنویسند کہ اکبر باغی مذکور بیاید اسیر نمایند
مختار خان ناظم احمداباد کارطلب خان متصدی سورت سید

محمود فواجدار برودہ بہروز خان فوجدار تہالنیر عالم شیرانی
فوجدار نذربار غیاث الدین فوجدار راویر خان زمان ناظم مالوہ—

हरकाऱ्यांकडून तोंडीं समजलें कीं, संभाजीनें अकबरास आपल्या देशांतून समुद्रमार्गें किंवा अहमदाबादेच्या वाटेनें राठोडांच्या देशास पाठवावें असें ठरविलें आहे. तेव्हां रूहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, पुढील लोकांना अकबर येत आहे, त्यास कैद करावें असा हस्बुलहुकूम लिहावा. अहमदाबादेचा नाजिम मुख्तारखान, सुरतेचा मुतसद्दी कारतलबखान, बडोदें, थाळनेर, नंदुरबार व रावेर येथील फौजदार अनुक्रमें सय्यिद महमूद, बहरोझखान, आलम शीरानी व घियासुद्दीन, माळव्याचा नाजिम खान झमान.

## ३०२

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रमजान १३<br>बुध. | سیاهم اخبارات دربار معلی<br>ماہ رمضان المبارک ۱۳ صنم<br>یوم الاربعہ سنہ ۲۶ | श. १६०४ भाद्रपद शुद्ध १५<br>इ. १६८२ सप्टेंबर ६ |

بہ دربارخان فرمودند کہ روح اللہ خان رقعہ بنویسند کہ جمعیت غنیم میخواہد در تہانہ انتور بیاید باید کہ عبدالعزیز خان قلعہدار جونیر و شاہ محمد تہانہدار انکولہ بنویسند کہ وقت کار کومک احمد تہانہدار انتور نماید کوچ رایات عالیات بہ سمت احمدانگر بعد عید رمضان مقرر است—

واجب العرض راوجی زمیدار سنگمنیر بعرض رسید اول آنکہ جمعیت غنیم از تہانہداری نواحی تل کوکن می آید اگر فدوی را تہانہداری مقرر شود بندبست نمایم منظور شد دویم آنکہ فدوی سہ بیستی منصبدار از اصل و اضافہ صد پنجاہی ذات دہ سوار سرافراز شود حکم شد صدی ذات دہ سوار سرافراز باشد سیوم آنکہ ہرچہ از غنیم متاعی بدست آید معاف شود منظور فرمودند چہارم آنکہ ہزار پیادہ بندوقچی سہ بندی مرحمت شود منظور فرمودند—

दरबारखानास हुकूम झाला तो असा—रूहुल्लाहखानास पत्र लिहावें कीं, गनिमाची जमेत अंतूर येथें येऊं इच्छिते. तेव्हां जुन्नरचा किल्लेदार अब्दुलअझीझ व अकोल्याचा ठाणेदार शाह मुहम्मद यांस अंतूरचा ठाणेदार अहमद यास साह्य करण्याविषयीं लिहावें. रमजान ईदनंतर बादशाहाचें अहमदनगराकडे जाण्याचें ठरलें आहे.

संगमनेरचा जमीदार रावजी याचा अर्ज आला तो असा– ( १ ) गनिमाचे लोक तळकोंकणांतून ठाणें दावमी ( दावडी? ) करून येत आहेत. मला ठाणेदारीवर नेमलें तर बंदोबस्त करीन. बादशाहानें तें मजूर केलें. ( २ ) मी तीन विस्ती मनसबदार आहे. १५० जात व १० स्वार एवढी वाढ मान्य करावी. हुकूम झाला कीं, १०० जात व १० स्वार एवढा मानकरी केला आहे. ( ३ ) शत्रूचें सामान माझ्या हातीं लागेल तें माफ व्हावें. तें मंजूर झालें. ( ४ ) १००० बंदूकधारी प्याद्यांच्या शिबंदीची कृपा व्हावी. तें मंजूर केलें.

### ३०३

जु. २६ रमजान १६ शनि.

سیاهه اخبارات دربار معلی
ماه رمضان المبارک ۱۶ سنه
یوم السبت سنه ۲۶

श. १६०४ भाद्रपद वद्य ३
इ. १६८२ सप्टेंबर ९

به عرض رسید قاسم خان از قلعه رامسیج موافق حکم نزدیک لشکر مغل رسید در باب دستک هرچه امر شود حکم شد دستک قلعه بدهند آمده ملازمت نماید —

अर्ज आला कीं, कासिमखान किले रामसेजहून हुकुमाप्रमाणें मोगली लश्कराजवळ पोहोंचला. दस्तकाच्या बाबतींत हुकूम व्हावा. हुकूम झाला कीं, किल्ल्याचा दस्तक द्यावा. त्यानें येऊन भेट घ्यावी.

### ३०४

जु. २६ रमजान १७ रवि.

سیاهه اخبارات دربار معلی
ماه رمضان المبارک ۱۷ سنه
یوم الاحد سنه ۲۶

श. १६०४ भाद्रपद वद्य ४
इ. १६८२ सप्टेंबर १०

از نوشته محمد بدیع ایلچی تهانه‌دار پارسا بعرض رسید که اودیا وغیره سه نفر بتعینات آنجا بمردم سنبها مقهور اتفاق نموده جاسوسی میرسانند حکم شد همراه راجه منوهرداس قلعه‌دار ملهیر تعینات نماید

مشارالیه پانصدی گری‌سنگه صدی سورسنگه صدی

पारसा येथील ठाणेदाराचा वकील मुहम्मद बदीअ याच्या लिहिल्यावरून समजलें कीं, तेथें नेमलेले अवधा वगैरे तीन लोक संभाजीस मिळाले असून हेरगिरी करीत आहेत. हुकूम झाला कीं, त्यांना मुल्हेरचा किल्लेदार राजा मनोहरदास याजकडे नेमावे. मशारजिल्हे ५००, गिरिसिंग १००, सूरसिंग १००.

३०५

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रमजान १९<br>मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ رمضان المبارک ۱۹ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۶ | श. १६०४ भाद्रपद वद्य ६<br>इ. १६८२ सप्टेंबर १२ |

نزر ملازمت

گویندراو تہانہدار بتہار موافق حکم آمدہ دو مہر شفقت اللہ
وغیرہ چہار نفر ۴ مہر —

चाकरीबाबत भेट; हुकुमाप्रमाणें बठारचा ठाणेदार गोविंदराव आला. त्यानें २ मोहरा भेट दिल्या. शफक्कतुल्लाह वगैरे ४ लोकांनीं एकेक मोहर दिली.

३०६

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रमजान २०<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ رمضان المبارک ۲۰ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۶ | श. १६०४ भाद्रपद वद्य ७<br>इ. १६८२ सप्टेंबर १३ |

اضافہ

سید شاہ محمد فوجدار شادی آباد گویندراو تہانہدار بتہار
بموجب نوشتہ رفیع الامین دیوان بنارس بعرض رسید کہ
بت خانہ نندمادہو (بندمادہو) مسمار نمودہ در باب احداث نمودن
مسجد ہرچہ امر شود حکم شد کہ طیار نماید —

वाढ

शादियाबादचा फौजदार सय्यिद शाह मुहम्मद व बठारचा ठाणेदार गोविंदराव

बनारस येथील दिवाण रफीउलअमीन याच्या लिहिल्यावरून समजलें कीं, 'बिंदु महादेवाचें देऊळ पाडून टाकलें. मशिदीच्या उभारण्याबाबत हुकूम व्हावा.' हुकूम झाला कीं, उभारावी.

३०७

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रमजान २०<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ رمضان المبارک ۲۰ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۶ | श. १६०४ भाद्रपद वद्य ७<br>इ. १६८२ सप्टेंबर १३ |

بموجب نوشتہ رضی الدین خان قلعہدار اودگیر بعرض رسید کہ

دیویسہ نام مفسد متصل موضع پونہتی بمفاصلہ بیست کروہ از قلعہ
مذکور قلعچہ خام مستحکم احداث نمودہ نظر بر فساد دارد بعد
مطالعہ بہ روح اللہ خان فرمودند کہ بہ معمورخان بنویسند کہ بہ قلعہ
اودگیر رفتہ مفسدان را تنبیہ نمودہ قلعچہ را مسمار سازد —

روح اللہ خان عرض نمود کہ قلعہدارخان قلعہدار فتح آباد عرف
دہارور سی (شش) ہفت نفر ۳ سہ اناثی (اسامی) عورت از ملک
غنیم دستگیر نمودہ مصحوب چراغ بیگ بحضور راہی است حکم شد
کہ حوالہ اہتمام خان نماید کہ در محبوس نگاہ دارد —

उदगीरचा किल्लेदार रिजाउद्दीनखान याच्या लिहिल्यावरून समजलें कीं, किल्ल्यापासून वीस कोसांवर असलेल्या मौजे पवनहट्टी येथें देवीसा नांवाचा बंडखोर एका कच्च्या किल्ल्याची दुरुस्ती करून बंड करण्याच्या विचारांत आहे. त्यावर रूहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, उदगीरच्या किल्ल्यास जाऊन व बंडखोरास तंबी देऊन छोट्या किल्ल्याचा नाश करण्याविषयीं मामूरखानास लिहावें.

रूहुल्लाहखानानें अर्ज केला कीं, 'फतहाबाद उर्फ धारूर येथील किल्लेदार किलअदारखान यानें गनिमाच्या मुलुखांतून सहा सात पुरुष व तीन बायका यांना पकडून आणून चिरागबेगबरोबर हुजुराकडे पाठविलें आहे.' हुकूम झाला कीं, त्यांना इहतमामखानाच्या हवालीं करावें व कैदेंत ठेवून लक्ष ठेवावें.

३०८

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रमजान २०<br>बुध. | سیاہہ اخبارات دربار معلی<br>ماہ رمضان المبارک ۲۰ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۶ | श. १६०४ भाद्रपद वद्य ७<br>इ. १६८२ सप्टेंबर १३ |

از واقعہ نلدرگ بعرض رسید کہ یک طرف دیوار قلعہ
مسمار شدہ قلندرخان قلعہدار سابق پانصد سوار موجود میداشت
و ہنگام شب شش ۶ مرتبہ پسران خان مشارالیہ قلعہ گشت میکردند
الحال محمد بیگ خان کہ قلعہدار این جا آمدہ ہمگین سیصد ۳ سوار
جمعیت ندارد دو مرتبہ ہم گشت نہ میگردد بہ روح اللہ خان فرمودند
کہ بہ خان مذکور نویسند کہ دیوار قلعہ بہ زودی احداث نمودہ
بہ ہوشیاری خبردار باشد —

नळदुर्ग येथील घटनांवरून समजलें कीं, किल्ल्याची एका बाजूची भिंत पडली आहे. पूर्वीचा किल्लेदार कलंदरखान याजवळ पाचशें स्वारांची

...१२...

जमेत असावयाची व खानाचीं मुलें रात्रीच्या वेळीं सहा वेळा गस्त घालावयाचीं. सध्या मुहम्मदबेगखान हा किल्लेदार म्हणून आला आहे. त्याजवळ तीनशें स्वारांची सुद्धा जमेत नाहीं व दोन वेळेस देखील गस्त होऊं शकत नाहीं. तेव्हां रूहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, खानास किल्ल्याची भिंत लवकर दुरुस्त करून खबरदारीनें राहण्याविषयीं लिहावें.

३०९

जु. २६ रमजान २१ गुरु.

سیاهہ اخبارات دربار معلی
ماہ رمضان المبارک ۲۱ سنہ
یوم الخمس سنہ ۲۶

श. १६०४ भाद्रपद वद्य ८
इ. १६८२ सप्टेंबर १४

عرضداشت سیدی یاقوت خان قلعہ دار دندان راجپوری معرفت بہرہمند خان بعرض رسید کہ معروض داشتہ بود کہ سندہا مقہور براے نگاہداشت جمعیت مردمان جای بجای طلبیدہ نوکر می نماید و آنچہ جمعیت در تہانجات بود نیز پیش خود طلبیدہ است اکبر باغی سابق در تونہہ بود از این جا بر آوردہ در جیتاپور نگاہداشتہ و بہ سبب نا موافق اب ہوای متعلقان باغی بیماری دارند بعد مطالعہ خاموش ماندند —

बहरामंदखानाच्या मार्फतीनें दंडाराजपुरीचा किल्लेदार सीदी याकूतखान याचा अर्ज आला तो असा— नोकरींत ठेवण्यासाठीं ठिकठिकाणच्या लोकांना संभानें बोलाविलें आहे. निरनिराळया ठाण्यामधील लोकांनाही बोलाविलें आहे. अकबर पूर्वी तोनहा (?) येथें होता. तो तेथून निघून जैतापुरास गेला. परंतु तेथील हवा योग्य नसल्यानें अकबराचे संबंधी आजारी झाले आहेत. अर्ज पाहिल्यावर बादशाह गप्प बसला.

३१०

जु. २६ रमजान २२ शुक्र.

سیاهہ اخبارات دربار معلی
ماہ رمضان المبارک ۲۲ سنہ
یوم الجمعہ سنہ ۲۶

श. १६०४ भाद्रपद वद्य ९
इ. १६८२ सप्टेंबर १५

فضایل خان عرض نمودہ کہ تاکو بنجارہ خطی نوشتہ کہ شکوہ فدوی بعرض رسید کہ مفسد است بنابران بہ معمور خان حکم شد کہ تنبیہ نماید فدوی خان زاد است دو پسران قابل منصب اند امیدواریم کہ بحضور طلبیدہ سرافراز فرمایند حکم شدہ محمد جعفر یساول رفتہ انہارا بحضور بیارد —

फजाइल खानानें अर्ज केला तो असा— ताकू बंजाऱ्यानें पत्र लिहिलें आहे कीं, 'मी बंडखोर असून मला तंबी देण्याविषयीं मामूरखानास हुकूम झाला आहे. परंतु मी खानजाद असून माझीं दोन मुलें मनसबीस योग्य आहेत. आशा करतों कीं, त्यांना हुजूर बोलावून त्यांचा सन्मान होईल. हुकूम झाला कीं, मुहम्मद जाफर यसावल यानें जाऊन त्यांना हुजूर आणावें.

३११

| जु. २६ रमजान २२<br>शुक्र. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه رمضان المبارک ۲۲ سنه<br>یوم الجمعه سنه ۲۶ | श. १६०४ भाद्रपद वद्य ९<br>इ. १६८२ सप्टेंबर १५ |
|---|---|---|

شیرانداز و بشیرانداز پسران شجاعت خان خزانه به قلعه ملهیر برده بود رسانیده آمده ملازمت نموده ده اشرفی نذر گزرانیده —

शुजाअतखानाचे मुलगे शेरअंदाज व बशीरअंदाज हे मुल्हेर येथें खजिना घेऊन गेले होते. तो पोहोंचवून ते परत आले व भेटले. दहा अश्रफ्या नजर केल्या.

३१२

| जु. २६ रमजान २३<br>शनि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه رمضان المبارک ۲۳ سنه<br>یوم السبت سنه ۲۶ | श. १६०४ भाद्रपद वद्य १०<br>इ. १६८२ सप्टेंबर १६ |
|---|---|---|

عنایت الله گرزبردار فرمان بنام شاهزاده محمد اعظم شاه و خط روح الله بنام شمس الدین خان برده بود رسانیده عرضداشت شاهزاده جیو و خط شمس الدین خان به روح الله خان آورده بنظر گزرانیده زبانی بعرض رسانید که تا حال شاهزاده جیو بر دریا بهمره استقامت دارند عبور نشده اند پیغام رستم خان برای ملازمت درمیان بود لیکن دختر او فوت شده بنابران معطل شده و جمعیت غنیم به سرحد بادشاهی آمده چند دیهات تاراج نموده درین اثنا شاهزاده جیو جمعیت جهته تنبیه مقهوران تعین نموده آنها گریخته رفتند چهار صد روپیه خدمتانه داده اند معاف فرمودند—

فرمان بنام سهراب خان قلعه‌دار پرینده صادر شد حواله عاقبت محمود خان مذکور نموده که بفرستند مضمون که آنچه مردم خادمان محل شاهزاده محمد اعظم شاه در قلعه به گزرانند درآمدن قلعه

مزاحم نه شوند و نقل فرمان حواله وکیل شاهزاده جیو حکم شده
که بخدمت شاهزاده جیو بفرستند —

इनायतुल्लाह गुर्जबर्दारानें अअजमशाहाच्या नांवाचें फर्मान व शम्सुद्दीनखानाच्या नांवचें रूहुल्लाहाचें पत्र पोहोंचविलें. शाहजाद्याचा अर्ज व रुहुल्लाहखानाच्या नांवचें शम्सुद्दीनखानाचें पत्र आणून बादशाहाच्या नजरे-खालीं घातलें व तोंडीं अर्ज केला कीं, ‘अजून शाहजादा भीमा नदीवर मुक्काम करून आहे; नदी पार केलेली नाहीं. रुस्तुमखानाचा चाकरीबाबत निरोप आला होता. परंतु त्याची मुलगी वारल्यामुळें तें पुढें ढकललें गेलें. शत्रूचे लोकांनीं बादशाही हद्दींत येऊन कांहीं गांवें लुटलीं. तेव्हां शाहजाद्यानें शत्रूला तंबी देण्यासाठीं जमेत नेमली. शत्रूचे लोक पळून गेले. ४०० रुपये खिदमताना दिला आहे.’ तो माफ फर्माविला.

परिंड्याचा किल्लेदार सुहराबखान याच्या नांवें फर्मान सादर झालें. तें त्याकडे पाठविण्यासाठीं खानाचा मुलगा आकिबत महमूद याच्या हवाला केलें. त्याचा आशय असा–अअजमशाहाच्या महालांतील चाकर येथें राहिले आहेत. त्यांना किल्ल्यांत घेण्याबाबत अडथळा करूं नये. फर्मानाची नकल-शाहजाद्याच्या वकीलाच्या हवाला केली व हुकूम झाला कीं, त्याकडे पाठवावी.

### ३१३

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रमजान २३ शनि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه رمضان المبارک ۲۳ سنه<br>یوم السبت سنه ۲۶ | श. १६०४ भाद्रपद वद्य १०<br>इ. १६८२ सप्टेंबर १६ |

بموجب التماس وکیل رنمست خان بعرض رسید که موکل بنده
بموجب حکم از پیدگانو بتاریخ نوزدهم ۱۹ شهر حال روانه حضور
شده چنانچه نزدیک لشکر معلی رسیده حکم شد دستک قلعه بدهند
آمده ملازمت نماید —

रणमस्तखानाच्या वकिलाच्या विनंतीचा अर्ज आला कीं, ‘माझे मालक हुकुमाप्रमाणें चालू महिन्याच्या १९ तारखेस पेडगांवाहून हुजुरास रवाना झाले. ते बादशाही लश्करापाशीं पोहोंचले आहेत.’ हुकूम झाला कीं, त्यास किल्ल्याचा दस्तक द्यावा; त्यानें येऊन भेट घ्यावी.

### ३१४

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रमजान २४ रवि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه رمضان المبارک ۲۴ سنه<br>یوم الاحد سنه ۲۶ | श. १६०४ भाद्रपद वद्य ११<br>इ. १६८२ सप्टेंबर १७ |

جگوجی ولد تاکو بنجاره ۹ مهر　　سردارترین ... مهر
خلعت منصب فرمودند

از التماس سردارترین بعرض رسید که اگر فدوی را تهانه‌داری و راهداری از اسیرتا اورنگ آباد یا دو هزار ۳سه بندی مقرر شود بند بست بواقعی نموده مردم غنیم را از این راه آمدن نه‌هند چنانچه هنگام تعیناتی دکهن آن خدمت بر بنده مقرر شود امیدواریم که سرافراز شود این معنی را مچلکه میدهند حکم شده روح الله خان برادری مشارالیه را بنظر بگزرانند—

जगोजी वलद थाकू बंजारा यास खिलअत व मनसब फर्माविली. सरदारतरीन यानें विनंति केली कीं, 'मला असीरपासून औरंगाबादे-पर्यंतची ठाणेदारी व राहदारी किंवा दोन हजार शिबंदी नेमून दिली तर उत्तम बंदोबस्त ठेवीन. शत्रूच्या लोकांना या वाटेनें येऊं देणार नाहीं. म्हणून दक्षिणच्या नेमणुकीच्या वेळीं मला ही चाकरी द्यावी. आशा करतों कीं, माझा सन्मान होईल. अशा अर्थाचा मुचलका मी देत आहे.' हुकूम झाला कीं, रूहुल्लाहखानानें याच्या भाऊबंदास नजरेखालून घालावें.

## ३१५

जु. २६ रमजान २४ रवि.

سیاهه اخبارات دربار معلی
ماه رمضان المبارک ۲۴ سنه
یوم الاحد سنه ۲۶

श. १६०४ भाद्रपद वद्य ११
इ. १६८२ सप्टेंबर १७

بندگان حضرت حقایق بومپال گاده از خان جهان بهادر پرسیدند که عرض نموده مشارالیه خوب سپاهی است در نوکران سنبها ولد سیوا مشهور عمده بود لایق ضایع کردن نیست امیدواریم که به منصب سرافراز شود جای بکار بادشاهی خواهداند فرمودند که او برضای و رغبت خود مسلمان شده مطالب او را شما بعرض رساند منظور نموده خواهد شده—

बादशाहानें खानजहान बहादुरास बोमपालगाढा याविषयीं विचारिलें. त्यानें अर्ज केला कीं, 'इसम मजकूर उत्तम शिपाई आहे. तो संभा वलद सीवा याच्या चाकरांपैकीं उत्तम चाकर होता. तो वाया घालविण्यासारखा नाहीं. त्याचा सन्मान होईल अशी आशा आहे. बादशाही कामास तो उपयुक्त ठरेल.' हुकूम झाला कीं, तो स्वखुशीनें मुसलमान झाल्यावर त्याच्या मागण्यांबाबत तू अर्ज कर. म्हणजे मंजूर करून तुझी इच्छा पूर्ण करूं.

### ३१६

जु. २६ रमजान २५ सोम.

سیاهم اخبارات دربار معلی
ماه رمضان المبارک ۲۵ منہ
یوم الاثنا سنہ ۲۶

श. १६०४ भाद्रपद वद्य १२
इ. १६८२ सप्टेंबर १८

رنمست خان وغیره موافق حکم از پیدگانو آمده ملازمت نموده—

خان مشارالیہ ... مہر خلعت داده بہ خطاب بہادرخان سرافراز نموده پنج ہزاری سہ ۳ ہزار

داود خان برادرزاده خان مذکور ... مہر خلعت چہار ہزاری ... سوار منصب شده

हुकुमाप्रमाणें रणमस्तखान वगैरे पेडगांवाहून हुजूर आले व नजर दिली.

खानानें... मोहरांची नजरकेली. त्यास खिलअत देऊन बहादुरखान पदवी दिली व पांच हजार जात, तीन हजार स्वार एवढी मनसब दिली.

खानाचा भाऊ दाऊदखान यानें ... मोहरांची नजर केली. त्यास खिलअत व चार हजार जात, तीन हजार स्वार एवढी मनसब दिली.

### ३१७

जु. २६ रमजान २६ मंगळ.

سیاهم اخبارات دربار معلی
ماه رمضان المبارک ۲۶ منہ
یوم الثلث سنہ ۲۶

श. १६०४ भाद्रपद वद्य १३
इ. १६८२ सप्टेंबर १९

سہراب خان قلعہدار پریندہ ہزار پانصد ذات دو صد سوار از انجملہ سیصد (؟) سوار دو اسپہ بود از روے مہربانے پانصد ذات اضافہ نموده عاقبت محمود پسر خان مشارالیہ چہار صدی دو صد سوار دو اسپہ سیصدی ذات بلاشرط بود صدی ذات بلاشرط اضافہ و یک صد سوار شرطی بلاشرط نموده خلعت داده و خلعت جہتہ خان معزالیہ حوالہ کرده نزد پدر رخصت فرمودند—

परिंड्याचा किल्लेदार सुहराबखान हा पंधराशें जात व दोनशें स्वार पैकीं तीनशें (?) दुघोडी असा मनसबदार होता. त्यावर कृपा करून पाचशें जातीची वाढ फर्माविली. खान मजकुराचा मुलगा आक्बित महमूद हा चारशें जात व २०० स्वार दुघोडी पैकीं तीनशें जात विनाशर्त असा मानकरी होता. त्यास शंभर जात विनाशर्त वाढ, शंभर स्वार सशर्त होते ते विनाशर्त केले, खिलअत दिली व खानासाठीं एक खिलअत त्याच्या हवाली करून त्यास आपल्या वडिलाकडे जाण्यास रजा दिली.

## ३१८

जु. २६ रमजान २८ गुरु.

سیاهه اخبارات دربار معلی
ماه رمضان المبارک ۲۸ سنه
یوم الخمس سنه ۲۶

श. १६०४ भाद्रपद वद्य ३० इ. १६८२ सप्टेंबर २१

عرض داشت خان جهان بهادر آمده بنظر گزشت معروض داشته که فدوی بموجب حکم آمده قلعه رام سیج را محاصره کرده از اقبال حضرت فتح نموده در تصرف پادشاهی خواهند آورد —

खानजहान बहादुराचा अर्ज नजरेखालून घातला. 'मी हुकुमाप्रमाणें आलों. रामसेजास वेढा दिला आहे. बादशाही सुदैवानें तो लवकरच जिंकून बादशाही अमलाखालीं आणण्याची आशा करतों.' असा त्याचा आशय होता.

## ३१९

जु. २६ शव्वाल १ शनि.

سیاهه اخبارات دربار معلی
ماه شوال ۱ سنه
یوم السبت سنه ۲۶

श. १६०४ आश्विन शुद्ध ३ इ. १६८२ सप्टेंबर २३

بعرض رسید که رستم دل و پسر جان سپار خان قلعه دار ظفر-آباد و محمد امین گرزبردار هزده لکه روپیه خزانه شانزده زنجیر فیل و یک صندوقچه پر از جواهر بابت پیشکش ابوالحسن والی حیدرآباد آورده هرچه امر شود حکم شده که خزانه را داخل خزانه عامره نموده و فیلان و جواهر او بنظر مقدس بگزرانند —

अर्ज आला कीं, 'रुस्तुमदिल व जफराबादेचा किल्लेदार जानसिपारखान याचा मुलगा व मुहम्मद अमीन गुर्जबर्दार यांनीं हैद्राबादचा मालक अबुलहसन याजकडून पेशकश म्हणून १८ लाख रुपये, १६ हत्ती व एक जडजवाहिरांनीं भरलेली पेटी आणली.' हुकूम झाला कीं, 'रुपये बादशाही खजिन्यांत दाखल करावे. हत्ती व जवाहिर नजरेखालीं घालावें.'

## ३२०

जु. २६ शव्वाल २ रवि.

سیاهه اخبارات دربار معلی
ماه شوال ۲ سنه
یوم الاحد سنه ۲۶

श. १६०४ आश्विन शुद्ध ४ इ. १६८२ सप्टेंबर २४

خادم الله واقعه نویس فوج قلیچ خان مقرر شده خلعت —
شیخ محمد بخشی واقعه نویس دندان راجپوری خلعت و اسپ —

حسب الحکم بہ مہر روح اللہ خان بنام عبدالعزیز خان قلعہ دار جونیر صادر شدہ مضمون آنکہ ابوالخیر پسر خورد را با جمعیت سوار [و] پیادہ بہ ہر قدری کہ تواند نزد احمد تھانہ دار انتور بفرستد حوالہ شاہین بیگ گرزبردار فرمودند —

دیروز قاسم خان عرض نمودہ کہ معتمد خان برائے ملاحظہ نمودن جمعیت تعیناتیان فوج اعظم شاہ رخصت شدہ بہ نوشتہ کہ در باب فدوی حکم شدہ کہ یک لک روپیہ خزانہ ہمراہ خود ببرد چنانچہ دو سہ مقام نمودہ انتظار خزانہ نشستہ ام بہ بہرہ مند خان فرمودند کہ باعث چیست عرض نمودہ کہ دیروز جمعہ بود امروز عید است پیش دستان کچہری دیوان اعلی در دفتر نہ نشستہ فرمودند پیش دستان و محرران را با جمعہ و عید چہ کار است پنج روزہ وضع نمایند و از آیندہ می نشستہ باشند —

खादिमुल्लाह यास कुलीचखानाच्या फौजेचा वाकेनवीस नेमिलें व खिलअत दिली. दंडाराजपुरीचा वाकेनवीस शेख मुहम्मद बक्षी यास खिलअत व घोडा दिला. जुन्नरचा किल्लेदार अब्दुलअझीझखान याच्या नावें रूहुल्लाह-खानाच्या शिक्क्याचा हस्बुलहुकूम सादर झाला. त्याचा विषय असा— आपला धाकटा मुलगा अबुलखैर याजबरोबर स्वार व प्यादे देऊन त्यांस अंतूरचा ठाणेदार अहमद याजकडे पाठवावें. हुकूम झाला कीं, तो शाहीनबेग गुर्जबर्दा-च्या हवाली करावा.

काल कासिमखानानें अर्ज केला तो असा— मुअ्‌तमिदखान अअजम-शाहाच्या फौजेची पहाणी करण्यासाठीं गेला होता. त्यानें लिहिलें आहे कीं, एक लाख रुपयांचा खजिना बरोबर नेण्याचा हुकूम झाल्यावरून दोन तीन मुक्काम करून खजिन्याची वाट पहात बसलों आहे. बहरामंदखानास हुकूम झाला कीं, याचें कारण काय? त्यानें अर्ज केला कीं, ‘ काल शुक्रवार होता व आज ईद आहे. यामुळें कचेरींतील सेवक कचेरींत आले नाहींत. ’ हुकूम झाला कीं, ‘ त्यांना शुक्रवार व ईद यांशीं काय करावयाचें आहे? त्यांचे पांच दिवस कमी करावेत. इथून पुढें त्यांनीं कचेरींत आलें पाहिजे. ’

३२१

| | | |
|---|---|---|
| जु. २६ शव्वाल ३ सोम. | سیاہہ اخبارات دربار معلی<br>ماہ شوال ۳ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۶ | श. १६०४ आश्विन शुद्ध ५<br>इ. १६८२ सप्टेंबर २५ |

بموجب نوشتہ محمد بدیع بلخی تھانہ دار پارسا بعرض رسید

که زمینداران بگلانه خبر دادند که اکبر ابتر از جای که بود حرکت نموده معلوم نیست کجا رفته لیکن ظاهر می شود که روهنکر (روهنکهید کهید) تعلقه غنیم که در آنجا جمعیت جمیع می شود آن طرف عبور نموده حقیقت خان نوکر ابتر بجهته ملاحظه نمودن راه جانب سالهیر رفته است شنیده خاموش ماندند ـ

محمد خلیل ولد داراب خان برا ے تشخیص نمودن منازل احمدانگر رفته بود آمده ملازمت نموده یک اشرفی نزر گزرانیده از اورنگ آباد تا احمدانگر شش ۶ منزل از آن جمله یک منزل پنج کروه مقرر نموده بعرض رسانید حکم شده منزل پنج کروه را دو منزل مقرر نموده هفت منزل شناسند ـ

سید اوغلان عرض نموده که شهاب الدین خان خطی نوشته که بندها ے بادشاهی از هر چهار طرف قلعه رام سیج را محاصره نموده بتاریخ بیست هفتم رمضان یک برج قلعه بتصرف بادشاهی آورده

به مکرم خان فرمودند که بیست نفر گرزبردار در اورنگ آباد بگزارد که رسید غله به فوج خان جهان بهادر رسانیده باشد ـــ

पारसाचा ठाणेदार मुहम्मद बदी बलखी याचा अर्ज आला तो असा– बागलाणच्या जमीनदारांनीं बातमी दिली कीं, ‘ अकबरानें आपल्या जागेवरून हालचाल केली आहे. तो कुठें गेला हें माहीत नाहीं. परंतु असें दिसतें कीं, तो गनिमाच्या रोहिणखेड तालुक्यांत लोक जमत आहेत तिकडे नदी पार करून गेला. अकबराचा नोकर हकीकतखान हा रस्त्याची पाहणी करण्या-साठीं साल्हेरकडे गेला आहे. ’ बादशाह ऐकून गप्प बसला.

मुहम्मद खलील वलद दाराबखान हा मुक्कामांचा तपास करण्यासाठीं अहमदनगराकडे गेला होता. येऊन भेटला. एक अश्रफी नजर करून सांगितलें कीं, औरंगाबादेपासून अहमदनगर सहा मुक्काम आहे. पैकीं एक मुक्काम पांच कोसांचा नेमला आहे. हुकूम झाला कीं, पांच कोसांचे दोन मुक्काम नेमावेत व सात मुक्काम समजावे.

सय्यिद ओघलान यानें अर्ज केला तो असा– शिहाबुद्दीनखानानें लिहिलें आहे कीं, बादशाही लोकांनीं रामसेजच्या किल्ल्यास चारी बाजूंनीं वेढा घालून तारीख २७ रमजानला किल्ल्याचा एक बुरूज बादशाही ताब्यांत आणला.

मुकर्रमखानास हुकूम झाला कीं, २० गुर्जबर्दार औरंगाबादेंत ठेवावे. त्यांनीं खानजहान बहादुराच्या फौजेस अन्नधान्याची रसद पोचवावयाची आहे.

३२२

| | | |
|---|---|---|
| जु. २६ शव्वाल ४<br>मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماہ شوال ۴ صفر<br>یوم الثلاث سنہ ۲۶ | श. १६०४ आश्विन शुद्ध ६<br>इ. १६८२ सप्टेंबर २६ |

راجہ مہاسنگہ بہدوریہ تھانہ دار گلشن آباد اصل دو ہزاری ...
از آن جملہ دو اسپہ ... سوار اضاف ... سوار اودنت سنگہ پسر
راجہ مہاسنگہ اصل چہار صدی ... سوار اضاف ... سوار

بہ روح اللہ خان فرمودند کہ حسب الحکم بہ شہاب الدین خان
بنویسند کہ در گرفتن قلعہ رام سیج خوب تلاش نمودہ در جانفشانی
خود دریغ نہ کردہ حالا آن قلعہ اختیار خان جہان بہادر مقرر شدہ
در تصرف بادشاہی خود آورد باید کہ توپخانہ را نزد خان
جہان بہادر گزاشتہ خود را بمعہ ہمراہیان نزد احمد تھانہ دار انتور
رساند -

پرسوجی چہار بیستی و رانوجی دو بیستی پسران ہری-
پندت ہرکارہ را بموجب پروانگی فضایل خان برطرف فرمودند —

गुलशनाबादेच्या ठाणेदार राजा महासिंग भदोरिया याची मनसब मूळ २०००, वाढ ३०० स्वार. महासिंगाचा मुलगा उदंतसिंग मूळ ३००; वाढ १०० स्वार.

रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा– शिहाबुद्दीनखानास हस्बुलहुकूम लिहावा कीं, ‘ तू रामसेजचा किल्ला घेण्याबाबत खूप कष्ट घेतलेस, स्वतःचा जीव गमावण्यास देखील मागेंपुढें पाहिलें नाहींस. सध्या तो किल्ला खानजहान बहादुराच्या अधिकाराखालीं दिला आहे. तो बादशाही अमलाखालीं आणील. खानजहान बहादुराजवळ तोफखाना सोडून तू स्वतः आपल्या जमेतीसह अंतूरचा ठाणेदार अहमद या जवळ पोंहचावें. ’

फजाइलखानाच्या सूचनेवरून हरि पंडित हरकाऱ्याचीं मुलें परसोजी चारबिस्ती व राणोजी दोबिस्ती यांस बडतर्फ फर्माविलें.

३२३

| | | |
|---|---|---|
| जु. २६ शव्वाल ५<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماہ شوال ۵ صفر<br>یوم الاربعہ سنہ ۲۶ | श. १६०४ आश्विन शद्ध ७<br>इ. १६८२ सप्टेंबर २७ |

بہ بہادرخان پرسیدند کہ شما چیزے خواندہ است عرض نمودہ

کہ مصحف مجید خوانده و قرس تمام می فہم و میگویم فرمودند
کہ چند پسر دارد عرض نموده ۳ سہ خانزاد شنیده خاموش ماندند—

बहादुरखानास हुकूम झाला कीं, तूं कांहीं वाचलें आहेस काय ? त्यानें अर्ज केला कीं, मी कुराण वाचलें आहे व संपूर्ण कुर्स ( ? ) माहिती असून तें उद्धृत करतां येतें. हुकूम झाला कीं, तुला किती मुलें आहेत ? अर्ज केला कीं, तीन मुलें आहेत. ऐकून बादशाह गप्प बसला.

३२४

| | | |
|---|---|---|
| जु. २६ शव्वाल ६<br>गुरु. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه شوال ۶ سنه<br>یوم الخمس سنه ۲۶ | श. १६०४ आश्विन शुद्ध ८<br>इ. १६८२ सप्टेंबर २८ |

بہادر وغیره را انعام داده بدره تل کوکن رخصت فرمودند
خان مشار الیہ خلعت و اسپ با ساز طلا و فیل پنج ہزاری ... سوار
داودخان خلعت و اسپ با سازطلا اصل چہار ہزاری ... سوار
اضاف ... سوار—

بموجب نوشتہ عبدالنبی تھانہ دار بہوگانو بعرض رسید کہ فدوی
جہتہ تنبیہ تاکو مفسد سواری نموده و مفسد مذکور پسر خود در
قلعہ گزاشتہ مقابلہ نموده تا دو پہر جنگ واقعہ شده اکر (اکثر)
مردم جانبین زخمی شدند شام افتاد از اقبال حضرت تنبیہ خواہم
کرد حکم شده کہ بنویسند زود قلعہ را فتح نموده تھانہ مستحکم نمایند—

बहादूर वगैरेंस इनाम देऊन तळकोंकणाच्या खोऱ्याकडे रवाना केलें. खानास खिलअत, सोन्याच्या साजाचा घोडा, हत्ती व पंच हजारी; दाऊदखानास खिलअत व सोन्याच्या साजासह घोडा, मूळ चार हजारी, तीन हजार स्वार; वाढ ५०० स्वार. भोगावचा ठाणेदार अब्दुन्नबी याच्या लिहिल्यावरून समजलें कीं, त्यानें ताकू बंडखोरास तंबी देण्यासाठीं स्वारी केली. तेव्हां बंडखोरानें स्वतःच्या मुलास किल्ल्यांत ठेवून लढाई केली. दोन प्रहरापर्यंत लढाई होऊन दोन्हीकडील बहुतेक लोक जखमी झाले. संध्याकाळ झाली. बादशाही सुदैवानें, बंडखोरांस तंबी देण्याचा त्याचा इरादा आहे. हुकूम झाला कीं, लवकर किल्ला घेऊन तेथें कायमचें ठाणें ठेवण्याबद्दल त्यास लिहावें.

३२५

| | | |
|---|---|---|
| जु. २६ शव्वाल ७<br>शुक्र. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه شوال ۷ سنه<br>یوم الجمعه سنه ۲۶ | श. १६०४ आश्विन शुद्ध ८<br>इ. १६८२ सप्टेंबर २९ |

عرضداشت احمد تهانه‌دار انتور بنظر گذشت معروض داشته بود که سابق جمعیت غنیم که جزوی درین ضلع آمده بود فدوی مقابله نموده شکست داده و الحال ده دوازده هزار سوار و پیاده آمده می خواهند که تاخت نمایند اگر خبر بنده بگیرند بهتر و الا نه تهانه مذکور از دست خواهد رفت و بنده ضائع خواهد شد بعد معروض فرمودند که شهاب‌الدین خان وغیره بندهاے بادشاهی را حکم شده است که کومک مشارالیه نمایند رسیده باشند —

अंतूरच्या ठाणेदाराचा अर्ज नजरेखालून गेला. त्यानें लिहिलें होतें कीं, पूर्वी गनिमाची जमेत ह्या जिल्ह्यांत आली त्या वेळीं मी तिचा पराजय केला. सध्या दहाबारा हजार स्वार व प्यादे येऊन लूटालूट करूं इच्छितात. जर ही माझी बातमी आपणांस मिळाली तर ठीक. नाहीं तर हें ठाणें माझ्या हातून गेलें व माझा नाश झाला असें समजावें. यावर हुकूम झाला कीं, शिहाबुद्दीन वगैरे बादशाही लोकांनीं उपर्युक्ताच्या कुमकेस जाऊन पोहोंचावें.

३२६

| जु. २६ शव्वाल ८ शनि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه شوال ۸ سنه<br>یوم السبت سنه ۲۶ | श. १६०४ आश्विन शुद्ध ९<br>इ. १६८२ सप्टेंबर ३० |
|---|---|---|

عرضداشت خان جهان بهادر بمعرفت وکیل بنظر گذشت معروض داشته بود که فدوی موافق حکم آمده قلعه رام‌سیج را محاصره نموده در عنقریب بتصرف بادشاهی خواهم آورد

به روح‌الله‌خان فرمودند که حسب‌الحکم به کانهوجی بنویسند که شمارا تعینات فوج بهادرخان نموده است بروند و عادل بیگ یساول رفته سزاولی کرده رسانیده بیاید —

پانزده ۱۵ هزار ششصد ۶ و پنجاه سوار را فوج بهادر خان مقرر نموده حاجی یادگار دیوان و واقعه‌نویس فوج کانهوجی را دیوانی فوج خان مذکور فرمودند دوصد پنجاهی ذات —

از عرضداشت شهاب‌الدین خان بعرض رسید که فدوی موافق حکم از قلعه رام‌سیج لوازمه توپخانه نزد خان جهان بهادر گذاشته بتاریخ ۶ شهرحال براے کومک احمد تهانه‌دار انتور روانه شده —

खानजहान बहादुराचा अर्ज वकिलामार्फत आला तो नजरेखालीं घातला.

त्यांत लिहिलें होतें कीं, ‘मी हुकुमाप्रमाणें येऊन रामसेजच्या किल्ल्यास वेढा दिला असून तो लवकरच बादशाही अमलाखालीं आणीन.’

रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा— कान्होजीस हस्बुलहुकूम लिहावा कीं, ‘तुला बहादुरखानाच्या फौजेंत नेमलें आहे तरी तू तिकडे जावेंस’. आदिलबेग यसावल यानें जाऊन सजावली करून त्यास पोहोंचवून परत यावें.

पंधरा हजार साडेसहाशें स्वारांना बहादुरखानाच्या फौजेंत नेमलें. कान्होजीच्या फौजेचा वाकेनवीस व दिवाण हाजी यादगार यास खान मजकुराच्या फौजेचा दिवाण नेमिलें. २५० जात फर्माविली.

शिहाबुद्दीनखानाच्या अर्जदाश्तेवरून समजलें कीं, त्यानें हुकुमाप्रमाणें तोफखाना खानजहान बहादुराजवळ सोडला व चालू महिन्याच्या ६ तारखेस तो अंतूरचा ठाणेदार अहमद याच्या कुमकेसाठीं रवाना झाला.

३२७

| | | |
|---|---|---|
| जु. २६ शव्वाल ८<br>शनि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ شوال ۸ سنہ<br>یوم السبت سنہ ۲۶ | श. १६०४ आश्विन शुद्ध ९<br>इ. १६८२ सप्टेंबर ३० |

از واقعہ ماندلگدہ بعرض رسید کہ دلپت کہنو فوجدار پور و بدہنپور در مجلس خود نشستہ بود شخصے حافظ مصحف مجید میخواند مشارالیہ بہ حافظ ظاہر کردہ کہ بندہ ہنگام خوردسالی کلمہ خواندہ بود و حضرت ظل سبحانی برسجد اند کہ مسلمان شود و حالا آواز غیب می آید کہ مسلمان شود حافظ گفتہ پس کلمہ بخواند موصی الیہ جواب نہ دادہ سراسیمہ شدہ ماندہ بنابران حافظ این معنی را محضر نمودہ بحضور ارسال داشتہ است بہ روح اللہ خان فرمودند کہ حسب الحکم بہ اسد خان بنویسد کہ دلپت را نزد خود طلبیدہ مسلمان نماید اگر مسلمان نہ شود قید نمودہ بحضور بفرستند و خدمت فوجداری تغیر او از تعیناتیان آن جا تجویز نمودہ معروض دارد —

मांदलगडाच्या घटनांवरून समजलें तें असें— पूर (?) व बधनपूरचा फौजदार दलपत खनो आपल्या मजलिसींत बसला असतांना हाफिज नांवाचा मनुष्य कुराण वाचीत होता. उपर्युक्तानें हाफिज यास सांगितलें कीं, ‘लहानपणीं मी कलमा पढत असें व मी मुसलमान व्हावें असें बादशाह सांगत असत.’ आतां मी मुसलमान व्हावें असा गुप्त आवाज येत आहे. हाफिज म्हणाला, ‘तर मग कलमा पढ’. तेव्हां उपर्युक्ताची वृत्ति द्विधा झाली व

त्यानें उत्तर दिलें नाहीं. अशा आशयाचा महजर हाफिजनें हुजुरास पाठविला आहे. त्यावर रूहुल्लाहखानास हुकुम झाला कीं, असदखानास हस्बुलहुकूम लिहावा कीं, त्यानें दलपत यास बोलावून मुसलमान करावें. तो मुसलमान होत नसेल तर कैद करून त्यास हुजुरास पाठवावें व त्याच्या बदलीमुळें तेथील फौजदारीवर तिकडे नेमणूक झालेल्यांतून तजवीज करून अर्ज करावा.

### ३२८

| | | |
|---|---|---|
| जु. २६ शव्वाल ९<br>रवि. | سیاهم اخبارات دربار معلی<br>ماه شوال ۹ سنه<br>یوم الاحد سنه ۲۶ | श. १६०४ आश्विन शुद्ध १०<br>इ. १६८२ आक्टोबर १ |

اضافه جلوس مبارک انعام

گوبندراو تهانه‌دار پتهار بحضور آمده بود رخصت شد اصل پانصدی ۳۰۰ سوار اضافه ۱۰۰ سوار—

जुलूस वर्षाच्या शुभेच्छेबद्दल वाढ व इनाम—

पठारचा ठाणेदार गोविंदराव हुजूर आला होता त्यास परत जाण्यास रजा दिली. मूळ ५०० व ३०० स्वार; वाढ १०० स्वार.

### ३२९

| | | |
|---|---|---|
| जु. २६ शव्वाल १०<br>सोम. | سیاهم اخبارات دربار معلی<br>ماه شوال ۱۰ سنه<br>یوم الاثنا سنه ۲۶ | श. १६०४ आश्विन शुद्ध ११<br>इ. १६८२ आक्टोबर २ |

خسرو بیگ صحبت یساول فرمان به اعظم شاه و حسن علی خان بهادر و قلیچ خان برده بود رسانیده عرضداشت هاے آورده بنظر گذرانیده زبانی بعرض رسانده شاهزاده به منزل تمرنی استقامت دارند قلیچ خان و سرافرازخان با فوج سیزده ۱۳ هزار سوار بجهته تنبیه غنیم لئیم از دریاے بهمره عبور شده و مردم جاسوسان خبر آوردند که دوازده کروه مردم غنیم نمایان هستند شنیده خاموش ماندند—

खुस्रवबेग सोहबत यसावल यानें अअजमशाह, हुसेन अलीखान बहादुर व कुलीचखान यांना फर्मानें पोहोंचवून व त्यांचे अर्ज आणून नजरेखालून घातले व तोंडीं अर्ज केला कीं, शाहजादा टेंभुर्णी मुक्कामीं असून कुलीचखान व सराफ़राजखान यांनीं तेरा हजार स्वारांसह गनिमास तंबी देण्यासाठीं भीमा नदी ओलांडली आहे. ( हेरानी ) बातमी आणली कीं, बारा कोसांवर शत्रू दिसत आहे. ऐकून बादशाह गप्प बसला.

३३०

| | | |
|---|---|---|
| जु. २६ शव्वाल ११ मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلی ماہ شوال ۱۱ سنہ یوم الثلاث سنہ ۲٦ | श. १६०४ आश्विन शुद्ध १२ इ. १६८२ आक्टोबर ३ |

ہندو راو معزول تہانہدار سنر آمدہ ملازمت نمودہ نہ ۹ اشرفی و پنجاہ روپیہ نزر گذرانیدہ خلعت مرحمت نمودہ بعد از ان بہ تعیناتی فوج شاہزادہ معزالدین رخصت فرمودند —

از عرضداشت احمد تہانہدار انتور بعرض رسید کہ جمعیت بر وقت رسیدہ باتفاق یکدگر مقابلہ نمودہ مقہوران را شکست دادہ امیدواریم کہ سرب و باروت وغیرہ لوازمہ توپخانہ مرحمت شود فرمودند مجرای کلی شد و شمشیر جہتہ موسی الیہ حوالہ محمد طفیل گرزبردار نمایند و سرب و غیرہ بفرستند —

بہ سید اوغلان فرمودند کہ حسب الحکم بہ شہاب الدین خان بنویسد کہ شمارا از رفتن کومک احمد تہانہدار انتور موقوف داشتہ باید کہ بہ احمدنگر برود —

सिन्नरहून बदलेला ठाणेदार हिंदूराव यानें ९ अश्रफी व ५० रु. भेट दिली. त्यास खिलअत देऊन व मुइज्झुद्दीनाच्या फौजेंत चाकरीवर नेमणूक करून रजा दिली.

अंतूरचा ठाणेदार अहमद याची अर्जदाश्त अशी कीं ' गनिमाचे लोक ह्या जिल्ह्यात आले होते. परंतु अब्दुलअझीझखानाचा मुलगा अब्दुल खैरखान वेळेवर आपल्या लोकांसह येऊन पोहोंचल्यामुळें आम्ही दोघांनीं मिळून शत्रूचा पराजय केला. शिसें, दारू व तोफखान्यास लागणाऱ्या गोष्टी पाठविण्याची मेहरबानी होईल अशी आशा करतों. हुकूम झाला कीं, हें मान्य आहे. उपर्युक्तासाठीं एक तलवार व शिसें वगैरे मुहम्मद गुर्जबर्दाराबरोबर देऊन पाठवावें.

सय्यिद ओघलानास हुकूम झाला कीं, शिहाबुद्दीनखानास हस्बुलहुकूम लिहावा कीं, तुला अंतूरचा ठाणेदार अहमद याच्या कुमकेस पाठविण्याचें रद्द केलें आहे. तू अहमदनगरास जावेंस.

३३१

| | | |
|---|---|---|
| जु. २६ शव्वाल १२ बुध. | سیاهہ اخبارات دربار معلی ماہ شوال ۲۱ سنہ یوم الاربعہ سنہ ۲٦ | श. १६०४ आश्विन शुद्ध १३ इ. १६८२ आक्टोबर ४ |

محمد خلیل ولد ابراهیم خان موافق حکم از قلعه رام سیج آمده
حکم شده که طیار شود نزد پدر به کشمیر رخصت نموده خواهد شد ـ

به روح الله خان فرمودند که به سیف الله بنویسد که از جمله
خزانه از همراهی خود ده هزار اشرفی به مردم تعیناتیان نقدی
فوج بهادرخان بغایت ماه مهر تنخواه داده خان مذکوررا بمعه فوج
به زودی بسزاولی کرده روانه تل کوکن نماید

بموجب انتخاب خط عبدالنبی تهانه دار انکوله به عرض رسید
اول آنکه فدوی موافق حکم تاکهوجی بنجاره را پیغام نموده که
قلعه را خالی کرده بدهد چنانچه درین باب حیله می نماید و نظر
بر فساد دارد حکم شده که برقندازان را بمعه دو ضرب توپ تعین
نمایند ـ

دویم از نوشته گماشته جیسنگه ولد راجروپ ظاهر شد که ده هزار
سوار جمعیت سنبها مقهور از دریاے بهیمره عبور شده بدامن کوه
آمده ازین ممر خاطر متفکر است شنیده خاموش ماندند ـ

हुकुमाप्रमाणें मुहम्मद खलील वलद इब्राहीमखान हा रामसेजच्या किल्ल्याहून आला. हुकूम झाला कीं, त्यानें तयार असावें. त्याला त्याच्या वडिलाजवळ काश्मीरला पाठवूं इच्छितों.

रूहुल्लाहखानास हुकुम झाला तो असा— सैफुल्लाह यास लिहावें कीं, तुझ्या जवळच्या एकूण खजिन्यापैकीं १० हजार अश्रफ्या बहादुरखानाच्या फौजेंतील नकदीच्या लोकांस मिहर महिन्याचा पगार म्हणून देऊन व खान मजकुरास फौजेसह सजावली करून लवकर तळकोंकणांत पाठवावें.

अकोल्याचा ठाणेदार अब्दुन्नबी यानें अर्ज पाठविला. तो असा— (१) मी हुकुमाप्रमाणें ताखूजी बंजाऱ्यास निरोप पाठविला कीं, किल्ला खाली करून द्यावा. परंतु याबाबत तो बहाणा करीत असून बंड करण्याकडे त्याचें लक्ष आहे. हुकूम झाला कीं, दोन तोफांसह बर्कंदाजांना नेमावें. (२) जयसिंग वलद राजरूप याच्या गुमास्त्याच्या लिहिल्यावरून समजलें कीं, संभाच्या दहा हजार स्वारांनीं भीमा नदी ओलांडली असून ते डोंगरांत आले आहेत. ह्या बातमीमुळें तो काळजींत आहे. ऐकून बादशाह गप्प बसला.

## ३३२

| | | |
|---|---|---|
| जु. २६ शव्वाल १३ | سیاهه اخبارات دربار معلی | श. १६०४ आश्विन शुद्ध १४ |
| गुरु. | ماه شوال ۱۳ صفر | इ. १६८२ आक्टोबर ५ |
| | یوم الخمیس سنه ۲۶ | |

ملازمت

بهادرجی برادر هندوراو خلعت داده به تعیناتی فوج شاهزاده معزالدین رخصت فرمودند گوپال سنگه ولد انندچند منوهرپوری بامید بندگی......صدی ذات نو سرفراز شد۔

به عرض رسید که جمعیت غنیم لئیم جانب بگلانه آمده است به روح الله خان فرمودند که حسب الحکم به معمور خان بنویسد که معه فوج همراهی خود براے تنبیه مقهوران به بگلانه برود حکم شد جمیل بیگ جماعت ذیل‌را از تعیناتی تهانه جونیر سزاولی کرده نزد شهاب الدین‌خان رسانیده بیاید۔

ناگوجی هفصدی ۶۰۰ سوار رانوجی پانصدی ۴۰۰ سوار عبدالقادر پانصدی ۱۰۰ سوار جانوجی چهارصدی ۴۰۰ سوار۔ راجه هردیو فوجدار جامودهرا طلب حضور فرمودند۔

चाकरी.

हिंदूरावाचा भाऊ बहादुरजी यास खिलअत देऊन मुइझ्झुद्दीनाच्या फौजेंत नेमून रवाना केलें. गोपालसिंग वलद आनंदचंद मनोहरपुरी चाकरीच्या आशेनें आला. ९ रुपये नजर केले. १०० जात असा नवा मानकरी केला.

अर्ज आला कीं, गनिमाची जमेत बागलाणांत आली आहे. रूहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, मामूरखानास हस्बुलहुकूम लिहावा कीं, शत्रूस तंबी देण्यासाठीं त्यानें स्वतः फौजेसह बागलाणास जावें. जमीलबेगानें खालील लोकांना जुन्नर येथून सजावली करून शिहाबुद्दीनखानाकडे पोहोंचवून यावें.

नागोजी सप्तशती ६०० स्वार; राणोजी पंचशती ४०० स्वार; अब्दुल-कादिर पंचशती १०० स्वार; जानोजी चारशती ४०० स्वार. जामोद्याचा फौजदार राजाहरदेव यास हुजुरास येण्याचा हुकूम झाला.

३३३

| जु. २६ शव्वाल १५ शनि. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه شوال ۱۵ سنه<br>یوم السبت سنه ۲۶ | श. १६०४ आश्विन वद्य १<br>इ. १६८२ आक्टोबर ७ |
|---|---|---|

به روح الله خان فرمودند که حسب الحکم به شهاب الدین خان بنویسد که خودرا زود در تهانه آله بنده نواحی جونیر رسانده استقامت بگیرد که

از آن طرف غنیم آمدن نتواند ـ

به راجه هردیو تهانه‌دار جامودہ طلب حضور شدہ بود داخل فوج قاسم خان فرمودند ـ

شاہ‌عالم جیو عرض نمود که راجه درگ‌سنگه بندیله قلعه‌دار دهرپ‌گدہ قیام دارد مشارالیه جوان شایسته و مصالح حضور است امیدوارم که قلعه‌داری بکسی دیگر بندہ مقرر نمودہ اورا طلب حضور فرمایند بنابران خدمت مذکور به نیک‌نام‌خان تعیناتی فوج محمد بدیع بلخی مقرر نمودہ هفصدی ذات چهار صد شصت سوار بود صدی ذات دو صد چهل سوار اضافه فرمودند و راجه درگ‌سنگه هزاری ذات هزار سوار منجمله هشت صد سوار دو اسپه و بیست لک دام انعام سرافرازی داشت طلب حضور فرمودند ـ

रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा—शिहाबुद्दीनखानास हस्बुल-हुकूम लिहावा कीं, जुन्नरजवळ असलेलें ठाणें आलाबंदा येथें पोहोंचून तेथेंच रहावें व तिकडून शत्रूस येऊं देऊं नये.

राजा हरदेव यास हुजुरास बोलाविलें होतें. त्यास कासिमखानाच्या फौजेंत जावें असा हुकूम झाला.

शाहआलम यानें अर्ज केला तो असा:—घोडपचा किल्लेदार राजा दुर्गासिंग बुंदेला उत्तम मनुष्य असून हुजुराच्या उपयोगाचा आहे. आशा करतों कीं, किल्लेदारीवर त्याच्या ऐवजीं दुसऱ्या माणसास नेमून त्यास हुजुरास बोलवावें. यावर मुहम्मदबदीअ बल्खी याच्या फौजेंतील नेकनामखान यास नेमून, ७०० जात, ४६० स्वार होता त्याल १०० जात, २४० स्वार एवढी वाढ फर्माविली. राजा दुर्गासिंग १००० जात, १००० स्वार, पैकीं ८०० स्वार दुघोडी असा मनसबदार होता. त्यास २० लाख दाम इनाम देऊन हुजुरास येण्याचा हुकूम झाला.

## ३३४

| जु. २६ शव्वाल १६ रवि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماہ شوال ١٦ سنه<br>یوم الاحد سنه ٢٦ | श. १६०४ आश्विन वद्य २<br>इ. १६८२ आक्टोबर ८ |
|---|---|---|

عسکرخان را قلعه‌داری انتورگدہ از تغیر سید زین العابدین مقرر نمودہ خلعت و خطاب اصغرخان سرافراز نمودہ رخصت فرمودند اصل هفصدی ١٠٠ سوار اضافه صدی ٢٠٠ سوار ـ

सय्यिद जैनुलआबिदीन याच्या बदलीमुळें अंतूरच्या किल्लेदारीवर अस्घरखानास नेमलें आणि त्यास खिलअत व अस्घरखान ही पदवी देऊन रवाना केलें. मूळ ७०० स्वार; वाढ १०० स्वार.

३३५

| | | |
|---|---|---|
| जु. २६ शव्वाल १७ सोम. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه شوال ۱۷ سنه<br>یوم الاثنا سنه ۲۶ | श. १६०४ आश्विन वद्य ३<br>इ. १६८२ आक्टोबर ९ |

از واقعه فوج اعظم شاه بعرض رسید که قلیچ‌خان از دریای بهمره کوچ نموده هفت کروه طی کرده به ایلاپور دیره نموده کوچ بکوچ پیشتر می رود —

به عرض رسید که شاه محمد و غیره در جنگ مردم غنیم همراه احمدخان تهانه‌دار انتور کوتاهی می نمایند بنابران کم فرمودند —

از التماس شیخ ابراهیم بابت سنبها مقهور که هزاری دو صد سوار سرافراز شده بعرض رسید اگر پنج هزار سوار و پیاده همراه فدوی تعین شوند بندوبست پونادهر به واقعی نموده دره‌های مسدود کرده مردم غنیم را آمدن ندهند تنبیه رسانم چیزی جواب نشد —

अअजमशाहाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें कीं, कुलीचखानानें भीमा नदीवरून कूच केलें व ७ कोस जाऊन एलापूर येथें डेरे दिले. कूच दर कूच तो पुढें जात आहे.

अर्ज आला कीं, अंतूरचा ठाणेदार अहमदखान याजबरोबर असलेले शाह मुहम्मद वगैरे शत्रूशीं झालेल्या लढाईंत चुकारपणा करीत आहेत. म्हणून त्यांस कमी केलें.

१२०० स्वारांचा मानकरी शेख इब्राहीम याच्या विनंतीवरून संभाच्या बाबतींत अर्ज आला कीं, 'माझ्याबरोबर ५००० स्वार व प्यादे नेमले तर पुनाधरचा (पुरंदरचा) उत्तम बंदोबस्त करून सर्व खोरें बंद करीन व शत्रूच्या लोकांना इकडे येऊं देणार नाहीं आणि त्यांना तंबी देईन'. यावर बादशाहानें उत्तर दिलें नाहीं.

३३६

| जु. २६ शव्वाल १८ मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ شوال ۱۸ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲٦ | श. १६०४ आश्विन वद्य ४<br>इ. १६८२ आक्टोबर १० |
|---|---|---|

شہاب الدین ولد نیکنام خان قلعہ دار ارکب دھرپ گڈہ مقرر شدہ خلعت اصل سیصدی ۳۰۰ سوار اضافہ صدی ۱۰۰ سوار ـ

शिहाबुद्दीन वलद नेकनामखान यास धोडपगड अरकचा किल्लेदार नेमलें व खिलअत दिली. मूळ ३००; वाढ १००.

३३७

| जु. २६ शव्वाल १९ बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ شوال ۱۹ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲٦ | श. १६०४ आश्विन वद्य ५<br>इ. १६८२ आक्टोबर ११ |
|---|---|---|

علی چودھری تل کوکن آمدہ یک مہر ۹ روپیہ خلعت دادند ـ

علی و غیرہ امیدوار نواحی تل کوکن را بتجویز احمد خان تھانہ دار انتور اضافہ فرمودند مشارالیہ ولد داود اصل صد پنجاهی ۵۰ سوار اضافہ پنجاهی ۲۰ سوار حسن برادرش اصل صد پنجاهی ۵۰ سوار اضافہ پنجاهی ۱۰ سوار ـ

از التماس علی چودھری تل کوکن بعرض رسید کہ اگر یک سردار همراہ بندہ معہ جمعیت ہزار سوار و دو ہزار پیادہ مقرر شود براہ سورت تا راہ تل کوکن جای کہ آبادی سنبہا مقہور است بہ برہم بنابران بہ سید عبد اللہ فرمودند کہ سرانجام نمودہ طیار شود با جمعیت مذکور رخصت خواهم فرمود ـ

चाकरी

तळकोंकणचा अली चौधरी आला. १ मोहर, ९ रुपये नजर दिली. त्यास खिलअत दिली.

अंतूरचा ठाणेदार अहमदखान याच्या तजविजीप्रमाणें तळकोंकणच्या आसमंतांतील अली वगैरे जमीदारांना वाढ फर्माविली. अली वलद दाऊद= मूळ दीडशती, ५० स्वार अर्धशती, २० स्वार वाढ; त्याचा भाऊ हसन= मूळ दीडशती, ५० स्वार; अर्धशती, १० स्वार वाढ.

तळकोंकणचा अली चौधरी याचा अर्ज आला तो असाः—एक सरदार, एक हजार स्वार व दोन हजार प्यादे यांसह माझ्याबरोबर नेमला तर सुरतेच्या

वाटेपासून ते तळकोंकणाच्या वाटेपर्यंतचा संभाजीचा राबता आहे तो भाग लुटीन. तेव्हां सय्यिद अब्दुल्लाह यास हुकूम झाला कीं, व्यवस्था लावून तयार असावें. उपर्युक्त लोकांबरोबर पाठविणार आहे.

## ३३८

जु. २६ शव्वाल २० गुरु.

سیاهه اخبارات دربار معلے
ماه شوال ۲۰ سنه
یوم الخمس سنه ۲۶

श. १६०४ आश्विन वद्य ६
इ. १६८२ आक्टोबर १२

حاجی سهراب عبد الرزاق جمله های را خلعت داده رخصت نموده که بسورت رفته سرانجام ذخیره و غیره کرده بندهای بادشاهی را سزاولی کرده بر جهازات نشانده جهته تنبیه غنیم روانه سازند حکم شد پنجاه اسپ کومکی تعینات فوج مکرم خان نمایند ـ

हाजी सुहराब अब्दुर्रझाक वगैरे सर्वांना खिलअत देऊन रजा दिली. त्यांनीं सुरतेस जाऊन दारूगोळ्याची व्यवस्था करून बादशाही लोकांची सजावली करावी; त्यांना जहाजांत बसवून गनिमास तंबी देण्यासाठीं रवाना करावें; ५० कुमकी घोडे मुकर्रमखानाच्या फौजेंत नेमावे असे हुकूम झाले.

## ३३९

जु. २६ शव्वाल २२ शनि.

سیاهه اخبارات دربار معلے
ماه شوال ۲۲ سنه
یوم السبت سنه ۲۶

श. १६०४ आश्विन वद्य ८
इ. १६८२ आक्टोबर १४

از واقعه گلشن آباد بعرض رسید که جمعیت غنیم لئیم در نواحی آمده چند دیهات این جارا [*آ]تش داده تاخت تاراج کرده بردند محمد بیگ خان قلعه دار نلدرگ حسب التماس روح الله خان هزاری هشت ۸ صد سوار دو اسپه بود یک صد سوار اضافه فرمودند حکم شده که جماعت دیگر را همراه سیدعبد الله تعینات نمایند آوجی پندت هزاری ۳۰۰ سوار شیخ ابراهیم هزاری ۲۰۰ سوار راماجی هفصدی ۴۰۰ سوار ـ

गुलशनाबादेच्या घटनांवरून समजतें कीं, गनिमाचे लोक इकडे आले आहेत व त्यांनीं येथील कांहीं गांवांना आग लावून तीं लुटून नेलीं. नळदुर्गचा किल्लेदार मुहम्मदबेगखान यास १००० स्वार, पैकीं ८०० दुघोडी अशी मनसब होती. तींत रूहुल्लाहखानाच्या विनंत्यनुसार १००० स्वारांची वाढ

फर्माविली. हुकूम झाला कीं, सय्यिद अब्दुल्लाहबरोबर दुसरे लोक नेमावेत.

आवजी पंडीत सहस्त्री, ३०० स्वार; शेख इब्राहीम सहस्त्री, २०० स्वार; रामजी सातशती ४०० स्वार.

## ३४०

| | | |
|---|---|---|
| जु. २६ शव्वाल २४ सोम. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه شوال ۲۴ سنه<br>یوم الاثنا سنه ۲٦ | श. १६०४ आश्विन वद्य ११<br>इ. १६८२ आक्टोबर १६ |

دیروز چهار گهری شب گذشته بود وکیل رستم خان عرف شرزه خان بیجاپوری را طلبیده از روی عنایت چهار دانه مروارید مرحمت فرمودند خسرو بیگ صحبت یساول فرمان بشاهزاده اعظم شاه و قلیچ خان برده بود فرامین به راجه منوهرداس گور قلعه دار ملهیر و به راجه مهاسنگه تهانه دار گلشن آباد و شاه محمد تهانه دار اکوله صادر شده که از بندوبست تعلقه خودها خبردار باشند ـ

काल चार घटका रात्र उलटल्यावर रुस्तुमखान उर्फ शर्जाखान विजापुरी याच्या वकिलास बोलाविलें. बादशाहानें मेहरबानी करून त्यास चार पोवळीं दिलीं. खुस्रवबेग सुहबत यसावलानें अअजमशाह व कुलीचखान यांच्या नावें फर्मानें नेलीं होतीं. मुल्हेरचा किल्लेदार राजा मनोहरदास गौंड, गुलशनाबादेचा ठाणेदार राजा महासिंग व अकोल्याचा ठाणेदार शाह मुहम्मद यांसाठीं फर्मानें सादर झालीं कीं, त्यांनीं आपल्या प्रदेशाच्या बंदोबस्ताबद्दल सावध असावें.

## ३४१

| | | |
|---|---|---|
| जु. २६ शव्वाल २५ मंगळ. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه شوال ۲۵ سنه<br>یوم الثلث سنه ۲٦ | श. १६०४ आश्विन वद्य १२<br>इ. १६८२ आक्टोबर १७ |

پنج گهری روز برآمده بندگان حضرت جهته شکار جانب کوه ستاره سوار شدند در راه یک آهو از چیته شکار نموده ـ

पांच घटका दिवस निघाल्यावर बादशाह शिकारीसाठीं साताऱ्याच्या डोंगराकडे स्वार झाले. वाटेंत एका चित्त्याकडून हरणाची शिकार करविली.

## ३४२

जु. २६ शव्वाल २६ बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ شوال ۲٦ سنہ یوم الاربعہ سنہ ۲٦ | श. १६०४ आश्विन वद्य १३ इ. १६८२ आक्टोबर १८

بہ محمد علی خان فرمودند کہ پانصد بان و یک صد من سرب و پنجاہ من باروت تعینات فوج شہاب الدین خان نمایند و سوای این هنگام تردد قلعہ رام سیج چہ قدر سرب باروت و غیرہ لوازمہ همراہ خان مذکور تعینات نمودہ بودند تحقیق نمودہ بعرض رساند —

جماعتہ ذیل‌را فوج مقرر نمودہ کہ در تھانہ ماندہ خبردار باشند تیرانداز ولد شجاعت خان مرحوم در تھانہ لاسور پانصد سوار جمعیت شاہ عالم در چیکل‌تھانہ محمد عادل ولد شریف خان بمعہ پانصد سوار در تھانہ پھول مری —

मुहम्मद अलीखानास हुकूम झाला कीं, ५०० बाण, १०० मण शिसें, ५० मण दारू शिहाबुद्दीनखानाच्या फौजेस द्यावी. ह्याशिवाय रामसेजचा किल्ला घेण्याच्या वेळीं आणखी किती दारूगोळा वगैरे उपर्युक्त खानास दिला होता त्याची चौकशी करून अर्ज करावा.

खालील लोकांना फौजेंत नेमलें. त्यांनीं ठाण्यांत राहून खबरदार असावें. लासुरांत तीरंदाज वलद मरहूम शुजाअतखान; चिखलठाण्यांत शाहआलमची पाचशे स्वारांची जमेत; फुलमरींत मुहम्मद आदिल वलद शरीफखान पांचशे लोकांसह.

## ३४३

जु. २६ शव्वाल २६ बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ شوال ۲٦ سنہ یوم الاربعہ سنہ ۲٦ | श. १६०४ आश्विन वद्य १३ इ. १६८२ आक्टोबर १८

از واقعہ فوج محمود خان بعرض رسیدہ کہ مظفر برادرزادہ دلیر خان با جمعیت پانصد سوار خان مذکور تعینات این جا است بیماری دارد بہ روح اللہ خان فرمودند بوکیل خان مذکور {خان مذکور} بگوید کہ مظفررا برای معالجہ طلب حضور می نمایند باید کہ فتح معمور پسر خودرا سردار جمعیت مقرر نمودہ نزد مکرم خان بفرستند و خطاب خانی زعایت خواهم فرمود —

بموجب نوشتہ الله یارخان قلعہ دار کنچنہ منچنہ بعرض رسید کہ جمعیت سنبہا مقہور بہ قلعہ کہیدہ براے محاصرہ نمودن قلعہ آمدہ بود چون این خبر فدوی شنیدہ جمعیت فرستادہ آخرش ہفت نفر زندہ دستگیر نمودہ ارسال داشتہ امیدوار اضافہ ایم حکم شدہ آنہارا حوالہ اہتمام خان نمایند۔

मामूरखानाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें तें असें:—दिलेरखानाच्या भावाचा मुलगा मुजफ्फर हा ५०० स्वारांसह उपर्युक्त खानाकडे नेमला होता; तो आजारी पडला. रूहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, उपर्युक्त खानाच्या वकिलास कळवावें कीं, मुजफ्फर यास उपचारांसाठीं हुजूर पाठवून द्यावें व स्वत:चा मुलगा फतह मामूर यास जमेतीचा सरदार नेमून मुकर्रमखानाजवळ पाठवावें. त्यावर खानाच्या पदवीची बादशाहानें कृपा केली.

कंचनामंचना येथील किल्लेदार अल्लाहयारखान यानें लिहिलें कीं, संभाचे लोक किल्ले खेडा (खंडा?) यास वेढा घालण्यासाठीं आले होते. ही बातमी ऐकल्यावर मी लोक पाठविले. शत्रूचे दहा लोक जिवंत पकडून आणून पाठविले आहेत. आशा करतों कीं, वाढ व्हावी? हुकूम झाला कीं, त्यांना इहतमामखानाच्या हवाला करावें.

## ३४४

| जु. २६ शव्वाल २७ गुरु. | سیاہہ اخبارات دربار معلے<br>ماہ شوال ۲۷ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۶ | श. १६०४ आश्विन वद्य १४<br>इ. १६८२ आक्टोबर १९ |
|---|---|---|

فرمان و حسب الحکم بہ مہر روح الله خان بہ خان جہان بہادر صادر نمودہ حوالہ غلام محی الدین گرزبردار نمودہ مضمون آنکہ بر قلعہ رامسیج جزوی جمعیت گذاشتہ خود بدرہ گہات تل کوکن نشستہ بہادرخان را بمعہ فوج سزاولی کردہ در آمد درہ مذکور نماید۔

آتش خان عرض نمودہ کہ جگوجی ولد تہاکو بنجارہ فسادی دو صدی پانصد سوار نوسرافراز شدہ بود گریختہ نزد پدر رفتہ حکم شدہ بر طرف شناسند۔

रूहुल्लाहखानाच्या शिक्क्यासह फर्मान व हस्बुलहुकूम खानजहान बहादुरासाठीं काढले ते गुलाम मुहियुद्दीन गुर्जबर्दाराच्या हवाला केले. त्यांत विषय होता कीं, रामसेजच्या किल्लयावर थोडे लोक ठेवून त्यानें स्वत:

तळकोकणच्या खोऱ्यांतील घाटांवर थांबून बहादुरखानास फौजेसह सजावली करून उपयुक्त खोऱ्याच्या वाटेस पोचवावें.

आतिशखानानें अर्ज केला कीं, बंडखोर जगोजी वलद थाकू बंजारा हा २००, ५०० स्वार असा नवीन मानकरी झाला होता. तो पळून आपल्या बापापाशीं गेला. हुकूम झाला कीं, त्याला बडतर्फ केलें आहे असें समजावें.

३४५

| | | |
|---|---|---|
| जु. २६ शव्वाल २७ गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ شوال ۲۷ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲٦ | श. १६०४ आश्विन वद्य १४<br>इ. १६८२ आक्टोबर १९ |

حسب الحکم بہ مہر روح اللہخان بنام سیف اللہ کہ جہتہ سزاولی بہادر خان رفتہ است صادر شدہ بمضمون آنکہ خان جہان بہادررا سزاولی کردہ از قلعہ رامسیج برگھات درہ تل کوکن ببرد و بہادر خان را بدرہ تل کوکن رساند ـ

از واقعہ چاکنہ بعرض رسید کہ جانبازخان قلعہ دار این جا بیمار است و جمعیت غنیم لئیم در نواحی آمدہ است بنابران مردمان خان مذکور دو دلہ شدہ اند می خواهد کہ از خان مذکور جدا نہ شوند هرچہ امر شود بہ روح اللہ خان فرمودند کہ بہ شهاب الدین خان بنویسند کہ خود را زود بہ قلعہ مذکور رساند ـ

बहादुरखानाच्या सजावलीसाठीं गेलेल्या सैफुल्लाह याच्या नांवें रूहुल्लाहखानाच्या शिक्क्यासह हस्बुलहुकूम सादर झाला. त्यांत विषय होता कीं, खानजहान बहादुरास किल्ले रामसेजहून सजावली करून तळकोंकणच्या खोऱ्यांतील घाटावर आणावें व बहादुरखानास तळकोंकणाच्या खोऱ्यांत पोहोंचवावें.

चाकणच्या घटनांवरून समजलें तें असें:—तेथील किल्लेदार जांबाझखान आजारी असून गनिमाचे लोक भोंवतालच्या प्रदेशांत आले आहेत. म्हणून खानाचे लोक द्विधा मनःस्थितीचे झाले असून ते उपर्युक्त खानापासून दूर जाण्यास तयार नाहींत. तरी हुकूम व्हावा. रूहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, शिहाबुद्दीनखानास लिहावें कीं, त्या किल्ल्यास लवकर पोहोचावें.

३४६

| जु. २६ शव्वाल २८ शुक्र. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ شوال ۲۸ سنہ یوم الجمعہ سنہ ۲۶ | श. १६०४ आश्विन वद्य ३० इ. १६८२ आक्टोबर २० |
|---|---|---|

چون هنگام شام آواز توپہای می شدند فرمودند یک چیلہ باریدار (؟) رفتہ بہ صلابت خان بہ پرسد کہ این آواز توپخانہ بادشاهی می شوند چنانچہ پرسیدہ آمدہ عرض نمود کہ مردمان شاہ عالم جیو و دلیرخان و غیرہ بابت شب دوالی می کنند شنیدہ خاموش ماندند ـ

संध्याकाळच्या वेळीं तोफांचा आवाज येत होता. तेव्हां हुकूम झाला तो असा:—एका गुलामास पाठवून सलाबतखानास विचारावें कीं, हा आवाज बादशाही तोपखान्याचा वाटतो काय ? त्यावर त्यानें विचारून येऊन अर्ज केला कीं, शाह आलमचे व दिलेरखान वगैरेंचे लोक दिवाळीच्या रात्रीनिमित्त आवाज करीत आहेत. ऐकून बादशाह गप्प बसला.

३४७

| जु. २६ शव्वाल २९ शनि. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ شوال ۲۹ سنہ یوم السبت سنہ ۲۶ | श. १६०४ कार्तिक शुद्ध १ इ. १६८२ आक्टोबर २१ |
|---|---|---|

بہ روح اللہ خان فرمودند کہ بہ شہاب الدین خان بنویسد کہ شمارا حکم شدہ بود کہ جانبازخان قلعہ دار چاکنہ بیمار است آن جا برود موقوف نمودہ باید کہ در آنتورہ ماندہ کومک احمد خان تهانہدار نمایند ـ

रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा:—शिहाबुद्दीनखानास लिहावें कीं, चाकणचा किल्लेदार जांबाझखान आजारी असल्यानें तेथें जाण्याबद्दल तुला हुकूम झाला होता. परंतु तें जाणें स्थगित केलें आहे. अंतूरला राहून तेथील ठाणेदार अहमदखान याची कुमक करावी.

३४८

| जु. २६ जिल्काद ३ मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ ذی قعدہ ۳ سنہ یوم الثلث سنہ ۲۶ | श. १६०४ कार्तिक शुद्ध ४ इ. १६८२ आक्टोबर २४ |
|---|---|---|

از نوشتہ میر وحدت گرزبردار کہ برائے نگاہ داشت پیادہ های همراهی

کانهوجی رفته بود بعرض رسید حکم شده بود که پیاده‌های قوم ماولیه نگاه دارد چنانچه سنبها مقهور دره‌های مسدود نموده پیاده‌های را کافر بچه آمدن نمی دهد و دیگر قوم را حکم نیست که نگاه داریم حکم شد که همراه باباجی بحضور بیاید —

मीर वहदत गुर्जबर्दार कान्होजीच्या बरोबर असलेले प्यादे चाकरींत ठेवण्यासाठीं गेला होता. त्याच्या लिहिल्यावरून समजलें कीं, मावळे जमातीच्या प्याद्यांना चाकरींत ठेवावें असा हुकूम झाला आहे. परंतु संभा तिकडील खोरें बंद करून प्याद्यांना येऊं देत नाहीं व दुसऱ्या जमातीच्या लोकांना ठेवण्याचा हुकूम नाहीं. हुकूम झाला कीं, बाबाजीबरोबर हुजुरास यावें.

३४९.

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्काद ५<br>गुरु. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۵ سنه<br>یوم الخمس سنه ۲۶ | श. १६०४ कार्तिक शुद्ध ६<br>इ. १६८२ आक्टोबर २६ |

محی‌الدین قلی گرزبردار فرمان بنام خان جهان بهادر برده بود رسانیده عرض‌داشت آورده بنظر گذرانید از زبانی او چنان ظاهر شد که عمدة الملک قلعه رام سیج را محاصره نموده سورچال های قایم کرده بود درین ضمن حکم والا رسیده که جمعیت جزوی در محاصره گذاشته خود بدره تل کوکن برود ازین جهته عمدة الملک ظاهر کرد که اگر یک هفته مهلت می شد از اقبال حضرت در تصرف بادشاهی آورد از حکم عذر نیست سیصد روپیه خدمتانه یافته بود معاف فرمودند —

मुहियुद्दीन कुली गुर्जबर्दारानें खानजहान बहादुराच्या नावें फर्मान नेऊन पोहोंचविलें. त्याचा अर्ज नजरेखालून घातला. त्यानें तोंडीं सांगितलें तें असें:— उम्दतुल्मुल्क यानें रामसेजच्या किल्ल्यास वेढा घालून मोर्चे कायम केले होते; पण याबाबत बादशाही हुकूम पोहोंचला कीं, जमेतीस वेढ्यांत ठेवून त्यानें स्वतः तळकोंकणाच्या खोऱ्यांत जावें. याबद्दल उम्दतुल्मुल्काचें म्हणणें असें आहे कीं, 'मला एक आठवड्याची मुदत मिळाली तर किल्ला बादशाही अमलाखालीं आणीन. हुकुमाविरुद्ध सबब नाहीं. ३०० रु. खिदमताना मिळाला होता तो माफ फर्माविला.

## ३५०

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्काद ९<br>सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی قعدہ ۹ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۶ | श. १६०४ कार्तिक शुद्ध १०<br>इ. १६८२ आक्टोबर ३० |

بروح الله خان فرمودند کہ حسب الحکم بہ کامل خان قلعہدار اسیر گدہ بنویسد ہرجا کہ رسیدہ باشد ہمان جا بماند فرمان در باب حوالہ نمودن قلعہ بنام منصور خان معزول قلعہدار حوالہ شما نمودہ اند نخواہد داد ہرگاہ کہ حکم مجدد برسد بران عمل نماید ـ

گرجاجی پسر خواندہ جادونرای دکنیرا تعینات فوج مکرم خان فرمودند ـ پانصدی چہار صد سوار

रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा:—असीरगडचा किल्लेदार कामिलखान यास हस्बुलहुक्म लिहावा कीं, तू जेथें पोहोंचला आहेस तेथेंच रहा. काढून टाकलेला किल्लेदार मन्सूरखान यास किल्ला हवाला करण्याबाबत लिहिलेलें फर्मान तुझ्याजवळ दिलें आहे. तें त्यास देऊं नकोस. नवा हुकूम मिळेल त्याप्रमाणें वाग.

जादूंराय (जाधवराय दखनी) याचा मुलगा गिरजाजी यास मुकर्रमखानाच्या फौजेत नेमलें. ५०० व ४०० स्वार

## ३५१

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्काद १०<br>मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی قعدہ ۱۰ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۶ | श. १६०४ कार्तिक शुद्ध ११<br>इ. १६८२ आक्टोबर ३१ |

بہ روح الله خان فرمودند بخدمت بادشاهزادہ اعظم شاہ و شاهزادہ معزالدین عرضداشت و حسب الحکمہا بہ مکرم خان و شہاب الدین خان و بہروز خان وغیرہ سرداران فوج و تہانہداران آن ضلع بنویسد اگر مردم غنیم براے تحصیل چوتہای بیایند آمدن ندهند تنبیہ نمودہ دستگیر نمایند مجری خود شدہ و اگر جمعیت غنیم زیادہ باشد بہ سرداران خبر کردہ باتفاق یکدگر تنبیہ رساند و اگر احیاناً تغافلی خواہد کرد و مردم غنیم از حد ہرکہ سلامت خواہد گذشت از منصب برطرف نمودہ خواہد شد ـ

रूहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, अअजमशाह व मुइझ्झुद्दीन यांना

अर्जदास्त व मुकर्रमखान, शिहाबुद्दीनखान व बहरोझखान वगैरे सरदार व त्या जिल्ह्यांतील ठाणेदार यांना हस्बुलहुकूम लिहावें कीं, 'शत्रूचे लोक चौथ वसूल करण्यासाठीं आले तर त्यांस येऊं देऊं नये. त्यांना तंबी देऊन कैद करावें. यांतच तुमचें कल्याण आहे. गनिमाचे लोक जास्ती असतील तर सरदारांना बातमी देऊन एकमेकांच्या सहकार्यानें त्यांना तंबी द्यावी. निष्काळजीपणा कराल व तुमच्या हद्दींतून शत्रू सुरक्षितपणें जाईल तर तुमची मनसब बडतर्फ केली जाईल.'

३५२

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्काद १० मंगळ. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعده ۱۰ سنه<br>یوم الثلث سنه ۲۶ | श. १६०४ कार्तिक शुद्ध ११<br>इ. १६८२ आक्टोबर ११ |

از واقعه فوج خان جهان بهادر بعرض رسید به عمدة الملک خبر رسیده که پانصد سوار جمعیت غنیم جمع شده می خواهند که جانب بیضاپور آمده تاخت نمایند بنابران... را سردار فوج مظفرخان پسر خود مقرر کرده در این ضمن خبر رسیده که... شده قریب سی کس جانب اورنگ آباد رفته و محی الدین قلی گرزبردار هرگاه عرض داشت عمدة الملک گرفته روانه شده جمعیت همراه داده چنانچه در راه مردم غنیم مقابله کرده گرزبردار مذکور چند نفر بقتل رسانیده سلامت بحضور رفته و عبدالله تهانه‌دار چاندور برائے تنبیه آنها سواری نه کرده هرچه امر شود بنابران هزاری ذات و پانصد سوار بود دو صد دوصد سوار کم فرمودند —

खानजहान बहादुराच्या फौजेंतील घटनांवरून समजलें तें असें :–उम्दतुल्मुल्कास बातमी मिळाली कीं, गनिमाचे ५०० स्वार गोळा होऊन वैजापुराकडे येऊन लुटालूट करावी अशा बेतांत होते. म्हणून माझा मुलगा मुजफ्फरखान यास फौजेचा सरदार नेमलें. इतक्यांत बातमी मिळाली कीं, जवळजवळ तीस लोक औरंगाबादेकडे गेले. म्हणून मुहियुद्दीनकुली गुर्जबर्दार हा उम्दतुल्मुल्काचा खर्ज घेऊन निघाला तेव्हां त्याबरोबर आपले लोक दिले. नंतर वाटेमध्यें शत्रूंशीं सामना करून गुर्जबर्दारानें कांहीं लोकांना जिवें मारलें व तो सुरळितपणें हुजुरास पोहोंचला. चांदोरचा ठाणेदार अब्दुल्लाह ह्यानें शत्रूला तंबी देण्यासाठीं स्वारी केली नाहीं. याविषयीं हुकूम व्हावा. हुकुम झाला कीं,

'त्यास एक हजार जात व पांचशें स्वार एवढी मनसब होती. पैकीं दोनशें जात व दोनशें स्वार कमी केले आहेत.'

३५३

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्काद ११<br>बुध. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۱۱ سنه<br>یوم الاربعه سنه ۲۶ | श. १६०४ कार्तिक शुद्ध ११<br>इ. १६८२ नोव्हेंबर १ |

از واقعه فوج قلیچ‌خان بعرض رسید که شیخ بده نوکر دلیرخان با جمعیت سیصد سوار خزانه و جنس و پارچه و غیره نزد کمال الدین خان می آورد چهار کروه از این جا فرود آمده بود هنگام شب جمعیت غنیم آمده برآنها افتاده جنگ واقعه شده آخرش جمعیت غنیم کثیر بود چند نفر همراهی شیخ مذکور بجان کشته آنچه نقد و جنس بود تاراج کرده بردند و اکثر مردم گریخته درین جا آمده کمال الدین خان و دلیر ولد بهادرخان این خبر شنیده عقب غنیم شتافته آخرش غنیم را نیافته برگشته آمده ـ

कुलीचखानाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें तें असें:—दिलेरखानाचा नोकर शेख बडा हा तीनशें स्वारांसह खजिना, जिन्नस, कपडे, वगैरे कमालुद्दीनखानाकडे आणीत असतां इकडून चार कोसांवर उतरला होता. रात्रीं शत्रूचे लोक येऊन त्यावर कोसळले व लढाई झाली. शत्रूचे लोक जास्त होते. त्यांनीं शेखाबरोबरच्या कांहीं लोकांना जिवें मारून, कांहीं रोख पैसे व जिन्नस मिळाले ते सर्व लुटून नेले. बहुतेक सर्व लोक पळून इकडे आले. हें समजतांच कमालुद्दीनखान, दिलेरखान व बहादुरखान शत्रूच्या पाठलागास गेले. परंतु शत्रू न आढळल्यानें ते परत आले.

३५४

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्काद १३<br>शुक्र. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۱۳ سنه<br>یوم الجمعه سنه ۲۶ | श. १६०४ कार्तिक शुद्ध १३<br>इ. १६८२ नोव्हेंबर ३ |

خواجه دانش نوکر قلیچ‌خان عرضه‌داشت خان مذکور آورده بنظر گذرانید معروض داشته بود که دریای بهمره چهل کروه در ملک غنیم رسیده چنانچه همیرراو و بتهوجی بمعه بیست هزار سوار و پیاده سنبها مقهور برای مقابله

آمده بودند فدوی سرافرازخان و یلبرش خان و کمال الدین خان و کشورسنگه هاده و غیره هفت هزار سواررا هراول فوج مقرر کرده سواری نموده بامردم غنیم جنگ واقعه شده از اقبال حضرت سیصد و چهار صد کس مقهوران‌را بجهنم رسانده و بسیار زخمی ساخته فتح بادشاهی شد و تا پنج کروه تعاقب نموده غنیم گریخته بدامن کوه پنهان شدند و از دست بندهای بادشاهی تردد بواقعی شد امیدوار نتیجه نیک اند بعد مطالعه عرضه‌داشت حواله شیخ مخدوم منشی نموده که انتخاب کرده بعرض رساند ـ

कुलीचखानाचा नोकर ख्वाजा दानिश यानें आणलेला खान मजुकराचा अर्ज नजरेखालीं घातला. त्यांत लिहिलें होतें कीं, 'मी भीमेपासून ४० कोस शत्रूच्या मुलुखांत पोहोंचलों. तेव्हां संभाकडील २० हजार स्वार व प्यादे यांसह हंबीरराव व विठोजी सामना करण्याकरितां आले. मी सराफ्राझखान, यलत्रशखान, कमालुद्दीनखान व किशोरसिंग हाडा वगैरेंना सात हजार स्वारांसह फौजेच्या हरावलीस नेमून स्वारी केली. शत्रूच्या लोकांशीं लढाई झाली. बादशाही सुदैवानें शत्रूच्या तीन-चारशें लोकांना यमसदनास पाठविलें व पुष्कळांना जखमी केलें. बादशाही फत्ते झाली. पांच कोसपर्यंत शत्रूचा पाठलाग केला. तो पळून जाऊन पहाडामध्यें लपला. बादशाही लोकांच्या हातून उत्तम कष्ट घडले आहेत. आशा करतों कीं, याचा परिणाम चांगला होईल.' पाहून झाल्यानंतर शेख मखदूम मुन्शी याच्या हवाला अर्जदास्त करून हुकूम झाला कीं, त्यांत निवड करून अर्ज करावा.

३'५'१

| जु. २६ जिल्काद १४ शनि. | سیاهه اخبارات دربار معلی ماه ذی قعده ۱۴ سنه یوم السبت سنه ۲۶ | श. १६०४ कार्तिक शुद्ध १४ इ. १६८२ नोव्हेंबर ४ |
|---|---|---|

حسب الحکم به کار طلب خان متصدی سورت بدین مضمون صادر نموده که سیدی سنبل پسر خوانده یاقوت خان و سیدی مصری نوکر سنبها مقهور بمعه چهل و پنج نفر دستگیر نموده سیدی مصری زخمی است هرگاه فرصت شود بحضور بفرستند و از همراهیان او که مسلمان هستند بجان بکشد و هر کس هندوان اگر مسلمان شود در قید نگاه دارند و الا نه اورا نیز بکشد و سبحان آقا روسی که بامید بندگی از خونکار روم آمده است مصحوب جمعیت

خود روانہ حضور نمایند ـ

सुरतेचा मुत्सद्दी कारतलबखान यास हस्बुलहुकूम सादर झाला कीं, चाळीसपन्नास लोकांसह पकडलेला याकूतखानाचा मुलगा सीदी संबुल व संभाचा जखमी झालेला नोकर सिदी मिसरी यांना हुजूर पाठवावें. त्यांजबरोबर मुसलमान आहेत त्यांना जिवें मारावें व हिंदू आहेत ते मुसलमान होत असतील तर त्यांना कैदेंत ठेवावें; नाहीं तर त्यांनाही मारावें. सुभान आका रूमी हा रूमहून चाकरीच्या अपेक्षेनें आला आहे. त्याच्या सोबत आपले लोक देऊन त्यास हुजूर रवाना करावें.

३५६

| जु. २६ जिल्काद १५ रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی قعدہ ۱۵ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۶ | श. १६०४ कार्तिक शुद्ध १५<br>इ. १६८२ नोव्हेंबर ५ |
|---|---|---|

سابق حکم شدہ بود کہ شاهزادہ معزالدین در احمدانگر باشد درنیولا حکم شد بہادرگدہ عرف پیدگانو بیاید و غنیمرا آن طرف آمدن ندهند خبردار باشند بدین سوجب فوج از حضور مقرر کردہ همراہ سواری شاهزادہ باشند ـ

از واقعہ فوج شاهزادہ محمد اعظم شاہ بعرض رسید کہ بتاریخ نہم شهر حال بروز دوشنبہ شاهزادہ جیو اسباب زیادتی و خادمان محل در قلعہ پریندہ گذاشتہ جریدہ از دریا بهمرہ عبور شدہ قرار چنان نمودہ کہ فوج قلیچ خان را همراہ گرفتہ برائے تنبیہ در آمد ملک غنیم شوند ـ

पूर्वी हुकूम झाला होता कीं, शाहझादा मुइझुद्दीनानें अहमदनगरांत रहावें. परंतु आतां हुकूम झाला आहे कीं, त्यानें बहादुरगड उर्फ पेडगांव येथें येऊन शत्रूस इकडील बाजूस येऊं देऊं नये; सावध असावें. पुढें दिल्याप्रमाणें हुजूरकडून फौज नेमूं. शाहझाद्याबरोबर ती असूं द्यावी.

मुहम्मद अअजमशाहाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें कीं, चालू महिन्याच्या ९ तारखेस सोमवारीं शाहझाद्यानें आपलें जास्तीचें सामान व महालांतील चाकर यांना परिंड्याच्या किल्ल्यांत सोडून व सडे होऊन भीमा ओलांडली. त्याचा विचार आहे कीं, कुलीचखानाची फौज बरोबर घेऊन तंबी देण्यासाठीं शत्रूच्या मुलुखांत जावें.

३५७

| जु. २६ जिल्काद १६<br>सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعدہ ۱٦ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲٦ | श. १६०४ कार्तिक वद्य १<br>इ. १६८२ नोव्हेंबर ६ |
|---|---|---|

از واقعہ فوج بہادرخان بعرض رسید کہ احوال خان مذکور پریشان بود بنابران از خان جہان بہادر دہ هزار روپیہ گرفتہ بتاریخ ٥ شہر حال در آمد درہ تل کوکن شدہ۔

बहादुरखानाच्या फौजेंतील घटनेवरून समजलें कीं, खान मजकुराची परिस्थिती बिकट झाली होती. म्हणून खानजहान बहादुराकडून दहा हजार रुपये घेऊन तो चालू महिन्याच्या ५ तारखेस तळकोंकणाच्या खोऱ्यांत जाणाऱ्या वाटेवर आला.

३५८

| जु. २६ जिल्काद १७<br>मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعدہ ۱۷ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲٦ | श. १६०४ कार्तिक वद्य २<br>इ. १६८२ नोव्हेंबर ७ |
|---|---|---|

سید اوغلان عرض نمود کہ قلیچ خان بحضور عرضہداشت نمودہ و بہ بندہ نوشتہ است کہ همیرراو و غیرہ جمعیت غنیم لئیمرا تنبیہ بواقعی نمودہ از اقبال حضرت خوب فتح کردہ و بندهای بادشاهی امیدوار رعایت اند فرمودند نشانِ مابدولت نمی شود چنانچہ خان مذکور نوشتہ کہ این قدر مردم غنیمرا بقتل رسانیدہ شب هنود روز روشن بود و اگر مردم غنیمرا می‌کشد کسی بندہ بادشاهی سر بکار می آید و سوای این برگشتہ نزد شاهزادہ محمد اعظم شاہ چرا آمدہ عرض نمود کہ او همچو بندہ نیست کہ خلاف معروض دارد فرمودند کہ انتخاب عرضداشت خان مذکور و خطی کہ راو انوپ سنگہ بہ لطف الله خان نوشتہ نموده بعرض رساند ـ

सय्यिद ओघलान यानें अर्ज केला तो असा:--कुलीचखानानें हुजुरास अर्ज पाठविला व मला लिहिलें आहे कीं, हंबीरराव वगैरे शत्रूच्या जमेतीस त्यानें उत्तम तंबी देऊन बादशाही सुदैवानें मोठा विजय मिळविला. शत्रूचे इतके लोक मारले कीं, शबे हुनूद प्रमाणें तो दिवस उजळला. बादशाही चाकर कृपेची आशा करीत आहे. हुकूम झाला कीं, 'माझा विश्वास बसत नाहीं; शत्रूच्या लोकांना जर मारले तर बादशाही लोक कामास कसे आले ? शिवाय

तो मुहम्मद अअजमशाहाकडे परत कां आला ?' अर्ज केला कीं, तो चाकर खोटें सांगणार नाहीं. हुकूम झाला कीं, खानाच्या अर्जाची छाननी करून व अनूपसिंगानें लुत्फुल्लाहखानास लिहिलेल्या पत्रावरून अर्ज करावा.

३५९

| जु॰ २६ जिल्काद १८ बुध. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعده ۱۸ سنه<br>یوم الاربعه سنه ۲۶ | श. १६०४ कार्तिक वद्य ४<br>इ. १६८२ नोव्हेंबर ८ |
|---|---|---|

عرض رسید که نرسوجی هفصدی دو صد سوار به معه پسرش از تعینات فوج خان جهان بهادر فراری شد حکم شد از فهرست بر آرند ـ

अर्ज आला कीं, २०० स्वारांचा सप्तशती नरसोजी आपल्या मुलासह खानजहान बहादुराच्या फौजेंतून पळून गेला. हुकूम झाला कीं, यादींतून त्याचें नांव कमी करावें.

३६०

| जु. २६ जिल्काद १९ गुरु. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعده ۱۹ سنه<br>یوم الخمس سنه ۲۶ | श. १६०४ कार्तिक वद्य ५<br>इ. १६८२ नोव्हेंबर ९ |
|---|---|---|

به بختاورخان فرمودند از ابو محمد پسر فوجدار خان بلوچ که از سر زمین دکن واقف حال است حقایق دره های ملک غنیم تحقیق نموده بعرض رساند چنانچه پرسیده عرض نمود که مشارالیه التماس می نماید که بدر آمد شدن ملک غنیم سیصد و شصت دره اند منجمله شصت و پنج دره چنان اند که فیل و شتر و غیره بگذرند و باقی دره های راه تنگ دارند حکم شد حقیقت مفصل نوشته بنظر گذرانند ـ

ملازمت

سید زین العابدین بخاری قلعه دار معزول انتوره گده بمعه پسر آمده یک مهر ـ

درجن سنگه ولد هریسنگه کچهواهه امید بندگی... ـ

سهماجی و بیکاجی بابت سنبها

سقهور امید بندگی ۹ مهر خلعت دادند ـ

बख्तावरखानास हुकूम झाला कीं, फौजदारखान बलोच याचा मुलगा अबू मुहम्मद यास दक्षिणेंतील भूगोलाची माहिती आहे. त्यानें शत्रूच्या मुलुखांतील घाटखिंडीबद्दल चौकशी करून अर्ज करावा. त्यावर त्यानें अर्ज केला तो असा :-उपर्युक्त विनंति करितो कीं, शत्रूच्या मुलुखांत जाण्यासाठीं ३६० घाट व खिंडी आहेत. त्यांपैकीं ६५ घाट असे आहेत कीं, जेथून हत्ती, उंट वगैरे जाऊं शकतात व बाकी खिंडींमधील वाटा अरुंद आहेत. हुकूम झाला कीं, ही हकीकत सविस्तर लिहून नजरेखाली घालावी.

भेट

अंतूरगडचा बदललेला किल्लेदार सय्यिद जैनुलआबिदीन बुखारी मुलासह आला. एक मोहर नजर केली. दुर्जनसिंग वलद हरिसिंग कछवा चाकरीच्या आशेनें आला. संभाकडील महिमाजी व त्रिकाजी चाकरीच्या आशेनें आले. ९ मोहरा नजर केल्या. खिलअत दिली.

३६१

| जु. २६ जिल्काद २० शुक्र. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعده ۲۰ سنہ<br>یوم الجمعہ سنہ ۲۶ | श. १६०४ कार्तिक वद्य ६<br>इ. १६८२ नोव्हेंबर १० |
|---|---|---|

سیف الله کہ برائے سزاولی بہادر خان رفتہ بود آمده ملازمت نموده یک اشرفی نذر گذرانیده عرض نمود کہ خان مذکوررا بتاریخ ۱۴ شہر حال داخل دره تل کوکن نموده بحضور آمدیم و خان جہان بہادر از قلعہ رام سیج کوچ نموده جانب دره تل کوکن روانہ شده چنانچہ متصل موضع چاندور رسیده بود ــ

बहादुरखानास सजावली करण्यासाठीं सैफुल्लाह गेला होता. त्यानें येऊन एक अश्रफी भेट दिली व अर्ज केला कीं, खानास चालू महिन्याच्या १४ तारखेस तळकोंकणाच्या घाटांत दाखल करून हुजुरास आलों. खानजहान बहादुरानें रामसेजच्या किल्ल्याहून कूच केलें व तो तळकोंकणाच्या घाटाकडे रवाना झाला; पुढें तो चांदवडजवळ पोहोंचला.

३६२

| जु. २६ जिल्काद २१<br>शनि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۲۱ سنه<br>یوم السبت سنه ۲۶ | श. १६०४ कार्तिक वद्य ७<br>इ. १६८२ नोव्हेंबर ११ |
|---|---|---|

بهادر علی خوش‌منزل یک لک روپیه خزانه سرکار اعظم شاه و یکصد اسپ کومکی و کمان و دسته تیر به جهته فوج قلیچ خان برده بود رسانیده آمده ملازمت نموده یک اشرفی نذر گذرانید فرمودند که خبر حسن علی خان بگوید که سواری اسپ میکند و صحبت همراه شاهزاده‌جیو چه نوعی دارد عرض نمود بدعا{ی} گوی حضرت مشغول وچاق و تندرست است مدام سواری اسپ می نماید هرچه شاهزاده‌جیو خدمت می فرمایند بجا می آرد فرمودند قلیچ خان نزد شاهزاده‌جیو بحضور شما آمده بود یا نه عرض نمود که آمده ملازمت نموده بود شاهزاده‌جیو بخان مذکور پرسیدند که شما به جلدی پیشتر برائے مقابله غنیم از حکم کدام رفته بود عرض نمود بموجب حکم معلی باز فرمودند پیش از مقابله غنیم چرا برگشته آمده عرض نمود که مردم غنیم جماعه کثیر بود بندهای بادشاهی قلیل بودند به سبب ملاحظه بهیر برگشته آمدیم ازین گفتگو خان مذکور آزرده شده به خانه خود رفته شاهزاده‌جیو {شاهزاده‌جیو} حسن علی خان بهادررا به دیره خان مذکور فرستاده طلبیده تسله کرده فرمودند شما اسپان کومکی به فوج قلیچ خان رسانیده یا نه عرض نمود بخدمت شاهزاده‌جیو رسانیده لیکن شاهزاده نه داده فرمودند خوب کرده ـ

बहादुरअली खुशमंझिल यानें एक लक्ष रुपयांचा खजिना अअजमशाहाकरितां आणि शंभर कुमकी घोडे व धनुष्यबाण कुलीचखानाच्या फौजेसाठीं आणले होते, ते पोहोंचवून तो परतला व त्यानें एक अश्रफी भेट दिली. हुकूम झाला कीं, हसनअली खानाची काय बातमी आहे ? तो घोड्यावर बसून शाहझाद्याबरोबर जातो कीं नाहीं ? अर्ज केला कीं, बादशाहाचें भलें चिंतण्यांत व प्रार्थना करण्यांत तो निमग्न असतो; त्याची प्रकृति चांगली आहे. तो नेहमींच घोड्यावर असतो व शाहझादा चाकरी फर्मावितो ती करतो. हुकूम झाला कीं, तू तेथें असतांना कुलीचखान शाहाझाद्यापाशीं आला होता कीं नाहीं ? अर्ज केला कीं, त्यानें येऊन भेट घेतली. तेव्हां शाहझाद्यानें त्यास विचारलें 'तू घाईनें गनिमाचा मुकाबला करण्यासाठीं कोणाच्या हुकुमानें पुढें गेला होतास ?'

त्यानें अर्ज केला 'बादशाहाच्या हुकुमानें'. नंतर शाहझाद्यानें विचारलें 'मग शत्रूशीं सामना करण्याचे अगोदरच परत कां निघून आलास ?' त्यानें अर्ज केला कीं, 'शत्रूचे लोक जास्ती होते आणि बादशाही लोक थोडे असून बरोबर बुणगे होते. म्हणून परत आलों.' या संभाषणामुळें खान दुःखी होऊन स्वतःच्या घरीं गेला. शाहझाद्यानें हसनअलीखान बहादुरास खानाच्या डेऱ्याकडे पाठवून त्यास बोलाऊन दिलासा दिला. हुकूम झाला कीं, 'तू कुमकी घोडे कुलीचखानाच्या फौजेंत पोहोंचविलेस कीं नाहीं ?' अर्ज केला कीं, शाहझाद्याच्या सेवेस पोहोंचविले. परंतु शाहझाद्यानें ते दिले नाहींत. हुकूम झाला कीं, ठीक केले.

## ३६३

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्काद २२<br>रवि. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعده ۲۲ سنه<br>یوم الاحد سنه ۲٦ | श. १६०४ कार्तिक वद्य ८<br>इ. १६८२ नोव्हेंबर १२ |

به روح الله خان فرمودند که به مغل خان بنویسد که بحضور عرض رسید که شمارا شاهزاده معزالدین معه فوج براے تنبیه مردم غنیم پیشتر رخصت نموده باید که هرگاه مقهوران نمایان شوند چنان تعاقب نماید که بقتل و یا دستگیر سازد و اگر بسرحد سردار دیگر برسند خبر نماید که آنها نیز موافق حکم عمل آورده از ملک بادشاهی بدر سازد ـ

عرضه‌داشت خان جهان بهادر بنظر گذشت معروض داشته بود که مردم جاسوسان خبر آوردند که مردم غنیم از قلعه ترنبک یک توپ به قلعه رام‌سیج می برند چنانچه فدوی شتافته چند نفر بقتل رسانیده و اکثر زنده دستگیر نموده توپ مذکور از آنها گرفته بعد مطالعه خاموش ماندند ـ

بروح الله خان فرمودند که حسب الحکم به عبد النبی تهانه دار انکوله بنویسد که شما مچلکه داده بود که بمعیاد سه ۳ ماه تهاکو بنجاره مفسد را بقتل و یا دستگیر نمایم چنانچه مفسد مذکور سوار و پیاده جمع نموده در پرگنه بیر سکونت گرفته هشت مواضع پرگنه سیوگانو تاخت تاراج نموده چهار ده مواضع را ویران ساخته درین باعث خرابی رعایا است در معیاد یک ماه مانده تا حال چه کرده باید که مفسد مذکوررا تنبیه نموده اخراج سازد و اگر تنبیه کردن نه تواند معروض دارد بدیگری مقرر نموده خواهد شد

وحکم شد عمر بیگ گرزبردار راجہ درگ سنگہ را سزاولی کردہ نزد مشارالیہ رساند کہ باتفاق یکدیگر فسادی‌را اخراج سازند ـ

रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा:—मुघुलखानास लिहावें कीं, हुजुरास अर्ज आला आहे कीं, 'तुला शाहझादा मुइझ्झुद्दीनानें फौजेसह शत्रूचे लोकांना तंबी देण्यासाठीं पुढें पाठविलें होतें. शत्रूचे लोक दिसतील तेव्हां त्यांचा पाठलाग करून त्यांना मारावें किंवा कैद करावें व इतर कोणा सरदाराच्या हद्दींत आले तर त्याची खबर त्यास द्यावी. ते हुकुमाप्रमाणें बादशाही मुलुखाच्या बाहेर काढतील.'

खानजहान बहादुराचा अर्ज नजरेखालून घातला. तो लिहितो: 'हेरांनीं बातमी आणली कीं, गनिमाचे लोक त्रिंबकहून एक तोफ किल्ले रामसेजास नेत होते. म्हणून मी धावून जाऊन कांहीं लोकांना मारून व बहुतेक लोकांना जिवंत पकडून त्यांच्याकडून तोफ परत घेतली. अर्ज पाहिल्यावर बादशाह गप्प बसला.

रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा:—अकोल्याचा ठाणेदार अब्दुन्नबी यास हस्बुलहुकूम लिहावा कीं, तीन महिन्यांत थाकू बंजाऱ्यास मारीन किंवा पकडीन असा मुचलका तू दिला होतास. परंतु हा बंडखोर स्वार व प्यादे जमा करून परगणे बीड येथें राहिला आहे. त्यानें परगणे सेवगांवमधील आठ गांवें लुटून चौदा गांवें ओस पाडलीं. यामुळें प्रजेचे हाल होत आहेत; आतां एक महिन्याची मुदत राहिली आहे. आतांपावेतों काय केलेंस ? बंडखोरांस तंबी देऊन घालवून द्यावयास पाहिजे होतें; तुझ्यानें तंबी देणें शक्य होत नसेल तर दुसऱ्या कुणाची तरी नेमणूक करावी असा अर्ज करावा. आतां उमरबेग गुर्जबर्दारानें सजावली करून राजा दुर्गसिंग यास त्याचेजवळ पोहोंचवावें व एकमेकांच्या सहकार्यानें बंडखोरास घालवून द्यावें.

## ३६४

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्काद २३<br>सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی قعدہ ۲۳ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲٦ | श. १६०४ कार्तिक वद्य ९<br>इ. १६८२ नोव्हेंबर १३ |

بموجب نوشتہ بہادرخان بعرض رسید کہ فدوی بتاریخ ۱۳ شہر حال

بمعہ فوج در آمد درہ تل کوکن شدہ بالاگھات برسید انشاءاللہ تعالی موافق ارشاد مرضی مبارک تقدیم خواهم رسانید و از حقیقت این جا سیف اللہ خوب واقف است بعرض خواهد رساند و نہ هزار پیادہ نگاهداشت کانهوجی همراہ بندہ تعین شدہ از آن جملہ دو هزار پیادہ رسیدہ اند و حقیقت درہ هویداست جمعی کہ جاگیردار همراہ تعینات اند وقتی کہ بیرون درہ بودند اکثری‌را خرچی از جاگیری آمد بعضی از ساهوکار[ان] قرض کشیدہ می خوردند و حالا همراہ فوج کسی ساهوکار نیست کہ قرض وام گرفتہ تردد نمایند بالای گهات نرخ غلہ فی روپیہ پنج اثار است و پائین گهات بحضرت روشن اگر بانها چیزی مساعدہ مرحمت شود بہتر است بعد معروض فرمودند کہ بخان مذکور بنویسد کہ از جملہ همراهیان کسی جمعیت داشتہ باشد شمار و ملاحظہ نمودہ سری یک اسپہ پنج روپیہ و دو اسپہ دہ روپیہ مساعدہ دادہ معروض دارد کہ از جاگیر آنها وضع نمودہ شود و در باب پیادہ‌ها حکم شدہ آتش خان بعرض رساند ـ

बहादुरखानाचा अर्ज आला तो असाः—चालू महिन्याच्या १४ तारखेस मी फौजेसह तळकोंकणात जाणाऱ्या घाटाच्या वाटेवर पोहोंचलों. घाटमाथ्यावर पोहोंचून बादशाही मर्जीप्रमाणें चाकरी करीत राहीन. सैफुल्लाह यास इकडील हकीकतीची चांगली माहिती आहे. तो त्याबद्दल अर्ज करील. कान्होजीच्या तैनातींतील ९००० प्यादे माझ्याबरोबर नेमले आहेत. पैकीं २००० प्यादे पोहोंचले आहेत. घाटांतील हकीकत उघड आहे. माझ्याबरोबर नेमलेले जागीरदार घाटाच्या वर होते तेव्हां बहुतेकांना खर्चासाठीं जागिरींतून पैसे आले व कांहीं सावकरांपासून कर्ज काढून खात. सध्या फौजेबरोबर कुणीही सावकार नाहीं कीं, कर्ज घेऊन आम्हांला कांहीं व्यवस्था करतां येईल. घाटमाथ्यावर रुपयास पांच शेर धान्याचा भाव आहे व घाटाखालीं काय भाव आहे तें हजरतांस माहीत आहे. मेहेरबानी करून कांहीं मदत केली तर ठीक होईल. हुकूम झाला कीं, खानास लिहावें कीं, तुझ्याबरोबर लोक आहेत त्यांची मोजणी व पाहणी करून प्रत्येकीं, एक घोडेवाल्यास पांच रुपये व दोन घोडेवाल्यास दहा रुपये मदत देऊन अर्ज करावा. त्यांच्या जागिरींतून ती रकम वजा करावी. प्याद्यांच्या बाबत आतिशखानानें अर्ज करावा.

३६५

| जु. २६ जिल्काद २३ सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ ذی قعدہ ۲۳ سنہ یوم الاثنا سنہ ۲٦ | श. १६०४ कार्तिक वद्य ९ इ. १६८२ नोव्हेंबर १३ |
|---|---|---|

دیوانہ بیگ و غیرہ ہفدہ منصبداران عرضداشت شہاب‌الدین خان آوردہ بنظر گذرانید و زبانی بعرض رسانید کہ خان مذکور بروز پنج شنبہ ۱۹ شہر حال اسباب زیادتی و مردم بہیررا در جونیر گذاشتہ تنہا بمعہ فوج بملک غنیم در آمدہ قریب بیست موضع تعلقہ غنیم تاخت و تاراج نمودہ آتش دادہ بسیاری‌را بقتل رسانید مویشی بدست آوردہ بروز جمعہ در آن جا مقام نمودہ و بندہای را بحضور فرستادہ قرار کردہ بود کہ بروز شنبہ چند مواضع دیگر گرد و پیش‌را تاراج نمودہ بیرون درہ خواهم برآمد فرمودند کہ مجری کلی شد ـ

दिवानावेग वगैरे सतरा मन्सबदारांनीं शिहाबुद्दीनखानाचा अर्ज आणला तो नजरेखालून घातला. तोंडीं अर्ज केला कीं, खान या महिन्याच्या १९ तारखेस गुरुवारीं जास्तीचें सामान व बुणगे जुन्नर येथें सोडून एकटा फौजेसह शत्रूच्या मुलखांत गेला. शत्रूच्या तालुक्यांतील जवळजवळ २० गांवें त्यानें लुटलीं व जाळलीं, अनेकांना मारलें व कित्येक जनावरें त्याच्या हातीं आलीं. त्यानें शुक्रवारीं तेथें मुक्काम करून आम्हांला हुजूर पाठविलें. त्यानें विचार केला होता कीं, शनिवारीं जवळ्यासचीं इतर कांहीं गांवें लुटून घाटाबाहेर यावें. हुकूम झाला कीं, मान्य आहे.

३६६

| जु. २५ जिल्काद २४ मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ ذی قعدہ ۲۴ سنہ یوم الثلث سنہ ۲٦ | श. १६०४ कार्तिक वद्य १० इ. १६८२ नोव्हेंबर १४ |
|---|---|---|

از واقعہ فوج شاهزادہ معزالدین بعرض رسید کہ جمعیت غنیم در نواحی نمایان شدہ بود بنابران شاهزادہ‌جیو مغل‌خان‌را برائے تنبیہ تعین نمودہ بود خان مذکور تا دوازدہ کروہ رفتہ آخرش جمعیت غنیم گریختہ رفت بنابران برگشتہ شدہ آمدہ بعد معروض بہ روح اللہ خان فرمودند حسب الحکم بہ مغل‌خان بنویسد کہ شما خوب نہ کردہ کہ برگشتہ آمدہ می باشی کہ تا آن جا تعاقب میکرد٭ (؟) کہ بسردار دیگر خبر می شد

از آینده چنان نخواهد کرد ـ

शाहझादा मुइझ्झुद्दीनाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें तें असें:— शत्रूचे लोक जवळच दिसले म्हणून शाहझाद्यानें मुघुलखानास त्यांना तंबी देण्यासाठीं नेमलें. त्याप्रमाणें खान बारा कोस गेला तेव्हां शत्रूचे लोक पळून गेले. म्हणून तो परत आला. यावर रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा:— मुघुलखानास हस्बुलहुकूम लिहावा कीं, तू हें ठीक केलें नाहींस. 'तू परत कां आलास ? थेटपर्यंत पाठलाग करून दुसऱ्या सरदारांना बातमी द्यावयास पाहिजे होती. इथून पुढें असें करूं नये'.

३६७

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्काद २४<br>मंगळ. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعده ۲۴ سنه<br>یوم الثلث سنه ۲۶ | श. १६०४ कार्तिक वद्य १०<br>इ. १६८२ नोव्हेंबर १४ |

شیخ عبدالله عرض نمود احمد خان تهانه‌دار انتوره به بنده نوشته که هرگاه شهاب الدین خان آمده به بنده مصلحت پرسیده که حالا چه باید کرد درین اثنای ایسا زمیندار تل‌کوکن ظاهر نمود که اگر بنده‌را هراول نمایند شمارا اندرون دره تل‌کوکن جای که آبادانی مردم غنیم است ببرم ازین جهت شهاب الدین مشارالیه‌را هراول خود نموده اندرون دره شتافته پانصد سوار جمعیت خود همراه خان مذکور داده آخرش خان مشارالیه اندرون دره چند مواضع را تاخت نموده چهار صد نفر بقتل رسانیده یک هزار بندی و چهار هزار مویشی بدست آورده باز خان مذکور بیرون دره شده درین جا آمده و قرار چنان کرده است که همین طور جریده شده اسپ قمچی بملک غنیم رفته تاخت و تاراج نموده برگشته آمده باشم بعد معروض فرمودند که برای شهاب الدین خان خلعت علحده نمایند ـ

शेख अब्दुल्लाह यानें अर्ज केला तो असा:— अंतूरचा ठाणेदार अहमदखान यानें मला लिहिलें कीं, शिहाबुद्दीनखान आला होता, तेव्हां त्यानें येथील कामाबद्दल व माझ्याबद्दल विचारलें. एवढ्यांत कोंकणचा जमीनदार एसा ह्यानें जाहीर केलें कीं, मला हरावलीस नेमलें तर तळकोंकणांतील शत्रूच्या भरभराटलेल्या ठिकाणीं तुम्हांस नेईन. तेव्हां शिहाबुद्दीनानें उपर्युक्तास आपल्या हरावलीस नेमून खोऱ्यामध्यें दौड केली. माझ्या जमेतीपैकीं ५००

स्वार उपर्युक्त खानाबरोबर दिले. नंतर त्यानें खोऱ्यांतील कांहीं गांवें लुटलीं व ४०० लोकांना मारलें, १००० लोक कैद केले व ४००० जनावरें लुटलीं. उपर्युक्त खान खोऱ्याच्या बाहेर इकडे आला आहे व त्याचा विचार आहे कीं, अशाच प्रकारें सडे होऊन घोडास्वारी करून शत्रूच्या मुलुखांत जाऊन, लुटालूट करून परतावें. यावर हुकूम झाला कीं, शिहाबुद्दीनखानासाठीं खिलत वेगळी करून ठेवावी.

## ३६८

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्काद २५<br>बुध. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعده ۲۵ سنه<br>یوم الاربعه سنه ۲۶ | श. १६०४ कार्तिक वद्य ११<br>इ. १६८२ नोव्हेंबर १५ |

از عرض‌داشت قلیچ خان بعرض رسید که مردم جاسوسان خبر آوردند که بیست هزار سوار جمعیت غنیم لئیم بمفاصله هشت کروه از خواص‌پوره آمده استقامت گرفته بنابران شاهزاده محمد اعظم شاه فدوی و حسن علی خان بهادر و غیره را جهته مقابله رخصت نموده هرگاه بندهای درین جا رسیده مقهوران به جنگ پیش آمدند شاهزاده‌جیو سر سوار شده آمده شامل حال شدند متمردان پس پای شده گریخته بنابران شاهزاده‌جیو بندهای را تعاقب تعین نموده از اقبال حضرت فتح عظیم شد و اسپان و اسلحه و غیره از مقهوران بدست آمده و اکثر بندهای بادشاهی بکار آمده تا چهار کروه تعاقب غنیم نموده برگشته آمده بخدمت شاهزاده‌جیو رسیدند بعد مطالعه فرمودند که مجری شده ـ

از واقعه فوج شاهزاده محمد اعظم شاه بعرض رسید که هرگاه قلیچ خان و غیره بندهای بادشاهی بعد فتح بخدمت شاهزاده‌جیو آمده بادشاهزاده ـ جیو در غسل‌خانه تشریف آوردند و بدین موجب انعام داده با حسن علی خان بهادر و قلیچ خان و دلاور خان سه ۳ چهار گهری خلوت نموده بعد از آن برخاستند حسن علی خان خلعت و اسپ و خنجر قلیچ خان ایضاً بهرجی خلعت و فیل دلاور خان خلعت و اسپ با ساز طلا ـ

कुलीचखानाच्या अर्जावरून समजलें तें असें:—हेरांनीं बातमी आणली कीं, शत्रूच्या २०००० लोकांनीं खवासपुऱ्यापासून आठ कोसांवर येऊन तळ दिला आहे. म्हणून मुहम्मद अअजमशाह यानें मला व हसन अलीखान

बहादूर वगैरेंना सामना देण्यासाठीं रवाना केलें. आम्ही तेथें पोहोंचलों तेव्हां शत्रू लढाईस आला. शाहझादा स्वार होऊन लढाईंत पुढें दाखल झाला. शत्रूनें काढता पाय घेतला म्हणून शाहझाद्यानें आम्हाला शत्रूच्या पाठलागासाठीं नेमलें. बादशाही सुदैवानें मोठा विजय प्राप्त झाला. शत्रूचे घोडे व हत्यारें वगैरे हातीं आलीं. बहुतेक बादशाही लोक कामास आले. शत्रूचा चार कोसांपर्यंत पाठलाग करून आम्ही परत शाहझाद्याकड आलो. अर्ज पाहिल्यावर हुकूम झाला कीं, मान्य आहे.

मुहम्मद अअजमशाहाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें कीं, कुलीचखान वगैरे बादशाही लोक विजय मिळवून शाहझाद्याकडे आले तेव्हां तो घुसलखान्यांत होता. पुढे दिल्याप्रमाणें इनामें देऊन हसनअलीखान बहादुर व कुलीचखान व दिलावरखान यांशीं तीनचार घटिका खलबत करून नंतर सर्व उठले. हसनअलीखान खिलत, घोडा व खंजीर; बहिर्जी खिलत व हत्ती; कुलीचखान खिलत, घोडा व खंजीर; दिलावरखान खिलत व सोन्याच्या साजासह घोडा.

३६९

| जु. २६ जिल्काद २९ रवि. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعده ۲۹ سنه<br>یوم الاحد سنه ۲٦ | श. १६०४ कार्तिक वद्य ३० इ. १६८२ नोव्हेंबर १९ |
|---|---|---|

یک پهر و سه گهری روز برآمده خاص عام نموده غسلخانه فرمودند ـ

ملازمت

نیتاجی دکهنی بامید بندگی ... مهر ـ

باباجی دکهنی بامید بندگی یک مهر ... روپیه ـ

روح الله خان عرض نمود که ابراهیم خان ناظم کشمیر به بنده خطی نوشته که بموجب حکم طرح کشمیر و تبت وغیره درههای آن جا ارسال داشته چنانچه بنظر گذرانیده بندگان حضرت ملاحظه فرمودند ـ

एक प्रहर तीन घटिका दिवस निघाल्यावर बादशाहानें खास व आम दरबार करून घुसलखाना फर्माविला. नेताजी दखखनी चाकरीच्या आशेनें आला व ····मोहर नजर केल्या. बाबाजी दखखनी चाकरीच्या आशेनें आला व एक मोहर ·······रुपये नजर केले.

रूहुल्लाहखानानें अर्ज केला तो असा:——काश्मीरचा नाजिम इब्राहीमखान

यानें मला पत्र लिहिलें कीं, हुकुमाप्रमाणें काश्मीर व तिबेट येथील दऱ्याखोऱ्यांचे नकाशे पाठविले आहेत ते बादशाहाच्या नजरेखाली घालावे. बादशाहानें ते पाहिले.

## ३७०

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्काद ३० सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی قعدہ ۳۰ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۶ | श. १६०४ मार्गशीर्ष शुद्ध १<br>इ. १६८२ नोव्हेंबर २० |

از واقعہ سیوگانو بعرض رسید کہ بتاریخ ۲۱ شہر حال گاوان توپ خانہ و شتران را کہ بندهای بادشاهی برائے چرانیدن بہ تهانہ انکولہ می بردند تهاکو بنجارہ با جمعیت آمدہ هفت نفر شتر و چند نفر عربچیان و ساربانان را کشتہ و زخمی ساختہ تمامی گاوان و شتران گرفتہ گریختہ چون این خبر {بہ} شیخ عبد النبی تهانہ دار انکولہ و برقنداز خان شنیدہ سواری نمودہ تعاقب کردہ منجملہ پنجاہ و نہ گاو گرفتہ آوردہ قریب یک صد بیست و پنج گاو گرفتہ گریختہ و کندو تهانہ دار سواری نکردہ بعد معروض حکم شد روح الله خان دیگر تهانہ دار تجویز نماید ـ

शेवगांवच्या घटनांवरून समजलें तें असें:—चालू महिन्याच्या २१ तारखेस बादशाही लोक तोपखान्याचे बैल व उंट यांना चारणीसाठीं अंकोल्याकडे नेत असतां थाकू बंजाऱ्यानें आपल्या लोकांसह येऊन सात उंट, तोफांच्या गाड्यांचे कांहीं लोक व सारवान यांना जिवें मारलें व जखमी केलें. नंतर सर्व बैल व उंट घेऊन तो पळाला. ही बातमी अंकोल्याचा ठाणेदार शेख अब्दुन्नबी व बर्कंदाजखान यांना समजल्यावर त्यांनीं स्वारी करून पाठलाग केला व त्यांपैकीं ५९ बैल परत आणले. खंडू ठाणेदारानें स्वारी केली नाहीं. यावर रूहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, दुसऱ्या ठाणेदाराची तजवीज करावी.

## ३७१

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्हेज २ बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی الحجہ ۲ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۶ | श. १६०४ मार्गशीर्ष शुद्ध ३<br>इ. १६८२ नोव्हेंबर २२ |

لکهموجی را تهانہ داری سرس گانو از تغیر سنگاجی مقرر نمودند هزار

پانصدی ذات هزار پانصد سوار منجملہ پانصد سوار دو اسپہ —

मंगाजीच्या बदलीमुळें लखमोजीस सरसगांवच्या ठाणेदारीवर नेमलें; तो १५०० जात, १५०० स्वार असा मनसबदार होता. पैकीं ५०० स्वार दुघोडी होते.

## ३७२

| | | |
|---|---|---|
| ज़ु. २६ जिल्हेज ३ गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی الحجہ ۳ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲٦ | श. १६०४ मार्गशीर्ष शुद्ध ४<br>इ. १६८२ नोव्हेंबर २३ |

اضافہ

بہرجی پارتہ تعینات فوج
شاهزادہ محمد اعظم شاہ
اصل پنج هزاری ہم ماهہ... سوار
اضافہ یک ماهہ —

سیام سنگہ قلعہ دار جونیر
اصل سیصدی ۱۲۰ سوار ...
اضافہ ۳۰ سوار —

मुहम्मद अअजमशाहाच्या फौजेंतील बहिरजी पार्थे (पारठे)= मूळ चारमाही पंचसहस्त्री····, वाढ एक माही स्वार.
जुन्नरचा किल्लेदार शामसिंग = मूळ त्रिशती १२० स्वार····वाढ ३० स्वार.

## ३७३

| | | |
|---|---|---|
| ज़ु. २६ जिल्हेज ४ शुक्र. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی الحجہ ہم سنہ<br>یوم الجمعہ سنہ ۲٦ | श. १६०४ मार्गशीर्ष शुद्ध ५<br>इ. १६८२ नोव्हेंबर २४ |

روح الله خان عرض نمود کہ تیرانداز تهانہ دار لاسور خطی نوشتہ کہ مظفر ولد جهان خان کاکر فوجدار گنداپور بہ فقیر نوشتہ کہ قریب یک هزار پانصد سوار جمعیت غنیم برائے تحصیل چوتهای آمدہ منجملہ پانصد سوار از دریای مان گنگ عبور شدہ سرحد بندہ رسیدہ اند کومک فدوی نمایند بنابران سواری کردہ روانہ شدہ از اقبال حضرت مقهوران‌را تنبیہ خواهم کرد فرمودند کہ خوب کردہ —

रूहुल्लाहखानानें अर्ज केला तो असाः—लासूरचा ठाणेदार तीरंदाज यानें पत्र लिहिलें कीं, गांडापूरचा फौजदार मुजफ्फरखान वलद जहानखान काकर यानें त्याला कळविलें कीं, शत्रूचे जवळजवळ १५०० लोक चौथ वसूल

करण्यासाठीं आले. त्यांपैकीं ५०० स्वार माणगंगा पार करून माझ्या सरहद्दींत घुसले आहेत. तरी माझ्या कुमकेस यावें. म्हणून तो स्वार होऊन रवाना झाला व बादशाही सुदैवानें शत्रूस तंबी देऊं इच्छितो. हुकूम झाला कीं, छान केलें.

३७४

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्हेज ६ रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ ذی الحجہ ۶ سنہ یوم الاحد سنہ ۲۶ | श. १६०४ मार्गशीर्ष शुद्ध ७ इ. १६८२ नोव्हेंबर २६ |

از نوشتہ تیرانداز تھانہ دار لاسور بعرض رسید فدوی بموجب نوشتہ فوجدار گانداپور براے تنبیہ مردم غنیم سواری نمودہ بود مردم غنیم مویشی پرگنہ بیضاپور و یک پسر دیسموکہ آن جارا بمعہ متاع دستگیر نمودہ می بردند بندہ شتافتہ عقب آنہا نمودہ چنانچہ مویشی و پسر دیسموکہرا گذاشتہ گریختہ رفتند فرمودند کہ مجری شدہ ـ

लासूरचा ठाणेदार तीरंदाज याच्या लिहिल्यावरून समजलें कीं, तो गांडापूरच्या फौजदाराच्या लिहिल्याप्रमाणें शत्रूला तंबी देण्यासाठीं स्वार होऊन गेला होता. शत्रूचे लोक परगणे वैजापूर येथील जनावरें व देशमुखाचा मुलगा यांना सामानासह कैद करून नेत असतां त्यानें धावून जाऊन त्यांचा पाठलाग केला. तेव्हां शत्रूच्या लोकांनीं जनावरें व देशमुखाचा मुलगा यांना सोडून दिलें व ते पळून गेले. हुकूम झाला कीं, मान्य आहे.

३७५

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्हेज ७ सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ ذی الحجہ ۷ سنہ یوم الاثنا سنہ ۲۶ | श. १६०४ मार्गशीर्ष शुद्ध ८ इ. १६८२ नोव्हेंबर २७ |

بموجب نوشتہ محمد شریف تھانہ دار سیونیر بعرض رسید حکم شدہ بود کہ آنچہ مردم غنیم در قید اند بہ حضور فرستد ہرگاہ بہ تھانہ داران سر راہ حکم شود کہ از حد خود سلامت رسانند آن زمان روانہ نمایم و بتہوجی کاتہ سردار عمدہ سنبہا مقہور بہ بندہ نوشتہ کہ سیاجی نوکر این جانب در قید شما است خلاص نماید چنانچہ خط مذکور بجنس فرستادہ بود بنظر گذشت حکم شدہ بمشارالیہ بنویسد کہ ہرگاہ شمارا طلب حضور خواهند کرد آن

زنان محبوسان را بحضور بیارد ـ

सियनेरचा ठाणेदार मुहम्मद शरीफ याच्या लिहिल्यावरून समजलें तें असें:—गनिमाचे लोक कैदेंत आहेत त्यांना हुजूर पाठवावें असा हुकूम झाला होता. परंतु मार्गावरील ठाणेदारांनीं आपल्या हद्दींतून त्या लोकांना सुरक्षित पोहोंचवावें असा हुकूम होईल तेव्हां पाठवीन. संभाचा उत्तम सरदार विठोजी काते ( काटे ) यानें मला लिहिलें कीं, आमचा सयाजी नांवाचा नौकर तुझ्या कैदेंत आहे, त्यास सोडावें. तेव्हां हें मूळ पत्रच पाठविलें आहे. तें नजरेखालून घातलें. उपर्युक्तास कळवणेंबद्दल हुकूम झाला कीं, 'तुला हुजूर बोलाविल्यानंतर कैद्यास बरोबर आणावें'.

३७६

| जु. २६ जिल्हेज ८ मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی الحجہ ۸ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۶ | श. १६०४ मार्गशीर्ष शुद्ध ९<br>इ. १६८२ नोव्हेंबर २८ |
|---|---|---|

بہ فضایل خان فرمودند کہ وکیل بہادرخان را بہ پرسید کہ از آن روزی کہ خان مذکور داخل درہ تل کوکن شدہ چیزی خبر آمدہ است چنانچہ پرسیدہ عرض نمود کہ وکیل التماس دارد بہ بندہ چیزی خبر نیامدہ است شنیدہ خاموش ماندند ـ

از عرضہ داشت خان جہان بہادر بعرض رسید کہ ناروجی تہانہ دار سنگمنیر نوشتہ کہ قریب شش ہفت ہزار سوار غنیم براے تحصیل چوتہای آمدہ اند بنابران مظفرخان و راو محکم سنگہ و غیرہ فوج بطرف اوندہ پتہ تعین نمودہ بود کہ در آن جا راہ مسدود نمایند بعد تعین نمودن آنہا بندہ نیز سواری نمودہ محاصرہ کردہ متصل موضع بہوجپورہ مقابلہ نمودہ جنگ واقعہ شد از اقبال حضرت بسیاری مقہوران بقتل رساندہ و لکہموجی سردار فوج غنیم را بجان کشتہ و باقی گریختہ رفتند و چندی مردم این جانب بکار آمدہ و زخمی شدند سر لکہموجی بریدہ ارسال خواہم داشت مطالعہ خاص در آوردند ـ

سید اوغلان عرض نمود کہ شہاب الدین خان بہ بندہ نوشتہ است کہ جاسوسان خبر آوردند کہ افواج غنیم از ملک خود بیرون آمدہ می خواہند کہ بطرف تہالنیر آوارہ شوند از این جہتہ بندہ مستعد شدہ ہر جا کہ خبر

غنیم بیابم سواری کردہ تنبیہ خواهم کرد حکم شدہ بہ خان مذکور بنویسد کہ اندرون درہ متعاقب غنیم برود کہ از حراست خبردار باشد و اگر مردم غنیم شوخی نمایند تنبیہ رسانند ـ

نو سرافراز فرمودند

هرکرن ولد جیسنگہ تجویز محتشمخان زمینداری هربنس کہیرہ مقرر شد چہار بیستی ۲۰ سوار ـ مہارای ولد بہان پروهیت صد پنجاهی ۱۰ سوار ـ

دربارخان عرض نمود کہ مکرمخان خطی نوشتہ مردم جاسوسان خبر آوردند کہ دو هزار سوار غنیم لئیم موضع سہندلی برای تاخت آمدہ اند بنابران فدوی بتاریخ سلخ ذی قعدہ اسباب زیادتی و مردم بہیررا در قلعہ بدر گذشتہ بجہتہ تنبیہ شتافتہ آخرش مقہوران متصل موضع یورن پانزدہ کروہ این طرف از موضع سہندلی مقابلہ نمودہ از اقبال حضرت بسیار کسرا بقتل رسانیدہ و پنجاہ کس را زندہ دستگیر نمودہ باقی گریختہ رفتند و چندی مردم این جانب بکار آمدہ و زخمی شدند بعد از آن بموضع سہندلی دیرہ نمودہ مفصل حقایق از عرضداشت بعرض خواهد رسید فرمودند مجری خان مذکور شد ـ

फजाइलखानास हुकूम झाला तो असा:—बहादुरखानाच्या वकिलास विचारावें कीं, खान तळकोंकणांत दाखल झाला त्या दिवसापासून कांहीं बातमी आली कां? त्यानें अर्ज केला : वकील विनंति करतो कीं, माझ्याकडे कांहीं बातमी नाहीं. ऐकून बादशाह गप्प बसला.

खानजहान बहादुराच्या अर्जावरून समजलें तें असें:—संगमनेरचा ठाणेदार नारोजी यानें लिहिलें आहे कीं, गनिमाचे जवळजवळ सहा सात हजार स्वार चौथ वसूल करण्यासाठीं आले आहेत. म्हणून मुजफ्फरखान व राव मुहक्कमसिंग व इतर यांच्या ज्या फौजा औंढापट्ट्याकडे नेमल्या होत्या त्यांना येथें वाटा रोखावयास लाविलें आहे. नंतर मी स्वारी करून व वेढा घालून भोजपुऱ्याजवळ शत्रूशीं लढाई केली. बादशाही सुदैवानें अनेक शत्रूंना मारून त्यांच्या फौजेचा सरदार लखमोजी यासही जिवें मारिलें. बाकीचे लोक पळून गेले. इकडील कांहीं जखमी झाले. लखमोजीचें शीर कापून पाठविलें आहे. तें बादशाहाच्या खास पाहण्यांत आलें.

सय्यिद ओघलान यानें अर्ज केला तो असा:—शिहाबुद्दीखानानें त्याला

लिहिलें आहे कीं, 'शत्रूच्या फौजा स्वतःच्या मुलुखांतून बाहेर येऊन थाळनेरकडे जाऊं इच्छितात अशी बातमी हेरांनीं आणिली; म्हणून मी तयार राहून शत्रूच्या येण्याची बातमी येईल तेव्हां स्वारी करून तंबी देऊं इच्छितों. यावर खानास कळविण्याबद्दल हुकूम झाला कीं, त्यानें खोऱ्यांतील बाजूस शत्रूच्या पाठलागास जावें आणि संरक्षणाबद्दल खबरदार असावें. शत्रूच्या लोकांनीं खोडी केली तर त्यांस तंबी द्यावी.

नवीन मानकरी फर्माविले ते असे:—मुहतशिमखानाच्या तजविजेनें हरकर्ण वलद जयसिंह यास हरबंस खेडयाच्या जमीनदारीवर नेमिलें. चार बीस्ती व २० स्वार आणि महाराय वलद भान पुरोहित दीडशती १०० स्वार.

दरबारखानानें अर्ज केला तो असा:—'मुकर्रमखानानें पत्र लिहिलें आहे कीं, शत्रूचे २००० स्वार महिंदली (री ?) खेडयामध्यें लुटालूट करण्यासाठीं आले आहेत. म्हणून जिल्काद महिन्याच्या शेवटच्या तारखेस जास्तीचें सामान व बुणगे यांना किल्ल्यामध्यें सोडून मी तंबी देण्यासाठीं धावलों. नंतर शत्रूनें महिंदली अलीकडे पंधरा कोसांवर असलेल्या योरणजवळ सामना दिला. बादशाही सुदैवानें अनेकांना मारून पन्नास लोकांना जिवंत पकडलें. बाकीचे पळून गेले. इकडील कांहीं लोक कामास आले आणि कांहीं जखमी झाले. त्यानंतर महिंदली येथे डेरा उभा केला. घटनांचा सविस्तर अर्ज पाठवीत आहे.' हुकूम झाला कीं, खानाचें म्हणणें मान्य आहे.

३७७

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्हेज १२<br>शनि | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی الحجہ ۱۲ سنہ<br>یوم السبت سنہ ۲٦ | श. १६०४ मार्गशीर्ष शुद्ध १३<br>इ. १६८२ डिसेंबर २ |

اهتمام خان عرض نمود کہ راجہ درگ سنگہ ولد راجہ دیبی سنگہ بندیلہ خطی نوشتہ است کہ فدوی موافق حکم براے تنبیہ تہاکو بنجارہ از پید گانو کوچ نمودہ پانزدہ ۱۵ کروہ این طرف رسیدہ بہ مردم زمینداران گفتہ فرستادہ کہ مردم غنیم براے تحصیل چوتہای آمدہ باشد خبر نمایند کہ تنبیہ رسانم چنانچہ زمیندار و جاسوسان خبر آوردند در پرگنہ کوتہہ مانکو بلال پندت و لکہماجی مردم غنیم قریب سہ ۳ هزار سوار آمدہ بنابران ازین استماع بندہ سواری نمودہ مقابلہ غنیم رسیدہ چنانچہ کوتہ یراق در پیش آمدہ جنگ

واقعہ شد از اقبال حضرت مانکو بلال بمعہ سیصد ۳ کس بقتل رساندہ و اکھماجی وغیرہ ہزیمت خوردہ گریختہ رفتند چنانچہ نشان و طورهی(؟) و چهتری و یک اسپ سواری سردار و نود و هشت اسپ مادیہ بدست آوردہ بحضور فرستادہ و بسیاری مردم غنیم زخمی ساختہ دان سنگہ عموزادہ بندہ بمعہ پنجاہ کس بکار آمدہ و یک صد پنجاہ تابینان زخمی شدند و فدوی‌را نیز زخم دهوپ رسیدہ فتح بادشاهی شد بعد معروض فرمودند کہ آنچہ اسپان و غیرہ متاع غنیم بدست آوردہ معاف نمودیم کہ مجری راجہ مذکور کلی شد —

इहतिमामखानाने अर्ज केला तो असा:--- राजा दुर्गसिंग वलद राजा देवीसिंग बुंदेला ह्यानें मला पत्र लिहिलें कीं, हुकुमाप्रमाणें थाकू बंजाऱ्यास तंबी देण्यासाठीं मी पेडगांवाहून कूच केलें व पेडगांवाच्या अलीकडे पंधरा कोसावर येऊन पोहोंचलों. नंतर जमीनदारांना सांगून पाठविलें कीं, शत्रूचे लोक चौथ वसूल करण्यासाठीं आले तर त्यांची बातमी द्यावी, म्हणजे मी त्यांना तंबी देईन. जमीनदारानें व हेरांनीं बातमी आणली कीं, परगणे कबठें येथें तीन हजार स्वारांसह माणको बल्लाळ पंडित व लखमाजी आले आहेत. हें ऐकून मी स्वारी करून शत्रूशीं सामना दिला. नंतर आखूड (कोतह यराक) हत्यारांची लढाई झाली. बादशाही सुदैवामुळें माणको बल्लाळ वगैरे तीनशे लोकांना मारलें. लखमाजी वगैरे पळून गेले. निशाण, तुरा, छत्री, सरदाराच्या स्वारीचा एक घोडा व ९८ घोडया हातीं आल्या आहेत. तें सर्व हुजूर पाठविलें आहे. शत्रूचे अनेक लोक जखमी झाले. माझा भाचा दानसिंग इतर पन्नास लोकांसह कामास आला. माझे १५० लोक जखमी झाले. मला देखील धूप लागून जखम झाली. बादशाही फत्ते झाली. यावर हुकूम झाला कीं, शत्रूचे घोडे व इतर सामान हातीं आलें आहे तें माफ केलें आहे. राजाचे म्हणणें मान्य आहे.

३७८

| जु. २६ जिल्हेज १३ रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ ذی الحجہ ۱۳ سنہ یوم الاحد سنہ ۲٦ | श. १६०४ मार्गशीर्ष शुद्ध १४ इ. १६८२ डिसेंबर ३ |
|---|---|---|

باباجی ولد بتهوجی از تعیناتی فوج خان جهان بهادر طلب حضور فرمودند پانصدی دو صد سوار(؟) بہ روح اللہ خان فرمودند کہ حسب‌الحکم بہ

احمد خان تهانہ دار انتورہ بنویسد کہ بہ شما حکم شدہ بود کہ پانصد
سوار تجویزی خود نگاہ دارد درین ولا موقوف نمودہ نگاہ ندارد ـ

खानजहान बहादुराच्या फौजेंतील बाबाजी वलद विठोजी पंचशती २०० स्वार यास हुजूर बोलाविण्याचा हुकूम झाला. रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असाः---अंतूरचा ठाणेदार अहमदखान यास हस्बुलहुकूम लिहावा कीं, 'तू स्वतःच्या देखरेखीखाली ५०० स्वार नेमावेस असा हुकूम झाला होता तो स्थगित केला आहे. ठेवूं नये

३७९

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्हेज १५<br>मंगळ. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماہ ذی الحجہ ۱۵ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۶ | श. १६०४ मार्गशीर्ष वद्य १<br>इ. १६८२ डिसेंबर ५ |

روح الله خان عرض نمود کہ مانکوجی تهانہ دار شکارپور خطی نوشتہ کہ
نارو ترمل سردار سنبہا مقہور با جمعیت کثیر این نواحی آمدہ فدوی سواری
کردہ مقابلہ نمودہ مفسد مذکوررا شکست دادہ بسیاری کس را بقتل
رسانیدہ و زخمی ساختہ و پنجاہ اسپ و چہل شمشیر مقہوران بدست آوردہ
فرمودند مجری شد ـ

रूहुल्लाहखानानें अर्ज केला तो असाः--- शिकार (शिक्रा)पूरचा ठाणेदार माणकोजी यानें पत्र लिहिलें कीं, संभाचा सरदार नारो त्रिमल मोठ्या जमेतीसह या भागांत आला तेव्हां मी स्वारी करून त्याशीं सामना दिला. बंडखोरांचा पराजय करून अनेकांना मारलें व जखमी केलें. शत्रूचे पन्नास घोडे व चाळीस तलवारी हातीं आल्या. हुकूम झाला 'मान्य आहे'

३८०

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्हेज १६<br>बुध. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماہ ذی الحجہ ۱۶ سنہ<br>یوم الاربع سنہ ۲۶ | श. १६०४ मार्गशीर्ष वद्य २<br>इ. १६८२ डिसेंबर ६ |

عرضہ داشت خان جہان بہادر آمدہ بنظر گذشت معروض داشتہ بود کہ
جمعیت غنیم جانب ترمک آمدہ بود بنابران مظفرخان خانہ زادرا معہ
فوج برائے تنبیہ تعین نمودہ آخرش جنگ واقع شدہ از اقبال حضرت
بسیار کس را بقتل رساندہ شکست دادہ باری قلعہ را سوختہ آمدہ بعد

معروض یک زنجیر فیل قیمت هزار روپیہ برائے مظفرخان بابت فتح
مرحمت نمودہ حوالہ وکیل فرمودند کہ بفرستند ـ

खानजहान बहादुराचा अर्ज आला तो पाहिला. त्याचा आशय असा :— गनिमाची जमेत त्रिंबकच्या बाजूस आली होती म्हणून माझा मुलगा मुजफ्फरखान यास फौजेसह तिला तंबी देण्यासाठीं नेमिलें; लढाई झाली; बादशाही सुदैवानें त्यानें अनेकांना मारलें व गनिमाचा पराजय केला. त्यानंतर किल्ल्याची वाडी जाळून तो परतला. यावर या विजयाबद्दल एक हजार रुपयांचा हत्ती मुजफ्फरखानाच्या वकिलाच्या हवाली केला व हुकूम झाला कीं, 'पाठवून द्यावा.'

## ३८१

| जु. २६ जिल्हेज १७ गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ ذی الحجہ ۱۷ سنہ یوم الخمس سنہ ۲٦ | श. १६०४ मार्गशीर्ष वद्य ३ इ. १६८२ डिसेंबर ७ |
|---|---|---|

بروح الله خان فرمودند کہ خان جہان بہادر مچلکہ دادہ بود کہ قلعہ
رام سیج را بہ تصرف بادشاهی بیارم چنانچہ نیاوردہ چہ قدر مبلغ سرکار والا
خرچ نمودہ بعرض رساند عرض نمود کہ سی هفت هزار شش صد و سی روپیہ
نقد و جنس خرچ شدہ اند حکم شدہ داخل مطالبہ خان مذکور نمایند ـ

रुहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, 'खानजहान बहादुरानें रामसेजचा किल्ला बादशाही अमलाखालीं आणीन असा मुचलका दिला होता; परंतु त्याप्रमाणें तो आणला नाहीं. त्यासाठीं सरकारी रकम किती खर्चीं पडली आहे त्याबाबत अर्ज करावा. त्यानें अर्ज केला कीं, रोख व जिन्नस मिळून ३७६३० रुपये खर्च झाले' हुकूम झाला कीं, ते खानाच्या मागण्यांमध्यें दाखल करावे.

## ३८२

| जु. २६ जिल्हेज २१ सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ ذی الحجہ ۲۱ سنہ یوم الاثنا سنہ ۲٦ | श. १६०४ मार्गशीर्ष वद्य ७ इ. १६८२ डिसेंबर ११ |
|---|---|---|

شاہ عالم جیو یک مالا مروارید پیشکش گذرانیدہ بندگان حضرت
جانب لوہ گدہ جہتہ سیر و شکار رخصت نمودہ حکم شد شکارخان قراول

همراه برود _

فضایل خان عرض نمود که هرکاره نوشته بهادر خان به بنده آورده زبانی ظاهری نماید که خان مذکور در آمد دره تل کوکن شده تا به قلعه تمهرنی رسیده یک مقام نموده قلعچه طیار می کناند و در راه از جهازات رسد غله میرسد سری روپیه نه ده اثار غله و یک اثار روغن آنرا نرخ در لشکر بود و اکثر زمینداران آن ضلع نیز متفق شده اند بعد طیار نمودن قلعچه موافق حکم عبدالفیاض خان میانه را بمعه جمعیت در آن جا گذاشته روانه پیشتر خواهد شد و چند مرتبه جمعیت غنیم نمودار شده بود از اقبال حضرت شکست داده نوشتجات خان مذکور نیز بنظر گذرانید بمطالعه خاص در آوردند _

शाहआलमनें पोवळ्यांची एक माळ बादशाहास भेट दिली. बादशाह लोहगडाकडे फेरफटका व शिकारीसाठीं रवाना झाला. हुकूम झाला कीं, शिकारखान करावल यानें बरोबर यावें.

फजाइलखानानें अर्ज केला तो असा:— बहादुरखानानें मला लिहिलेलें (पत्र) हरकाऱ्यानें आणून तोंडीं सांगितलें कीं, 'उपर्युक्त खान तळकोंकणच्या खोऱ्यांत उतरण्याच्या वाटेवर येऊन किले टेंभुरणीस पोहोंचला. तेथून एका मुक्कामाच्या अंतरावर तो एक गढी तयार करवीत आहे व वाटेंतील ठिकाणांवर जहाजांतून धान्याची रसद पोचवीत आहे. लश्करामध्यें रुपयास नऊ-दहा शेर धान्य व एक शेर तेल, असे भाव आहेत.'

या जिल्ह्यांतील बहुतेक जमीनदार एकत्र आले आहेत. गढी तयार झाल्यावर हुकुमाप्रमाणें अब्दुलफय्याजखान मियाना जमेतीसह तेथें सोडून पुढें जाऊं इच्छितो. शत्रूचे लोक दिसले त्या त्या वेळीं बादशाही सुदैवानें त्यांचा पराजय केला. खानानें लिहिलेलें पत्रही बादशाहाच्या नजरेखालीं घातलें. बादशाहानें तें पाहिलें.

३८३

| जु. २६ जिल्हेज २२<br>मंगळ. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ذی الحجه ۲۲ سنه<br>یوم الثلث سنه ۲۶ | श. १६०४ मार्गशीर्ष वद्य ९<br>इ. १६८२ डिसेंबर १२ |
|---|---|---|

از واقعه فوج خان جهان بهادر بعرض رسید که ترمل راو تهانه دار دندوری و غیره تملکه داده بودند که مردم غنیمرا بسرحد خود آمدن نخواهم داد

چنانچہ از قلعہ اوسر مفسد مذکور بر آمدہ چہار نفر متصل موضع بالکہندرا دستگیر نمودہ بردند بنابران کم فرمودند —

| مشارالیہ | محمت والی قلعہ‌دار | مالوجی تھانہ‌دار تس‌گانو |
|---|---|---|
| اصل ہزاری کمی | چاندور اصل سیصدی | اصل صد پنجاہی کمی |
| دوصدی — | کمی صدی — | پنجاہی — |

खानजहान बहादुराच्या फौजेंतील घटनांवरून समजलें कीं, दिंडोरीचा ठाणेदार त्रिमलराव वगैरेंनीं 'शत्रूच्या लोकांना आपल्या हद्दींत येऊं देणार नाहीं' असे मुचलके लिहून दिले होते. पण पुढें बंडखोरानें ओसरच्या किल्ल्यांतून बाहेर येऊन मौजे बालखंड येथील चार लोकांना पकडून नेलें. म्हणून खालील लोकांची मनसब कमी केली. त्रिमलराव=मूळ १०००; कमी २००. चांदवडचा किल्लेदार मुहिमत (महिपत?)=मूळ ३००; कमी १००. तिसगांवचा ठाणेदार मालोजी=मूळ १५०; कमी ५०.

३८४

| जु. २६ जिल्हेज २४ गुरु. | سیاہہ اخبارات دربار معلے ماہ ذی الحجہ ۲۴ سنہ یوم الخمس سنہ ۲۶ | श. १६०४ मार्गशीर्ष वद्य ११ इ. १६८२ डिसेंबर १४ |
|---|---|---|

بموجب انتخاب خط کار طلب خان متصدی سورت بعرض رسید —

اول آنکہ در باب چہل و پنج کس نوکران سنبہا مقہور حکم شدہ بود کہ ہرکس مسلمان شود قید نگاہ دارد و باقی را بقتل رساند چنانچہ بندہ بموجب حکم جماعت کہ مسلمان شدند اورا مسلمان کردہ سیزدہ نفر بقتل رساندہ و محپت نام سردار مقہور در قید است درباب خلاص او بندی(؟) یعقوب خان معروض داشتہ است حکم شدہ کہ بخان مذکور بنویسد کہ ہرکس مسلمان شدہ بمعہ محپت مذکور بحضور بفرستند —

دویم بموجب حکم دو صد سوار تابینان خود ہمراہ عزتخان بتاریخ ۲۴ ذی قعدہ سنہ حال روانہ ملک غنیم نمودہ و خزانہ این جا ہمراہ سبحان بیگ با دو ہزار روانہ حضور کردہ حکم شد خوب کردہ —

सुरतेचा मुत्सद्दी कारतलबखान यानें पाठविलेल्या पत्रावरून समजलें तें असें— (१) संभाच्या पंचेचाळीस नोकरांबद्दल हुकूम झाला होता कीं, मुसलमान होतील त्यांना कैदेंत ठेवून त्यांवर लक्ष ठेवावें आणि उरलेल्यांना

मारावें. हुकुमाप्रमाणें मी त्यांपैकीं मुसलमान होऊं इच्छीत होते त्यांना मुसलमान करून बाकी तेरा लोकांना ठार केलें. शत्रूचा महिपत नांवाचा सरदार कैदेंत आहे. त्याला सोडण्याबाबत याकूबखानानें मला विनंति केली आहे.' हुकूम झाला तो असा:--- 'खानास लिहावें कीं, महिपतसह जे मुसलमान झाले त्यांना हुजूर पाठवावें.' २) 'हुकुमाप्रमाणें चालू वर्षाच्या २४ जिल्काद या दिवशीं माझे दोनशें स्वार इझ्झतखानाबरोबर देऊन शत्रूच्या मुलखांत पाठविले व दोन हजार स्वार सुभानबेगबरोबर देऊन इकडील खजिना हुजूर पाठविला आहे.' हुकूम झाला कीं, छान केलें.'

३८५

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्हेज २६<br>शनि. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ذی الحجہ ۲۶ سنہ<br>یوم السبت سنہ ۲۶ | श. १६०४ मार्गशीर्ष वद्य १३<br>इ. १६८२ डिसेंबर १६ |

از واقعہ بدر بعرض رسید کہ مردم غنیم لئیم جہتہ تحصیل چوتھای آن ضلع آمدہ بود چند دیہات را تاخت نمودہ بند مویشی و غیرہ متاع متصرف شدہ جانب صوبہ برار رفتند و مکرمخان تغافلی نمودہ برائے تنبیہ مقہوران سواری نہ کردہ چنانچہ خان مذکور دو ہزار پانصد ذات یک ہزار دو صد سوار بود از روی اعتراضی پانصدی ذات و دو صد سوار کم کردہ حکم شدہ فوج خان مذکور ہمراہ الہام اللہ خان و قاسم خان و بہروزخان تفریق نمودہ تعین سازند و یوسف بیگ گرزبردار رفتہ سزاولی کردہ خان مذکوررا بمعہ گرز برداران بحضور بیارد ــ

बीदरच्या घटनांवरून समजलें कीं, शत्रूचे लोक चौथ वसूल करण्यासाठीं त्या जिल्ह्यांत गेले होते. त्यांनीं कांहीं गांवें लुटलीं आणि माणसें व जनावरें घेऊन ते वऱ्हाडकडे गेले. मुकर्रमखानानें निष्काळजीपणा करून शत्रूला तंबी देण्यासाठीं स्वारी केली नाहीं. खान मजकुरास २५०० जात, १२०० स्वार अशी मनसब होती. पैकीं गैरमर्जीमुळें ५०० जात, २०० स्वार कमी करण्याचा आणि त्याची फौज इल्हामुल्लाहखान, कासिमखान व बहरोझखान यांमध्यें वाटून देऊन त्यास युसफबेग गुर्जबर्दारानें सजावली करून हुजूर आणावें असा हुकूम झाला.

३८६

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्हेज २७<br>रवि. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ذی الحجه ۲۷ سنه<br>یوم الاحد سنه ۲۶ | श. १६०४ मार्गशीर्ष वद्य १४<br>इ. १६८२ डिसेंबर १७ |

در باب ایسا زمیندار تل‌کوکن حکم شد که بمعه هزار نفر پیاده خودرا نزد شهاب‌الدین خان رساند بموجب نوشته قاسم خان بعرض رسید که بنده موافق حکم بجهته تنبیه تهاکو بنجاره روانه شده در اکوله رسیده آنچه قلعچه مفسد بود مسمار ساخته بتاریخ ۲۱ شهر حال روانه شده هر جا که حکم است خودرا خواهم رساند و اکثر منصب‌داران تعینات همراه فدوی تا حال نه رسیدند و امیدوارم که لوازمه توپخانه و ده نفر هرکاره تعین شوند حکم شد که هرکاره های از همراهی مکرم خان تعین نمایند و در باب لوازمه حکم شد که آتش‌خان بعرض رساند ـ

तळकोंकणचा जमीनदार एसा याज़बाबत हुकूम झाला कीं, त्यानें १००० पायदळासह शिहाबुद्दीनखानाकडे जावें.

कासिमखानानें लिहिलें आहे तें असें:-- 'हुकुमाप्रमाणें मी थाकू बंजाऱ्यास तंबी देण्यासाठीं गेलों, अकोल्यास पोहोंचलों व तेथें बंडखोरांची गढी होती ती पाडली. चालू महिन्याच्या २१ तारखेस तेथून निघालों असून जाण्याचा हुकूम होईल तिकडे जाऊन पोहोंचत आहे. माझ्याबरोबर नेमलेले बहुतेक मनसबदार अजून पोहोंचले नाहींत. आशा करतों कीं, तोफखाना आणि दहा हरकारे लोकांची नेमणूक होईल. हुकूम झाला कीं, 'मुकर्रमखाना-बरोबर असलेल्या हरकाऱ्यांपैकीं कांहीं नेमावे. तोफखान्याबद्दल हुकूम झाला कीं, 'आतिशखानानें अर्ज करावा'.

३८७

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्हेज २८<br>सोम. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ذی الحجه ۲۸ سنه<br>یوم الاثنا سنه ۲۶ | श. १६०४ मार्गशीर्ष वद्य ३०<br>इ. १६८२ डिसेंबर १८ |

فرمان بنام خان‌جهان بهادر صادر نموده که جمعیت غنیم لئیم جهته تحصیل چوتهای بسمت صوبه برار آمده بندبران خودرا بمعه فوج جهته تنبیه مقهور آن جا رساند حواله عزیزالله بیگ گرزدار نموده حکم شد که عمدة‌الملک را سزاولی کرده به برار رساند و حسب‌الحکم به مهر

روح الله خان بنام ایرج خان صوبه‌دار برار حوالہ گرزدار مذکور فرمودند ـ

فرمان بنام مغل‌خان صادر شده مضمون آنکه شمارا سه ۳ هزار شش صد ٦ و پانزده سوار را سردار فوج مقرر نموده خودرا به پونه‌دهر رساند و مردم غنیم اگر در آن ضلع بیاید تنبیه رساند حواله سید میر گرزبردار نموده بموجب ذیل از فوج شاهزاده معزالدین همراه خان مذکور تعین فرمودند ـ

खानजहान बहादुराच्या नांवें फर्मान सादर झालें कीं, चौथ वसूल करण्यासाठीं शत्रूचे लोक वऱ्हाडकडे आले आहेत. तरी शत्रूला तंबी देण्यासाठीं त्यानें स्वतः फौजेसह तेथें पोहोंचावें. फर्मान अझीझुल्लाहबेग गुर्जबर्दाराच्या हवाला केलें व हुकूम झाला कीं, त्यानें उम्दतुल्मुल्काची सजावली करून त्यास वऱ्हाडांत पोहोंचवावें. तसेंच वऱ्हाडचा सुभेदार ईरजखान याच्या नांवें रूहुल्लाहखानाच्या शिक्क्याचा हस्बुलहुकूम गुर्जबर्दाराच्या हवाला करावा.

मुघुलखानाच्या नांवें फर्मान सादर झाला कीं, 'तुला ३६१५ स्वारांच्या फौजेचा सरदार नेमलें आहे. तू पुरंधर येथें पोहोंचावेंस आणि शत्रूचे लोक त्या ज़िल्ह्यांत आले तर त्यांना तंबी द्यावी'. फर्मान सय्यिद मीर गुर्जबर्दाराच्या हवाला केलें. मुइझ्झुद्दीनाच्या फौजेंतील लोक उपर्युक्त खानाबरोबर नेमले ते पुढीलप्रमाणें [ येथें कोणाही मराठ्याचें नाव नाहीं. *]

## ३८८

| | | |
|---|---|---|
| जु. २६ जिल्हेज २८<br>सोम. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ذی الحجه ۲۸ سنه<br>یوم الاثنا سنه ٢٦ | श. १६०४ मार्गशीर्ष वद्य ३०<br>इ. १६८२ डिसेंबर १८ |

خوجه حسین بیگ و غیره ده نفر منصب‌دار عرضداشت شهاب‌الدین ـ خان آورده بنظر گذرانیده معروض داشته بود که بتاریخ ۱۳ شهر حال در چاکنه به قدوی خبر رسید که مردم غنیم جانب لوه‌گده آمده اند بنابران بنده سواری نموده در آن جا رسید قریب شصت ٦٠ نفر بقتل رسانده و در این ضمن خبر رسیده که مردم غنیم ایساپور آمده چوتهای تحصیل می نمایند چنانچه فدوی سه ۳ کروه شتافته در آن جا رسید و اکثری‌را بقتل رسانیده و زخمی ساخته شکست داده بود درین ولا خبر یافته که مردم غنیم در پرگنه قصور (؟) آمده در آن جا رسیده با مردم غنیم مقابله نموده جنگ واقعه شد قریب یک صد پنجاه کس از مردم غنیم بقتل رسانیده و بسیار کس‌را زخمی ساخته فتح

بادشاهی شده و اکثر مردم این جانب بکار آمده و هشتاد مواضع غنیم‌را تاراج نموده بیست هفت قبضه دهوپ و بندوق و چهل سه ۳ بهالہ و یک پالکی و پنج نشان و دو جفت نقاره بدست آورده بند مویشی مردم غنیم بسیار همراهیان فدوی متصرف شده بعد مطالعه فرمودند که مجری کلی شد به روح‌الله خان فرمودند خان مذکوررا داروغگی گرزبرداران از تغیر مکرم‌ـ خان مقرر نموده داخل سیاهه نمایند و سید اوغلان نیابت سربراه نماید و خلعت بابت خدمت و فرمان و شمشیر بابت فتح نمودن غنیم صادر نموده حواله سید اوغلان نموده که بفرستند ـ

खोजा हुसैनबेग वगैरे दहा लोकांनीं शिहाबुद्दीनखानाचा अर्ज आणून नजरेखालीं घातला तो असा:—'चालू महिन्याच्या १४ तारखेस चाकण येथें मला बातमी कळली कीं, शत्रूचे लोक लोहगडाकडे आले आहेत. म्हणून मी स्वारी केली. शत्रूच्या जवळजवळ ६० लोकांना मारलें. पुढें बातमी लागली कीं, शत्रूचे लोक इसापूर ( विसापूर ) येथें येऊन चौथ वसूल करीत आहेत. म्हणून मी तीन कोस धावून गेलों. शत्रूपैकीं बहुतेकांना मारून व जखमी करून त्यांचा पराजय केला. नंतर बातमी मिळाली कीं, शत्रूचे लोक परगणे कुसूर येथें आले आहेत. मी तेथें पोहोचलों व शत्रूशीं लढाई दिली. शत्रूचे जवळजवळ दीडशें लोक मारले व अनेकांना जखमी केले. बादशाही फत्ते झाली. तसेंच इकडील बाजूचे बहुतेक सर्व लोक कामास आले. शत्रूचीं अठरा खेडीं लुटलीं. २७ धूप, १ बंदूक, ४३ भाले, एक पालखी, पांच निशाणें व नगाऱ्याचे दोन जोड आणि शत्रूचे अनेक लोक व जनावरें माझ्या हातीं आलीं.' अर्ज पाहिल्यावर हुकूम झाला कीं, मान्य आहे. रूहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, 'मुकर्रमखानास बदलून उपर्युक्त खानास गुर्जबर्दारांच्या दारूग्याच्या हुद्यावर नेमावें व तसें रोजनाम्यांत दाखल करावें. तसेंच चाकरीबद्दल खिलत व शत्रूवरील विजयाबद्दल फर्मान व तलवार सय्यिद ओघलानच्या हवाला करून त्याजकडे पाठविण्यास सांगावें.

३८९

| जु. २६ मोहरम १ गुरु. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه محرم غره سنه<br>یوم الخمس سنه ۲۶ | श. १६०४ पौष शुद्ध २<br>इ. १६८२ डिसेंबर २१ |
|---|---|---|

ملازمت

سیواجی کہ همراه احمدخان تهانه‌دار انتوره از فوج غنیم فتح نموده آورده بحضور ارسال داشته ... مهر ... پانصدی ذات سیصد سوار بود پنجاه سوار اضافه نموده همراه خان مذکور رخصت فرمودند ـ

محمد جعفر برادر آتش خان برائے رسانیدن خزانه به پرینده رفته بود مشارالیه ... مهر ... احمد همراه مشارالیه ـ

بروح الله خان فرمودند که حسب الحکم بنام سید منورخان صوبه‌دار برهانپور بدین مضمون بنویسد ـ

خواصیان و غیره بیگم صاحب از شاه جهان آباد بحضور می آیند هرگاه داخل برهانپور شوند با جمعیت خود تا کتل فردا پور رساند و علی قلی خان بمعه چهار صد هشتاد چهار سوار از حضور رفته از آن جا بیارد ـ

چون فوج غنیم از جانب بگلانه آواره شده قصد آمدن آن جا دارد باید که به تهانه‌داران این نواحی تاکید برنگارد و خود نیز از بندوبست بواقعی خبردار باشد ـ

بموجب نوشته مقیم‌خان قلعه‌دار بهادرگده بعرض رسید که مهنداجی فوجدار نواحی قلعه این جا از بندوبست خبردار بود چنانچه مشارالیه موافق حکم به تمرنی رفته جهته محافظت قلعه جمعیت درکار است حکم شده پانصد سوار تعین نمایند ـ

از التماس شیر افگن بخشی واقعه‌نویس فوج الهام الله‌خان بعرض رسید که در راه قطور است اگر حکم شود همراه منور بیگ حاجب بیجاپور بمردم ... منظور فرمودند ـ

بروح الله خان فرمودند که حسب الحکم به بهادرخان بنویسد عرضه داشت در باب مستحکم نمودن تهانه کلیان بهمری ارسال داشته بود بنظر گذشت باید که براه ناندنج و غیره براهی که لشکر عبور می تواند شد و تهانجات مستحکم جا بجای مقرر تواند کرد همان راه روانه ملک غنیم شود و هر کیفیتی که روی دهد متواتر معروض داشته باشد ـ

चाकरी

अंतूरचा ठाणेदार अहमदखान यानें शत्रूवर विजय मिळवून शिवाजीस हुजूर पाठविलें होतें. तो ५०० जात, ३०० स्वार असा मनसबदार होता. त्यांत

५० स्वारांची वाढ करून त्यास उपर्युक्त खानाबरोबर परत पाठविलें.

आतिशखानाचा भाऊ मुहम्मद जअफर हा खजिना पोहोंचविण्यासाठीं परिंड्यास गेला होता. उपर्युक्त ‥मुहर‥ उपर्युक्ताच्या सांगातीचा अहमद.

रूहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, बुर्हानपूरचा सुभेदार सय्यिद मुनव्वरखान याच्या नांवें हस्बुलहुकूम लिहावा तो असा:—बेगमसाहेबाचे खासे व इतर शाहजहानाबादेहून हुजुरास येत आहेत. त्यांना बुर्हानपुरापासून ते फर्दापूरच्या पठारापर्यंत स्वतःच्या लोकांसह पोहोंचवावें. तसेंच अलीकुलीखानानें ४८४ स्वारांसह हुजूराहून जाऊन त्यांना तेथून आणावें.

शत्रूची फौज बागलाणाकडे फिरत असून तिचा तिकडे येण्याचा विचार आहे. तेव्हां त्या भागांतील ठाणेदारांना नीट व्यवस्था ठेवण्याबद्दल लेखी ताकीद द्यावी. स्वतः देखील तिकडील बंदोबस्ताबद्दल खबरदार असावें.

बहादुरगडचा किल्लेदार मुकीमखान याच्या लिहिल्यावरून समजलें कीं, त्या भागांतील फौजदार महादजी तिकडील बंदोबस्ताबद्दल खबरदार होता. तो हुकुमाप्रमाणें टेंबुर्णीस गेला. किल्ल्याच्या संरक्षणासाठीं लोकांची आवश्यकता आहे. हुकूम झाला कीं, 'पांचशें स्वार नेमावे'.

इल्हामुल्लाहखानाच्या फौजेंतील वाकेनवीसीचा बक्षी शेर अफगन याचा अर्ज आला कीं, वाटेनें पाणी आहे. हुकूम झाला तर विजापूरचा हेजीब मुनव्वरबेग याजबरोबर लोकांना पाठवीन. तें मान्य असल्याचा हुकूम झाला.

रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा:—बहादुरखानास हस्बुलहुकूम लिहावा कीं, 'तू कल्याण-भिवंडी येथें ठाणें उभें करण्याबद्दल अर्ज पाठविला होतास तो पाहिला. नांदनज (नान्नज) वगैरे मार्गानें बादशाही लश्कर पार होऊं शकेल काय ? ठिकठिकाणीं पक्की ठाणीं घालून त्याच मार्गानें शत्रूसंबंधीं घडेल तें नेहमीं लिहीत जावें.

३९०

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम ३<br>शनि. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۳ سنه<br>یوم السبت سنه ۲۶ | श. १६०४ पौष शुद्ध ४<br>इ. १६८२ डिसेंबर २३ |

بهادر علی جهته دیدن شکار بمعه جریب رفته بود چنانچه قصبه عنبرپور جاگیر بهادرخان رفته سه ۳ منازل مشخص نموده هنگام برگشتن براه جام کهیره

شکار دیده آمده ملازمت نموده یک اشرفی نذر گذرانیده و طومار منازل بنظر گذرانیده حکم شد که آخر روز آمده حقایق شکار بعرض رساند ـ

روح الله خان عرض نمود که بهادرخان به بنده نوشته که هفت هزار سوار و هشت هزار پیاده جمعیت غنیم آمده بود بنده خبر یافته در کلیان بهمری قلعچه احداث کرده تهانه مستحکم نشانده بتاریخ ۸ ذی الحجه با مردم غنیم مقابله نموده از اقبال حضرت بسیار کس‌را بقتل رسانده و هزیمت داده اسپان مادیه و چهتری و دهوپ وغیره بدست آورده درین ضمن خبر رسیده که جمعیت غنیم قریب ده هزار سوار و دوازده هزار پیاده آمده بتاریخ ۱۴ نیز مقابله کرده از اقبال حضرت آنهارا شکست داده فتح یافته بعد آن سواری نموده نزدیک قلعه بتنگا تعلقه غنیم رسیده باری قلعه‌را آتش داده سوخته فرمودند که مجری کلی شد ـ

عرضداشت سید عزت خان آمده بنظر گذشت معروض داشته بود که فدوی از رام‌نگر بمفاصله شش کروه قلعه کنهرگده غنیم رسیده موافق حکم قلعه‌را محاصره نموده از اقبال حضرت فتح یافت در تصرف بادشاهی خواهم آورد بعد مطالعه حواله خدمت خان فرمودند ـ

मोजणीची सांखळी घेऊन बहादुरअली शिकार पाहण्यासाठीं गेला होता. तो बहादुरखानाच्या जागिरींतील कसबे अंबरपूर येथें गेला व तीन मुक्कामापर्यंत त्यानें तपास केला. परतीच्या वेळीं जामखेडच्या वाटेवर त्याला शिकार दिसली. त्यानें येऊन एक अश्रफी भेट दिली व मुक्कामांचा हिशेब दाखविला. हुकूम झाला कीं, त्यानें दिवस मावळतांना शिकारीच्या हकीकतीचा अर्ज करावा.

रूहुल्लाहखानानें अर्ज केला तो असा:—'बहादुरखानानें मला पत्र लिहिलें आहे कीं, शत्रूचे सात हजार स्वार व आठ हजार प्यादे आले होते. मला बातमी मिळाली कीं, कल्याण-भिवंडीच्या कोटाची दुरुस्ती करून त्यांनीं तेथें पक्कें ठाणें उभारलें आहे. ८ जिल्हेज रोजीं शत्रूशीं सामना झाला. बादशाही सुदैवानें अनेकांना मारून पळवून लाविलें. त्यांचें घोड्या, छत्री, धूप वगैरे सामान हातीं आलें. यासंबंधीं अशी बातमी मिळाली कीं, शत्रूचे जवळजवळ १०००० स्वार व १२००० पायदळ आलें आहे. पुन: १४ तारखेस सामना दिला व बादशाही

सुदैवानें विजय मिळविला. त्यानंतर स्वार होऊन शत्रुप्रदेशांतील बितिंगा गडाच्या वाडीस आग लावून ती जाळली. हुकूम झाला कीं, मान्य आहे.

सय्यिद इझ्झतखानाचा अर्ज पाहिला. तो लिहितो—रामनगरहून सहा कोसांवर मी शत्रूच्या कन्हेरगड किल्ल्यापाशीं पोहोंचलों; हुकुमाप्रमाणें किल्ल्यास वेढा घातला. बादशाही सुदैवानें विजय मिळवून तो बादशाही अमलाखालीं आणीत आहे. अर्ज पाहून तो खिदमतखानाजवळ दिला.

३९१

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम ४<br>रवि. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۴ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۶ | श. १६०४ पौष शुद्ध ५<br>इ. १६८२ डिसेंबर २४ |

ملازمت

سیادت خان موافق حکم بہ پہول مری رفتہ خزانہ و اموال محمد امین خان مرحوم آوردہ —

عبد اللطیف دیوان احمدآباد بمعہ پسران همراه خزانہ [*و] اموال محمد امین خان مرحوم آمدہ —

میگاجی دکہنی ... مہر ......

بہادر علی خوش منزل موافق حکم بعرض رسانید کہ شکار موضع عنبر پور و جام کہیرہ چندان نیست کہ حضرت تشریف فرمایند کہ خوب (؟) بعد عاشورہ متوجہ خواهم شد —

بہ لطف الله خان فرمودند کہ بہ خان جہان بہادر بنویسد کہ از فرستادن صوبہ برار موقوف نمودہ باید کہ از بندبست گلشن‌آباد بواقع خبردار باشد در آن جا روح الله خان را بمعہ فوج رخصت نمودہ خواهد شد دتاجی پسر خواندہ جادون رای دکہنی دو صد پنجاهی ذات پنجاہ سوار سرافراز فرمودند —

भेट ( = चाकरी )

हुकुमाप्रमाणें सियादतखानानें फुलंब्रीस जाऊन मरहूम मुहम्मद अमीनखानाचा खजिना व इतर मौल्यवान जिन्नस आणले. अहमदाबादेचा दिवाण अब्दुल्लतीफ यानें मुलांसह मरहूम मुहम्मद अमीनखानाचा खजिना व इतर मौल्यवान जिन्नस बरोबर आणले. मेघाजी दखनी ......मोहरा दिल्या.

बहादुरअली खुषमंझिल यानें हुकुमाप्रमाणें अर्ज केला कीं, मौजे अंबरपूर

व जामखेड येथील शिकार बादशाहानें जावें अशी नाहीं. चांगल्या शिकारीसाठीं मोहरमच्या ९, १० तारखानंतर मी तिकडे जाईन.

लुत्फुल्लाहखानास हुकूम झाला कीं, खानजहान बहादुरास लिहावें कीं, 'तुला वऱ्हाडांत पाठविण्याचें स्थगित केलें असून तू गुलशनाबादेच्या बंदोबस्ताबद्दल उत्तम तऱ्हेनें सावध असावेंस. तिकडे रूहुल्लाहखानास फौजेसह धाडू इच्छितों'.

जादूनराय ( जाधवराव ) दखनी याचा मुलगा दत्ताजी २५० जात व ५० स्वार असा नव्यानें मानकरी केला.

## ३९२

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम ४<br>रवि. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۴ سنه<br>یوم الاحد سنه ۲۶ | श. १६०४ पौष शुद्ध ५<br>इ. १६८२ डिसेंबर २४ |

از واقعه فوج شاهزاده محمداعظم شاه بعرض رسید که هرگاه شاهزاده — جیو بمنزل پرناله شش کروه آن طرف رسیدند مردم جاسوسان خبر آورده که همبیرراو و غیره فوج غنیم بیست هزار سوار منجمله فوج پنج هزار سوار اقرار نموده که بر دیره عقب به رفتند بنابران شاهزادهجیو فیروزخان و راو انوپ سنگه و غیره فوج عقب دیره گذاشته خود با فوج جهته تنبیه سواری نموده آخرش مقهوران بمقابله پیش آمدند جنگ واقع شد از اقبال حضرت بسیار بقتل رسانده و زخمی ساخته شکست داده و اکثر بندهای بادشاهی بکار آمده و زخمی شدند و فیروزخان بمعه پسران تردد نموده زخمی شدند و قلیچ خان و غیره بندهای بادشاهی خیلی تردد نموده شنیده خاموش ماندند —

मुहम्मद अअजमशाहाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें तें असें—शाहझादा पन्हाळ्याच्या अलीकडे सहा कोसांवर पोहोंचला तेव्हां हेरांनीं बातमी आणली कीं, शत्रूच्या हंबीरराव वगैरे वीस हजार फौजेपैकीं ५००० स्वारांनीं डेऱ्याच्या पिच्छाडीवर तुटून पडण्याचा बेत ठरविला. म्हणून शाहझाद्यानें फिरूझखान व राव अनूपसिंग वगैरेंना फौजेसह डेऱ्याच्या पिच्छाडीस ठेविलें. त्यानें स्वतः शत्रूस तंबी देण्यासाठीं फौजेसह स्वारी केली. शत्रू लढाईसाठीं समोर आल्यावर लढाई झाली व बादशाही सुदैवानें अनेकांना

मारून व जखमी करून त्यांचा पराजय केला. बहुतेक बादशाही लोक कामास आले व जखमी झाले. फिरूझखानानें आपल्या मुलांसह कष्ट केले. व ते जखमी झाले. कुलीचखान वगैरे बादशाही लोकांनीं देखील अत्यंत कष्ट केले. ऐकून बादशाह गप्प बसला.

### ३९३

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम ५<br>सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ محرم ۵ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲٦ | श. १६०४ पौष शुद्ध ६<br>इ. १६८२ डिसेंबर २५ |

باباجی راو سیصد شصت سوار بمعہ سیصد ۳ و بیست و شش نفر پیادہ ماولیہ نگاہ داشت مشارالیہ از تعیناتی فوج محمد نعیم همراہ مغل‌خان تعینات فرمودند —

मुहम्मद नईम याच्या फौजेंत नेमलेला बाबाजीराव यास त्यानें चाकरींत ठेवलेले तीनशें साठ स्वार व तीनशें सवीस मावळे पायदळ यांसह मुघलखानाकडे नेमल्याचा हुकूम झाला.

### ३९४

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम ६<br>मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ محرم ٦ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲٦ | श. १६०४ पौष शुद्ध ७<br>इ. १६८२ डिसेंबर २६ |

از عرضہ‌داشت نیک‌نام‌خان قلعہ‌دار دهرپ گدہ بعرض رسید کہ مردم غنیم از قلعہ هنونت گدہ و رولہ و جولہ و غیرہ چهار قلعہ جهتہ تحصیل چوتهای برآمدہ بودند بندہ جمعیت تعین نمودہ چنانچہ مقابلہ شدہ قریب دہ پانزدہ نفر بقتل رساندہ و بسیاری زخمی نمودہ و پانزدہ نفر زندہ دستگیر نمودہ بحضور فرستادہ اکثر مردم این جانب بکار آمدہ و زخمی شدند حکم شد حوالہ اهتمام‌خان نمایند کہ در قید نگاہ دارد و مجری خان مذکور شد اضافہ شاہ محمد تهانہ دار سیونیر —

धोडपगडचा किल्लेदार नेकनामखान याचा अर्ज आला कीं, 'शत्रूचे लोक हनुमंतगड, रवळा, जवळा, वगैरे चार किल्ल्यांतून चौथ वसूल करण्या-साठीं आले होते. त्यांवर मी लोक नेमले. सामना झाला. अदमासें दहापंधरा लोक मारले व अनेकांना जखमी केलें. पंधरा लोकांना पकडून हुजूर पाठविलें

आहेत. माझ्याकडील बहुतेक लोक कामास आले व जखमी झाले'. हुकूम झाला कीं, त्यांना इहतिमामखानाकडे सोपवावें व कैदेंत ठेवून त्यांजवर लक्ष ठेवावें. खानाचें म्हणणें मान्य झालें. शिवनेरचा ठाणेदार शाह मुहम्मद यास बढती दिली.

३९५

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम ७<br>बुध. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه محرم ۷ سنه<br>یوم الاربعا سنه ۲٦ | श. १६०४ पौष शुद्ध ८<br>इ. १६८२ डिसेंबर २७ |

اهتمام خان عرض نمود که سردار ترین فوجدار سیوگانو و غیره بر تهاکو بنجاره فسادی سواری نموده آخرش مقهور بجنگ پیش آمده از اقبال حضرت بسیاری را بقتل رسانده و زخمی نموده و هفت کروه تعاقب نموده مقهوران در کوه رفته پنهان شده و یک شتر عموی او و سی و سه ۳ اسپ مادیه و سی بهاله و سی دهوپ و سی سپر بحضور ارسال داشته است فرمودند اسپ و غیره بمشارالیه معاف نموده مجری شد ـ

به امانت خان فرمودند که به بهرورخان تهانه دار تهالنیر بنویسد که ده بیگه زمین برای فالیز طیار نمایند ـ

इहतिमामखानानें अर्ज केला कीं, शेवगांवचा फौजदार सरदारतरीन वगैरेंनीं बंडखोर थाकू बंजाऱ्यावर स्वारी केली. शत्रू लढाईसाठीं समोर आला. बादशाही सुदैवानें अनेकांना मारलें व जखमी केलें. तसेंच सात कोसपर्यंत शत्रूचा पाठलाग केला. पण तो डोंगरांत लपून बसला. त्याच्या काकाचा एक उंट, तेहतीस घोड्या, तीस भाले, तीस धूप व तीस ढाली हुजूर पाठविल्या आहेत. हुकूम झाला कीं, उपर्युक्तास घोडे वगैरे माफ केलें आहे. त्याचें म्हणणें मान्य आहे.

अमानतखानास हुकूम झाला कीं, थाळनेरचा ठाणेदार बहरोझखान यास कलिंगडें लावण्यासाठीं दहा बिघे जमीन तयार करण्याबद्दल लिहावें.

३९६

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम ७<br>बुध. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه محرم ۷ سنه<br>یوم الاربعا سنه ۲٦ | श. १६०४ पौष शुद्ध ८<br>इ. १६८२ डिसेंबर २७ |

از واقعه فوج شاهزاده معزالدین بعرض رسید که بتاریخ ۵ شهر حال شاهزاده‌جیو موافق حکم مغل‌خان‌را بمعه فوج جانب پونادهر رخصت فرمودند ـ

शाहझादा मुइझ्झुद्दीनाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें कीं, हुकुमाप्रमाणें शाहझाद्यानें मुघलखानास फौजेसह चालू महिन्याच्या पांच तारखेस पुरंधरकडे पाठविलें.

३९७

| जु. २६ मोहरम १२ सोम. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۱۲ سنه<br>یوم الاثنا سنه ۲۶ | श. १६०४ पौष शुद्ध १३<br>इ. १६८३ जानेवारी १ |
|---|---|---|

عرضه‌داشت شاهزاده محمد اعظم شاه آمده بنظر گذشت معروض داشته بود که همبیرراو و غیره نوکران سنبها مقهور با جمعیت پانزده هزار سوار جهته مقابله آمده بودند چنانچه بنده قلیچ خان و حسین علی‌خان بهادر و راو انوپ ـ سنگه و انروده‌سنگه هاده سرافرازخان و غیره را هراول و دست راست و دست چپ مقرر نموده سواری کرده مقهوران بجنگ کوته یراق پیش آمده از اقبال حضرت بسیاری مقهوران قریب هشت صد نفر بجهنم رسانیده و زخمی ساخته و هفصد نفر زنده دستگیر کرده و چهتری و نشان و بندوقها و غیره اسلحه آنها بدست آورده و اکثری بندهای بادشاهی بکار آمده و زخمی شدند و زخم بندوق به قلیچ‌خان رسیده فتح عظیم شد و تردد بندهای بادشاهی مشروحاً معروض داشته ام پذیرای بیایند بندگان حضرت بعد مطالعه به شاه‌عالم جیو مطالعه کنانیده به روح الله خان فرمودند که حقایق تردد هرکدام نوشته بنظر گذرانند و یک لک روپیه انعام جهته شاهزاده‌جیو علحده نمایند ـ

روح الله خان عرضه‌داشت مغل‌خان بنظر گذرانیده بعرض رسانید که به بنده نیز خطی نوشته که فدوی موافق حکم از نزد شاهزاده معزالدین به پونادهر رسیده بیست هفت موضع غنیم‌را آتش داده بسیاری‌را بقتل رسانده و زخمی ساخته یک صد نفر زنده دستگیر نموده یک هزار مویشی بدست آورده باقی گریخته رفتند بعد آن پسر تهاکو بنجاره و مانکوجی نوکر سنبها مقهور متفق شده آمده مقابله نموده آنهارا نیز شکست داده فرمودند که مجرای کلی شد ـ

मुहम्मद अअजमशाहाचा अर्ज पाहिला. लिहिलें होतें कीं, संभाचे हंबीरराव वगैरे नोकर १५००० स्वारांसह लढाईसाठीं आले होते. म्हणून मी कुलीचखान, हसनअलीखान, राव अनूपसिंग, अनिरुद्धसिंग हाडा व सराफराझ-खान वगैरेंना हरावलीस आणि उजव्या-डाव्या बाजूंस नेमून स्वारी केली. शत्रूशीं, ढाल-तलवार, खंजीर, वगैरे हत्यारांनीं लढाई केली. बादशाही सुदैवानें शत्रूच्या आठशें लोकांना मारलें व जखमी केलें आणि सातशें लोकांना जिवंत पकडलें. त्यांची छत्री, निशाण, बंदुका वगैरे हत्यारें हातीं आलीं. तसेंच बहुतेक बादशाही लोक कामास आले व जखमी झाले. कुलीचखानास बंदुकीची जखम झाली. मोठा विजय प्राप्त झाला. बादशाही लोकांनीं अत्यंत कष्ट घेतले त्याचा तपशील दिला आहे. विचार व्हावा. बादशाहानें अर्ज पाहिल्यावर शाहआलम यास पहावयास दिला. रूहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, प्रत्येकानें केलेल्या प्रयत्नाची हकीकत लिहून मला दाखवावी. एक लक्ष रुपये शाहझाद्यास बक्षीस म्हणून वेगळे ठेवावे.

रूहुल्लाहखानानें मुघलखानाचा अर्ज बादशाहास दाखविला व सांगितलें कीं, त्यानें मलासुद्धा पत्र लिहिलें आहे कीं, 'मी हुकुमाप्रमाणें शाहझादा मुइझ्झुद्दीनपासून निघून पुरंधरास पोहोंचलों. शत्रूच्या सत्तावीस खेड्यांना आग लाविली. अनेकांना मारलें व जखमी केलें. शंभर लोकांना जिवंत पकडलें व एक हजार जनावरें माझ्या हातीं लागलीं. बाकीचे पळून गेले. यानंतर थाकू बंजाऱ्याचा मुलगा व संभाचा नोकर माणकोजी हे चालून आले. मीं त्यांशीं सामना दिला व त्यांचा पराजय केला'. हुकूम झाला कीं, मान्य आहे.

३९८

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम १३<br>मंगळ. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۱۳ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲٦ | श. १६०४ पौष शुद्ध १४<br>इ. १६८३ जानेवारी ३ |

عرضداشت بهادرخان آمده بنظر گذشت معروض داشتہ بود کہ جمعیت غنیم را مقابلہ نموده شکست داده بود حالا دو مرتبہ دیگر جمعیت غنیم بر لشکر بادشاهی شب خون آمده از اقبال حضرت بسیار مردم مقهوران بجهنم رسانده و زخمی ساختہ و قلعچہ کایان بهمری احداث نموده لیکن کنگره های می نمایم موافق حکم دو هزار سوار نو نوکر نگاه داشتہ چنانچہ آن جماعت

ظاهر می نمایند کہ پذیرای گردد چیزی بطریق یومیہ مرحمت شود کہ تردد نمایند بعد مطالعہ عرضداشت حوالہ روح اللہ خان نمودہ کہ انتخاب کردہ بعرض رساند ـ

بہ روح اللہ خان فرمودند کہ بہ مہنداجی پسر بجاجی نایک متوفی بنویسد کہ خودرا از تمرنی بہ پیدگانو رسانیدہ بدستور سابق از محافظت شہر خبردار باشد ـ

बहादुरखानाचा अर्ज आला तो पाहिला. त्यांत लिहिलें होतें कीं, शत्रूच्या लोकांशीं लढाई करून त्यांचा पराजय केला. सध्या आणखी दोन वेळां शत्रूच्या लोकांनीं बादशाही लश्करावर अचानक हल्ला केला. बादशाही सुदैवानें शत्रूच्या अनेक लोकांना ठार मारलें व जखमी केलें. नंतर कल्याण-भिवंडीच्या कोटाची दुरुस्ती केली; कंगुरे दुरुस्त करीत आहे. हुकुमाप्रमाणें २००० स्वार नवीन चाकरीस ठेवले आहेत. ते सांगत आहेत कीं, आम्हांस चाकरी मान्य आहे; परंतु कष्ट करण्यासाठीं आम्हास कांहीं रोजीना मिळण्याची कृपा व्हावी. अर्ज पाहिल्यावर रूहुल्लाहखानाजवळ दिला व त्यास त्यांतील निवडक गोष्टींबद्दल अर्ज करण्याचा व कै. बजाजी नायकाचा मुलगा महादजी यास टेंभुर्णीहून निघून पेडगांवास पोहोंचवून पूर्वीप्रमाणें शहराच्या संरक्षणाबद्दल सावध असावें असें लिहिण्याचा हुकूम झाला.

### ३९९

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम १५<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ محرم ۱۵ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۶ | श. १६०४ पौष वद्य १<br>इ. १६८३ जानेवारी ४ |

ملازمت

رام راجہ نوکر سنبہا مقہور امید بندگی آمدہ ـ ۵۰ مہر ... داخل کٹہرہ نقرہ فرمودند ـ پرتاپ سنگہ راتہور امید بندگی از وطن آمدہ ۹ مہر ... داخل کٹہرہ نقرہ فرمودند ـ

संभाचा नोकर रामराजा व प्रतापसिंग राठोड भेटी (चाकरी)च्या आशेनें आले. दोघांनीं अनुक्रमें ५० व ९ मोहरा नजर केल्या. त्यांस चांदीच्या कठड्यांत प्रवेश देण्याचा हुकूम झाला.

४००

| जु. २६ मोहरम १५ गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ محرم ۱۵ سنہ یوم الخمس سنہ ۲۶ | श. १६०४ पौष वद्य १ इ. १६८३ जानेवारी ४ |
|---|---|---|

از واقعہ فوج سید عزت خان بعرض رسید کہ خان مذکور قلعہ کنہیر گدہ تعلقہ غنیم محاصرہ نمودہ است و مردمان غنیم پیادہ از عقب تفنگ اندازی نمودہ آخرش خان مذکور مستور شدہ جہتہ مقابلہ طیاری کردہ مردم غنیم طرح دادہ رفتند و خان مذکور بہ مقام خود ماندہ امیدوار است کہ درین نزدیکی قلعہ را در تصرف بادشاهی در آورد ۔

عنایت اللہ وکیل شاهزادہ محمد اعظم شاہ نشان شاهزادہ جیو کہ بشیخ مخدوم فرستادہ بودند بنظر گذرانید بمطالعہ خاص در آوردہ منجملہ نشان یک فرد علحدہ برآمدہ حوالہ روح اللہ خان نمودہ و برنشان از قلم فرنگی دستخط خاص نوشتہ حوالہ شیخ مخدوم کردہ شکوہ خان جہان بہادر بزبان مبارک در آوردند کہ عمدۃ الملک بمعہ فوج یک جا نشستہ است جای برغنیم سواری نہ می کند و سابق عرضداشت خان مذکور آمدہ بود طلبیدہ ملاحظہ نمودہ فرمان بنام خان جہان بہادر حوالہ حاجی بیگ گرزبردار نمودہ کہ برساند ۔

सय्यिद इज्झतखानाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें कीं, उपर्युक्त खानानें शत्रूच्या तालुक्यांतील कन्हेरगडास वेढा दिला आहे. शत्रूचे लोक पायदळाच्या पिछाडीवर बंदुकीचा मारा करीत होते. शेवटीं खान मजकूर गुपचूप लढाईची तयारी करून शत्रूवर कोसळला. शत्रू पळून गेला. उपर्युक्त खान आपल्या स्वतःच्या ठिकाणीं कायम असून आशा करतो कीं, किल्ला लवकरच बादशाही अमलाखालीं आणला जाईल.

मुहम्मद अअजमशाहाचा वकील इनायतुल्लाह यानें शेख मख्दूम याच्या हातीं पाठविलेलें शाहझाद्याचें पत्र नजरेखालून घातलें. बादशाहानें प्रत्यक्ष पहाणी केली. पत्राचें एक पान वेगळें काढून, रूहुल्लाहखानाजवळ देऊन पत्रावर फिरंगी टाकानें सही केली. ते शेख मख्दूमाचे जवळ देऊन, खानजहान बहादुराबद्दल तक्रार केली कीं, 'उम्दतुल्मुल्क एकाच ठिकाणीं बसून आहे. तो शत्रूवर चढाई करीत नाही. खानजहान बहादुराचा पूर्वी आलेला अर्ज मागवून

पहाणी केली. नंतर खानजहान बहादुराच्या नांवाचें फर्मान हाजीबेग गुर्जबर्दाराजवळ देऊन पोहोंचविण्याचा हुकूम झाला.

## ४०१

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम १५<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۱۵ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۶ | श. १६०४ पौष वद्य १<br>इ. १६८३ जानेवारी ४ |

اول آنکہ انکوجی (ایکوجی) عموی سنبہا مقہور آزرده شده معہ چہار هزار سوار نواحی بیجاپور سکونت دارد می خواهد کہ اگر قول {و} پنجہ مرحمت شود بحضور بیاید {و} و بنام مشارالیہ خلعت و فرمان حوالہ فدوی شود حکم شد هرگاه بہ کرناتک برسد عرضہداشت نماید مرحمت نموده خواهد شد۔

संभाचा काका अंकोजी (एकोजी) हा कष्टी होऊन चार हजार स्वारांसह विजापूरजवळ मुक्काम करून आहे. इच्छा करतो कीं, पंज्याच्या कौलाची मेहरबानी झाली तर हुजूर यावें. उपर्युक्ताच्या नांवें खिलत व फर्मान या चाकराजवळ (?) द्यावें. हुकूम झाला कीं, कर्नाटकांत पोहोंचल्यानंतर अर्ज करावा म्हणजे मेहरबानी होईल.

## ४०२

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम १६<br>शुक्र. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۱۶ سنہ<br>یوم الجمعہ سنہ ۲۶ | श. १६०४ पौष वद्य ३<br>इ. १६८३ जानेवारी ५ |

بزبانے هرکاره های بعرض رسید کہ اکبر باغی بہ سنبہا مقہور گفتہ کہ بنده را کومک داده از ملک خود بر آرند جای خواهم رفت مقہور مانع نموده آخرش باغی قبول نکرده تعین مصلحت شده کہ باغی را از ملک خود مقہور بر آرد بنابران حسب الحکم بمہر روح الله خان بنام جماعت ذیل منصوب گرز برداران صادر شدند کہ از تعلقہ خودها خبردار باشند اگر باغی مذکور در آن ضلع بیاید تعاقب کرده دستگیر نمایند۔

بنام مختارخان صوبہ دار احمد آباد
و فوجداران آن نواحی حوالہ محمد
اسمعیل گرزبردار فرمودند

بنام الهام اللهخان صوبہ دار تلنگانہ و
فوجداران آن ضلع حوالہ فتحی بیگ
گرزبردار فرمودند

بنام خان زمان وغیره حوالہ محمد
سعیدخان مذکور صوبہ دار مالوہ
همزه خان فوجدار هوشنگ آباد
پردل خان فوجدار بهلسہ

بنام ایرج خان وغیره حوالہ جان بیگ۔
خان مذکور صوبہ دار برار
رام سنگہ زمیندار چانده دیندار
زمیندار اسلام گده

हरकाऱ्यांनीं तोंडीं अर्ज केला तो असा:—अकबरानें संभास कळविलें कीं, 'माझ्याबरोबर कुमक द्यावी म्हणजे मी येथून दुसरीकडे जाईन. संभानें त्यास मनाई केली. परंतु बंडखोरानें तें मान्य केलें नाहीं. शेवटीं ठरलें कीं, बंडखोरास संभानें आपल्या मुलखांतून बाहेर जाऊं द्यावें.' तेव्हां पुढील लोकांच्या नावें रूहुल्लाहखानाच्या शिक्क्यानिशीं हस्बुलहुकूम गुर्जबर्दारां-जवळ दिले कीं, त्यांनीं स्वतःच्या तालुक्याबाबत सावध असावें. बंडखोर त्या जिल्ह्यांत आला तर त्याचा पाठलाग करून त्यास कैद करावें. अहमदाबादेचा सुभेदार मुख्तारखान व त्या आसपासचे फौजदार, तेलंगणचा सुभेदार इल्हामुल्लाहखान व त्या जिल्ह्याचे फौजदार, वऱ्हाडचा सुभेदार ईरजखान, माळव्याचा सुभेदार खानझमान यांना देण्यासाठीं अनुक्रमें मुहम्मद इस्माईल, फतहीबेग, मुहम्मद सईद, जानबेग या गुर्जबर्दारांजवळ, शिवाय होशंगाबाद व भेलसें येथील फौज़दार अनुक्रमें हमझेखान व पुरदिलखान आणि चांदा व इस्लामगड येथील जमीदार अनुक्रमें रामसिंग व दीनदार यांसही हस्बुलहुकूम दिले.

४०३

| | | |
|---|---|---|
| श. १६०४ पौष वद्य ५<br>इ. १६८३ जानेवारी ७ | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماه محرم ۱۸ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲٦ | जु. २६ मोहरम १८<br>रवि. |

ملازمت

حاجی الله ولی همراه اسباب کتخدای
شاهزاده کامبخش از شاهجهان آباد
آمده یک مہر ۱۰۰۰ روپیہ

راموجی دکهنی یک مہر ...
روپیہ حکم جهتہ رسانیدن خزانہ
همراه کامیاب خان برود

بہ روح الله خان فرمودند کہ بہ یسونت راو بنویسد کہ سرداری دره تل کوکن

به بهادرخان مقرر شده خود را بمه پیاده هاے نگاهداشت خود نزد خانمذکور برود و آنچه بگوید عذر نیارد۔

भेट–चाकरी

हाजी अल्लाह वली हा शाहझादा कामबक्ष याच्या लग्नाचें सामान घेऊन शाहजहानाबादेहून आला. १ मोहर १ रुपया नजर केली.

रामोजी दखनी १ मोहर,····रुपये नजर केले. हुकूम झाला कीं, त्यानें कामयाबखानाबरोबर खजिना पोहोंचविण्यासाठीं जावें.

रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असाः—यशवंतरावास लिहावें कीं, तळ-कोंकणच्या खोऱ्याच्या सरदारीवर बहादुरखानास नेमलें आहे. तू आपल्या प्याद्यांसह खानाकडे जावें व तो सांगेल त्याविरुद्ध सबब सांगू नये.

४०४

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम १८<br>रवि. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۱۸ سنه<br>یوم الاحد سنه ۲۶ | श. १६०४ पौष वद्य ५<br>इ. १६८३ जानेवारी ७ |

فرمان بنام خان جهان بهادر صادر نموده که نصرت خان را تا رسیدن معمورخان در گلشن آباد گذاشته خود را نزد شاهزاده معزالدین رساند حواله محمد طفیل گرز بردار نموده و حسب الحکم بنام معمورخان صادر نموده که شما را سردار فوج پنج هزار سوار مقرر نموده از تمرنے به گلشن آباد رفته خبردار باشد۔

खानजहान बहादुराच्या नांवें फर्मान सादर झालें कीं, 'मामूरखान पोहोंचेपर्यंत नुस्रतखानास गुलशनाबादेस सोडावें व स्वतः शाहझादा मुइझ्झु-द्दीनाजवळ पोहोंचावें.' हें मुहम्मद तुफैल गुर्जबर्दाराजवळ दिलें. मामूरखानाच्या नांवें हस्बुलहुकूम सादर झाला कीं, 'तुला पांच हजार स्वारांच्या फौजेचा सरदार केलें आहे. तू टेंभुर्णीहून गुलशनाबादेस जाऊन खबरदार असावेंस'.

४०५

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम १९<br>सोम. | سیاهه اخبارات دربار معلے<br>بماه محرم ۱۹ سنه<br>یوم الاثنا سنه ۲۶ | श. १६०४ पौष वद्य ६<br>इ. १६८३ जानेवारी ८ |

عرضداشت بهادرخان که نزد کارطلب خان متصدی سورت فرستاده بود

چنانچہ خان مذکور بداک چوکی بحضور فرستادہ بمعرفت فضایل خان بنظر گذشت معروض داشتہ بود کہ تکوجی سردار سنبہا مقہور با جمعیت کثیر از قلعہ کلیان بہمری چہار کروہ آن طرف آمدہ مورچل بندی نمودہ مستور شدہ از استماع این خبر فدوی سیدی یاقوت خان و رومی خان سردار جہازات کہ رسد غلہ آوردہ بودند و مردم کہ در کلیان بہمری گذاشتہ بود و داورخان و ابوالفیاض خان و شجاول وغیرہ بندہای بادشاہی را سہ (۳) فوج مقرر نمودہ براے تنبیہ سواری نردہ آخرش مقہور بجنگ تیر تفنگ پیش آمدہ بعد از آن بہ کوتہ یراق مقابلہ نمودہ از اقبال حضرت تکوجی سردار را بمعہ بسیار کس بجہنم رسانیدہ شکست دادہ فتح عظیم شد دیگر جمعیت غنیم گریختہ در کوہ پنہان شدہ و بندہ های بادشاہی تا پنج کروہ تعاقب نمودہ آمدہ داخل قلعہ کلیان بہمری شدند و از دست بندہای تردد شدہ مفصل از واقعہ بعرض خواہد رسید۔

सुरतेचा मुत्सद्दी कारतलबखान याजकडे बहादुरखानानें अर्जदास्त पाठविली होती. ती खानानें हुजूर पाठविली. फजाइलखानाच्या मार्फत ती बादशाहाच्या नजरेखालून घातली. तींत लिहिलें होतें कीं, 'संभाचा सरदार तुकोजी हा मोठ्या जमेतीसह कल्याणभिवंडीच्या गढीअलीकडे चार कोसांवर आला असून मोर्चेबंदी तयार करण्यांत मग्न आहे. हें समजल्यावर मी सीदी याकूतखान व धान्य घेऊन आलेल्या जहाजांचा सरदार रूमीखान, यांना कल्याणभिवंडी येथें पाठविलें आणि दाऊदखान, अबुलफय्याजखान व शुजावल वगैरे बादशाही लोकांच्या तीन फौजा तयार करून शत्रूस तंबी देण्यासाठीं स्वारी केली. शत्रूशीं प्रथम बाणाची व बंदुकीची लढाई झाली. नंतर हातघाईचा सामना झाला. बादशाही सुदैवानें इतर अनेक लोकांसह तुकोजी मारला गेला. त्याचा पराजय केला. मोठा विजय प्राप्त झाला. शत्रूची दुसरी जमेत पळून जाऊन डोंगरांत लपली. बादशाही लोकांनीं पांच कोस पाठलाग केला. नंतर ते कल्याण-भिवंडीच्या किल्ल्यास परत आले. लोकांनीं कष्ट केले आहेत. या घटनेचा तपशीलवार अर्ज पाठवीत आहे.

४०६

| जु. २६ मोहरम २० मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ محرم ۲۰ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۶ | श० १६०४ पौष वद्य ७<br>इ. १६८३ जानेवारी ९ |
|---|---|---|

بہ فضایل خان فرمودند کہ از بہاسکرراو داروغہ ہرکارہ های بہ پرسید

چیزے خبر آمدن اکبر باغی داود خان مذکور پرسیده عرض نمود کہ التماس میدارد کہ تا حال بہ بنده مردم هرکاره های چیزی ننوشتہ اند فرمودند باغی مذکور از ملک کافر بچہ برآمده تاحال چیزی اطلاع ندارد صدی ذات بود از روی اعتراضی بیستی ذات کم فرمودند حکم شده پانصد من باروت و سیصد من سرب و سہ هزار بان دو صد ماهتابی از قلعہ پرنده برکاب شاهزاده محمد اعظم شاه بفرستند۔

फजाइलखानास हुकूम झाला तो असा:—हरकाऱ्यांचा दारूगा भास्करराय यास विचारावें कीं, अकबराच्या येण्याबद्दल कांहीं बातमी आहे कां? तेव्हां खानानें तपास करून अर्ज केला तो असाः—'[तो] विनंती करतो कीं, अजून हरकाऱ्यांनीं मला कांहींही लिहिलेलें नाही'. हुकूम झाला कीं, 'बंडखोर काफिर बच्चाच्या प्रांतांतून बाहेर आला असून अजून कांहींच कशी बातमी मिळाली नाहीं?' त्यास १०० जात मनसब होती. पैकीं इतराजीमुळे २० जात कमी केल्याचें फर्माविलें.

हुकूम झाला कीं, पांचशें मण दारू, तीनशें मण शिसें, तीन हजार बाण व दोनशें महताबी एवढें सामान परिंड्याहून मुहम्मद अअजमशाहाकडे पाठवावें.

४०७

| जु. २६ मोहरम २० मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۲۰ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۶ | श. १६०४ पौष वद्य ७<br>इ. १६८३ जानेवारी ९ |
|---|---|---|

بہ روح الله خان فرمودند کہ حسب الحکم عرضہ داشتہ شاهزاده معزالدین و حسب الحکم بنام خان جهان بهادر بنویسد کہ اکبر باغی از ملک کافر بچہ برآمده بایدکہ خودهارا در رام نگر رسانیده بہ نشیند و خبر اکبر باغی بواقعي گرفتہ اگر قصد جانب بنگالہ داشتہ باشد براه جهارکهند شده تعاقب نمایند اگر بسمت هندوستان برود براه گوندوانہ تعاقب کرده دستگیر یا بقتل رسانند۔

रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा:—शाहझादा मुइझुद्दीन व खानजहान बहादुर यांच्या नांवें हस्बुलहुकूम लिहावा कीं, 'बंडखोर अकबर हा काफिर बच्चाच्या मुलुखांतून बाहेर आला. तेव्हां तुम्ही रामनगरास जाऊन थांबावें. अकबरासंबंधीं पक्की बातमी मिळवावी. त्याचा बंगालकडे जाण्याचा

विचार असेल, तर झारखंडमार्गें पाठलाग करावा. तो हिंदुस्थानाकडे जात असेल, तर त्याचा गोंडवनाच्या मार्गें पाठलाग करून त्यास पकडावें किंवा ठार करावें.'

### ४०८

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम २२ गुरु. | سیاهم اخبارات دربار معلے ماه محرم ۲۲ سنہ یوم الخمس سنہ ۲۶ | श. १६०४ पौष वद्य ९ इ. १६८३ जानेवारी २१ |

عرضہ داشت ایرج خان صوبہ دار برار آمده بنظر گذشت معروض داشتہ بود کہ جمعیت غنیم نواحی کہولاپور تاخت نموده بند مویشی متصرف شده می روند از استماع این فدوی قاسم خان بمعہ فوج سواری نموده مقہوران را تنبیہ کرده بند مویشی واپس آورده حوالہ مالکان نموده بسیار کس را بقتل رسانیده شکست داده مقہوران گریختہ رفتند و همین مضمون عرضہ داشت قاسم خان نیز بنظر گذشت بعد مطالعہ فرمودند مجرای خان مشارالیہ کلی شد۔

वऱ्हाडचा सुभेदार ईरजखान याचा अर्ज आला तो नजरेखालून घातला. तो लिहितो :—'शत्रूची जमेत खोलापूरच्या आसपास लुटालूट करून गुरें ताब्यांत घेऊन जात आहे, असें समजल्यावर मी व कासिमखानानें फौजेसह स्वार होऊन शत्रूस तंबी दिली आणि गुरें परत आणून त्यांच्या मालकांच्या हवाला केलीं. अनेकांना मारलें, शत्रूचा पराजय केला. तो पळून गेला.' याचविषयीं कासिमखानाचा अर्ज बादशाहाचे नजरेखालून घातला. पाहिल्यावर हुकूम झाला कीं, खानाचें म्हणणें मान्य आहे.

### ४०९

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम २५ रवि. | سیاهم اخبارات دربار معلے ماه محرم ۲۵ سنہ یوم الاحد سنہ ۲۶ | श. १६०४ पौष वद्य १२ इ. १६८३ जानेवारी १४ |

چون مردم غنیم براه تلنگانہ شده آمده بودند الهام الله خان صوبہ دار آن جا سواری نکرده بنابران خان مذکور دو هزار پانصدی ذات هزار پانصد سوار منجملہ هزار سوار دو اسپہ بود پانصدی ذات دو صد سوار کم فرمودند

سید انورخان قلعہ دار اوسہ هزار پانصدی ذات نہصد سوار بود یک صد سوار از کمی اضافہ فرمودند

مقیم خان قلعہ دار پیدگانو هزار پانصدی ذات نہصد سوار بود فوت شد۔

शत्रूचे लोक तेलंगणाचे वाटेनें आले होते; परंतु तेथील सुभेदार इल्हामुल्लाहखान यानें स्वारी केली नाहीं; म्हणून खानास २५०० जात व १५०० स्वार अशी मनसब होती तीपैकीं १००० स्वार दुघोडी होते. तींत ५०० जात व २०० स्वार कमी केल्याचें फर्माविलें.

औशाचा किल्लेदार सय्यिद अन्वरखान यास १५०० जात व ९०० स्वार एवढी मनसब होती. त्याचे १०० स्वार कमी केले होते. आतां त्यांत वाढ केल्याचा हुकूम झाला.

पेडगांवचा किल्लेदार मुकीमखान यास १५०० जात व ९०० स्वार अशी मनसब होती; तो मरण पावला.

४१०

| जु. २६ मोहरम २६ सोम. | سیاهِ اخبارات دربار معلے ماه محرم ۲۶ سنہ یوم الاثنا سنہ ۲۶ | श. १६०४ पौष वद्य १३ इ. १६८३ जानेवारी १५ |
|---|---|---|

بہ روح اللہ خان فرمودند کہ بہ محتشم خان فوجدار میوات و مان سنگہ فوجدار ماندل وغیرہ فوجداران نواحی اجمیر بنویسد کہ اکبر باغی از ملک کافر بچہ برآمدہ قصد باطنی مارواڑ دارد و بہ اسد خان حکم شد کہ تعاقب نمایند و دستگیر یا بقتل رسانده هرگاه شمارا بہ طلبند با جمیعت آمده کومک نمایند بہ روح اللہ خان فرمودند کہ حسب الحکم بہ بہادرخان بنویسد کہ محمد جعفر بخشی واقعہ نویس فوج را سردار جہازات از انتقال {از انتقال} رومی خان مرحوم مقرر نموده اگر کسی از برادری خان مرحوم قابل خدمت باشد باو مقرر نمایند۔

रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असाः—मेवातचा फौजदार मुहत-शिमखान, मांदलचा फौजदार भावसिंग आणि अजमीरच्या आसपासचे फौजदार यांना लिहावें कीं, 'अकबर काफिर बच्चाच्या मुलखांतून निघून आला आहे. त्याचा मारवाडास जाण्याचा विचार आहे.' असदखानास हुकूम झाला कीं, 'त्याचा पाठलाग करून त्यास पकडावें किंवा मारावें. तुला बोलावितील तेव्हां तू जमेतीसह जाऊन कुमक करावीस.

रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा :-- 'बहादुरखानास हस्बुलहुकूम लिहावा कीं, फौजेंतील वाकेनवीस मुहम्मद जअफर बक्षी यास रूमीखानाच्या मृत्यूमुळें जहाजांचा सरदार नेमलें आहे. खानाच्या भाऊबंदांपैकीं कोणी चाकरीस योग्य असेल तर त्यास नेमावें'.

४११

| जु. २६ मोहरम २७ मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے ماه محرم ۲۷ سنہ یوم الثلث سنہ ۲۶ | श. १६०४ पौष वद्य १४ इ. १६८३ जानेवारी १७ |
|---|---|---|

میر بابا وغیره دو نفر عرضہ داشت شهاب الدین خان آورده بنظر گذرانیده معروض داشتہ بود کہ مردم جاسوسان خبر آوردند کہ افواج غنیم در راج گده و پوناده و سیواپور جمع می شوند قصد چنان دارند کہ در ملک بادشاهی بیایند بنابران فدوی بمعہ بندهای پادشاهی یلغر نموده در آن جا رسیده مقهوران مقابلہ کرده از اقبال حضرت شکست داده بسیاری را بقتل رسانیده چهل دهوپ و شانزده شمشیر و یک زوج نقاره و یک منزل پالکی از مقهوران بدست آورده بحضور فرستاده فرمودند کہ درباب مجری فرمان بہ خان مذکور بنویسد۔

मीर बाबा वगैरे दोन लोकांनीं शिहाबुद्दीनखानाची अर्जदाश्त आणली होती ती बादशाहानें पाहिली. तो लिहितो कीं 'शत्रूच्या फौजा राजगड, पुरंधर व शिवापूर येथे जमा होत आहेत. त्यांचा बादशाही मुलखांत जाण्याचा विचार आहे अशी बातमी हेरांनीं आणली आहे. म्हणून मी बादशाही लोकांसह तेथें पोहोंचून शत्रूशीं सामना केला. बादशाही सुदैवानें त्यांचा पराजय करून अनेकांना मारलें. शत्रूकडील चाळीस धूप, सोळा तलवारी, नगाऱ्याचा एक जोड व एक पालखी हातीं आली. तें सर्व हुजूर पाठविलें आहे'. हुकूम झाला कीं, त्याचें म्हणणें मान्य असल्याचें फर्मान खानास लिहावें

४१२

| जु. २६ मोहरम २८ बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے ماه محرم ۲۸ سنہ یوم الاربعہ سنہ ۲۶ | श. १६०४ पौष वद्य ३० इ. १६८३ जानेवारी १७ |
|---|---|---|

بہ روح اللہ خان فرمودند کہ سرانجام نموده مستعد باشد جانب گلشن آباد

رخصت خواهم فرمود و نیز شش هزار شش صد هفتاد سوار را فوج خان مذکور سابق مقرر شده بود خبر رسیده نمایند۔

فرمان عالی شان و یک راس اسپ قیمت پنجاه مهریه با ساز طلا بابت فتح از مردم غنیم به شهاب الدین صادر نموده حواله میر بابا منصب دار نموده رخصت فرمودند بدیع الزمان وغیره دو نفر گرزبرداران خلعت و فرمان به شاهزاده معزالدین برده بود رسانیده جواب آن عرضه داشت شکر گزاری آورده بنظر گذرانیده و زبانی بعرض رسانید که شاهزاده جیو موافق حکم از احمدانگر کوچ نموده به رام دواله رسیده فدوی را از لوه گده رخصت حضور نموده پانصد روپیه دو خلعت خدمتانه یافته معاف حکم شد۔

रूहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, 'सरंजामासह तयार असावें. तुला गुलशनाबादेकडे पाठवूं इच्छितों. तसेंच पूर्वी खानाच्या फौजेंत नेमलेल्या ६६७० स्वारांची बातमी आणून तयार असावें'.

शत्रूवर विजय मिळविला म्हणून शिहाबुद्दीनखानास देण्यासाठीं फर्मान व पन्नास मोहरा किंमतीचा सोन्याच्या साजासह एक घोडा मीर बाबा मन्सबदाराजवळ दिला.

बदीउझ्झमान वगैरे दोन गुर्जबर्दारांनीं मुइझ्झुद्दीनसाठीं खिलअत व फर्मान आणलें होतें तें पोहोंचविलें. उत्तरादाखल त्याचा आभारप्रदर्शित करणारा अर्ज आणला तो बादशाहास दाखविला. नंतर तोंडीं अर्ज केला कीं, 'शाहझादा हुकुमाप्रमाणें अहमदनगरहून कूच करून रामदिवाला येथें पोहोंचला. मला त्यानें लोहगडाहून हुजूर जाण्यास रजा दिली. पांचशें रुपये व दोन खिलअत असा खिदमताना मिळाला'. हुकूम झाला कीं, तो माफ केला आहे.

## ४१३

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम २९<br>गुरु. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه محرم ۲۹ سنه<br>یوم الخمیس سنه ۲۶ | श. १६०४ माघ शुद्ध १<br>इ. १६८३ जानेवारी १८ |

بشاه عالم جیو فرمودند که نشان و عرضه داشت بهره مند خان به شاهزاده معزالدین بنویسد که بمعه فوج طیار باشد هرگاه حکم رسد برآن عمل نماید

بعرض رسید که یک شیر متصل موضع تانکلی ظاهر شده است بنابران سیادت خان را رخصت نموده که مردم جلوباور همراه گرفته محاصره نماید۔

शाहआलम यास हुकूम झाला तो असा :—बहरामंदखानास निशान व मुइझ्झुद्दीनास अर्ज लिहावा कीं, फौजेसह तयार असावें व हुकूम मिळेल त्याप्रमाणें करावें

अर्ज आला कीं, मौजे टाकळीजवळ एक वाघ दिसला आहे. म्हणून सियादतखानास धाडून फर्माविलें कीं, हाकारे घेऊन वाघास घेरा घालावा.

## ४१४

| | | |
|---|---|---|
| जु. २६ मोहरम ३० शुक्र. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۳۰ سنہ<br>یوم الجمعہ سنہ ۲٦ | श. १६०४ माघ शुद्ध २<br>इ. १६८३ जानेवारी १९ |

عرضہ داشت بادشاه زاده محمد اعظم شاه بداک چوکی آمده بنظر گذشت معروض داشتہ بود کہ بنده بموجب حکم از گہاتی مانک عبور نموده این طرف آمده براه تمرنی بہ پیدگانو خواهم آمد شیخ رضی را براے آوردن خزانہ بمعہ جمعیت بہ پرینده رخصت نموده ایم بندگان حضرت بمطالعہ خاص در آورده فرمان دستخط خاص بشاهزاده جیو بداک چوکی روانہ فرسودند

عرضہ داشت ابوالحسن والی حیدرآباد بداک چوکی آمده بنظر گذشت

دو گہری شب گذشتہ لطف الله و نصرت خان پسر خان جہان بہادر را طلبیده خلوت نموده بندگان حضرت نصرت خان را نصیحت کرده خان مذکور بعرض رسانید کہ پسر غلام بعرض رسانیده است کہ اگر از اکبر باغی مقابلہ شود درباب دستگیر نمودن و بقتل رسانیدن هرچہ امر شود حکم شد کہ اگر دستگیر شود بہتر والا بقتل رساند نیز عرض نمود کہ راو محکم سنگہ چندراوت و کیرت سنگہ ولد راو کرن از تعیناتی فوج پسر غلام همراه روح الله خان تعینات نموده اند امیدوار اند کہ بدستور سابق تعینات باشد منظور نکرده حکم شد آن هردوارا تعینات قاسم خان نمایند و بہ نصرت خان حکم شد کہ فردا رخصت شود و آنچہ دیگر مطالب داشتہ باشد بہ بخشیان اعظام نوشتہ بدهد بعرض خواهند رسانید۔

मुहम्मद अअजमशाहाचा अर्ज डाकचौकीनें आला तो पाहिला. त्यानें लिहिलें होतें कीं, 'मी हुकुमाप्रमाणें माणिकघाटी उतरून इकडे आलों. टेंभुरणीमार्गें पेडगांवास येऊं इच्छितों. शेख रिजा यास खजिना आणण्यासाठीं जमेतीसह

परिंड्याकडे पाठविलें'. बादशाहानें अर्ज वाचून 'शाहाझाद्यास स्वत:च्या सहीनें फर्मान डाकचौकीनें पाठवावें' असा हुकूम दिला.

हैद्राबादच्या मालक अबुलहसन याचा अर्ज डाकचौकीनें आला तो पाहिला.

दोन घटिका रात्र झाल्यानंतर लुत्फुल्लाहखान व खानजहान बहादुराचा मुलगा नुस्रतखान यांस बोलावून खलबत केलें. बादशाहानें नुस्रतखानास उपदेश केला. खानजहान बहादुरानें अर्ज केला तो असा :–'माझ्या मुलानें अर्ज केला आहे कीं, बंडखोर अकबराशीं लढाई झाली तर त्यास पकडावें किंवा मारावें याबाबत हुकूम व्हावा.' त्यावर हुकूम झाला कीं, पकडतां आलें तर ठीकच; नाहींतर मारावें. नंतर त्यानें अर्ज केला कीं, 'माझ्या मुलाच्या फौजेंत नेमलेले राव मुहक्कमसिंग, चंद्रवन व कीरतसिंग वलद रावकर्ण यांना रूहुल्लाह-खानाबरोबर नेमण्यांत आलें आहे. आशा करतों कीं, पूर्वीच्या दस्तुराप्रमाणें त्यांना नेमावें.' बादशाहानें तें मान्य केलें नाहीं. हुकूम झाला कीं, 'त्या दोघांना कासिमखानाबरोबर नेमावें.' तसेंच नुस्रतखानास हुकूम झाला कीं, 'उद्या तुला पाठविणार आहों; तेव्हां कांहीं इतर मागण्या असतील त्या मोठ्या बक्षीकडे लिहून द्याव्या म्हणजे तो अर्ज करील'.

४१५

| | | |
|---|---|---|
| जु. २६ सफर १ | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه صفر غره منه<br>یوم ... سنه ۲۶ | श. १६०४ माघ शुद्ध ३<br>इ. १६८३ जानेवारी २० |

از واقعه فوج بهادرخان بعرض رسید که سیاماجی تعینات این جا پانصدی ذات چهارصدی سوار بود فراری شده یوسف بیگ گرزبردار موافق حکم رندوله خان اندرسنگه را بتعیناتی فوج قاسم خان و سید فتح علی خان را بتعیناتی فوج الهام الله خان از فوج محمد اسحاق سزاولی کرده رسانیده آمده بعرض رسانید که قاسم خان و الهام الله خان برائے تنبیه مردم غنیم سواری نموده هر دو فوج را نلدرگ گذاشته آمدیم ـ

बहादुरखानाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें कीं, येथें नेमलेल्या शामाजीस ५०० जात व ४०० स्वार अशी मनसब होती. पण तो पळून गेला. युसुफबेग गुर्जबर्दारानें हुकुमाप्रमाणें रणदूलाहखान व इंद्रसिंग यांना कासिम-खानाच्या फौजेंत व सय्यिद फतह अलीखान यास मुहम्मद इसहाक याच्या

फौजेंत पोहोंचविलें आणि येऊन अर्ज केला कीं, कासिमखान व इल्हामुल्लाहखान ह्यांनीं शत्रूला तंबी देण्यासाठीं स्वारी केली आहे. दोन्ही फौजांना नळदुर्गास सोडून आलों.

## ४१६

| | | |
|---|---|---|
| जु. २६ सफर २ | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ صفر ۲ سنہ<br>یوم ... سنہ ۲٦ | श. १६०४ माघ शुद्ध ४<br>इ. १६८३ जानेवारी २१ |

حکم شد کہ یک زنجیر فیل قیمت هفت هزار روپیہ و ترکش جہت روح اللہ خان و خلعت و اسپان وغیرہ همراهیان را علحدہ نمایند کہ بروز پنج شنبہ مرحمت نمودہ بگلشن آباد رخصت خواهم فرمود۔

'सात हजार रुपये किमतीचा एक हत्ती व बाणांचा भाता रूहुल्लाहखाना-साठीं आणि खिलअत व घोडी वगैरे त्याच्या सोबतच्या लोकांसाठीं वेगळे काढून ठेवावें. गुरुवारीं त्यांना गुलशनाबादेस पाठवूं इच्छितों' असें बादशाहानें फर्मावलें.

## ४१७

| | | |
|---|---|---|
| जु. २६ सफर ३ | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ صفر ۳ سنہ<br>یوم ... سنہ ۲٦ | श. १६०४ माघ शुद्ध ५<br>इ. १६८३ जानेवारी २२ |

چون بخشی الملک روح اللہ خان بحضور نیامدہ بندگان حضرت یاد فرمودند. بعرض رسید کہ در [ر] های آزار دارد نیامدہ بعزیز اللہ خان برادر خان مذکور فرمودند کہ بہ بخشی الملک رفتہ بگوید کہ بروز پنج شنبہ آمدہ رخصت شدہ بگلشن آباد برود

रूहुल्लाहखान हुजूर न आल्यामुळें बादशाहानें त्याची आठवण काढली. तेव्हां समजलें कीं, तो आजारी पडल्यामुळें आला नाहीं. उपर्युक्त खानाचा भाऊ अझीझुल्लाहखान यास हुकूम झाला तो असा:—बक्षीउल्मुल्काकडे जाऊन सांगावें कीं, त्यानें गुरुवारीं यावें; त्यास गुलशनाबादेकडे पाठविणार आहों.

४१८

| जु. २६ सफर ४ | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه صفر ۴ سنه<br>یوم ... سنه ۲۶ | श. १६०४ माघ शुद्ध ६<br>इ. १६८३ जानेवारी २३ |
|---|---|---|

فرمان در باب قلعه داری پیدگانو و خلعت ماتمی پدر بنام عبدالرحمن ولد مقیم خان مرحوم حواله عبدالرحیم گرز بردار فرمودند

سیف الله ولد روح الله خان عرض نمود که میرغلام التماس نمود که موافق حکم بروز پنج شنبه آمده بگلشن آباد رخصت خواهم شد۔

باهتمام خان فرمودند که بهادر افغان نوشتجات میان خان و سید خان و غیره بدلیرخان آورده است حقایق او این قدر نموده بعرض رسانند چنانچه پرسیده عرض نمود التماس میدارد که نوشتجات سنبها مقهور بنام میان خان و سید خان پسران بهای خان ترین و حسین خان مهمند و بهادرخان پنی و عبدالکریم داوزی جاگیرداران منگل بیده آمده که شما نوکری بنده قبول نماید از یافت این جا رعایت خواهم کرد و جاگیر خودها در ملک بنده در آرند و اگر رضامند خواهند شد جاگیر بدستور سابق بشما بحال خواهم داشت یا اگر جای دیگر جاگیر مقرر خواهم کرد چنانچه این معنی قبول نکرده که مایان مسلمان ایم دین اسلام خود گذاشته مطالبت کافر چطور کبول نمایم بنابران بنده را نزد دلیرخان فرستادند که شمابان والی هستند اگر قول پنجه معرفت خود و جاگیرها بدستور سابق بحال مرحمت بکنانند برکاب بادشاهزاده محمد اعظم ساه رفته خدمت نمایند و اگر بیجاپوری منگل بیده را بمایان بحال داشتی قبول نکنند بشاهزاده جیو حکم شود که کومک بندهای نمایند که منگل بیده سرحد بیجاپور است بتصرف اولیای دولت قاهره بیارم و خط سنبها مقهور بنام آنها آمده بود بجنس در خط خود بجهته فرستاده اند حکم شد افغان مذکور نزد دلیرخان باشد جواب فهمیده خواهم فرمود۔

पेडगांवच्या किल्लेदारीबावत हुकूम झाला कीं, अब्दुर्रहमान वलद मुकीम-खान याच्या नांवें फर्मान व पित्याच्या दुखवट्याचीं वस्त्रें अब्दुर्रहीम गुर्जबर्दाराच्या हवाला करावीं. सैफुल्लाह वलद रूहुल्लाहखान यानें अर्ज केला

तो असा :—मीर गुलामानें विनंति केली आहे कीं, हुकुमाप्रमाणें गुरुवारीं येऊन तो गुलशनाबादेस जाऊं इच्छितो.

इहतिमामखानास हुकूम झाला कीं, 'मियाखान व सय्यिदखान वगैरेंनीं दिलेरखानास लिहिलेलीं पत्रें बहादुर अफगान यानें आणलीं आहेत. त्यांतील घटनांबद्दल अर्ज करावा'. त्यानें विचारून अर्ज केला तो असा :—तो विनंती करितो कीं, संभाचीं पत्रें मंगळवेढें येथील जागीरदार भाईखानतरीनचीं मुलें मियाखान व सय्यिदखान, हुसैनखान महमंद, बहादुरखान पन्नी, अब्दुल करीम दाऊजी, यांना आलीं आहेत तीं अशीं :—'तुम्ही माझी चाकरी कबूल करावी. नंतर पाहिजे ती कृपा करीन. कारण तुमच्या जागिरी माझ्या मुलुखांत आहेत. हें मान्य असेल, तर जागिरी पूर्वीप्रमाणें बहाल करीन किंवा दुसऱ्या ठिकाणीं नेमून देईन'. परंतु आम्ही हें म्हणणें मान्य केलें नाहीं. कारण आम्ही मुसलमान आहों व आमचा इस्लाम धर्म सोडून काफिराच्या मागण्या आम्ही कशा मान्य करूं? म्हणून मला दिलेरखानाजवळ पाठविलें. तू आमचा मालक आहेस. स्वत:मार्फत पंज्याचा कौल व पूर्वीप्रमाणें जागिरी आम्हांस बहाल करविल्यास मुहम्मद अअजमशाहाबरोबर जाऊन आम्ही चाकरी करूं. विजापुरी मंगळवेढें आम्हांला जागीर दिलें तर तें मान्य करणार नाहीं. शाहझाद्यास आमची कुमक करावी असा हुकूम व्हावा. म्हणजे विजापुरी हद्दीवर असलेलें मंगळवेढें बादशाही अमलाखालीं आणूं. संभाचें पत्र या लोकांच्या नांवें आलें होतें तें हुजूर पाठविलें आहे. हुकूम झाला कीं, 'अफगानानें दिलेरखानाजवळ असावें; सर्व समजून घेऊन उत्तर देऊं.'

## ४१९

| | | |
|---|---|---|
| जु. २६ सफर ५ | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه صفر ٥ سنه<br>یوم ... سنه ٢٦ | श. १६०४ माघ शुद्ध ७<br>इ. १६८३ जानेवारी २४ |

عبدالرحمن گرزبردار به حسب الحکم مهداجی را از تمرنی سزاولی کرده به پیدگانو محمد نعیم را به پرینده رسانیده آمده بعرض رسانید بهاسکرراو داروغه هرکارهای عرض نمود که مردم هرکاره خبر آورده که اکبر باغی بتاریخ ١٤ محرم از ملک سنبها مقهور آمده پائین سرحد مقهور و فرنگ

سکونت گرفتہ و قصد چنان دارد کہ بہ ملک فرنگستان برود چنانچہ بہاسکر
چہار بیستی بود بیستی ذات کمی اضافہ فرمودند۔

अब्दुर्रहमान गुर्जबर्दारानें महदाजी व मुहम्मद नईम यांच्या नांवें हस्बुलहुकूम नेले होते ते पोहोंचवून आणि सजावली करून टेंभुर्णीहून महदाजीला पेडगांवास व मुहम्मद नईम याला परिंड्यास पोहोंचवून येऊन अर्ज केला.

हरकाऱ्यांचा दारूगा भास्करराव यानें अर्ज केला तो असा :---'हरकाऱ्यांनीं बातमी आणली आहे कीं, अकबरानें मोहरमच्या १४ तारखेस संभाच्या मुलुखांतून निघून संभा व फिरंगी यांच्या सरहद्दीच्या पायथ्याशीं मुक्काम केला आहे. फिरंग्यांच्या मुलखांत जावें असा त्याचा बेत आहे.' म्हणून भास्कराची मनसब चार बिस्ती (८०) जात केली होती ती परत वाढविली.

## ४२०

| | | |
|---|---|---|
| जु. २६ सफर ८ | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۸ سنہ<br>یوم ... سنہ ۲٦ | श. १६०४ माघ शुद्ध ९<br>इ. १६८३ जानेवारी २७ |

چون حقایق رستم خان عرف شرزہ خان بیجاپوری بعرض رسید کہ بنزد
شاهزاده محمد اعظم شاه آمده رجوع شد با سنبہا مقہور ملحق است بنابران
بمعہ برادری سوای پسر کہ در حضور است برطرف فرمودند۔

रुस्तुमखान उर्फ शर्झाखान विजापुरी याजकडील घटनांवरून समजलें कीं, तो मुहम्मद अअजमशाहाकडे येऊन रुजू झाला होता. परंतु तो संभास मिळाला आहे. म्हणून हुजूर असलेला त्याचा मुलगा सोडून भाऊबंदांसह त्याला बडतर्फ केलें.

## ४२१

| | | |
|---|---|---|
| जु. २६ सफर ९ | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۹ سنہ<br>یوم ... سنہ ۲٦ | श. १६०४ माघ शुद्ध ११<br>इ. १६८३ जानेवारी २८ |

بشیخ مخدوم منشی فرمودند بخدمت شاهزاده محمد اعظم شاه عرضداشت
نماید کہ بمعہ فوج اکاوده (انکوده) سرحد بیجاپور رفتہ هستند و سید خان
و میان خان وغیره نوکران والی بیجاپور جاگیردار منگل بیده بنوشتہ شما
آنچہ حقایق خود بدلیرخان نوشتہ بود مفصل بعرض رسید اگر می داند کہ از

کومک بادشاهی منگل بیده بدست شمایان ماند بهتر و متعلقان خودها درآن‌جا گذاشته بخاطر جمع بیایند و اگر احیاناً جای بدست شما نماند پس اهل عیال خودرا همراه گرفته بحضور بیاید در ملک بادشاهی بطریق وطن جاگیر مرحمت نموده خواهد شد بعد از آن فکر آن جا براحل خواهم فرمود به حسب به شمس‌الدین خان بخشی فوج بادشاهزاده و دلیر همت برادرزاده دلیرخان قلمی نمایند که نوکران بیجاپوری را تسلی نموده بطلبید و بهادر نوکر میان‌خان که خطوط آنها آورده بود رخصت نموده که مصحوب یک نوکر خود مع خطوط خودها بنام آن جماعه داده به بیجاپور بفرستد۔

به زبانی هرکاره های بعرض رسید که اکبر باغی پائین سرحد مقهور و فرنگستان به بندر کوها (گووه) رفته نشسته است میخواهد که بر جهاز بنشیند و طیاری جهازهای میشود معلوم نیست که کجا خواهد رفت۔

शेख मख्दूम मुन्शी यास हुकूम झाला कीं, अअजमशाहानें फौजेसह विजापुरी सरहद्दीवर अकलूदा (=अंकोदा ?) येथें राहावें. मंगळवेढें येथील जागीरदार आणि विजापुरकरांचे नोकर सय्यिदखान, मियाखान व इतर यांनीं जी हकीकत दिलेरखानास लिहिली होती ती सर्व तुमच्या पत्रामुळें समजली. बादशाही कुमकेमुळें मंगळवेढें तुमच्या हातीं राहील असें तुम्हास वाटत असेल तर ठीकच; मग तुमचे कारभारी व संबंधी यांस तिथें सोडून तुम्ही स्वस्थ चित्तानें इकडे यावें. तुमच्या हातीं राहात नाहीं असें झालें तर मग आपल्या कुटुंबियांसह हुजूर यावें. बादशाही मुलुखांत वतनासारखी जागिरीची कृपा केली जाईल. त्यानंतर तिकडील बाजूचें काम पूर्वींप्रमाणें तुमचेवर सोपवीन. शाहझाद्याच्या फौजेचा बक्षी शम्सुद्दीनखान व दिलेरखानाचा पुतण्या दिलेर हिम्मत यांस लिहावें कीं, 'विजापुरी नोकरांना दिलासा देऊन बोलवावें. त्यांचीं पत्रें आणणारा मियाखानाचा नोकर बहादुर याजबरोबर आपल्या एका नोकरास, त्यांच्या नांवें आपलीं पत्रें देऊन, विजापुरास पाठवावें'.

हरकाऱ्यांच्या तोंडून समजलें कीं, अकबर संभा व फिरंगी यांच्या सरहद्दीजवळ गोव्यास जाऊन बसला आहे. त्याचा जहाजांत बसण्याचा बेत आहे. जहाजांची तयारी होत आहे. कुठें जाणार तें समजत नाहीं.

## ४२२

जु. २६ सफर ११

سیاهم اخبارات دربار معلے
ماه صفر ۱۱ سنہ
یوم ... سنہ ۲۶

श. १६०४ माघ शुद्ध १३
इ. १६८३ जानेवारी ३०

حکم شده بود کہ قاسم‌خان بمعہ فوج از نلدرگ نزد روح الله‌خان بیاید درین ولا حکم شد کہ بمعہ فوج در پرینده آمده بماند و از آن جا محمد نعیم بدستور سابق در بیر آمده خبردار باشد۔

हुकूम झाला होता कीं, 'कासिमखानानें आपल्या फौजेसह नळदुर्गाहून रूहुल्लाहखानाजवळ जावें'. आतां हुकूम झाला कीं, फौजेसह परिंड्यांत येऊन रहावें आणि मुहम्मद नईम यानें पूर्वीप्रमाणें बीड येथें जाऊन सावध असावें.

## ४२३

जु. २६ सफर १३

سیاهم اخبارات دربار معلے
ماه صفر ۱۳ سنہ
یوم ... سنہ ۲۶

श. १६०४ माघ शुद्ध १५
इ. १६८३ जानेवारी १

عرضداشت بادشاهزاده محمد اعظم‌شاه آمده بنظر گذشت معروض داشتہ بود کہ حکم والا صادر شود کہ بتخانہ مہادیو کہ از رحمت‌پور پیشتر در ملک سنبہا مقہور واقعہ است رفتہ مسمار نماید چنانچہ موافق حکم باین سمت روانہ شده‌ایم منسمار خواهم ساخت

शाहझादा मुहम्मद अअजमशाह याची अर्जदाश्त आली ती बादशाहानें पाहिली. अर्ज केला होता कीं, 'संभाच्या मुलुखांतील रहिमतपुरापुढें महादेवाचें देवालय आहे तें जाऊन पाडून टाकावें असा हुकूम व्हावा. त्याप्रमाणें जाऊन तें पाडीन'.

## ४२४

जु. २६ सफर १३

سیاهم اخبارات دربار معلے
ماه صفر ۱۳ سنہ
یوم ... سنہ ۲۶

श. १६०४ माघ वद्य १
इ. १६८३ फेब्रुवारी १

شکارخان عرض نمود کہ فدوی موافق حکم جہتہ دیدن شکار جام‌کہره رفتہ بود چنانچہ گہات کلک های طیاراند۔

میرفتح الله مشرف فراشخانہ فرمودند کہ فردا پیشخانہ را ببرد بروز شنبہ برائے شکار آن جا واری خواهد فرمود

بہ لطف الله خان فرمودند حسب الحکم بسلاح خان کہ جواهر وغیرہ بخدمت بادشاهزادہ محمد اعظم شاہ بردہ بنویسد کہ در راہ خطرہ است در احمد نگر باشد هرگاہ بادشاهزادہ جیو بتخانہ مسمار نمودہ در پیدگانو خواهد آمد برساند۔

शिकारखानानें अर्ज केला कीं, 'हुकुमाप्रमाणें मी शिकार बघण्यासाठीं जामखेडास गेलों होतों. घाटांत कलक (एक प्रकारचें जनावर) आहेत.' फरासखान्याचा मुशरीफ मीर फतहुल्लाह यास हुकूम झाला कीं, 'उद्या पेशखाना पुढें न्यावा. आम्ही शनिवारीं शिकारीसाठीं तिकडे स्वारी करूं इच्छितों'.

लुत्फुल्लाहखानास हुकूम झाला तो असा :—'मुहम्मद अअजमशाहाकडे जवाहीर वगैरे नेत असलेल्या सलाहखानास लिहावें कीं, वाटेंत धोका आहे. तू अहमदनगरांत असावेंस. शाहझादा देऊळ पाडून पेडगांवास येईल तेव्हां तेथें पोहोंचवावें'.

## ४२५

| | | |
|---|---|---|
| जु. २६ सफर १५ | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماہ صفر ۱۵ سنہ<br>یوم ... سنہ ۲٦ | श. १६०४ माघ वद्य २<br>इ. १६८३ फेब्रुवारी ३ |

غریب بیگ گرزبردار عرضہ داشت قاسم خان آوردہ بنظر گذرانیدہ زبانی بعرض رسانید کہ بخان مذکور خبر رسیدہ کہ مانکو بلال سرگروہ جمعیت سنبہا مقہور با پنج هزار سوار پنج کروہ آن طرف نلدرگ نمودار شدہ چنانچہ خان مذکور ازین استماع سوار شدہ با مردم غنیم مقابلہ نمودہ چہتری و نشان وغیرہ بدست آوردہ میرعابد دیوان فوج شش صدی ذات هفتاد سوار بود بمعہ چند کس گرزبردار وغیرہ بکار آمدہ بعد معروض از روی مہربانی خلعت و فرمان و علم و طوغ مرحمت نمودہ حوالہ میرغریب وغیرہ نمودہ هزار پانصدی ذات یک هزار سوار منجملہ یک صد سوار دو اسپہ از آن جملہ دو صد سوار شرطی بودند بلا شرط نمودہ یک صد سوار اضافہ فرمودند۔

गरीबबेग गुर्जबर्दारानें कासिमखानाची अर्जदाश्त आणून दाखविली व तोंडीं अर्ज केला कीं, 'संभाच्या लोकांचा नायक माणको बल्लाळ हा ५००० स्वारांसह नळदुर्गच्या बाजूस दिसला. यामुळें खानानें स्वार होऊन शत्रूशीं

सामना केला. शत्रूचें छत्री, निशाण वगैरे हातीं आलें. फौजेंतील दिवाण मीर आबिद यास ६०० जात व ७० स्वार अशी मनसब होती. तो कांहीं गुर्जबर्दारांसह कामास आला'. नंतर त्याजवर कृपा म्हणून खिलत, फर्मान, झेंडा, तोघ, मीर गरीब वगैरेंच्या हवालीं केलें. खान मजकुराच्या १५०० जात व १००० स्वारांपैकीं १०० स्वार दुघोडी होते व २०० स्वार सशर्त होते, ते विनाशर्त करून १०० स्वारांची वाढ फर्माविली.

४२६

| जु. २६ सफर १७ | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ صفر ۱۷ منہ<br>یوم ... سنہ ۲٦ | श. १६०४ माघ वद्य ४<br>इ. १६८३ फेब्रुवारी ५ |
|---|---|---|

صبحی بندگان حضرت از دیره جام‌کهره بجهتہ شکار سوار شدند چون سری راه دیر (دیره) شاه عالم جیو بود بنابران شاهزاده جیو یک راس اسپ معہ زین ساده و یک قبضہ جمدهر و ساز سمیراهنی پیش‌کش گذرانیده بندگان حضرت جمدهر واپس داده چون احوال پریشانی رامرای نوکر سنبہا مقهور کہ هزاری ذات هشت صد سوار منجملہ دو صد سوار دو اسپہ نوسرافراز شده بعرض رسید حکم شد پانجده هزار روپیہ مساعدت بدهند و تاکید نماید کہ بتعاینات فوج روح الله خان برود۔

जामखेडच्या डेऱ्यांतून सकाळीं बादशाह शिकारीसाठीं स्वार झाला. शाहआलमचा डेरा शेवटीं होता. शाहझाद्यानें साधें खोगीर चढविलेला एक घोडा, एक जमधर व साज असलेली लोखंडाची तलवार भेट म्हणून बादशाहास दिली. बादशाहानें जमधर परत केला. एक हजार जात व आठशें स्वार पैकीं २०० स्वार दुघोडी असा नवा मानकरी झालेला संभाचा नौकर रामराय यानें आपल्या बिकट परिस्थितीचा अर्ज केला. हुकूम झाला कीं, १५००० रुपये त्यास मदत द्यावें आणि ताकीद करावी कीं, त्यानें रूहुल्लाहखानाच्या फौजेकडे जावें.'

४२७

| जु. २६ सफर १८ | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ صفر ۱۸ سنہ<br>یوم ... سنہ ۲٦ | श. १६०४ माघ वद्य ५<br>इ. १६८३ फेब्रुवारी ६ |
|---|---|---|

دو گهری روز برآمده بندگان حضرت دیره جام کهره سوار شدند دَر راه

یک نیلگاو شکار نموده پنج نیم کروه طی نموده در عمل دو پهر برآمده داخل دولت‌خانه متصل موضع پیدگنو نشسته دیوان موقوف فرمودند شکارخان را معه چریب جانب لاسور رخصت نموده حکم شد شکار دیده هنوز جمعه آمده بعرض رسانند و محمد مطلب خوش‌منزل را حکم شد جای دولت‌خانه دیده بیاید۔

दोन घटका दिवस निघाल्यावर जामखेडच्या डेऱ्यांतून बादशाहा स्वार झाला. वाटेमध्यें एका नीलगाईची शिकार करून त्यानें ५॥ कोस अंतर पार केलें. दुपारच्या वेळेस तो पिंपळगांव येथील दौलतखान्यांत पोहोंचला. त्यानें दिवाण भरविण्याचें स्थगित केलें. शिकारखानास जरीबासह (मोजणीची सांखळी) लासुराकडे पाठविलें व हुकूम केला कीं, शिकार बघून शुक्रवारीं येऊन अर्ज करावा. मुहम्मद मुत्तलिब खुशमंझिल यास हुकूम झाला कीं, दौलतखान्यासाठीं जागा बघून यावें.

४२८

| जु. २६ सफर २० | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه صفر ۲۰ سنه<br>یوم ... سنه ۲۶ | श. १६०४ माघ वद्य ७<br>इ. १६८३ फेब्रुवारी ८ |
|---|---|---|

رام رای دکهنی را یک راس اسپ انعام داده نزد روح الله خان رخصت فرمودند هزاری ذات هشت صد سوار منجمله دو صد سوار دو اسپه از واقعه فوج روح الله خان بعرض رسید که خان مذکور بتاریخ هفدهم شهرحال آمده بگلشن آباد رسید۔

از عرضه داشت شمشیرخان فوجدار دهامونی بعرض رسید که پسران چنپت مقهور ستر گده قلعه باسم خود نموده بود بنده سواری کرده مفسدان بجنگ پیش آمدند از اقبال حضرت قریب دو صد کس را به قتل رسانیده و بسیاری را زخمی ساخته قلعه را بتصرف بادشاهی آورده قریب شصت کس این جانب بکار آمده و زخمی شدند فرمودند مجرای کلی شد۔

रामराय दखनी यास एक घोडा बक्षीस देऊन रुहुल्लाहखानाकडे पाठविण्याचा हुकूम झाला. त्यास एक हजार जात व आठशें स्वार पैकीं दोनशें स्वार दुघोडी अशी मनसब आहे.

रूहुल्लाहखानाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें कीं, हा खान चालू महिन्याच्या १७ तारखेस गुलशनाबादेस येऊन पोहोंचला.

धामोणी येथील फौजदार समशेरखान याच्या अर्जावरून समजलें कीं, 'चंपतच्या मुलांनीं सत्रगडास आपलें नांव दिलें. मी स्वारी करून शत्रूशीं सामना केला. बादशाही सुदैवानें जवळ जवळ २०० लोकांना मारलें आणि अनेकांना जखमी करून किल्ला बादशाही अमलाखालीं आणला. आपल्या बाजूचे जवळ जवळ ६० लोक कामास आले व जखमी झाले.' हुकूम झाला कीं, मान्य आहे.

### ४२९

| जु. २६ सफर २० | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۲۰ سنہ<br>یوم ... سنہ ۲٦ | श. १६०४ माघ वद्य ७<br>इ. १६८३ फेब्रुवारी ८ |
|---|---|---|

امانت‌خان عرض نمود کہ راگهر کہوره (کہوپره) بابت سنبہا مقہور سابق باراده بندگی التماس نموده بود اگر چیزی رعایت شود قلعہ ترمبک کہ از مقہور است میدهم بنابران هفصدی ذات دوصد سوار سرافراز نموده چیزی نقد مرحمت شده بود چون قلعہ‌دار آن‌جا این معنی راضی نشد ازین ممر فراری شده و جمناجی چهارصدی یک‌صد سوار اضافہ اورا اهتمام‌خان قید نموده او التماس می نماید کہ بنده نوکر بادشاهی است ازو هیچ قرابت ندارد هرچہ امر شود حکم شد ضامن گرفتہ خلاص نمایند۔

عرضداشت بهادرخان آمده بنظر گذشت معروض داشتہ بود کہ در قلعہ فرنگیان سنبہا مقہور متصرف شد توپخانہ طیار نموده می خواست کہ انچہ جهازات از طرف سورت نزد بنده می آیند آمدن ندهند۔

چنانچہ فدوی سیدی یعقوب‌خان را بمعہ جمعیت آن جا فرستاده چنانچہ خان مذکور رفتہ یک قلعہ را مسمار نموده و اکثر مردم بقتل رسانیده و قلعہ دویم را محاصره کرده مردم مقہور را بجہنم رسانیده لیکن قلعہ بدست نیامده بنابران بنده بتاریخ ۲۷ محرم سواری نموده جنگ واقعہ شد بسیاری‌را بقتل رسانیده قلعہ را گرفتہ مسمار ساختہ بہ تهانہ کلیان بهمری آمده آمد و رفت جهازات نزد بنده است فرمودند کہ مجری شده و نیز بفضایل‌خان فرمودند کہ این عرضداشت را بخدمت بادشاه‌زاده محمد اعظم شاه بداک چوکی روانہ سازد۔

अमानतखानानें अर्ज केला तो असा:— संभाकडील रावो खोरा

(खोपडा ?) यानें पूर्वीं चाकरी करण्याविषयीं विनंती केली होती कीं, कांहीं कृपा झाली तर शत्रूकडील त्रिंबकगड मिळवून देईन. म्हणून त्यास ७०० जात व २०० स्वार असा नवीन मानकरी बनवून कांहीं रोख रकमेची कृपा केली होती. परंतु तेथील किल्लेदारानें त्याचें म्हणणें मान्य केलें नाहीं म्हणून तो पळून गेला आहे. याबाबत मूळ ४०० स्वार व १०० ची वाढ मिळालेला जमनाजी यास इहतिमामखानानें कैद केलें आहे. तो विनंती करीत आहे कीं, मी बादशाही चाकर आहे व माझें त्याच्याशीं कोणतेही नातें किंवा संबंध नाहीं. हुकूम व्हावा. हुकूम झाला कीं, त्याच्याकडून जामीन घेऊन सुटका करावी.

बहादुरखानाचा अर्ज आला तो नजरेखाली घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, 'फिरंग्यांचे दोन किल्ले संभानें घेतले. त्याचा विचार आहे कीं, तोफखाना तयार ठेवून सुरतेहून माझ्याकडे येणाऱ्या जहाजांस आडवावें. म्हणून मी सीदी याकूतखानास जमेतीसह तिकडे पाठविलें. नंतर खानानें जाऊन एक किल्ला पाडून बहुतेक लोकांना मारलें. परंतु किल्ला हातीं आला नाहीं. म्हणून मी मोहरमच्या २७ तारखेस स्वारी केली. लढाई झाली. अनेकांना मारलें. किल्ला घेऊन पाडून टाकला. नंतर कल्याण-भिवंडीस आलों. माझ्याकडे जहाजांची येजा चालू आहे.' हुकूम झाला कीं, 'हा अर्ज शाहझादा मुहम्मद अअजम-शाहाकडे डाकचौकीनें पाठवावा.'

## ४३०

| | | |
|---|---|---|
| जु. २६ सफर २७ | سیاهم اخبارات دربار معلی<br>ماه صفر ۲۷ سنہ<br>یوم ... سنہ ۲٦ | श. १६०४ माघ वद्य १४<br>इ. १६८३ फेब्रुवारी १५ |

سبہان راو بتجویز خان جہان بہادر ہزاری ذات شش صد سوار نو سرافراز فرمود ند ـ

खानजहान बहादुराच्या तजविजीनें सुभानरावास हजार जात व ६०० स्वार असा नवीन मानकरी केल्याचा हुकूम झाला.

## ४३१

| | | |
|---|---|---|
| जु. २६ सफर २९ | سیاهم اخبارات دربار معلی<br>ماه صفر ۲۹ سنہ<br>یوم ... سنہ ۲٦ | श. १६०४ फाल्गुन शुद्ध १<br>इ. १६८३ फेब्रुवारी १७ |

شیخ عبد الله ولد شیخ نظام عرض نمود کہ احمد خان تہانہ دار انتور

نوشتہ کہ کشنا پندت خبر باغی آورده کہ دو هزار سوار و دو هزار پیاده باختیار خود نو نوکر نگاه داشتہ بود تنخواه آنها مقہور میداد و مقہور یک مالا مروارید و یک فیل بہ باغی پیشکش گذرانیده بود چنانچہ باغی مذکور یک لولی هندوی مسلمان نموده بخانہ خود نگاه داشتہ مالا وغیره جنس بابت پیشکش باو بخشیده چون این خبر مقہور رسیده بباغی گفتہ فرستاده کہ بنده مالا وغیره برای توزک گذرانیده بود باغی جواب داد کہ من بادشاهزاده ایم هرچہ خاطری اید می‌کنم باز مقہور پیغام فرستاده کہ جمعیت پیش خودرا نزد بنده بفرستند بنابران باغی لاچار شده دیره را سوختہ طرح فقیر شده جانب ملک فرنگیان بطرف گوه روانہ شده بود آخرش مقہور بہ فرنگیان نوشتہ کہ باغی را رفتن ندهند بنابران آنها رفتن نداده ازین جہتہ باغی باز برگشتہ آمده بملک مقہور بمکان سابق جای کہ مانده بود استقامت گرفتہ است شنیده خاموش ماندند۔

शेख अब्दुल्लाह वलद शेख निजाम यानें अर्ज केला तो असा:– अंतूरचा ठाणेदार अहमदखान यानें लिहिलें आहे कीं, कृष्णा पंडितानें बातमी आणली कीं, अकबर बंडखोरानें आपल्या अधिकारांत नवीन २००० स्वार व २००० पायदळ चाकरींत ठेवले होते. त्यांचा पगार संभा देत असे. संभानें एक पोवळ्याची माळ व एक हत्ती बंडखोरास भेट म्हणून दिला होता. परंतु बंड-खोरानें एका वेश्येस मुसलमान करून आपल्या घरीं ठेविलें व तिला माळ वगैरे भेट म्हणून आलेले जिन्नस बक्षीस दिले. ही बातमी संभास समजली तेव्हां त्यानें बंडखोरास निरोप पाठविला कीं, 'मी माळ वगैरे तुझ्यासाठीं भेट दिली होती' बंडखोरानें उत्तर पाठविलें कीं, आम्ही बादशाहझादे आहों. मनास येईल तें करूं.' नंतर संभानें निरोप पाठविला कीं 'तुझ्याकडील जमेत मजकडे पाठवावी.' त्यामुळें बंडखोर लाचार झाला. त्यानें डेरा जाळून टाकला व तो फकीर बनून, फिरंग्यांच्या मुलखांतील गोव्याकडे निघाला होता. यावर संभानें फिरंग्यांना लिहिले कीं, 'बंडखोरास जाऊं देऊं नये' तेव्हां त्यांनीं त्याला जाऊं दिलें नाहीं. त्यामुळें बंडखोर परत येऊन संभाच्या मुलखांत पूर्वीं रहात होता तेथें रहात आहे. हें ऐकून बादशाहा गप्प बसला.

## ४३२

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रवल १<br>रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع‌لاول غرہ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۶ | श. १६०४ फाल्गुन शुद्ध २<br>इ. १६८३ फेब्रुवारी १८ |

حکم شد پنج هزار بندوقچی صلابت‌خان و آتش‌خان نگاه داشتہ اند برکاب بادشاہ‌زادہ محمد اعظم شاہ تعین نمایند۔

فرمان بنام روح اللہ‌خان صادر شد مضمون آنکہ بالفیل شمارا از طلبیدن حضور موقوف نمودہ در گلشن آباد باشد حوالہ سید میر گرزبردار فرمودند۔

हुकूम झाला कीं 'सलाबतखान व आतिशखान यांच्या चाकरींत असलेल्या ५००० बंदुकधाऱ्यांना मुहम्मद अअजमशाहाबरोबर नेमावें.

रूहुल्लाहखानाच्या नांवें फर्मान सादर झालें तें असें– 'तुला तावडतोब हुजुरास बोलावण्याचें स्थगित केलें आहे. तू गुलशनाबादेस असावेंस.' फर्मान सय्यद मीर गुर्जबर्दाराचे हवालीं करावयाचा हुकूम झाला.

## ४३३

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रवल ३<br>मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع‌الاول ۳ سنہ<br>یوم‌الثلث سنہ ۲۶ | श. १६०४ फाल्गुन शुद्ध ४<br>इ. १६८३ फेब्रुवारी २० |

عرضداشت محمد نعیم آمدہ بنظر گذشت معروض داشتہ بود کہ فدوی براہ چوسالہ در سہ روز از پرنیدہ بمعہ مردم وغیرہ در بید (بیر) رسیدیم موافق حکم جمعیت همراهی خود همراہ رضا قلی داروغہ توپخانہ فوج شاهزادہ کام‌بخش گذاشتہ بمعہ یک‌صد سوار روانہ حضور شدیم حکم شد کہ شیربیگ گرزبردار رفتہ مشارالیہ را زود بیارد۔

شیر خواجہ گرزبردار حسب الحکم بنام منوربیگ حاجب بیجاپور بردہ بود چنانچہ مشارالیہ آمدہ بعرض رسانید کہ هرگاہ فدوی در شولاپور رسیدہ سیدشیرخان قلعہ‌دار آن جا ظاهر نمودہ کہ پیشتر راہ مسدود است نرود حسب الحکم حوالہ بندہ نماید خواهم رساند بنابران حوالہ نمودہ و رسید بمہر خان مذکور بحضور آوردیم۔

मुहम्मद नईम याचा अर्ज आला तो बादशाहाचे नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, 'मी लोकांसह परिंड्याहून चौसाळ्याच्या मार्गे ३

दिवसांत बीड येथें पोहोंचलों. हुकुमाप्रमाणें मी माझ्याबरोबरची जमेत कामबक्षाच्या फौजेंतील तोफखान्याचा दारोगा रिजा कुली याजकडे सोडून १०० स्वारांसह हुजुरास रवाना झालों.' हुकूम झाला कीं, 'शेरबेग गुर्जबर्दारानें जाऊन उपर्युक्तास लवकर आणावें.'

विजापूर येथील हाजी मुनव्वरबेग याच्या नांवें शेर खोज्या गुर्जबर्दारानें हस्बुल हुकूम आणला होता. त्यानें अर्ज केला तो असाः— मी सोलापुरास पोहोंचलों तेव्हां तेथील किल्लेदार सय्यिद शेरखानानें सांगितलें कीं, 'पुढील वाटा बंद आहेत, पुढें जाऊ नये. हस्बुलहुकूम माझ्याकडे द्यावा. मी तो पोहोंचवीन.' त्यावर मी तो त्यास देऊन खात्याच्या शिक्क्याची पावती आणली आहे.

## ४३४

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रवल ४<br>बुध. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الاول ۲۶ سنه<br>یوم الاربعه سنه ۲۶ | श. १६०४ फाल्गुन शुद्ध ५<br>इ. १६८३ फेब्रुवारी २१ |

از واقعه پرینده بعرض رسید که حسین خان میانه از بیجاپور معه جمعیت چهار هزار سوار امید بندگی بحضور می آید درین جا رسیده فرد وقایع حواله اهتمام خان نموده که نزد دلیرخان ببرد و خان مذکور باو نوشته که بخاطر جمع بحضور بیاید چنانچه رسانیده آمده بعرض رسانید که دلیرخان التماس میدارد که اگر بامردم رعایت خواهد شد دیگران نیز بحضور خواهد آمد۔

परिंड्याच्या घटनांवरून समजलें कीं, 'विजापूरचा हुसेनखान मियाना हा ४००० स्वारांच्या जमेतीसह चाकरीच्या आशेनें हुजूर येत आहे. तो येथें आला आहे. बादशाहानें घटनांचा कागद इहतिमामखानाजवळ देऊन फर्माविलें कीं, 'हा दिलेरखानास द्यावा. आणि खानानें त्यास लिहावें कीं, खातरजमा ठेऊन हुजूर यावें.' यावर तो पोहोंचवून येऊन अर्ज केला तो असाः– 'दिलेरखान विनंति करीत आहे कीं, ह्या लोकांवर कृपा झाली तर इतर सुद्धा हुजूर येऊं इच्छितात.'

४३५

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रवल ६<br>शुक्र. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الاول ۶ سنه<br>یوم الجمعه سنه ۲۶ | श. १६०४ फाल्गुन शुद्ध ७<br>इ. १६८३ फेब्रुवारी २३ |

سید میر گرزبردار فرمان بنام روح الله خان برده بود عرضداشت آورده بنظر گذرانید معروض داشته بود که در باب قاسم خان حکم شد که بدره تل کوکن کومک بهادرخان برود چنانچه خان مذکور از آن سرزمین چندان واقف نیست بعد مطالعه بلطف الله خان فرمودند که حسب الحکم بروح الله خان بنویسد که بمعه فوج همراهی خود و قاسم خان بکومک بهادرخان درآمد دره شده آنچه بهادرخان کاری خواهد کرد باتفاق شما خواهد نمود سیصد روپیه خدمتانه گرزبردار بعرض رسید معاف فرمودند

بعرض رسید که جمعیت غنیم نواحی احمدانگر نمایان شده بنابران تیرانداز وغیره را انعام داده رخصت فرمودند و حکم شد عزیز بیگ گرزبردار رسانیده بیاید۔

सय्यिद मीर गुर्जबर्दारानें रूहुल्लाहखानाच्या नांवें फर्मान आणलें होतें. त्याचा अर्ज आणून तो बादशाहाचे नजरेखालीं घातला तो असा:–‘कासिम-खानाच्या बाबत हुकूम झाला आहे कीं, तळकोंकणच्या दरींत बहादुरखानाच्या कुमकेस जावें. परंतु त्यास तिकडील भागाची अजिबात माहिती नाहीं’ हें समजल्यावर लुत्फुल्लाहखानास हुकूम झाला तो असा:–‘रूहुल्लाहखानाच्या नांवें हस्बुलहुकूम लिहावा कीं, तुझी फौज व कासिमखान यांसह तू बहादुर-खानाच्या कुमकेसाठीं तळकोंकणच्या खोऱ्यांतील वाटेच्या तोंडाशीं जावें. बहादुरखान काम करीत आहे तें त्यानें तुमच्याशीं मिळून करावें.’ ३०० रु. खिदमताना मिळाला होता तो माफ फर्माविला.

अर्ज आला कीं, ‘गनिमाची जमेत अहमदनगराभोंवतीं दिसली. म्हणून तीरंदाज वगैरेंना इनाम देऊन तिकडे पाठविलें.’ हुकूम झाला कीं, अझीझबेग गुर्जबर्दारानें त्यांना पोहोंचवून यावें.

४३६

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रवल १०<br>मंगळ. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الاول ۱۰ سنه<br>یوم الثلث سنه ۲۶ | श. १६०४ फाल्गुन शुद्ध ११<br>इ. १६८३ फेब्रुवारी २७ |

بزبانی مردم هرکاره بعرض رسید که هفت هزار سوار جمعیت غنیم هفت هشت کروه نواحی جالنه اند شتران و غیره متاع مسافران تاراج نموده تحصیل چوتهای می نمایند حسب الحکم بمهر لطف الله خان درباب تنبیه مردم غنیم صادر فرمودند۔

हरकाऱ्यांकडून तोंडीं अर्ज आला कीं, शत्रूचे ७००० स्वार जालन्यापासून सात कोसांवर आले आहेत. प्रवाश्यांचे उंट वगैरे लुटून चौथाई वसूल करीत आहेत. हुकूम झाला कीं, शत्रूला तंबी देण्यासाठीं लुत्फुल्लाहखानाच्या शिक्क्याचा हस्बुलहुकूम पाठवावा.

४३७

| | | |
|---|---|---|
| ज्यु. २६ रवल ११<br>बुध. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الاول ۱۱ سنه<br>یوم الاربعه سنه ۲۶ | श. १६०४ फाल्गुन शुद्ध १२<br>इ. १६८३ फेब्रुवारी २८ |

عرضه داشت خان جهان بهادر بمعرفت وکیلی بنظر گذشت معروض داشته بود که فرمان بفدوی رسید حکم شده بود که جمعیت غنیم جانب نلدرگ و کلیانی آمده باید که شاهزاده معزالدین را دربدر گذاشته بمعه فوج آن طرف بیاید چنانچه موافق حکم عمل نموده روانه شدیم۔

حسب الحکم بمهر لطف الله خان بنام معمورخان صادر نموده مضمون آن که مردم بهیررا عقب گذاشته جمعیت غنیم که جانب جالنه آمده تعاقب کرده تنبیه رساند حواله ابوالخیر گرزبردار نموده که بداک چوکی روانه نماید۔

खानजहान बहादुराचा अर्ज वकिलामार्फत आला तो बादशाहाचे नजरेखाली घातला. तो असा :— 'मला फर्मान मिळालें. हुकूम झाला होता कीं, शत्रुची जमेत नळदुर्ग--कल्याणीकडे आलेली आहे. मुइज्झुद्दीनास जवळपास सोडून फौजेसह तिकडे जावें. म्हणून हुकुमाप्रमाणें निघालों आहे'.

मामूरखानाच्या नांवें लुत्फुल्लाहखानाच्या शिक्क्यानिशीं हस्बुलहुकूम सादर झाला तो असा:– बुणग्यांना मागें सोडून जालन्याकडे आलेल्या शत्रूचा पाठलाग करून त्यास तंबी द्यावी. हा अबुलखैर गुर्जबर्दाराजवळ देऊन डाकचौकीनें पाठवावा.

४३८

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रवल १२ गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ ربیع الاول ۱۲ سنہ یوم الخمس سنہ ۲۶ | श. १६०४ फाल्गुन शुद्ध १३ इ. १६८३ मार्च १ |

از واقعہ جالنہ بعرض رسید کہ مردم غنیم آمدہ فیلان سرکار شاہ عالم جیو کہ از این جا دوازدہ کروہ بودند و شتران اکثر مردم بغارت بردند بعد معروض فرد وقایع نزد امانت‌خان فرستادہ فرمودند کہ فوجداری آن ضلع پسر خان مذکور است چنانچہ متاع رفتہ جواب گوید و نیز حکم شد کہ بفوجداران و تہانہ داران آن نواحی بنویسد کہ تعاقب کردہ پی در سازند و یا از خود جواب نمایند۔

जालना येथील घटनापत्रावरून समजलें कीं, शत्रूच्या लोकांनीं येथून बारा कोसांवर असलेले शाहआलमचे हत्ती व बहुतेक लोकांचे उंट लुटून नेले. अर्जानंतर वाक्याचा कागद अमानतखानाकडे पाठवून हुकूम दिला कीं, 'या जिल्ह्याच्या फौजदारांना व ठाणेदारांना लिहावें कीं, पाठलाग करून ते परत मिळवावे. नाही तर स्वतः ज्ञाब द्यावा.

४३९

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रवल १३ शुक्र. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ ربیع الاول ۱۳ سنہ یوم الجمعہ سنہ ۲۶ | श. १६०४ फाल्गुन शुद्ध १४ इ. १६८३ मार्च २ |

مقصود بیگ وغیرہ دونفر گرزبردار فرمان بنام روح‌اللہ‌خان بردہ بود عرضداشت آوردہ بنظر گذرانیدہ بعرض رسانید کہ خان مذکور موافق حکم بدرہ تل‌کوکن روانہ شدہ چہار کروہ سزاولی کردہ بحضور آمدیم سیصد ۳ روپیہ خدمتانہ یافتہ بود معاف فرمودند۔

मक्सूदवेग वगैरे गुर्जबर्दारांनीं रूहुल्लाहखानाच्या नांवें फर्मान नेलें होतें. त्याचा अर्ज बादशाहाचे नजरेखालीं घातला व अर्ज केला कीं, 'खान तळकोंकणाच्या खोऱ्यांत गेला आहे. आम्ही ४ कोसांपर्यंत त्याची सजावली करून हुजूर आलों" ३०० रुपये खिदमताना मिळाला होता तो माफ फर्माविला.

४४०

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रवल १४<br>शनि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع الاول ۱۴ سنہ<br>یوم السبت سنہ ۲۶ | श. १६०४ फाल्गुन वद्य १<br>इ. १६८३ मार्च ३ |

ابوالفیض گرزبردار حسب الحکم بخان جہان بہادر بردہ بود رسانیدہ جواب آن آوردہ بنظر گذرانیدہ بعرض رسانید کہ مردم جاسوسان بخان مذکور خبر رسانیدہ کہ مردم غنیم جانب برار آمدہ بنابران خان مذکور بلغر جہتہ تنبیہ آنہا روانہ شدہ۔

अबुलफैज गुर्जबर्दाराने खानजहान बहादुराकडे हस्बुलहुकूम नेला होता त्याचें उत्तर आणून तें बादशाहाचे नजरेखालीं घातलें तें असें – हेरांनी मला बातमी दिली कीं, शत्रूचे लोक वऱ्हाडाकडे गेले आहेत. म्हणून मी सडा होऊन त्यांना तंबी देण्यासाठीं गेलों.

४४१

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रवल १६<br>सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع الاول ۱۶ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۶ | श. १६०४ फाल्गुन वद्य ३<br>इ. १६८३ मार्च ५ |

معمورخان قلعہ دار نلدرگ مقرر نمودہ ہزار پانصدی ذات ہشت صد سوار بود پانصد سوار شرطی اضافہ فرمودند۔

صلابت خان داروغہ توپخانہ را یک فیل عیوض اسپ خلعت خاصہ انعام دادہ و یک فیل مادیہ دادہ رخصت نمودہ و حکم شد کہ بہ تہانہ کلیان بہمری متصل فرداپور رفتہ خبردار باشد بعد از آن موافق حکم بعمل خواهد آورد و همراهیان را بموجب ذیل انعام دادہ رخصت فرمودند۔

मामूरखानास नळदुर्गचा किल्लेदार नेमिलें. त्यास १५०० जात व ८०० स्वार अशी मनसब होती. तींत ५०० स्वार इतकी वाढ सशर्त फर्माविली

तोफखान्याचा दारूगा सलाबतखान यास घोड्याच्या ऐवजीं एक हत्ती, खासा खिलत व एक हत्तीण देऊन रजा दिली. आणि हुकूम झाला कीं, 'फर्दा पुराजवळ कल्याण-भिवंडीच्या ठाण्यास जाऊन सावध व हुकुमाप्रमाणें वागत रहावें'. त्याजबरोबर दिलेल्या लोकांना खालीलप्रमाणें बक्षीस देऊन रजा दिली.

४४२

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रवल १८<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماہ ربیع الاول ۱۸ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۶ | श. १६०४ फाल्गुन वद्य ५<br>इ. १६८३ मार्च ७ |

لطف‌الله خان عرض نمود کہ خان جہان بہادر خطی نوشتہ کہ سابق فدوی را از مردم غنیم یک صد بیست کروہ مفاصلہ بود بیلغر رسیدہ چنانچہ چہل کروہ مفاصلہ ماندہ از اقبال حضرت تنبیہ خواہم کرد۔

लुत्फुल्लाहखानानें अर्ज केला तो असा :— 'खानजहान बहादुरानें लिहिलें आहे कीं, पूर्वी शत्रूपासून मी १२० कोसांच्या अंतरावर होतों. पुढें सडा झालों. आतां फक्त चाळीस कोसांचें अंतर राहिलें आहे. बादशाही सुदैवानें शत्रूला तंबी देईन.'

४४३

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रवल २१<br>शनि. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماہ ربیع الاول ۲۱ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۶ | श. १६०४ फाल्गुन वद्य ८<br>इ. १६८३ मार्च १० |

از عرضداشت سید منورخان ناظم برہانپور بعرض رسید کہ مردم جاسوسان خبر آوردند کہ جمعیت جانب اکولہ آمدہ بنابران فدوی پسران خود را بخدمت شاہزادہ عظیم الدین گذاشتہ بجہتہ تنبیہ مردم غنیم سواری نمودہ۔

بموجب نوشتہ کامیاب خان بعرض رسید کہ بابوجی وکیل دکہنی کہ در حضور است مدام حقیقت سنبہا مقہور می‌نوشت اورا در قید نگاہ دارند حکم شد کہ اہتمام خان قید نماید خان مذکور موافق حکم در قید نگاہ داشتہ بعرض رسانید کہ وکیل مذکور التماس می دارد کہ فدوی وکیل کس نیست بی تقصیر ام خلاص شوم حکم شد ضامن گرفتہ خلاص نماید۔

बुर्‍हानपूरचा नाजिम सय्यिद मुनव्वरखान याच्या अर्जावरून समजलें तें असें :— 'हेरांनीं बातमी आणली आहे कीं, शत्रूची जमेत अकोल्याकडे गेली आहे. म्हणून मी माझ्या मुलांना शाहझादा अजीमुद्दीनाच्या चाकरींत ठेवून शत्रूला तंबी देण्यासाठीं स्वारी केली.'

कामयाबखानानें लिहिल्यावरून समजलें कीं, 'बाबूजी दखनी वकील

हा हुजूर आहे. तो संभाची हकीकत नेहमी लिहीत असे. त्यास कैदेंत ठेवावें'. हुकूम झाला कीं, इहतिमामखानानें कैद करावें. खानानें हुकुमाप्रमाणें यास कैद करून अर्ज केला तो असा :– 'वकील विनंति करीत आहे कीं, मी कुणाचाच वकील नाहीं. मी निर्दोष आहे. माझी सुटका व्हावी'. हुकूम झाला कीं, जामीन घेऊन सोडावें.

४४४

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रवल २३<br>सोम. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الاول ۲۳ سنه<br>یوم الاثنا سنه ۲۶ | श. १६०४ फाल्गुन वद्य १०<br>इ. १६८३ मार्च १२ |

بموجب نوشته محمدحسین فوجدار بالاپور بعرض رسید که جمعیت غنیم برای تحصیل چوتهای این ضلع آمده بود فدوی سواری کرده دو اسپ ماديه و پنج نفر زنده دستگیر نموده آورده شنیده خاموش ماندند۔

बाळापूरचा फौजदार मुहम्मद हुसैन यानें लिहिल्यावरून समजलें कीं, शत्रूची जमेत चौथ वसूल करण्यासाठीं ह्या जिल्ह्यांत आली होती. तेव्हां मी स्वारी करून दोन घोड्या व पांच लोक यांना जिवंत पकडून आणलें आहे.' ऐकून बादशाह गप्प बसला.

४४५

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रवल २४<br>मंगळ. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الاول ۲۴ سنه<br>یوم الثلث سنه ۲۶ | श. १६०४ फाल्गुन वद्य ११<br>इ. १६८३ मार्च १३ |

بشیخ عبدالله فرمودند که از محمد افضل برادر احمدخان ساکن نواحی تل کوکن پسر سید که بهادر خان وغیره بندهای بادشاهی به کلیان بهمری رسیده قلعچه احداث کرده ایام برسات در آن جا ماندن می تواند موافق حکم پرسیده عرض نمود که او التماس می دارد که بسبب هوای در آن جا در برسات اسپان ضایع می شوند لیکن دوازده کروه این طرف یک جای بنام میولی (مینولی) واقعه است اگر آن جا بمانند بهتر است چراکه در راه کتل درمیان است بارابرین وطن سنبها مقهور فوج بادشاهی رفته تاخت کرده باز خواهد بود لیکن رسد غله براه جهازات نخواهد رسید و براه کتل مذکور رسد غله بدشواری در لشکر خواهد رسید شنیده خاموش ماندند۔

शेख अब्दुल्लाह यास हुकूम झाला तो असा :—'तळकोंकणांत राहणाऱ्या अहमदखानाचा भाऊ मुहम्मद अफ्जल यास विचारावें कीं, बहादुरखान वगैरे बादशाही लोक कल्याणभिवंडीस पोहोंचले आहेत; ते गढी दुरुस्त करून पावसाळ्यांत तेथें राहूं शकतील काय ?' हुकुमाप्रमाणें विचारून अर्ज केला तो असा :—तो विनंति करतो कीं, पावसाळ्यामधें तेथील हवेंत घोडे जाया होतील. पण तेथून अलिकडे बारा कोसांवर मेवली (मेणवली ?) नांवाचें ठिकाण आहे. ते तिथें राहिले तर ठीक आहे. कारण इकडे वाटेमधें पठार आहे. बादशाही फौज जाऊन संभाचें वतन लुटून परत येईल. परंतु जहाजाच्या मार्गें अन्नधान्याची रसद पोहोंचणार नाहीं. तसेंच पठारमार्गें अत्यंत मुश्किलीनेंच लश्करांत रसद पोहोंचूं शकेल. ऐकून राजा गप्प बसला.

४४६

| जु. २६ रबल २५ बुध. | سیاهه اخبارات دربار معلے ماه ربیع الاول ۲۵ سنه یوم الاربع سنه ۲۶ | श. १६०४ फाल्गुन वद्य १२ इ. १६८३ मार्च १४ |
|---|---|---|

علاول بودی (لودی) و ناروجی و غیره فرستاده جگدیو زمیندار سری [رنگ] پتن بمعرفت اهتمام خان ملازمت نموده پانصد هون نذر گذرانیده منجمله یک صد هون گرفته باقی واپس داده و هر سه را خلعت دادند

افزن بیگ گرزبردار حسب الحکم بنام خان جهان بهادر برده بود رسانیده جواب ان خط آورده بنظر گذرانیده معروضه اشته بود که جمعیت غنیم جانب برارآمده بود ایرج خان برای تنبیه سواری کرده ازاستماع این خبر فدوی موافق حکم به کومک صوبه دار بتاریخ ۱۹ شهر حال یلغر رسیده با جمعیت غنیم مقابله شو از اقبال حضرت بسیارکس را بقل رسانیده و زخمی ساخته شکست داده فتح بادشاهی شده شنیده خاموش ماندند۔

از التماس شیرمحمد بابت اکبه باغی که در قلعه رنتهبور قید است بعرض رسید که انچه متاع بنده بود ضبط شده فدوی و متعلقان که در شاهجهان آباد اند برای قوت عاجز اند امیدوارم که ازقید خلاص فرمایند به لطف الله خان فرمودند که به تهریر خان قلعه دار ان جا بنویسد که اوراخلاص نماید۔

श्री(रंग)पट्टणचा जमीदार जगदेव यानें अलावल बोदी (लोदी) व नारोजी वगैरेना बादशाहाकडे पाठविलें. त्यांनीं इहतिमामखानाच्या मार्फत

बादशाहाची भेट घेऊन त्यास ५०० होन नज़र केले. बादशाहानें त्यांपैकीं १०० होन घेऊन बाकी परत केले. तिघांना खिलत दिले.

अकबराकडील शेर मुहम्मद रणथोर (रणथंबोर) येथें कैदेंत आहे. त्यानें अर्ज केला कीं, 'माझे सामान होतें तें जप्त झालें आहे. मी व शाहजानाबादेंत असलेले माझे नातेवाईक अत्यंत त्रासून गेलो आहों. आशा करितो कीं, कैदेंतून सोडण्याचा हुकूम व्हावा. लुत्फुल्लाखानास हुकूम झाला कीं, त्यास सोडण्यासाठी किल्लेदार तहरीरखान यास लिहावें.

४४७

| जु. २६ रवल २६ गुरु. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الاول ۲۶ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۶ | श. १६०५ फाल्गुन वद्य १२<br>इ. १६८३ मार्च १५ |
|---|---|---|

از واقعہ فوج بہادرخان بعرض رسید کہ گوتماجی دکھنی ہزاری ذات پانصد سوار بود بکار آمده از عرضہ داشت سید عزت خان لہوجی (بتہوجی) بمعہ جمعیت چہار ہزار سوار و پیاده مردم غنیم آمده راه مسدود کرده بود فدوی پدم سنگہ را هراول و دیگر مردمان را چنداول وغیره مقرر کرده بتاریخ ۲ شہرحال مقابلہ کرده جنگ واقعہ شد قریب چہار صد کس را بقتل رسانیده و زخمی ساختہ و باقی رو فرار نهاده و پدم سنگہ و غیره بندهای بادشاهی تردد نمود شش منزل لشکر بہادرخان مسافت است و مردم فرنگی این نواحی آمده ملاقی شده اند بعد مطالعہ عرضہ داشت را نگاه داشتند۔

बहादुरखानाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें कीं, गोतमाजी दखनी हा १००० जात व ५०० स्वार असा मनसबदार होता, तो कामास आला.

सय्यिद इझ्झतखानाच्या अर्जावरून समजलें कीं, 'विठोजी ४००० स्वार व पायदळ यांसह आला आहे. त्यानें वाटा रोखल्या होत्या. मी पदमसिंगास हरावल व इतर लोकांना चंदावल नेमून चालू महिन्याच्या दोन तारखेस सामना झाला. लढाई झाली. शत्रूचे जवळजवळ ४०० लोक मारले व जखमी केले. बाकी लोक पळून गेले. या लढाईंत पदमसिंह वगैरे बादशाही लोकांनीं कष्ट केले. बहादुरखानाचें लश्कर येथून सहा मुकाम अंतरावर आहे. इकडील भागांतील फिरंगी लोक येऊन भेट घेतात,' ऐकल्यावर अर्ज ठेवून घेतला.

## ४४८

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रवल २८ शनि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع الاول ۲۸ سنہ<br>یوم السبت سنہ ۲٦ | श. १६०४ फाल्गुन वद्य १४<br>इ. १६८३ मार्च १७ |

از عرضداشت بہادرخان بعرض رسید کہ همیرراو نوکر سنبہا مقہور بجمع جمعیت کثیر آمده چنانچہ فدوی بتاریخ ۱۰ شہرحال از کلیان بہمری سواری نموده بامردم غنیم مقابلہ کرده جنگ واقعہ شد بسیار مردم غنیم بقتل رسانیده و همیرراو از زخم بان رفتہ و خسرپوره را باسہ نفر ۳ دیگر سردار غنیم را بجان کشتہ شکست داده چند کروه تعاقب نموده و اکثر بندهای بادشاهی نیز بکارآمده و زخمی شدند بندگان حضرت بمطالعہ خاص در آوردند۔

बहादुरखानाच्या अर्जावरून समजलें कीं, संभाचा नौकर हंबीरराव जमेतीसह आला. म्हणून मी चालू महिन्याच्या १० तारखेस कल्याण-भिवंडी येथून स्वारी करून शत्रूच्या लोकांशीं सामना दिला. लढाई झाली. शत्रूचे अनेक लोक मारले गेले व हंबीररावास बाण लागून जखम झाली. तसेंच त्याच्या बायकोचा भाऊ व इतर तीन सरदार मारले गेले. त्यांचा पराजय झाला. आम्ही कांहीं कोस पाठलाग केला. बरेच बादशाही लोक कामास आले व जखमी झाले. बादशाहानें खास मनन केलें.

## ४४९

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रवल २८ शनि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع الاول ۲۸ سنہ<br>یوم السبت سنہ ۲٦ | श. १६०४ फाल्गुन वद्य १४<br>इ. १६८३ मार्च १७ |

خوجہ تیمور ناظر شاهزاده اعظم الدین خط بخواجہ دولت ناظر شاه عالم جیو نوشتہ بود چنانچہ ناظر مذکور بمعرفت لطف اللہ خان بعرض رسانید کہ شیخ جہان فوجدار جامودہ بہ سید منورخان نوشتہ بود کہ مردم غنیم برای تحصیل چوتہای آمده اند کومک نماید خان مذکور بخدمت شاهزاده جیو اظہار ساختہ فرمودند کہ شما رفتہ کومک نماید عرض نمود کہ پرگنہ جامودہ تعلقہ صوبہ برار است فرمودند کہ ملک بادشاهی است باید رفت چنانچہ خان مذکور حسب الامر بتاریخ ۱۵ شہرحال روانہ شده بتاریخ ۱٦ شاهزاده جیو برائے شکار سوار شدند و شیخ جہان نیز سواری کرده جنگ عظیم

واقع شد بسیار مقهوران بقتل رسانیده و زخمی ساخته شکست داده هفتاد اسپ و اسپ مادی و چهل هفت بهاله و غیره سلاح بدست آورده بحضور فرستاده است بندگان حضرت فرمودند که شاهزاده جیو برمحل کومک فرستاده.

अजीमुद्दीनचा नाजिर खोजा तैमूर यानें शाहझादा शाहआलमचा नाजिर खोजा दौलत यास पत्र लिहिलें होतें. नंतर लुत्फुल्लाहखानाच्या नाजिर मार्फत अर्ज केला. जामोद्याचा फौजदार शेख जहान यानें सय्यिद मुनव्वरखानास लिहिलें होतें कीं, 'शत्रूचे लोक चौथ वसूल करण्यासाठीं आले आहेत; कुमकेस यावें'. खानानें शाहझाद्यास हें कळविलें, तेव्हां शाहझाद्यानें हुकूम दिला कीं, 'तू जाऊन कुमक करावीस.' त्यानें अर्ज केला कीं, जामोदा परगणा सुभे व्हाडांत आहे. शाहझाद्यानें हुकूम दिला कीं, 'तो बादशाही मुलूख आहे. तुला गेलेंच पाहिजे' त्यावर खान हुकुमाप्रमाणें चालू महिन्याच्या १५ तारखेस निघाला. १६ तारखेस शाहझाद्यानें शिकारीसाठीं गमन केलें. शेख जहाननें स्वारी केली. मोठी लढाई झाली. शत्रूच्या अनेक लोकांना मारलें व जखमी केलें. त्यांचा पराजय झाला. ७० घोडे व घोड्या, ४७ भाले वगैरे हत्यारें हातीं आलीं. तीं सर्व हुजूर पाठविलीं आहेत. हुकूम झाला कीं, शाहझाद्यानें वेळेवर कुमक पाठविली.

४५०

| जु. २६ रवल ३० सोम. | سیاهه اخبارات دربار معلی ماه ربیع الاول ۳۰ سنه یوم الاثنا سنه ۲۶ | श. १६०५ चैत्र शुद्ध १ इ. १६८३ मार्च १९ |
|---|---|---|

عبدالله بیگ و غیره عرضداشت سیف الله آورده بنظر گذرانیده که لیک (نیک) رای و غیره چهار سردار قافرچه بمعه جمعیت کثیر بند و مویشی از ملک بادشاهی تاخت کرده می بردند رعایا موضع (پلس) مکن گانو آمده ظاهر نموده بنابران مومی الیه بمعه همراهیان از پرگنه باسم متصل مکر (مهکر) بجهته تنبیه غنیم سواری نمود چنانچه مقابله کرده جنگ واقع شد از اقبال حضرت سیصد ۳ کس بقتل رسانیده و زخمی ساخته شکست داده چهار هزار بند مویشی واپس آورده و هفتاد اسپ و اسپ مادیه بدست آورده و اکثر بندهای بادشاهی بکار آمده و زخمی شدند و مشارالیه تعاقب مردم غنیم می رود بعد معروض فرمودند که مجرای شده جهته مشارالیه شمشیر

علحده نمایند و فرمان در جواب عرضداشت قلمی نماید و عبدالله بیگ پنجاهی و رستم بیگ دو بیستی بودند هریک نیم نیم بیستی ذات اضافه نموده حکم شد که بمشارالیه بنویسد که انچه بند و مویشی بدست آورده اگر کسی وارث پیدا شود بدهد باقی بحضور بفرستد۔

अब्दुल्लाहबेग वगैरेनीं सैफुल्लाहाचा अर्ज आणून बादशाहाचे नजरेखालीं घातला तो असा:—मकन (पळस) गांव येथील प्रजाजन सांगतात कीं, लेकराय (नेकराय) वगैरे संभाचे ४ सरदार मोठ्या जमेतीसह येऊन बादशाही मुलुखांतील लोक व जनावरे लुटून नेत आहेत. म्हणून उपर्युक्तानें मुखेडजवळ असलेल्या वाशीम गांवाहून आपल्या लोकांसह शत्रूला तंबी देण्यासाठीं स्वारी केली. नंतर लढाई झाली. बादशाही सुदैवानें ३०० लोक मारले व जखमी केले. त्याचा पराजय करून ४००० लोक व जनावरें परत आणलीं. ७० घोडे व घोड्या हातीं आल्या. बहुतेक बादशाही लोक कामास आले व जखमी झाले. उपर्युक्त शत्रूचा पाठलाग करीत गेला.' हुकूम झाला कीं, 'मान्य आहे. उपर्युक्तासाठीं एक तलवार वेगळी ठेवावी व त्याच्या अर्जाच्या उत्तरादाखल फर्मान लिहावें.' अब्दुल्लाहबेग ५० व रुस्तुमबेग दो बिस्ती असे मनसबदार होते; प्रत्येकास निमबिस्ती जातीची वाढ केली. हुकूम झाला तो असा:— 'उपर्युक्तास लिहावें कीं, लोक व जनावरें हातीं आलीं आहेत त्यांना कोणी वारस असतील तर तीं त्यांना द्यावीं. उरलेलीं हुजूर पाठवावीं.'

## ४५१

| जु. २६ रखर<br>मंगळ. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الثانی غره منه<br>یوم الثلث سنه ۲٦ | श. १६०५ चैत्र शुद्ध २<br>इ. १६८३ मार्च २० |
|---|---|---|

یک پهر چهار گهری روز بر آمده بندگان حضرت خلوت فرمودند رودرسنگه زمیندار بگلانه بمعرفت مغل خان ملازمت نموده مهر.........

بعرض رسید که علاول و غیره سه ۳ نفر فرستاده جگدیو زمیندار سری [رنگ] پتن ملازمت نموده پانصد هون نظر گذرانیده منجمله یک صد هون گرفته باقی واپس داده و هر سه ۳ را خلعت مرحمت شدند چهار صد هون از آنها مردم چوبداران بزور ضرب گرفته اند {حکم اند} حکم شد اهتمام خان تحقیق نموده بعرض رساند۔

بموجب التماس فتح جنگ خان بعرض رسید اول آنکہ جاگیر فدوی در پرگنہ جہت سرکار سرهند تنخواہ شود بہ اعتماد خان فرمودند کہ بیست لک دام در پرگنہ مذکور و باقی در دکن سوای تھالنیر در پرگنہ نوسہ چاکنہ وغیرہ تنخواہ دهد۔

دویم دہ هزار روپیہ مساعدت بمعرفت دلیرخان و شش هزار پانصد روپیہ از قلعہ پرینده یافت و یک صد مہر و هزار روپیہ بابت نذر و یک هزار چہار صد روپیہ بابت نقارہ و چہار صد روپیہ بابت انعام اسپ و پانصد روپیہ بابت علم متصدیان منجملہ بیست هزار روپیہ انعام وضع نمودہ می گیرند حکم شدہ کہ بیست هزار روپیہ وضع نمودہ انچہ تتمہ بماند از نزد خود جواب گوید۔

एक प्रहर चार घटका झाल्यावर बादशाहानें खलबत केलें. मुघलखानाच्या मार्फत बागलाणाचा जमीनदार रुद्रसिंग यानें भेट घेतली.

अर्ज़ आला कीं, ‘ अलावल वगैरे तीन लोकांस श्रीरंगपट्टणचा ज़मीनदार जगदेव यानें पाठविलें होतें. त्यांनीं भेट घेऊन ५०० होन नजर केले. त्यांपैकीं १०० होन घेऊन बाकी परत दिले व तिघांवर खिलतीची कृपा केली. गुर्जबर्दारांनीं धाक दाखवून त्या लोकांकडून ४०० होन घेतले.’ हुकूम झाला कीं, इहतिमामखानानें चौकशी करून अर्ज करावा.

फतहजंगखानाच्या विनंतीवरून समजून आलें तें असें:—(१) मला परगणे सरहिंद येथील जहागिरींतून तनखा मिळावा. अअतमादखानास हुकूम झाला कीं, परगणे मजकूर येथून २० लाख दाम व बाकी दक्षिणेंतील थाळनेर सोडून परगणे नेवसा (नेवासा), चाकण वगैरेंतून तनखा द्यावा. (२) दहा हजार रुपये दिलेरखानामार्फत मदत म्हणून व ६५०० रुपये परिंड्याहून मला मिळाले. तसेंच १०० मोहरा व १००० रुपये भेटीबाबत, १४०० रुपये नगाऱ्याबाबत, ४०० रुपये बक्षिसाच्या घोड्याबाबत, ५०० रुपये मुत्सद्यांच्या झेंड्याबाबत मला मिळाले. पैकीं इनामाचे वीस हजार रुपये वजा करून घ्यावे.’ हुकूम झाला कीं, ‘२० हजार रुपये वजा करून उरलेल्या रकमेची भरती स्वतः करावी.’

जु. २६ रखर २

سایهم اخبارات دربار معلے
ماه ربیع الثانی ۲ سنہ
یوم الاثنا سنہ ۲٦

श. १६०५ चैत्र शुद्ध ३
इ. १६८३ मार्च २१

४५२

لطف الله خان عرض نمود کہ خان جہان بہادر خطی نوشتہ کہ مردم غنیم متصل تل گانو وغیره مقابلہ نموده شکست خورده براه چانده بہ سرحد حیدرآباد رفتہ فدوی تعاقب نموده فیلان و شتران سرکار شاه عالم جیو وغیره مردم کہ جا بجای گذاشتہ بودند بنده رفتہ حوالہ جاگیرداران نموده سند گرفتہ آنہا بحضور خواهد فرستاد-

مغل خان عرض نمود کہ صلابت خان نوشتہ کہ فدوی از کتل فردا پور تا بیست کروه جاسوسان خبر غنیم طلبیده هیچ اثر غنیم نیست اگر حکم شود پیشتر بروم فرمودند کہ بنویسد اگر غنیم در آن ضلع نیست بحضور بیاید-

محمد علی خان عرض نمود کہ سهراب خان قلعہ دار پرینده خطی نوشتہ کہ حکم شده بود سہ ۳ هزار بان منجملہ دو هزار بان مساعدت شاهزاده محمد اعظم شاه از قلعہ این جا بدهد چنانچہ یک هزار هشت صد بان شاهزاده جیو گرفتند و دیگر بان مرمت طلب اند بنابران نگرفتہ حکم شده کہ بہ متصدیان ظفرآباد بنویسد کہ یک هزار دو صد بان از قلعہ آن جا بدهند-

लुत्फुल्लाहखानानें अर्ज केला तो असा:—खानजहान बहादुरानें पत्र लिहिलें आहे कीं, 'मी शत्रूच्या लोकांशी तळगांवजवळ व इतर ठिकाणीं सामना करून त्यांचा पराजय केला. ते चांद्याच्या वाटेनें हैद्राबादच्या सरहद्दीकडे गेले. मी त्यांचा पाठलाग केला. लोकांनीं शाहआलमचे हत्ती, उंट वगैरे ठिक-ठिकाणीं पकडले होते, ते मी आणून जागीरदारांच्या जवळ दिले. त्यांच्या-कडून सनद घेऊन हुजुरास पाठवीत आहे.'

मुघलखानानें अर्ज केला तो असा:— सलाबतखानानें लिहिलें आहे कीं, 'मी फर्दापूरच्या पठारापासून वीस कोसांवर असतां हेरांकडून शत्रूची खबर मागविली. पण शत्रूचें कांहीं चिन्ह दिसत नाहीं. हुकूम झाला, तर पुढे जाईन.' हुकूम झाला कीं; 'त्यास लिहावें, शत्रू त्या जिल्ह्यांत नसेल, तर हुजूर यावें.'

मुहम्मद अलीखानानें अर्ज केला तो असा:—परिंड्याचा किल्लेदार सुहराबखान यानें मला पत्र लिहिलें आहे कीं, 'मला हुकूम झाला होता कीं,

तीन हजार बाणांपैकीं शाहझादा मुहम्मद अअजमशाहाच्या मदतीसाठीं दोन हजार बाण या किल्ल्यांतून द्यावे. परंतु शाहझाद्यानें अठराशें बाण घेतले. उरलेले बाण नादुरुस्त असल्यानें घेतले नाहींत.' हुकूम झाला कीं, 'जफराबादेच्या मुत्सद्यांना म्हणून लिहावें. तेथील किल्ल्यांतून १२०० बाण द्यावे.

### ४५३

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रखर ३<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ٥ سنہ<br>یوم الخمس سنہ ٢٦ | श. १६०५ चैत्र शुद्ध ४<br>इ. १६८३ मार्च २२ |

عرضداشت روح الله خان آمده بنظر گذشت معروض داشتہ بود کہ فدوی بمنزل دل گانو بہ ملک فرنگیان رسیده و مردم همراهیان احوال پریشان داشتند بنابر هرکدام را مساعدت داده و سید عزت خان و پدم سنگہ نزدیک رسیده در سہ ٣ چهار روز شامل خان فدوی شده نزد بہادرخان خواهند رسید بمطالعہ خاص درآوردند۔

रूहुल्लाहखानाचा अर्ज आला तो बादशाहाचे नजरेखाली घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, 'मी फिरंग्यांच्या मुलखांतील दलगांव मुक्कामीं पोहोंचलों. माझ्या बरोबरच्या लोकांची परिस्थिती बिकट होत आहे असें पाहून प्रत्येकास मदत दिली. सय्यिद इज्झतखान आणि पदमसिंग मजजवळ पोहोंचले. तीनचार दिवसांत आम्हीं खानासह बहादुरखानाजवळ पोहोंचूं.' हा अर्ज बादशाहाच्या खास पाहण्यांत आला.

### ४५४

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रखर ५<br>शनि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ٧ سنہ<br>یوم الثبت سنہ ٢٦ | श. १६०५ चैत्र शुद्ध ६<br>इ १६८३ मार्च २४ |

از واقعہ فوج بہادرخان بعرض رسید کہ نظام راو هزاری پانصد سوار بود در مورچال از زخم بان بکار آمده۔

عرضہ داشت ایرج صوبہ دار برار معرفت لطف الله خان بنظر گذشت معروض داشتہ بود کہ جمعیت غنیم جانب تلگانو آمده بود بنده سواری نموده از حد خود بدر کرده بعد از آن خبر رسیده کہ مقهوران جانب ایلچ پور آمدند بجهتہ برای تنبیہ مقهوران بآن طرف سواری نمود بندوبست بواقعی خواهم

کرد بعد مطالعہ فرمودند کہ حسب الحکم بخانمذکور بنویسند کہ سابق درباب
شما حکم شدہ بود کہ بمعہ نصف جمعیت برکاب شاهزاده اعظم شاه برود موقوف
نموده نزد شاهزاده معزالدین درظفرآباد برود ازواقعہ فوج خان جہان بہادر
بعرض رسید خان مذکور تعاقب غنیم نموده تابہ میل کہندن دیہہ ماما صاحب
سرحد حیدرآباد ازروئے مہربانی حکم شدہ خلعت خاصہ وکمرتکہ برائی
خانمشارالیہ و خلعات جہتہ مظفر خان و نصرت خان علحدہ نمایند-

'निजामराव १००० जात व ५०० स्वारांचा मनसबदार होता. तो मोर्चामध्यें बाणाच्या जखमेनें कामास आला.' असे बहादुरखानाच्या फौजेतील घटना पत्रांवरून समजलें.

वऱ्हाडचा सुभेदार ईरजखान याचा अर्ज लुत्फुल्लाहखानाच्या मार्फत बादशाहाचे नजरेखालून घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, शत्रूची जमेत तलगांवाकडे आली होती. मी स्वारी करून स्वतःच्या सरहद्दीबाहेर गेलों. नंतर असे कळलें कीं, शत्रूचे लोक एलिचपुराकडे आलेले आहेत. म्हणून त्यांना तंबी देण्यासाठीं मी त्या बाजूस स्वारी करून उत्तम बंदोबस्त ठेवीन हुकुम झाला कीं, 'खानास हस्बुल हुकुम लिहावा, 'तू आपल्या निम्म्या लोकांसह शाहाझादा अअजमशाह यांजकडे जावें' असा तुला पूर्वी हुकुम झाला होता, तो स्थगित केला आहे. आतां तू शाहझादा मुइझ्झुद्दीनाकडे जावें.'

४५५

| जु. २६ रबर ६ रवि. | سیاہہ اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ٦ منہ<br>یوم الاحد سنہ ٢٦ | श. १६०५ चैत्र शुद्ध ७<br>इ. १६८३ मार्च २५ |
|---|---|---|

ہفت گہری روز برآمده عدالت نموده شاه عالم جیورا برای شکار جانب
اوہ گده رخصت نموده خاص عام موقوف نموده درعمل یک پہر سہ گہری
غسل خانہ فرمودند

فرمان درباب قلعہ داری و فوجداری نلدرگ بنام سید یادگار حسین خان
صادر شد حوالہ یوسف بیگ گرز بردار نموده۔

सात घटका झाल्यावर न्यायालय भरवून शाह आलम यास शिकारीसाठीं लोहगडकडे जाण्यास रजा दिली. खास व आम दरबार स्थगित केले. दुपारी एक प्रहर व तीन घटकानंतर घुसलखाना फर्माविला.

नळदुर्गच्या किल्लेदारी व फौजदारी बाबत सय्यिद यादगार हुसेनच्या नांवें फर्मान झालें तें युसूफबेग गुर्जबर्दाराच्या जवळ दिलें.

४५६

| | | |
|---|---|---|
| जु. २७ रखर ७<br>सोम. | سیاه اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ۷ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۶ | श. १६०५ चैत्र शुद्ध ८<br>इ. १६८३ मार्च २६ |

عرضہ داشت دلپت کنو (ر) فوجدار بدهنور و دیوان آمین پور و ماندل آمده بنظر گذشت کہ بنده را یک سال است خدمت مذکور سربراه نموده تا حال جاگیر و نہ نقدی تنخواه یافتہ احوال پریشان دارم خدمت مذکور بدیگرے مقرر شود عرضہ داشت را بمطالعہ خاص در آوردند حوالہ رشید خان نموده کہ فرمودند کہ بجائے او دیگری تجویز نمایند -

عرضہ داشت معمور خان آمده بنظر گذشت معروضداشتہ بود کہ فدوی موافق حکم برکاب شاهزاده محمداعظم شاه روانہ شده چنانچہ دربن ضمن نشان شاهزاده جیو رسیده کہ جمعیت غنیم جانب پیدگانو آمده برای تنبیہ آنها دلاور خان را رخصت نموده باید کہ شما هم بہ کومک خان مذکور بروید بنا بران بآن طرف روانہ شدیم -

بہراه مند خان عرض نموده کہ حمزه خان فوجدار هوشنگ آباد خط نویشتہ کہ راه هندیہ موافق حکم بند نموده اند چنانچہ اکثر مردم براه فوجداری پردل خان فوجدار بهلیہ بایں راه ی آیند و بنده مانع ی نماید بشدت پیش آمده جهتہ جنگ مستعدی شوند جهتہ اعتراضی حضور تنبیہ نمی توانم کرد امیدوارم کہ بہ پردل خان حکم شود کہ از آن طرف خبردار باشد کسے را باین راه نہ گذارد منظور نموده حکم شد کہ دریں باب بہ خان مذکور نویسد -

बिदनूरचा फौजदार, अमीनपूर व मांदलचा दिवाण दलपत कुंवर याचा अर्ज आला तो नजरेखालून घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, ' माझ्या येथील चाकरीस एक वर्ष झालें आहे. परंतु अजून जागीर व रोख तनखा मिळाला नाहीं. माझी परिस्थिती बिकट आहे. आतां या चाकरीवर दुसऱ्या कोणास नेमावें.' अर्ज बादशाहाच्या खास पाहण्यांत आला. त्यांनीं तो रशीदखानाच्या जवळ दिला. त्याच्या ऐवजीं दुसऱ्यास नेमण्याचा हुकूम झाला.

मामूरखानानें अर्ज केला तो असा: 'शाहझाद्याचें पत्र आले कीं, शत्रूची जमेत पेडगांवाकडे आली आहे. त्यांना तंबी देण्यासाठीं दिलावरखानास पाठविलें आहे. तू खानाच्या कुमकेसाठीं गेलें पाहिजे; म्हणून मी हुकुमाप्रमाणें मुहम्मद अअजमशाहा बरोबर तिकडे रवाना झालों.' अर्ज बादशाहाचे नजरेखालून घातला.

बहरामंदखानानें अर्ज केला तो असा :—होशिंगाबादचा फौजदार हमजाखान यानें पत्र लिहिल कीं, 'मी हुकुमाप्रमाणें हंडियाची वाट बंद केली आहे. परंतु बहुतेक लोक बहेलियाचा फौजदार पुरदिलखानाच्या फौजदारीतील वाटेनें येऊन या मार्गानें जात आहेत. मी त्यांना मनाई केली आहे. ते वेगानें पुढे येऊन लढाई करण्यासाठी तयार झाले होते. हुजूर इतराजी होईल म्हणून त्यांना तंबी दिली नाहीं. आशा करितों कीं, पुरदिलखानास 'तिकडील बाजू बद्दल खबरदार असावें. कोणालाही त्या वाटेनें जाऊं देऊं नय.' असा हुकूम होईल.' बादशाहानें तें मंजूर केलें. हुकूम झाला कीं, या बाबत खानास लिहावें.

४९७

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रस्वर ९<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الثانی ۹ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۶ | श. १६०५ चैत्र शुद्ध ११<br>इ. १६८३ मार्च २८ |

اشرف خان عرض نمود کہ قاضی جہان و قاضی راهیری بموجب فرمان بامید بندگے بہ حضور آمده است حکم شد دستک قلعہ بدهد کہ آمده ملازمت نمایند۔

عرضہ داشت قلعہ دارخان قلعہ دار فتح عرف دهارور بنظر گشت معروضداشتہ بود کہ نارو جی سردار سنبها مقهور بمعہ جمعیت در نواحی آمده بود فدوی خبر یافتہ سواری نموده مقابلہ کرده از اقبال حضرت سردار مقهور را بمعہ یکصد کس مقهوران بقتل رسانیده سر بریده مینار ساختہ و بسیار کس را زخمی نموده شکست داده و سیزده نفر زنده دستگیر نموده و چهتری و اسپ ماده و وغیره سلاح بدست آورده و اکثر مردم این جانب نیز بکار آمده و زخمی شدند فتح بادشاهی شد بمطالعہ خاص در آوردہ فرمودند کہ مجرای کلے شد هزاری ذات ششصد سوار بود یکصد سوار اضافہ فرمودند۔

अश्रफखानानें अर्ज केला कीं, 'काझीजहान व राहेरीचा काजी हें फर्माना प्रमाणें चाकरीच्या आशेनें हुजूरास आले आहेत'. हुकूम झाला कीं, 'त्यांना किल्ल्यांत येण्याचा दस्तक द्यावा. त्यांनी येऊन चाकरी करावी'.

फतहाबाद उर्फ धारूरचा किल्लेदार किलअदारखान याचा अर्ज बादशाहाचे नजरेखालून घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, 'संभाचा सरदार नारोजी हा जमेतीसह या भागात आला होता. हें कळाल्यावर मी स्वारी करून सामना केला. बादशाही सुदैवानें शत्रूच्या सरदारास १०० स्वारांसह मारलें. त्यांची डोकीं कापून मनोरा तयार केला. आणखी अनेकांना जखमी करून त्यांचा पराजय केला. त्यांच्या १३ लोकांना जिवंत पकडलें. छत्री, घोड्या, भाला वगैरे हत्यारें हातीं आलीं. तसेंच इकडील बाजूचे सर्व लोक कामास आले किंवा जखमी झाले. बादशाहाचा विजय झाला आहे.' अर्ज बादशाहाच्या खास पाहण्यांत आला. हुकूम झाला कीं, हे मान्य आहे. खान १००० जात व ६०० स्वार असा मनसबदार होता. त्यांत १०० स्वारांची वाढ फर्मावली.

४५८

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रस्वर १०<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع الثانی ۱۰ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۶ | श. १६०५ चैत्र शुद्ध १२<br>इ. १६८३ मार्च २९ |

قاضی جہان و قاضی راهیری بامید بندگے ملازمت نموده پنج اشرفی و ۱۸ هزده روپیہ نذر گذرانید از التماس وکیل اودیت سنگھ پسر راجہ مہاسنگھہ بہدوریہ بعرض رسید کہ موکل بنده بعد پدر بمعہ جمعیت هفصد سوار و هشتصد پیاده از گلشن آباد آمده درباب ملازمت هرچہ امر شود حکم شده دستک امدن قلعہ بدهند۔

بسنت نایک سہ بیستی ذات پانزده سوار و سیواجی دو بیتی ده سوار از خویشان تہا کو بنجاره مفسد را بموجب تجویز سردار ترین نو سرافراز فرمودند۔

काझी जहान व काझी राहेरी यांनीं बादशाहाची भेट घेऊन ५ अश्रफ्या व १८ रुपये भेट दिले.

राजा महासिंग भदोरियाचा मुलगा उदितसिंग याच्या वकिलाच्या विनंतिवरून अर्ज आला कीं, 'माझे मालक वडिलांच्या मृत्यूनंतर ७०० स्वार व

८०० पायदळ अशा जमेतीसह गुलशनाबादेहून आले आहेत. त्यांच्या चाकरी बाबत हुकूम व्हावा.' हुकूम झाला कीं, त्यास किल्यामध्यें येण्याचा दस्तक द्यावा.

बंडखोर थाकू बंजारा याचे नातेवाईक वसंत नायक, ६० जात व १५ स्वार आणि शिवाजी, ४० जात व १० स्वार, यांना सरदारतरीन याच्या तजविजीप्रमाणें नवीन मानकरी केलें.

४५९

| जु. २६ रखर ११ | سیاهہ اخبارات دربار معلے | श. १६०५ चैत्र शुद्ध १३ |
|---|---|---|
| शुक्र. | ماه ربیع‌الثانی ۱۱ سنہ | इ. १६८३ मार्च ३० |
| | یوم الجمعہ سنہ ۲۶ | |

حسب‌الحکم بمہر لطف‌اللہ خان بنام معمور خان و دلاور خان صادر شد مضمون انکہ مردم غنیم نواحی پیدگانو آمده باید کہ سواری نموده تنبیہ رساند حوالہ عبداللہ بیگ گرز بردار نموده۔

मामूरखान व दिलावरखान यांचे नांवें लुत्फुल्लाहखानाच्या शिक्क्याचा हस्बुलहुकूम आला तो असा:- 'शत्रूचे लोक पेडगांवच्या भागांत आले आहेत. तुम्ही त्यांना तंबी दिली पाहिजे.' हा हुकूम अब्दुल्लाहबेग गुर्जबर्दाराजवळ दिला.

४६०

| जु. २६ रखर १२ | سیاهہ اخبارات دربار معلے | श. १६०५ चैत्र शुद्ध १४ |
|---|---|---|
| शनि. | ماه ربیع‌الثانی ۱۲ سنہ | इ. १६८३ मार्च ३१ |
| | یوم الثبت سنہ ۲۶ | |

قاضی جہان و قاضی راهیری بہ امید بندگی ملازمت نموده بودند خلعات اده حقایق ملک غنیم پرسیدند مشارالیہ بعرض رسانید۔

عرضداشت معمورخان آمده بنظر گذشت معروض داشتہ بود کہ بنده مطابق نوشتہ بادشاهزاده محمد اعظم شاه بہ پیدگانو می رفت متصل است گانو جمعیت غنیم نمودار شده اراده داشت کہ برمردم بہیر آمده شوخی نماید باحتیاط تمام مقابلہ غنیم [کرده*] مانده مقہوران طرح داده فراری شدند بنده از آن جا روانہ شده و دلاور خان بمعہ فوج خود آمده شامل حال بنده شد چنانچہ بہ پیدگانو رسیده درآن جا مردم جاسوسان خبر آورد کہ جمعیت غنیم ازآن جا سی و پنج کروه فرود ازاین استماع بنده و دلاور خان مردم بہیر در پیدگانو

گذاشتہ بتاریخ ۶ شہر حال مقابلہ کردہ از اقبال حضرت بسیار کس را بقتل رسانیدہ شکست دادہ و اکثر مردم این جانب بکار آمدہ و زخمی شدند و کمال الدین خان وغیرہ از همراهی دلاور خان و رعایت خان وغیرہ همراهی بندہ خیلی تردد نمودہ، مفصل این از روی واقعہ بعرض خواهد رسید و بندہ تعاقب غنیم می آورد فرمودند کہ مجرای خان مشارالیہ کلی شد۔

काझी जहान व काझी राहेरी यांनीं बादशाहाची भेट घेतली. त्यांना खिलअत देऊन बादशाहानें शत्रूच्या मुलखाची हकीकत विचारली. त्यांनीं अर्ज केला. मामूरखानाचा अर्ज आला तो नजरेखालून घातला. त्यानें विनंती केली होती कीं 'मी मुहम्मद अअजमशाहानें लिहिल्याप्रमाणें पेडगांवास जात होतों. अष्टे गांवाजवळ शत्रूची जमेत दिसली. बुणग्यांची खोड काढण्याचा त्यांचा विचार होता. मी संपूर्ण खबरदारीनें शत्रूंचा सामना करून त्यांना तंबी दिली. ते पळून गेले. मी तेथून पुढें निघालों. दिलावरखान स्वतःच्या फौजेसह येऊन मला मिळाला. नंतर पेडगांवास पोहोंचलों. तेथें हेरांनीं बातमी आणली कीं, शत्रूचे लोक तेथून पळून ३५ कोसांवर उतरले आहेत. हें कळल्यावर मी व दिलावरखानानें [बुणग्यांना] पेडगांव येथें ठेवले आणि चालू महिन्याच्या ६ तारखेस लढाईंत अनेक लोकांना मारून बादशाही सुदैवानें शत्रूचा पराजय केला. इकडील बाजूचे बरेच लोक कामास आले आणि जखमी झाले. दिलावर-खानाबरोबरचे कमालुद्दीनखान वगैरे व माझ्या बरोबरचे रिआयतखान वगैरे लोकांनीं खूपच कष्ट केले. या घटनांच्या संपूर्ण हकीकतीचा अर्ज पाठवीत आहे आणि मी शत्रूच्या पाठलागावर जात आहे.' हुकूम झाला कीं, खानाचें म्हणणें मान्य आहे.

४६१

| जु. २६ रबर १२<br>शनि. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماہ ربیع الثانی ۱۲ سنہ<br>یوم السبت سنہ ۲۶ | श. १६०५ चैत्र मार्च १४<br>इ. १६८३ मार्च ३१ |
|---|---|---|

میر احمد داروغہ توپخانہ محمد بدیع بلخی تھانہ دار پارسا عرضداشت مشارالیہ آوردہ بنظر گذرانیدہ معروض داشتہ بود کہ مردم زمینداران قلعہ دهکمار (نا) بابت غنیم بہ بندہ ملاقی شدہ چنانچہ بندہ بانها خلعت و چهار اسپ دادہ قلعہ مذکور بتصرف بادشاهی آوردہ چنانچہ آن جا تھانہ نشاندہ

مردم زمینداران را تسلہ دلاسای نموده پیش خود نگاه داشتہ دو صد روپیہ روزمرہ با نہا میدھم و اقرار نموده کہ اگر از حضور پرداخت مایان شود قلعہ سالہیر را از تعلق غنیم بتصرف بادشاهی بیاریم و دیگر دونفر نوکر اکبر ابتر کاغذ سفید بمہر اکبر آورده بود آنہا را دستگیر نموده فرستاده ایم بعد مطالعہ فرمودند کہ جواب این فہمیده فرموده خواهد شد۔

ازواقعہ فوج روح اللہ خان بعرض رسید کہ بتاریخ بیست ششم ۲۶ شہر ربیع الاول سنہ الیہ بہ کلیان بہمری رسیده شامل حال فوج بہادرخان شده خان مذکور بہ بخشی الملک اظہار کرده کہ اندرون قلعہ فرود آید بخشی الملک گفتہ کہ همراه بندہ جمعیت کثیر و قلعہ خورد است بیرون دیره نموده مانده

روزدویم بہ بہادرخان گفتہ نشستہ ماندن یک جا مناسب نیست برای گشت سواری می نموده باشند چنانچہ خان مذکور سوار شده بود مردم غنیم نمودار شده و اکثری را بقتل رسانیده شکست داده چنانچہ فرمان بہ بخشی الملک از حضور آمده بود جہتہ استقبال فرمان سواری نموده با مردم غنیم مقابلہ شده ازاقبال حضرت بسیارکس را بقتل رسانیده شکست داده و اکثر مردم این جانب بکارآمده و زخمی شدند بعد ازاں فرمان گرفتہ تسلیمات بجای آوردند۔

पारसाचा ठाणेदार मुहम्मद बदी बलखी याच्या फौजेंतील तोफखान्याचा दारूगा मीर अहमद यानें उपर्युक्ताचा अर्ज आणून नजरेखालून घातला व एक अश्रफी भेट दिली. त्यानें अर्ज केला होता कीं, ‘शत्रूकडील किल्ले दहकमा(ना)बाबत तेथील जमीनदार लोक मला येऊन भेटले. मी त्यांना खिलअत व ४ घोडे देऊन तो किल्ला बादशाही अमलाखालीं आणला. नंतर तेथें ठाणें कायम केलें. जमीनदार लोकांना दिलासा देऊन व माझ्या चाकरींत ठेवून त्यांना २०० रुपये रोज देत आहे. त्यांचा असा विचार आहे कीं, हुजुरापाशीं आपलें ऊर्जित झालें, तर शत्रूच्या तालुक्यांतील साल्हेरचा किल्ला बादशाही अमलाखालीं आणावा. अकबराच्या दोन नोकरांनीं त्याच्या शिक्क्याचा पांढरा कागद आणला होता. त्यांना पकडून पाठविलें आहे.’ पाहिल्यानंतर हुकूम झाला कीं, ‘विचार करून याचें उत्तर दिलें जाईल.’

रूहुल्लाहखानाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें कीं, २६ रबल रोजीं खान कल्याण-भिवंडीस पोहोंचून बहादुरखानाच्या फौजेस मिळाला. खान मजकुरानें बक्षी-उल्-मुल्कास सांगितलें कीं, ‘किल्ल्यांत येऊन उतरावें’. बक्षी-

उल्-मुल्कानें कळविलें, 'माझ्या बरोबर मोठा जमाव व किल्ला लहान आहे. मी बाहेरच डेरा टाकून रहातों'.

दुसरे दिवशीं त्यानें बहादुरखानास निरोप दिला कीं, 'एके ठिकाणीं बसून राहणें ठीक नाहीं. गस्त घालण्यासाठीं हललें पाहिजे' नंतर खानानें तसें केलें असतां शत्रूचे लोक तेथें दिसले. त्यांतील बहुतेकांना मारून त्याचा पराजय केला. मध्यंतरीं बक्षी-उल्-मुल्कास हुजुराकडून फर्मान आलें होतें. त्यानें फर्मानाच्या सन्मानासाठीं प्रयाण केलें. तेव्हां शत्रूशीं सामना झाला. बादशाही सुदैवानें शत्रूच्या अनेक लोकांना मारून त्यांचा पराभव केला. इकडील बहुतेक लोक कामास आले वा जखमी झाले. त्यानंतर फर्मान घेऊन तस्लिमात केली.

## ४६२

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रखर १४<br>सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع الثانی ۱۳ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲٦ | श. १६०५ चैत्र वद्य १<br>इ. १६८३ एप्रिल २ |

خسرو بیگ یساول برای سزاولے پدم سنگھہ ولد راو کرن وسید عزت خان آورده بنظر گذرانید و زبانی بعرض رسانید کہ همیر راؤ سردار سنبها مقهور بمعہ جمعیت بیست هزار سوار و ده هزار پیاده نواحی کایان بهری آمده بود چنانچہ پدم سنگھہ وغیره مردم چندول مقابلہ کرده از اقبال حضرت دو سردار مقهور با دو صد کس دیگر بجهنم رسانیده و همیر راو زخمی شده گریخت و پدم سنگھہ هزار پانصدی ذات هزار سوار سی و پنج ۳۰ زخم برداشتہ و بهگونت سنگھہ ولد مانکوجی دکهنی پانصدی ذات چهارصد سوار بود بکار آمده و رام سنگھہ ولد رتن راتهور هزار پانصدی هزار سیصد سوار بیمار بود بعد بکارآمدن پدم سنگھہ زره بکتر پوشیده می خواست برائے تنبیہ مقهوران سواری نماید ضعیف شده بسبب گرما فوت شده و هری سنگھہ ولد پورن مل بندیلہ زخمی شده در میدان افتاده بود مردم غنیم برداشتہ بردند و رگهوناتهہ سنگھہ ولد پدم سنگھہ و کابلی سنگھہ زمیندار بهان گده و مادهورام سیسودیہ و توکوجی وغیره بندهای بادشاهی زخمی شدند بعد معروض فرمودند کہ آفرین باد برنمک حلالی پدم سنگھہ جای تردد همین بود مابدولت سعادت

هم بپسران وغیره متعلقان متوفی‌ای خوب رعایت خواهم فرمود و به اهتمام خان حکم شده اگر کوچ های متوفی ستی شوند مزاهم نه شوند اختیار دارند۔

खुस्रवबेग यसावल हा पद्मसिंग वलद रावकरण व सय्यिद इझ्झतखान यांची सजावली करण्यासाठीं गेला होता तो आला. त्यानें रूहुल्लाहखान व सय्यिद इझ्झतखान यांचे अर्ज आणून बादशाहाच्या नजरेखालीं घातले आणि तोंडीं अर्ज केला कीं, 'संभाचा सरदार हंबीरराव वीस हजार स्वार व दहा हजार पायदळ यांसह कल्याण–भिवंडीच्या जवळ आला होता; म्हणून पद्मसिंग वगैरे पिच्छाडीच्या लोकांनीं लढाई करून बादशाही सुदैवानें शत्रूचे दोन सरदार व २०० लोक मारले. हंबीरराव जखमी होऊन पळाला. पद्मसिंग हा १५०० जात व १००० स्वार असा मनसबदार होता; त्यास ३५ जखमा झाल्या. भगवंतसिंग वलद माणकोजी दखनी हा ५००. जात व ४०० स्वार असा मनसबदार होता; तो कामास आला. रामसिंग वलद रतन राठोड, १५०० जात व १३०० स्वार, हा आजारी होता. त्यानें पद्मसिंगाच्या मृत्यूनंतर चिलखत घालून शत्रूस तंबी देण्यासाठीं स्वारी करण्याची इच्छा प्रगट केली; पण तो अशक्त होता; तो उष्णते(तापा) मुळें मरण पावला. हरिसिंग वलद पूरणमल बुंदेला जखमी होऊन लढाईच्या मैदानावर पडला होता. शत्रूच्या लोकांनीं त्यास नेलें. रघुनाथसिंग वलद पद्मसिंग, भानगढचा जमीनदार काबुलीसिंग, माधोराम सिसोदिया व तुकोजी वगैरे बादशाही लोक जखमी झाले.' अर्जानंतर हुकूम झाला कीं, 'पद्मसिंगाच्या निमकहलालीबद्दल वाहवा ! हेंच कष्ट करावयाचें ठिकाण होतें ! बादशाह त्याचीं मुलें व संबंधित यांचेवर कृपा करू इच्छितात.' इहतिमामखानास हुकूम झाला कीं, 'त्याच्या बायकांना सती जावयाचें असेल तर अडथळा करू नये.' त्यांना अधिकार आहे.

## ४६३

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रखर १५<br>मंगळ. | سیاهم اخبارات دزبار معلے<br>ماه ربیع الثانی ١٥ سنه<br>یوم الثلث سنه ٢٦ | श. १६०५ चैत्र वद्य २<br>इ. १६८३ एप्रिल ३ |

به شاه عالم جیو فرمودند که روح الله خان از جنگ مردم دکهنیان واقف نه بود لیکن بهر حال به استقلال تمام مانده در سرداری خود دریغ نه کرده و بهادر خان را میبالسی کرده دوازده کروه پیشتر آمده خان مذکور

را بعه فوج همراه برده از حقایق غنیم مطلع می کرد چون مردم غنیم شوخی نموده بر چنداول افتاده بنابران پدم سنگهه وغیره بکارآمدند

چون کمی جمعیت تعیناتیان فوج ها بعرض رسید بنابران کم فرمودند

گوبند راو اصل پانصدی کمی ۵۰ سوار

शाह आलम यास हुकूम झाला कीं, 'रूहुल्लाहखानास दक्षिणी लोकांच्या लढाईची पध्दत माहिती नव्हती. तशाही परिस्थितींत तो टिकून राहिला. त्यानें सरदारकीच्या कामामध्यें ढिलाई केलेली नाहीं. तो बारा कोस पुढें आला व बहादुरखानास त्यानें आपल्या फौजेबरोबर आणून शत्रूची माहिती करून दिली. शत्रूच्या लोकांनीं खोड काढून त्याच्या पिछाडीवर हल्ला केला; त्यांत पद्मसिंग वगैरे कामास आले.'

फौजेंत नेमून दिलेल्या संख्येपेक्षा लोक कमी होते असा अर्ज आला. म्हणून मनसब कमी करण्याचा हुकूम झाला. त्याचा तपशील: गोविंदराव पूर्वी ५०० जात, २०० स्वार असा मनसबदार होता. त्याचे पन्नास स्वार कमी केले.

## ४६४

| जु. २६ रखर १६ बुध. | سیاهه اخبارات دربار معلی ماه ربیع الثانی ۱۶ سنه یوم الاربعه سنه ۲۶ | श. १६०५ चैत्र वद्य ३ इ. १६८३ एप्रिल ४ |
|---|---|---|

مطالب هدایت الله که به کرناتک رخصت شده بعرض رسید

.......... سیوم اگر نوکران سنبها مقهور و بیجاپوری رجوع آرند هرچه امر شود حکم شد تسلی نموده معروض دارند۔

.......... ششم وکلای سری رنگ پتن التماس دارند که اگر ملک سنبها مقهور در تصرف بیارند هرچه شود حکم شده که آنچه از قافر بچه بگیرند مجرای است ۔

بموجب واقعه فوج روح الله خان بعرض رسید که در جنگ مردم غنیم بندهای بادشاهی بکارآمدند و زخمی شدند از آنچه که بکارآمدند پدم سنگهه با بیست و پنج سوار بهگونت سنگهه ولد مانکو توکوجی مادهورام سیسودیه مان سنگهه برادر بهگونت سنگهه دلیر خان اکرم خان قاسم خان نوازش خان عظمت الله خان سید عبدالهادی سید مرتضی وغیره بندهای حاتم بیگ محمد یار ابراهیم بیگ مستصم بیگ سید بهادر خواجه محمد صالح سید یوسف

شیخ فرید ولد حمید خان میر محمد ولد ملتفت خان بھگونت سنگھ ولد رام سنگھ
سیام سنگھ راجہ درگ سنگھ سید عبدالشکور سید نصیب سید مجاهد سید جلال
سید غایت ناصر بیگ وغیره گرزداران همایون علی فرهاد بیگ

منصب داران زخمی شدند
بسنت راو نواس راو دارکوجی سترسال ولد رتن راتهور سندر داس اودیت سنگھ
بسنت راو کابلی سنگھ بهان راو بهیم سنگھ بهوج راج کلیان راو دلیر خان
اکرم خان نوازش خان راجه درگ سنگھ خواجه محمد عادل عبدالشکور
سید نورالدین عبدالقادر حاجی برهان و حاجی عیوض بیگ وغیره عبدالله بیگ
وغیره بدیع الزمان و میر خلان برادری قاسم خان برادری خراجه یعقرب

سه نفر عسه نفر

بعرض رسید که هری سنگھ ولد پورن مل بهدیله سیصدی دو صد سوار
زخمی را مردم غنیم در جنگ همراهی روح الله خان برده بودند فوت شده۔

कर्नाटकांत पाठविलेल्या हिदायतुल्लाहच्या मागण्यांबद्दल अर्ज आला. त्यांतील तिसरी अशी : संभा व विजापूरकर यांचे नोकर रुजू झाले आहेत तरी त्यांबद्दल हुकूम व्हावा. हुकूम झाला कीं, 'त्यांना दिलासा देऊन अर्ज करावा.' सहावी अशी : श्रीरंगपट्टणच्या वकिलांनीं विनंति केली कीं, 'संभाचा मुलूख बादशाही अमलाखालीं आणला. त्याबाबत हुकूम व्हावा.' हुकूम झाला कीं, संभापासून जें घेतलें जाईल तें मान्य आहे.

रूहुल्लाहखानाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें कीं, शत्रूच्या लोकांशीं झालेल्या लढाईंत बादशाही लोक कामास आले व जखमी झाले. त्यांपैकीं कामास आले ते : २५ स्वारांसह पद्मसिंग, भगवंतसिंग वलद माणको, तुकोजी, माधोराम सिसोदिया, भगवंतसिंगाचा भाऊ मानसिंग, दिलेरखान, अक्रमखान, कासिमखान, नवाझिशखान, अज्मतुल्लाहखान, सय्यिद अब्दुल हादी, हातिम बेगाचे सय्यिद मुर्तजा वगैरे लोक, मुहम्मद यार, इब्राहीमबेग, मुअतासिमबेग, सय्यिद बहादुर, ख्वाजा मुहम्मद सालिह, सय्यिद युसुफ, शेख फरीद वलद हमीदखान, मीर मुहम्मद वलद मुल्तफितखान, भगवंतसिंग वलद रामसिंग, श्याम-सिंग, राजा दुर्गसिंग, सय्यिद अब्दुश्शकूर, सय्यिद नसीब, सय्यिद मुजाहिद, सय्यिद जलाल, सय्यिद घायत, नासिरबेग वगैरे गुर्जबर्दार, हुमायून अली, फर्हादबेग. जखमी झालेले मनसबदार असे : वसंतराव, निवासराव, दारकोजी

(द्वारकोजी), छत्रसाल वलद रतन राठोड, बसंतराव, सुन्दरदास, उदीतसिंग, काबुलीसिंग, भानराव, भीमसिंग, भोजराज, कल्याणराव, दिलेरखान, अक्रमखान, नवाझिशखान, राजा दुर्गासिंग, ख्वाजा मुहम्मद आदिल, अब्दुश्शकूर, सय्यिद नूरुद्दीन, अब्दुल कादिर, हाजी बुर्हान, हाजी अब्दुल्लाहबेग वगैरे, ऐवज़बेग बदीउझ्झमान, मीर खलान वगैरे, कासिमखानाच्या भाऊबंदांपैकीं तीन लोक, ख्वाजा याकूब याच्या भाऊबंदांपैकीं . . . लोक.

अर्ज आला कीं, 'जखमी झालेला हरिसिंग वलद पूरणमल बुंदेले ३०० जात, २०० स्वार याला रूहुल्लाहखानाबरोबर झालेल्या लढाईंत शत्रू घेऊन गेला होता. तो मरण पावला.

४६५

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रखर १९<br>शनि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ۱ ۵ منہ<br>یوم السبت سنہ ۲ ٦ | श. १६०५ चैत्र वद्य ६<br>इ. १६८३ एप्रिल ७ |

قاضی جہان قاضی راهیری منشی سرکار سنبہا مقہور بامید بندگی آمده بود هزاری ذات و هزار سوار نوسرافراز فرمودند۔

عرضداشت شیرانداز بمعرفت لطف‌الله خان بنظر گذشت معروض داشتہ بود کہ جاسوسان خبرآوردند کہ جمعیت غنیم قریب شش هزار سوار آمده اند بنا بران فدوی خزانہ و غیره در قلعہ احمد نگر گذاشتہ سواری نموده چنانچہ مردم مقہوران گریختہ رفتند فرمودند کہ حسب الحکم بمشارالیہ بنویسد کہ از اینده با تفاق قلعدار سواری نموده باشد۔

از التماس وکیل پدم سنگھہ بعرض رسید کہ موکل بنده معہ تابینان بکار آمده است بہ پسران موکل چنان منصب سرافراز شود متفرقہ نگردد حکم شده کہ جمعیت را بنظر بگذراند دیگر رعایت نموده خواهد شد۔

संभाच्या सरकारांतील मुन्शी राहेरीचा काझी जहान हा चाकरीच्या आशेने आला होता, त्यास १००० जात व १००० स्वार असा नवा मनसबदार केल्याचा हुकूम झाला.

शीरंदाझ याचा अर्ज लुत्फुल्लाहखानामार्फत आला होता, तो बादशाहाचे नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, 'शत्रूची जवळ जवळ सहा हजार

स्वारांची जमेत आली आहे अशी बातमी हेरांनी आणली; म्हणून मी खजिना वगैरे अहमदनगरच्या किल्ल्यांत ठेवून स्वारी केली. परंतु शत्रूचे लोक पळाले'. हुकूम झाला कीं, 'उपर्युक्तास हस्बुलहुकूम लिहा कीं, आतां पुढें किल्लेदाराच्या सहकार्यानें स्वारी केली पाहिजे.'

पद्मसिंगाच्या वकिलानें विनंति केली कीं, 'माझे मालक स्वारांसह कामास आले. त्यांच्या मुलांसाठीं योग्य ती मनसब मिळावी. म्हणजे लोक फुटून जाणार नाहीत.' हुकूम झाला कीं, 'जमेत नजरेखालीं घालावी. नंतर कृपा केली जाईल.'

४६६

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रखर २० रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ۲۰ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۶ | श. १६०५ चैत्र वद्य ७<br>इ. १६८३ एप्रिल ८ |

اودیت سنگھ پسر راجہ مہا سنگھ متوفی را خطاب راجگی سرافراز نموده و پانصدی ذات سیصد سوار بود دو صدی ذات و دو صد سوار دو اسپہ اضافہ نموده همراه شیرانداز تعین فرمودند۔

فرمان و خلعت خاصہ بنام روح الله خان درباب طلب حضور خوالہ هدایت الله وغیره چهار نفر گرز برداران نموده فرمودند کہ اول بہ گلشن آباد بروند اگر دانند کہ خبرآمدن خان مذکور است در آن جا رساند والا بسورت رفتہ براه دریا بروند و بہ بهره مند خان فرمودند کہ بہ کارطلب خان متصدی سورت بنویسد هرگاه گرز برداران برسند یک غراب بسر راه نموده بدهد۔

حکم شده هرگاه خان جهان بهادر قلعہ نلدرگ را محاصره نموده توپ نصرت بخش همراه برده بود حالا درشولاپور است اگر خان مذکور طلب نماید بفرستند۔

قاضی جهان را بسبب احوال پریشانی دو هزار روپیہ انعام مرحمت فرمودند۔

स्वर्गवासी राजा महासिंग याचा मुलगा उदीतसिंग यास राजा ही पदवी देऊन तो ४०० जात व ३०० स्वार असा मनसबदार होता, त्यांत २०० स्वार दुघोडी अशी वाढ करून शीरंदाझाचे बरोबर त्याची नेमणूक केल्याचा हुकूम झाला.

रूहुल्लाहखानास हुजूर बोलावण्याबाबतचें फर्मान व खाशाची खिलत हिदायतुल्लाह वगैरे चार गुर्जबर्दारांच्या जवळ दिली व हुकूम झाला कीं, 'प्रथम गुलशनाबादेस जावें; खानाच्या येण्याची बातमी समज़ली, तरच तिथें थांबावें; नाहीं तर सुरतेस जाऊन पुढें समुद्रमार्गें जावें.' बहरामंदखानास हुकूम झाला कीं 'सुरतेचा मुत्सद्दी कारतलबखान यास लिहावें कीं, गुर्जबर्दार पोहोंचतील तेव्हां एक गुराब तयार करून त्यांस द्यावी.'

हुकूम झाला कीं, खानजहान बहादुरानें नळदुर्गास वेढा दिला होता. तेव्हां त्यानें नुस्रतबक्ष तोफ बरोबर आणली होती. सध्या ती सोलापुरांत आहे. खानानें ती मागविली, तर त्यास पाठवावी.

काझी जहान यास त्याच्या बिकट परिस्थितीमुळें २००० रुपये बक्षीस दिले.

४६७

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रखर २०<br>रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ۲۰ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۶ | श. १६०५ चैत्र वद्य ७<br>इ. १६८३ एप्रिल ८ |

چون شرزه خان بیجاپوری درکار بادشاهی تن نداده ملازمت بادشاهزاده اعظم شاه نکرده بنا بران اعتراضی نموده غالب خان پسرش را از منصب سہ هزاری ذات و دو هزار سوار برطرف نموده و بہ سید مبارک خان قلعہ دار دولت آباد فرمودند کہ مشارالیہ را بمعہ قبیلہ برده در قلعہ نگاه دارد۔

शर्झाखान विजापुरी यानें बादशाही कामांत लक्ष घातलें नाहीं. तसेंच मुहम्मद अअजमशाहाची चाकरी केली नाहीं. म्हणून त्यावर बादशाहाची इतराजी झाली. त्याचा मुलगा घालिबखान यास तीन हजार जात व दोन हजार स्वार या मनसबेवरून बडतर्फ केलें. दौलताबादेचा किल्लेदार सय्यिद मुबारकखान यास हुकूम झाला कीं, खानास कबिल्यासह पकडून आणून किल्यांत कैदेंत ठेवावें.

४६८

| | | |
|---|---|---|
| जु. २६ रखर २१<br>सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ۲۱ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۶ | श. १६०५ चैत्र वद्य ८<br>इ. १६८३ एप्रिल ९ |

محمد رحیم محمد امین خانی را خلعت داده بخدمت تهانه داری چاندور رخصت فرمودند۔

عرضداشت شیرانداز تهانه دار احمدانگر بنظر گذشت معروضداشته بود که مردم غنیم حالا از این نواحی فراری شده رفتند حکم شده که راجه اودت سنگهه بهدوریه را که دیروز همراه مشارالیه تعین نموده اند اول نزد شیرانداز برود هرگاه مردم غنیم مقابله شهاب‌الدین خان بیایند آن زمان راجه مذکور نزد خان مشارالیه برود۔

سیف‌الله ولد روح‌الله خان عرض نمود که پسر غلام خطے نوشته که مردم غنیم هفت کروه پیش از کلیان بهمری جمع شده میخواستند که قابو یافته بر بندهائے بادشاهی شوخی نماید۔

چنانچه فدوی بمعه فوج جهته تنبیه آنها شتافته آخرش مقهوران تاب مقابله نیاورده چهتری و بهاله وغیره سلاح و اسباب زیادتی گذاشته گریخته درجنگل پنهان شدند و دو سه مواضع آنها که متصل بودند آتش داده سوخته و چندی بند مویشی بدست آورده برگشته کلیان بهمری رسیده موافق حکم روانه جانب گلشن‌آباد شدیم و جاسوسان خبر آوردند که روپاجی بهوسله و ماناجی موره سرداران مقهور که سابق درجنگ زخمی شده بودند بجهنم رسیدند بندگان حضرت شنیده فرمودند که این حقایق داخل واقعه نمایند از واقعه رنتهور بعرض رسید که روپ سنگهه هاده تهانه دار کهندار هشتصدی ذات هشتصد سوار بود فوت شد۔

لطف‌الله خان عرض نمود که وکیل پدم سنگهه متوفی التماس نماید که انروده سنگهه پسر متوفی بمنصب سیصد ذات یکصد سوار سرافراز شده امیدوار رعایت است چنانچه پنجاه سوار اضافه فرمودند۔

حکم شده آنچه گرز برداران همراهی قاسم خان درگلشن‌آباد مانده اند بحضور بیایند۔

मुहम्मद रहीम मुहम्मद अमीनखानी यास खिलत देऊन चांदवड येथील ठाणेदारीच्या चाकरीवर जाण्याचा हुकूम केला.

अहमदनगरचा ठाणेदार शीरंदाझ याचा अर्ज नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, शत्रूचे लोक येथून गेले आहेत. हुकूम झाला कीं, उपर्युक्ता-बरोबर काल नेमलेला राजा उदीतसिंग भदोरिया यानें प्रथम शीरंदाझाकडे

जावें. शिहाबुद्दीनखानाच्या बरोबर शत्रू लढण्यासाठीं येईल, तेव्हां राजानें खानाजवळ जावें.

सैफुल्लाह वलद रूहुल्लाहखान यानें अर्ज केला तो असा:—माझ्या मुलानें पत्र लिहिलें कीं, शत्रूचे लोक कल्याण-भिवंडीच्या पुढें सात कोसांवर जमा झाले व बादशाही लोकांची खोडी काढावी असा त्यांचा विचार होता. म्हणून मी फौजेसह तंबी देण्यासाठीं धावून गेलों. त्यांनीं लढाई दिली नाहीं. छत्री, भाले, वगैरे हत्यारें व इतर सामान सोडून ते पळून गेले. जंगलांत लपून बसले आहेत. जवळपास २, ३, खेडीं होतीं तीं त्यांनीं जाळलीं. कांहीं लोक व जनावरें माझ्या हातीं आलीं. मी कल्याण-भिवंडीस परत आलों. हुकुमाप्रमाणें गुल्शनाबादेस जात आहे. हेरांनीं बातमी आणली कीं, शत्रूचे सरदार मानाजी मोरे व रूपाजी भोसले हे पूर्वीं लढाईंत जखमी झाले होते ते मेले. हें ऐकून बादशाहानें हुकूम दिला कीं, हें वाक्यांत घालावें. रणथंबोरच्या घटनांवरून समजलें कीं, कंधारचा ठाणेदार रूपसिंग हाडा हा ८०० जात व ८०० स्वार असा मनसबदार होता तो मरण पावला.

लुत्फुल्लाहखानानें अर्ज केला तो असा:—पद्मसिंगाचा वकील विनंति करीत आहे कीं, पद्मसिंगाच्या मुलास नवीनच ३०० जात व १०० स्वार अशी मनसब मिळाली आहे. तो अधिक बादशाही कृपेची आशा करतो'. त्यास ५० स्वार वाढ केल्याचा हुकूम झाला.

## ४६९

| | | |
|---|---|---|
| जु. २७ जिल्हेज २<br>सोम. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ذی الحجہ ۲ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۷ | श. १६०५ मार्गशीर्ष शुद्ध ३<br>इ. १६८३ नोव्हेंबर १६ |

اهتمام خان عرض نمود کہ جگدیو راو زمیندار سری رنگ پتن بہ پدیا و سید زین العابدین خطی نوشتہ کہ فرمان مصحوب هدایت الله بنام بنده صادر شده بود تاحال بفدوی نرسید و چیزی حقایق فرمان باین خانہ‌زاد اطلاع نیست کہ موافق حکم بعمل آرم چنانچہ هدایت الله مذکور بردریا کشنا پنجاه پنج کروه این طرف حیدرآباد نشستہ معلوم نیست کہ از تغافلی خود و یا دیگرکس نشستہ است فرمودند کہ اگر او میدانست کہ پیشتر راه جاری نبود چرانشستہ مانده می باشی کہ این طرف می آید اگر کس از رفتن پیشتر

مانع می بود از آمدن این طرف مانع نبود باز بہ اژدہ بیگ گرزبردار کہ فرمان
بعزت خان حاجب حیدرآباد بردہ بود اعتراضی نمودہ کہ او فرمان از ہدایت‌اللہ
گرفتہ چرا بہ زمیندار مذکور نرساندہ بعرض رسانید کہ التماس میدارد بندہ
گفتہ بود حوالہ فدوی نماید مومی الیہ قبول نکردہ بعد ازآن حکم شد کہ
عزت خان حسب‌الحکم صادر نمود کہ ہمراہ ہدایت‌اللہ جمعیت والی حیدرآباد۔
را سزاولی کردہ روانہ نماید چنانچہ خان مذکور تاحال چیزی جواب معروض
نہ داشتہ اعتراضی نمودہ منصب آن جماعت کم کردہ حکم شد کہ حاجی
موصوم وکیل والی حیدرآباد را از غسلخانہ مانع نمایند و اژدہ بیگ کہ چہارصد
روپیہ از عزت خان خدمتانہ یافتہ پس بگیرند۔

इहतिमामखानानें अर्ज केला कीं, श्रीरंगपट्टणचा जमीनदार जगदेवराव यानें पिद्या व सय्यिद जैनुल्‌आबिदीन यांना पत्रें लिहिलीं कीं, माझ्या नावांचें फर्मान हिदायतुल्लाह याजबरोबर पाठविलें होतें; परंतु अजूनपर्यंत तें मला मिळालें नाहीं. तसेंच त्यांतील मजकुराबद्दल देखील कांहीं समजलें नाहीं. यामुळें त्याप्रमाणें वागणें झालें नाहीं. नंतर समजलें कीं, हिदायतुल्लाह हा कृष्णा नदीच्या इकडील बाजूस ५५ कोसांवर येऊन थांबला आहे. तो तिथें गाफिलपणानें थांबला आहे कीं, इतर कुणासाठीं थांबला आहे हें माहीत नाहीं. हुकूम झाला कीं, त्याला पुढील वाट बंद आहे हें माहीत होतें. त्याला पुढें जाण्याबद्दल कुणी मनाई केली असेल. पण परत येण्यासाठीं कुणी अडविलें नाहीं ना? नंतर हैद्राबादचा हेजीब इज्झतखान याचेसाठीं फर्मान नेणाऱ्या अझ्दहबेग गुर्जबर्दारावर इतराजी होऊन हुकूम झाला कीं, त्यानें हिदायतुल्लाहकडून फर्मान घेऊन जमीनदारास कां पोहोंचविलें नाहीं? त्यानें विनंति केली कीं, 'मी त्यास फर्मान मजजवळ देण्याबद्दल म्हटलें होतें. परंतु त्यानें तें मान्य केलें नाहीं'. नंतर हुकूम झाला कीं, इज्झतखानास हस्बुलहुकूम पाठवावा. त्यानें हैद्राबादेच्या राजाचे लोक हिदायतुल्लाहची सजावली करण्यासाठीं पाठवावें. परंतु खानानें अजूनपर्यंत कांहींच कळविलें नाहीं. म्हणून त्यावर इतराजी होऊन त्याची मनसब कमी केली. हुकूम झाला कीं, हैद्राबादेच्या राजाचा वकील हाजी मौसूम यास गुसलखान्यांत येण्याची मनाई करावी. तसेंच अझ्दहबेगानें इज्झतखानापासून ४०० रु. खिदमताना घेतला होता तो परत करावा.

## ४७०

| जु. २७ मोहरम २४ बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ محرم الحرام ۲۴ سنہ یوم الاربعہ سنہ ۲۷ | श. १६०५ पौष वद्य ११ इ. १६८४ जानेवारी २ |
| --- | --- | --- |

پتری راو ولد راگہو وکیل سنتا مفسد بمعرفت خان جہان بہادر ملازمت نموده پنج مہر نذر گذرانید عرضداشت موکل نیز بنظر گذرانید مہربانی نموده وکیل مذکور را [از*] التماس عمدة الملک پانصدی سیصد سوار نوسرافراز نموده خلعت انعام داده فرمودند کہ فرمان و قول پنجہ برائے سنتا مفسد طیار نموده حوالہ عمدة الملک نمودند۔

عمدة الملک خان جہان بہادر عرض نمود کہ اکثر مردم مرہٹہ وقت بے وقت نزد بنده از طرف نوکران مقہور می آیند بدون حکم حضور مردم کوتوال نمی گذرانند حکم شد کہ دستک بمہر خود می داده باشند۔

बंडखोर संताचा वकील पत्रीराव वलद राघो हा खान जहान बहादुरामार्फत चाकरीस आला. त्यानें पांच मोहरा नजर केल्या आणि आपला अर्ज बादशाहाच्या नजरेखालीं घातला. त्यावर बादशाहानें कृपा केली. उम्दतुल्मुल्काच्या विनंतीवरून त्या वकिलास ५०० जात, ३०० स्वारांचा नवीन मनसबदार करून खिलत दिली. हुकूम झाला कीं, 'संतासाठीं फर्मान व पंजाचा कौल तयार करून उम्दतुल्मुल्काच्या हवालीं करावे.

उम्दतुल्मुल्क खान जहान बहादुरानें अर्ज केला कीं, 'शत्रूच्या नोकराकडून अनेक मराठे वेळीं अवेळीं मजकडे येतात; बादशाही हुकुमाशिवाय कोतवालाचे लोक त्यांना सोडत नाहींत.' यावर हुकूम झाला कीं, 'त्यानें स्वतःच्या शिक्क्याचे दस्तक देत रहावें.'

## ४७१

| जु. २७ मोहरम २५ गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ محرم الحرام ۲۵ سنہ یوم الخمس سنہ ۲۷ | श. १६०५ पौष वद्य १२ इ. १६८४ जानेवारी ३ |
| --- | --- | --- |

ولی بیگ منصبدار عرضداشت شہاب الدین خان آورده بنظر گذرانیده معروض داشتہ بود کہ فدوی نواحی قلعہ راهیری قصبہ نظام پور ملک سنبہا مقہور تاخت باخت نموده دو هزار بندی و شش هزار مویشی بدست آورده

به پونا دهر رسیدیم بعد مطالعه فرمودند که رحمت یاد خطاب شهاب‌الدین خان بهادر سرافراز نموده مانکوجی وغیره همراهیان اضافه نموده حکم شد که ده خلعت علحده نمایند۔

حسب الحکم بمهر لطف‌الله خان بنام سر بلند خان صادر نموده مضمون آنکه بمعه فوج از پیدگانو نزد شهاب‌الدین خان بهادر برود هرگاه خان مذکور برائے تاخت ملک غنیم برود از آن جا خبردار باشد۔

دلیر خان را از طلب حضور موقوف نموده حکم شد در پید گانو باشد آنچه مطالب داشته باشد نوشته حوالهٔ پسرش نمایند که بحضور آمده بعرض رسانند۔

वलीबेग मनसबदारानें शिहाबुदीनखानाचा अर्ज आणून तो बादशाहाचे नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, 'मी संभाच्या मुलखांतील किल्ले, राहेरीच्या भोंवतालचा प्रदेश व कसबे निजामपूर लुटलें. दोन हजार लोक व सहा हजार जनावरें हातीं आलीं. नंतर पुरंधर येथें पोहोंचलों.' अर्ज पाहिल्यावर हुकूम झाला कीं, शिहाबुदीनखानास 'रहमत याद' (यार?) असा किताब दिला आहे. माणकोजी वगैरे बरोबरीच्या लोकांना वाढ देऊन त्यांसाठीं दहा खिलती वेगळ्या ठेवाव्या.'

लुत्फुल्लाहखानाच्या शिक्क्याचा हस्बुलहुकूम सरबुलंदखानाच्या नांवें सादर झाला तो असा : पेडगांवाहून फौजेसह शिहाबुदीनखानाकडे जावें. खान गनिमाच्या मुलखांत लूटमार करण्यासाठीं जाईल तेव्हां त्यानें तेथें सावध असावें. दिलेरखानास हुजूर बोलाविल्याचें स्थगित करून हुकूम झाला कीं, त्यानें पेडगांवांतच रहावें. त्याच्या मागण्या असतील त्या त्यानें लिहून आपल्या मुलाबरोबर द्याव्या. त्यानें हुजूर येऊन अर्ज करावा.

## ४७२

| | | |
|---|---|---|
| जु. २७ मोहरम २६ शुक्र. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه محرم الحرام ۲۶ سنه<br>یوم الجمعه سنه ۲۷ | श. १६०५ पौष वद्य १३<br>इ. १६८४ जानेवारी ४ |

بموجب نوشته خان جهان بهادر بعرض رسید که فدوی معه فوج به اوسه رسیده بودم مردم هرکارها خبر آوردند که جمعیت غنیم بطرف اود گیر آمده می خواهد که فساد نمایند بنابر مظفرخان [پسر*] خانه زادرا [برائے*]

تنبیہ مقهوران بہ آن طرف رخصت نموده از اقبال حضرت تنبیہ خواهد کرد۔

بابا جی و دتا جی - اسپان     مانکوجی تہانہ دار شکارپور فیل

खानजहान बहादुरानें लिहिलें तें असें : 'मी फौजेसह औशास पोहोंचलों होतों. हरकाऱ्यांनीं बातमी आणली कीं, शत्रू उद्गीरला आला आहे आणि त्रास देण्याचा त्याचा विचार आहे. म्हणून शत्रूला तंबी देण्यासाठीं माझा मुलगा मुजफ्फरखान यास मी तिकडे पाठविलें. बादशाही सुदैवाबाने तो तंबी देईल.'

बाबाजी व दत्ताजी–घोडे     शिक्रापूरचा ठाणेदार माणकोजी–हत्ती

४७३

| | | |
|---|---|---|
| जु. २७ मोहरम २८<br>रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه محرم الحرام ۲۸ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۷ | श. १६०५ पौष वद्य ३०<br>इ. १६८४ जानेवारी ६ |

حکم شد فیل قیمت نہ هزار روپیہ بابت فتح مردم غنیم بہ نصرت خان ولد خان جهان بهادر علحده نمایند۔

بعرض رسید کہ هری‌سنگهہ تعینات گلشن آباد صد پنجاهی ذات سی سوار بود فراری شد۔

हुकूम झाला कीं, नुसरतखान वलद खानजहान बहादुर यानें शत्रूवर विजय मिळविल्याबद्दल नऊ हजार रुपये किंमतीचा हत्ती त्याजसाठीं वेगळा ठेवावा.

अर्ज आला कीं, गुलशनाबादेवर नेमलेला हरिसिंग हा १५० जात, ३० स्वार असा मनसबदार होता. तो पळून गेला.

४७४

| | | |
|---|---|---|
| जु. २७ मोहरम २९<br>सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه محرم الحرام ۲۹ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۷ | श. १६०५ माघ शुद्ध १<br>इ. १६८४ जानेवारी ७ |

الهداد ولد حیدر بیجاپوری را حسب التجویز محمد اعظم شاه تهانہ داری دندو [ر]ی از تغیر جان راو مقرر نموده پانصدی ذات دو صد سوار بود صدی دو صد سوار اضافہ فرمودند۔

عرضہ داشت فخرالدین تهانہ دار نولاکهہ عمره آمده بنظر گذشت معروض داشتہ

بود کہ جمعیت غنیم نواحی لوہ گدہ آمدہ بود بنابران فدوی سواری نمودہ مقابلہ کردہ از اقبال حضرت بیسیارکس را بقتل رسانیدہ شکست دادہ اسپان مادیہ وغیرہ سلاح بدست آوردہ حکم شد کہ مجرای شد

मुहम्मद अअजमशाहाच्या तजविजीनें इलहदाद वलद हैदर विजापुरी यास जानरावाच्या बदलीमुळे दिंडोरीच्या ठाणेदारीवर नेमून त्याच्या ५०० जात व २०० स्वार अशा मनसबींत २०० स्वारांच्या वाढीचा हुकूम दिला.

नवलाख उमऱ्याचा ठाणेदार फखुद्दीन याचा अर्ज आला तो बादशाहाचे नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होते कीं, ‘शत्रूची जमेत लोहगडच्या आसपास आली होती. म्हणून मी स्वारी करून तिजशीं सामना दिला. बादशाही सुदैवानें अनेकांना मारून तिचा पराजय केला. घोडे, घोड्या, हत्यारें हातीं आलीं.’ हुकूम झाला कीं, हें मान्य आहे.

४७५

| | | |
|---|---|---|
| जु. २७ मोहरम ३० मंगळ. | سیاہہ اخبارات دربار معلے<br>ماہ محرم الحرام ۳۰ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۷ | श. १६०५ माघ शुद्ध २<br>इ. १६८४ जानेवारी ८ |

از واقعہ اکبرآباد بعرض رسید کہ راجہ دھرم پال زمیندار کزولی عمل پرگنہ هندون سی صدی ذات سی صد سوار مدت است طلب حضور شد روانہ نمی شود و سربفساد برداشتہ دیہات پرگنہ سہولی تاراج نمودہ و جاگیر اکثر منصبداران را متصرف شدہ محصول چہارم حصہ بانہا نمی رسد باشرف خان فرمودند کہ بہ مہتشم خان ناظم آن جا بنویسد کہ اورا تسلہ نمودہ بحضور بفرستند ۔

از نوشتہ غازی الدین خان بہادر بعرض رسید کہ سبہان جی و غیرہ نوکر سنبہا مقہور بہ قول نامہ بندہ آمدہ بے فکر ملاق شد بنابر مشارالیہ را هزاری ذات پانصد سوار و دیوجی را پانصدی ذات دو صد سوار تجویز نمودہ حکم شد کہ بحضور بفرستند حسن بیگ و غیرہ دو نفر احدی عرضداشت مظفرخان پسر خان جہان بہادر آوردہ بنظر گذرانیدہ معروض داشتہ بود کہ فدوی از نواحی صوبہ برار آمدہ خبر یافت کہ جمعیت غنیم سی اورد اسپ قمہ چی دویدہ بہ سارنگ پور رسیدہ مقابلہ کردہ هفصد کس را بقتل رسانیدہ تعاقب نمودہ و هنگام شب بر بہیر مقہور افتادہ متاع نقد و جنس و اسپ مادیہ و غیرہ اسلحہ

بدست آورده قریب سیصد منصبدار بادشاهی بکارآمده از اقبال حضرت فتح شد بعد مطالعه به سید اوغلان فرمودند که نقل عرضداشت گرفته اصل را حواله خدمت خان نماید بعد مطالعه حکم شد که خلعت خاصه مجرای جهته مظفرخان علحده نمایند لطف الله خان عرض نمود که حسب الحکم به روح الله خان صادر شده بود چنانچه خان مذکور موافق حکم رسیده جواب الخط معروض داشته۔

محمد خلیل و قراول خان را چیزی ارشاد نموده بخدمت باد شاهزاده جیو عرض نموده از گلشن آباد به تهانه اکوله سونیر شده بحضور بیاید عرضه داشت شاه عالم جیو بمعه کاید طلا و تلوه نقره بابت فتح سانپگانو بداکب چوکی آمده بنظر گذشت۔

अकबराबादेच्या घटनांवरून समजलें कीं, परगणे हिंदोनमधील किरोलीचा जमीनदार राजा धर्मपाल, ३०० जात व ३०० स्वार असा मनसबदार आहे. त्यास बऱ्याच काळापूर्वीं हुजूर बोलाविलें असतां तो जात नाहीं. त्यानें बंड करून परगणे महोली येथील खेडीं उध्वस्त केलीं आहेत. तसेंच बहुतेक जागीरदारांच्या मनसबी स्वतःच्या अमलाखालीं आणल्यामुळें त्यांना १/४ देखील वसूल मिळत नाही. तेव्हां अश्रफखानास हुकूम झाला कीं, 'तेथील नाजिम मुहतशिमखान यास लिहावें कीं, धर्मपालास दिलासा देऊन हुजूर पाठवावें'.

गाझीउद्दीनखानानें लिहिलें कीं, 'माझ्या कौलनाम्याप्रमाणें सुभानजी वगैरे संभाचे नोकर निर्धास्तपणें येऊन भेटत आहेत. म्हणून उपर्युक्तास १००० जात ५०० स्वार व देवाजीस ५०० जात २०० स्वार अशा मनसबीची तजवीज केली आहे.' हुकूम झाला कीं, त्यांना हुजूर पाठवावें.

खानजहान बहादुराचा मुलगा मुजफ्फरखान याचा अर्ज हसनबेग वगैरे दोन इसमांनीं आणून तो बादशाहाचे नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, 'मी वऱ्हाडच्या आसपासच्या भागांतून आलों, तेव्हां बातमी मिळाली कीं, शत्रूचे लोक जात आहेत. म्हणून मी स्वार होऊन सारंगपुरास पोहोंचलों. तेथें शत्रूशीं सामना करून ७० लोकांना मारलें. नंतर पाठलाग करून रात्रीं शत्रूच्या बुणग्यांवर हल्ला केला. रोख रक्कम, सामान-सुमान, घोडे-घोड्या, हत्यारें हातीं आलीं. लढाईंत जवळ जवळ ३०० बादशाही मनसबदार कामास आले. बादशाही सुदैवानें विजय प्राप्त झाला. अर्ज पाहिल्यानंतर सय्यिद ओघलानास हुकूम झाला कीं, 'अर्जाची नक्कल घेऊन मूळ अर्ज

खिदमतखानापाशीं द्यावा. मुजफ्फरखानाच्या सन्मानार्थ खाशी खिलत वेगळी ठेवावी.' लुत्फुल्लाहखानानें अर्ज केला कीं, 'रूहुल्लाहखानास हस्बुलहुकूम सादर झाला होता. हुकुमाप्रमाणें तो पोहोंचला. त्यानें उत्तर पाठविलें आहे.

मुहम्मद खलील व करावलखान यांना कांहीं सांगून अअजमशाहाकडे पाठविलें. हुकूम झाला कीं, 'शाहझाद्यास भेटून गुलशनाबादेहून अकोलें-शिवनेर या मार्गे हुजूर यावें.'

सांपगांव (संपगांव) जिंकल्याबद्दल सोन्याची किल्ली, चांदीची ढाल आणि शाहआलम याचा अर्ज डाककौकीनें आला तो नजरेखालीं घातला.

४७६

| | | |
|---|---|---|
| जु० २७ सफर १<br>बुध. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه صفر غره سنه<br>یوم الاربعه سنه ۲۷ | श. १६०६ माघ शुद्ध ३<br>इ. १६८४ जानेवारी ९ |

طاس بیگ و عبدالله بیگ گرز بردار عرضداشت مظفرخان ولد خان جهان بهادر آورده بنظر گذرانیده که فدوی از سون گانو تعاقب غنیم نموده بیست کرده به یلغر موضع پور رسیده مقابله کرده جنگ واقعه شده از اقبال حضرت بسیاری بقتل رسانیده جادون و کاکوجی سرداران مقهوررا زخمي نموده اسپان ماده وغیره سلاح بدست آورده پنج کروه تعاقب کرده همان جا دیره نموده بعد مطالعه تعریف خان مذکور نموده خلعت خاصه و فیل قیمت نه هزار روپیه علحده نموده حکم شد فرمان مجرای قلمی نمایند۔

مهداجی ولد بجاجی تعینات فوج شاه عالم جیو چهار هزاری ذات سه هزار پانصد سوار بود چون شکوه او بعرض رسید پانصد سوار کم فرمودند۔

از واقعه فوج شاه عالم جیو بعرض رسید که بادشاهزاده جیو قلعه سانپ گده در تعریف بادشاهی آورده قلعه داری آن جا عبدالفیاض خان مقرر کرده منظور فرمودند۔

از واقعه فوج اعظم شاه بعرض رسید که تیماجي سردار سنبها مقهور با جمعیت در ملک بادشاهی می آید چنانچه بادشاهزاده جیو بکشور سنگهه هاده را برای تنبیه مقهوران تعین نموده مشارالیه بیلغر رفته مقابله نموده بسیاری بقتل رسانیده سردار مقهور را دستگیر نموده آورده و بادشاهزاده جیو خلعت مرحمت نموده فرمودند که مراتب مشارالیه بعرض رسانده و هرگاه بادشاهزاده۔

جیو تردد معروض خواهند داشت پسران مومی الیہ را نیز رعایت نموده خواهد شد ۔

तासबेग व अबदुल्लाहबेग या गुर्जबर्दारांनीं मुजफ्फरखान वलद खानजहान बहादूर याचा अर्ज आणून नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, 'मी सोनगांवाहून शत्रूचा पाठलाग करीत एकटाच २० कोसावरील पूर येथें पोहोंचलों. तेथें लढाई झाली. बादशाही सुदैवानें मी अनेकांना मारलें. शत्रूकडील जाधव व काकोजी यांना जखमी केलें. घोडे, घोड्या, हत्यारें वगैरे हातीं आलीं. नंतर पांच कोसपर्यंत पाठलाग करून तेथेंच डेरे उभे केले. अर्ज पाहिल्यावर बादशाहानें खानाची स्तुती करून त्यासाठीं खासा खिलत व नऊ हजार रुपये किंमतीचा हत्ती वेगळा ठेवला. हुकूम झाला कीं, 'त्याचें म्हणणें मान्य झाल्याबद्दल फर्मान पाठवावें.'

शाहआलमच्या फौजेंत नेमलेला महदाजी वलद बजाजी हा ४००० जात व ३५०० स्वार असा मनसबदार होता. त्याविरुध्द तक्रारीचा अर्ज आला; म्हणून त्याचे ५०० स्वार कमी केल्याचा हुकूम झाला.

शाहआलमच्या फौजेंतील घटनांवरून समजलें तें असें : शाहझाद्यानें सांपगड (संपगाव?) बादशाही अमलाखालीं आणून अब्दुलफय्याजखानास तेथील किल्लेदार म्हणून नेमलें. तें मान्य असल्याचा हुकूम झाला.

अअजमशाहाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें तें असें : संभाचा सरदार तिमाजी हा आपल्या लोकांसह बादशाही मुलखांत येत असतो. म्हणून शाहझाद्यानें किशोरसिंग हाडा यास शत्रूला तंबी देण्यासाठीं नेमिलें. त्यानें एकट्यानें जाऊन सामना दिला. अनेकांना मारलें व शत्रूच्या सरदारास कैद करून आणलें. तेव्हां शाहझाद्यानें त्यावर खिलतीची कृपा केली. हुकूम झाला कीं 'उपर्युक्ताच्या मानमरातिबाबद्दल अर्ज करावा. शाहझादा त्यानें केलेल्या श्रमाबद्दल अर्ज करील तेव्हां त्याच्या मुलांवर देखील कृपा केली जाईल.

## ४७७

| | | |
|---|---|---|
| जु. २७ सफर २ गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۲ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۷ | श. १६०५ माघ शुद्ध ४<br>इ. १६८४ जानेवारी १० |

هدایت الله مشوف معزول مورتک...... فرمان و خلعت بزمیندار سری رنگ پٹن برده بود بسبب مسدود راه برگشته آورده نه روپیه نذر گذرانید ۔

حفظ الله خویش دلیرخان عرضداشت خان مذکور و اسپان ماده وغیره تاراج غنیم از پیدگانو آورده ملازمت نموده نه روپیه نذر گذرانیده حکم شد که فردا سری سواری بنظر بگذرانید۔

محمد خلیل ولد داراب خان را یک راس اسپ قیمت هشتاد مهر به انعام داده و قراول خان را نزد اعظم شاه رخصت نموده فرمودند چیزی که ارشاد شده بخدمت بادشاهزاده جیو بعرض رسانده از گلشن آباد به تهانه اکوله و سونیر شده بیاید۔

मोरटकचा काढून टाकलेला मुश्रीफ....हिदायतुल्लाह यानें श्रीरंगपट्टणच्या जमीनदारासाठीं फर्मान व खिलत नेली होती. परंतु वाटा बंद असल्यामुळें त्यानें परत येऊन ९ रुपये भेट दिली. दिलेरखानाचा नातेवाईक हिफ्जुल्लाह हा पेडगांवाहून खानाचा अर्ज, तसेंच शत्रूकडून लुटून आणलेले घोडे, घोड्या वगैरे आणून भेटला, व ९ रुपये नजर दिली. हुकूम झाला कीं, उद्या फेरफटक्याच्या वेळेस नजरेखालीं घालावें.

मुहम्मद खलील वलद दाराबखान यास ८० मोहरा किंमतीचा एक घोडा बक्षीस दिला व करावलखानास अअजमशाहाकडे पाठविलें. त्यास हुकूम झाला कीं, 'तुला सांगितलें आहे तें शाहाझाद्यास कळवून गुलशनाबादेहून आकोलें-शिवनेर यामार्गें परत यावें.'

### ४७८

| जु. २७ सफर ४ शनि. | سیاهه اخبارات دربار معلی ماه صفر ۲۸ سنه یوم الثلث سنه ۲۷ | श. १६०५ माघ शुद्ध ६. इ. १६८४ जानेवारी १२. |
|---|---|---|

عبدالله بیگ منصب دار عرضه داشت روح الله خان آورده بنظر گذرانیده معروض داشته بود که جان راو و جادوجی وغیره سه ۳ نابسرداران سنبها مقهور با جمعیت هزده سوار در نواحی بیجاپور آمده بود بنا بران فدوی از این استماع از افضل پور که از انکل کوت ده کروه این طرف است معه فوج قاهره سواری نموده بموضع ایندیه مقابله شد از اقبال حضرت هزار کس بقتل رسانیده و بسیاری زخمی ساخته شکست داده و اکثر بندهای بادشاهی بکار آمده و جمعیت بیجاپوری که قریب سه هزار سوار کومک آنها آمده بود شکست داده بعد معروض فرمودند که مجرای شد پنجاه اسپ کومکی برائے همراهیان خان مذکور علحده

نمایند و مراتب کامیاب خان و دلیر و اسمعیل خان وغیره بعرض رسانند هرگاه روح الله خان ملازمت خواهد کرد همه را اضافه سرافراز خواهم فرمود و عبدالله بیگ را خلعت دادند۔

از زبانی هرکاره های بعرض رسید که غازی الدین خان بهادر از پونا دهر سه چهار روز را آذوقه گرفته بتاریخ غره شهرحال سربلند خان را در آن جا گذاشته اسپ قمچی دویده است۔

अब्दुल्लाहबेग मनसबदारानें रूहुल्लाहखानाचा अर्ज आणून तो बादशाहाचे नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, 'संभाचे जानराव, जाधवजी वगैरे तीन सरदार १८ [हजार*] स्वारांसह विजापूरच्या आसपास आले होते. तेव्हां मी फौजेसह अक्कलकोटाच्या अलीकडे दहा कोसांवर असलेल्या अफजलपूर या गांवाहून स्वारी केली. इंदियह (इंडी?) येथें सामना झाला. बादशाही सुदैवानें एक हजार लोकांना मारलें व अनेकांना जखमी करून त्यांचा पराजय केला. बरेच बादशाही लोक कामास आले. विजापूरकरांचे तीन हजार स्वार त्यांच्या मदतीसाठीं आले असतां त्यांचाही पराजय केला.' यावर हुकूम झाला कीं, 'हें मान्य आहे. खानाबरोबर असलेल्या लोकांसाठीं पन्नास घोडे वेगळे ठेवावे. तसेंच कामयाबखान, दिलेर व इस्माइलखान यांच्या मानमरातिबाबद्दल अर्ज करावा. रूहुल्लाहखान भेटीस येईल तेव्हां या सर्वांना बाढ देऊन त्यांचें उर्जित केलें जाईल.' अब्दुल्लाहबेग यास खिलत दिली.

हरकाऱ्यांकडून तोंडीं समजलें कीं, गाझीउद्दीनखान ३-४ दिवसांपुरतें धान्य घेऊन पुरंदराहून चालू महिन्याच्या एक तारखेस स्वार होऊन गेला; सरबुलंदखानास पाठीमागें ठेविलें आहे.

## ४७९

| जु. २७ सफर ५<br>रवि. | سیاهه اخبارات دربار معلے<br>بماه صفر ۵ سنه<br>یوم الاحد سنه ۲۷ | श. १६०६ माघ शुद्ध ६<br>इ. १६८४ जानेवारी १३ |
|---|---|---|

حسب الحکم بنام دلیر خان بداک چوکی صادر نموده که پانصد سوار از همراهی خود مقرر نماید که هفت هشت کروه نواحی پیدگانو طلایه میکرده باشند درین ضمن بهره مند خان عرض نمود که همراه خان مذکور جمعیت کم است فرمودند که فوج خان مذکور پنج هزار سوار کسی زیاده مقرر کرده

عرض نمود کہ تا حال نہ رسید فرمودند کہ مردم یساولان تعین نمایند کہ سزاولی کردہ رسانیدہ بیاید۔

حکم شد کہ گرد دیرہ پلنگتوش خان بہادر احاطہ کردہ بدہند۔

اشرف خان عرض نمود کہ محمد شریف خویش ملا احمد تہانہ دار پاتودہ خطی نوشتہ کہ دو سوار و یک پیادہ غنیم برای چوتھہ درین ضلع آمدہ بود فدوی دستگیر نمودہ حکم شد کہ نزد اعظم شاہ بفرستند۔

दिलेरखानाच्या नांवें हस्बुलहुकूम सादर झाला कीं, 'पेडगांवच्या सभोंवती सातआठ कोसपर्यंत गस्त घालण्यासाठीं तुझ्याजवळचे ५०० स्वार नेमावे.' यावर बहरहमंदखानानें अर्ज केला कीं, 'खानाबरोबरच्या लोकांची संख्या कमी आहे.' तेव्हां हुकूम झाला कीं, 'खानापाशीं ५००० पेक्षा अधिक स्वार नेमले आहेत.' यावर त्यानें अर्ज केला कीं, 'ते अजून पोहोंचले नाहींत. तेव्हां हुकूम झाला कीं, 'यसावलांना नेमून व त्यांनीं त्यांची सजावली करुन पोहोंचवून परत यावें.'

पिलंगतोशखानाच्या डेऱ्यास वेढा देण्याचा हुकूम झाला.

अश्रफखानानें अर्ज केला तो असा : पाटोद्याचा ठाणेदार मुल्ला अहमद याचा नातेवाईक मुहम्मद शरीफ यानें पत्र लिहिलें आहे कीं, 'शत्रूचे २ स्वार व एक पदाति या जिल्ह्यामध्यें चौथ वसूल करण्यासाठीं आले होते. मी त्यांना कैद केलें आहे.' हुकूम झाला कीं, त्यांना अअजमशाहाकडे पाठवावें.

४८०

| जु. २७ जवर ७ मंगळ. | سیاہہ اخبارات دربار معلے<br>ماہ جمادی الثانی ۲ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۷ | श. १६०६ ज्येष्ठ शुद्ध ९<br>इ. १६८४ मे १३ |
|---|---|---|

شیر محمد کہوہانی را تہانہ داری برہمن وادہ از تغیر ابوالحسن امیر خانی مقرر نمودہ حکم شد مرحمت خان با ہزار سوار رفتہ بند بست نمودہ بیاید بعرض رسید کہ مردم غنیم جانب تالنیر آمدہ بنابر خواجہ فتوح شتافتہ است حکم شد کہ یک سزاول رفتہ یسونت راو را از سونیر بفوج اعظم شاہ رسانیدہ بیاید چہار ہزاری ذات چہار ہزار سوار۔

अबुलहसन अमीरखानाच्या बदलीमुळें शेर मुहम्मद खोहानी यास ब्राह्मणवाड्याच्या ठाणेदारीवर नेमलें. हुकूम झाला कीं, मरहमतखानानें एक

हजार स्वारांसह जाऊन बंदोबस्त करून यावें. अर्ज आला कीं, शत्रूचे लोक थाळनेरकडे आले आहेत. ख्वाजा फुतूह तिकडे गेला आहे. हुकूम झाला कीं, 'एका सजावलानें जाऊन यशवंतरावास शिवनेरीहून अअजमशाहाच्या फौजेंत पोहोंचवून यावें.'

४८१

| जु. २७ जखर ८<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ جمادی‌الثانی ۸ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۷ | श. १६०६ ज्येष्ठ शुद्ध १०<br>इ. १६८४ मे १४ |
|---|---|---|

شیر محمد کہزهانی را از تہانہ داری بہامن واره موقوف نموده بہ عبدالنبی لدو هادیداد خان مرحوم مقرر نموده حکم شد کہ پانصد سوار را فوج همراه تعین نمایند و اعتقاد خان پسر اسد خان با هزار سوار گرفتہ گدهی آن جا احداث نموده بیاید میر قلیچ گرزبردار فرمان و خلعت بہ خان جهان بہادر درباب فتح قلعہ سانگولہ رسانیده عرضداشت آورده بنظر گذرانیده بعرض رسانید کہ یک شمشیر و پانصد روپیہ خدمتانہ یافتہ معاف فرمودند۔

از التماس وکیل اعظم شاه بعرض رسید کہ بادشاهزاده نشان نوشتہ کہ یک صد کہرنال مرحمت شود حکم شد کہ بہ عبدالقادر قلعہ‌دار اورنگ‌آباد بنویسد کہ بیست نہ کہرنال از قلعہ مذکور و بیست شش از قلعہ دولت‌آباد نزد بادشاهزاده جیو بفرستند۔

शेर मुहम्मद खोहानी यास ब्राह्मणवाड्याच्या ठाणेदारीवर नेमावयाचें स्थगित केलें आणि त्याच्या ऐवजीं मरहूम हादीदादखानाचा मुलगा अब्दुन्नबी यास नेमलें. हुकूम झाला कीं, 'त्याजबरोबर ५०० स्वार नेमावे व असदखानाचा मुलगा अअतकादखान यानें १००० स्वारांसह जाऊन तेथील गढी दुरुस्त करून यावें.' सांगोल्याचा किल्ला जिंकल्याबद्दल मीर कुलीच गुर्जबर्दारानें खानजहान बहादुरास खिलत व फर्मान पोहोंचवून त्याचा अर्ज आणून तो बादशाहाचे नजरेखालीं घातला. त्यानें अर्ज केला कीं, 'एक तलवार व ५०० रुपये खिदमताना मला मिळाला आहे.' तो माफ केल्याचें फर्माविलें.

अअजमशाहाच्या वकिलाच्या विनंतीवरून अर्ज आला तो असा : शाहझाद्यानें पत्र लिहिलें आहे कीं, शंभर गरनाळांची दुरुस्ती करणें आवश्यक आहे. यावर हुकूम झाला तो असा : औरंगाबादेचा किल्लेदार अब्दुल कादिर

यास लिहावें कीं, 'तुझ्या किल्ल्यांतून २९ गरनाळा व दौलताबादेच्या किल्ल्यांतून २६ गरनाळा शाहाझाद्याकडे पाठवाव्या.

### ४८२

| | | |
|---|---|---|
| जु. २७ जखर ९ | سیاهہ اخبارات دربار معلے | श. १६०६ ज्येष्ठ शुद्ध ११ |
| गुरु. | ماہ جمادی‌الثانی ۹ سنہ | इ. १६८४ मे १५ |
| | یوم الخمس سنہ ۲۷ | |

اعتقاد خان را از فرستادن بہامن واره موقوف نموده حکم شد کہ مرحمت خان معہ بیلداران وغیره جہتہ احداث گدهی برود۔

شیخ محمد قریشی بابت سنبها مقهور را بسبب احوال پریشانی هزار روپیہ مساعدت دادند۔

حکم شد کہ چهار توپ از قلعہ دولت‌آباد و دو توپ از پرینده و دو هزار گولہ از ایندور تو طیار (؟) حکم شد بود موقوف شناسند۔

इआतिकादखानास ब्राह्मणवाड्यास पाठविण्याचें स्थगित केलें. हुकूम झाला कीं, मरहमतखानानें गवंड्याना बरोबर नेऊन गढीची दुरुस्ती करावी. संभाकडील शेख मुहम्मद कुरैशी यास, त्याची परिस्थिती बिकट असल्यामुळें, १००० रुपये मदत म्हणून दिले. दौलताबादेच्या किल्ल्यांत ४ तोफा, परिंड्याच्या किल्ल्यांत २ तोफा व इंदूर येथें १००० गोळे तयार ठेवावे असा हुकूम झाला होता तो स्थगित केल्याचें समजावें.

### ४८३

| | | |
|---|---|---|
| जु. २७ रज्जब ६ | سیاهہ اخبارات دربار معلے | श. १६०६ आषाढ शुद्ध ६ |
| मंगळ. | ماہ رجب المرجب ٦ سنہ | इ. १६८४ जून १० |
| | یوم الثلث سنہ ۲۷ | |

محمد خلیل تہانہ دار سونیر آمده ملازمت نموده دو مہر نظر گذرانید بہ بہره مند خان فرمودند کہ آنچہ مطلب مشارالیہ باشد بعرض رساند۔

शिवनेरचा ठाणेदार मुहम्मद खलील येथें आला. त्यानें भेट घेऊन २ मोहरा नजर केल्या. बहरामंदखानास हुकूम झाला कीं, त्याच्या मागणीबद्दल अर्ज करावा.

### ४८४

| | | |
|---|---|---|
| जु. २७ रज्जब १३ | سیاهہ اخبارات دربار معلے | श. १६०६ आषाढ शुद्ध १५ |
| मंगळ. | ماہ رجب المرجب ۱۳ سنہ | इ. १६८४ जून १७ |
| | یوم الثلث سنہ ۲۷ | |

از واقعہ فوج شاہ عالم بہادر بعرض رسید کہ شاہزادہ از دریای بھیمرہ عبور کردہ فوج جرانگار و برانگار مقابلہ شدہ و مردم بہیر و پیش خانہ عقب ماندہ چنانچہ پنج ہزار سوار جمعیت غنیم از بیست پنج کروہ شتافتہ بر مردم بہیر افتادہ غارت گرفتہ بنابران شاہزادہ نیز نقارہ نمودہ برگشت مقہوران گریختہ رفتند چالو نفر عرض بیگی شاہزادہ یک زخم تیر رسید۔

शाहआलमच्या फौजेंतील घटनांवरून समजलें कीं, शाहझाद्यानें भीमा नदी पार केली. त्याच्या उजव्या व डाव्या बाजूच्या फौजांनीं सामना दिला. त्याचे बुणगे व पेशखाना हे पाठीमागें राहिले होते. शत्रूचे २५ हजार स्वार २५ कोस धावून जावून बुणग्यांवर घसरले व त्यांना लुटलें. म्हणून शाहझाद्यानें नगारे वाजवून फौजेस परतण्यास सांगितलें. परंतु शत्रूचे लोक पळून गेले. अर्जबेगींपैकीं चालू यास बाणाची जखम झाली.

४८५

| | | |
|---|---|---|
| जु. २७ रज्जब १५<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ رجب المرجب ۱۵ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۷ | श. १६०४ आषाढ वद्य २<br>इ. १६८६ जून १९ |

دیروز عرضداشت شاہ عالم بہادر بداک چوکی آمدہ بنظر گذشت معروض داشتہ کہ بتاریخ ۱۲ ............ بندہ رسیدم بتاریخ ۱۳ روز شنبہ حضور برسم۔

काल डाकचौकीनें शाहआलम याचा अर्ज आला. तो नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें कीं,...मी १२ तारखेस पोहोंचलों. शनिवारीं १३ तारखेस हुजूर येईन.

४८६

| | | |
|---|---|---|
| जु. २७ रज्जब १७<br>शनि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ رجب المرجب ۱۷ سنہ<br>یوم السبت سنہ ۲۷ | श. १६०६ आषाढ वद्य ४<br>इ. १६८६ जून २१ |

از نوشتہ عبدالعزیز خان قلعدار جونیر بعرض رسید کہ پانصدی ذات دو صد سوار بندہ بی تقصیر کم شدہ بحال شود منظور شد۔

जुन्नरचा किल्लेदार अब्दुल अझीझ यानें लिहिलें कीं, 'माझे ५०० जात व २०० स्वार कमी केले आहेत; मी निर्दोषी आहे; ते बहाल व्हावे. हुकूम झाला कीं, तें मंजूर आहे.

४८७

जु. २७ रज्जब १८<br>रवि.

سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه رجب المرجب ۱۸ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۷

श. १६०६ आषाढ वद्य ५<br>इ. १६८४ जून २२

بہ سرکارخان قراول فرمودند کہ دیرہ شاہ عالم بہادر متصل قلعہ احمدانگر مقرر شد راو تحقیق نماید کہ شاہزادہ محمد کام بخش وغیرہ ملازمت شاہ عالم بہادر بردند و شاہزادہ نیز ہمان خواہد نمود۔

برعداندازخان فرمودند کہ ازکرہ نمونہ دریار بہمرہ چہ مسافت دارد عرض نمودہ کہ دو کروہ پا و کم جریبی است شنیدہ خاموش ماندند۔

सरकारखान करावल यास हुकूम झाला कीं, 'शाहआलमचा तंबू अहमदनगरच्या किल्ल्याजवळ आहे. कामबक्ष वगैरे शाहआलमच्या भेटीस गेले किंवा नाहीं त्याबद्दल रावानें (खानानें) चौकशी करावी. शाहझाद्यानें सुध्दा तसेंच करावें.'

रअदअंदाझखानास हुकूम झाला कीं, 'करडे निमोण्यापासून भीमा नदी किती अंतरावर आहे?' त्यानें अर्ज केला कीं, 'मोजणीप्रमाणें सवादोन कोसांस थोडी कमी आहे.' ऐकून बादशाह गप्प बसला.

४८८

जु. २७ शाबान २४<br>सोम.

سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه شعبان ۲۴ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۷

श. १६०६ अ. श्रावण वद्य ११<br>इ. १६८४ जुलै २८

بہرہ مند خان عرض نمود کہ یعقوب بے عبدالعزیز خانی برائے طلایہ رفتہ بود چنانچہ کہندوجی نوکر سنبہا مقہورزا بابیست و پنج سوار دستگیر نمودہ و [آن *] مقہور ظاہر می نماید کہ بندہ را حسب الحکم بمہر فضایل خان صادر شدہ بود بنابران امید بندگی بحضور آمدم حکم شد کہ او را نزد فضایل خان بفرستد خان مذکور تحقیق نمودہ بعرض رساند۔

बहरामंदखानानें अर्ज केला कीं, "अब्दुल अझीझ खानाबरोबर याकूब गस्त घालण्यासाठीं गेला होता. संभाचा नोकर खंडोजी यास पंचवीस स्वारांसह कैद केलें. तो सांगत आहे कीं, 'मी चाकरीच्या आशेनें आलों आहे. मला फजाइलखानाच्या शिक्क्याचा हस्बुलहुकूम मिळालेला आहे.' हुकूम झाला

कीं, ' त्यास फजाइलखानाकडे पाठवावें. खानानें चौकशी करून अर्ज करावा. '

४८९

| | | |
|---|---|---|
| जु. २७ शाबान २५<br>मंगळ | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماہ شعبان ۲۵ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۷ | श. १६०३ अ. श्रावण वद्य १२<br>इ. १६८४ जुलै २९ |

فرمان درباب فتح ازمردم مقہور و بارانی ازروئے عنایت برائے غازی‌الدین خان بہادر حوالہ خواجہ قاسم کہ عرضداشت آوردہ بود پنجاہی اضافہ فرمودند۔

از واقعہ پونار بہ عرض رسید کہ از چاندہ خبر رسیدہ کہ رام سنگہ زمیندار چاندہ قریب چہار پنج ہزار سوار جمعیت قوم افغان و مغلیہ پیش قرار نو نوکر نگاہ داشتہ ومیدارد و نظر برفساد است بہ روح‌اللہ خان فرمودند کہ بہ اعتقاد خان پسر اسد خان بنویسد کہ معہ فوج برائے تنبیہ زمیندار مذکور خود را بسرعت تمام رساند۔

از واقعہ سوبہ بعرض رسید کہ مردم بیوپاریان رسد غلہ درین جا آرند ظاہر می نمایند کہ بسبب برسات غلہ نمی رسد و سوای این مقصدیان سرکار والا سری صد پنج روپیہ محصول می شوند اگر معاف شنود افزونی غلہ گردد منظور نمودہ حکم گیر کہ مزاہم نشود۔

بہ اسد خان فرمودند کہ بکارطلب خان متصدی سورت بنویسد کہ یک صد نفر ضراب برائے سکہ نمودن نقرہ از آن جا بحضور بفرستد۔

गाझीउद्दीनखानानें शत्रूवर विजय मिळविला म्हणून त्याचेसाठीं फर्मान व कृपा म्हणून पावसापासून संरक्षण करणारा कोट ख्वाजा कासीम याजवळ दिला. त्यानें गाझीउद्दीनखानाचा अर्ज आणला होता. तो २०० जात असा मनसबदार होता. त्यांत ५० ची वाढ केल्याचा हुकूम झाला.

पवनारच्या घटनांवरून समजलें तें असें : चांद्याहून बातमी आली कीं, चांद्याचा जमीनदार रामसिंग यानें मुघल व अफगाण लोकांपैकीं जवळजवळ चारपांच हजार स्वार नवीन चाकर ठेवले असून त्याचा बंड करण्याचा विचार आहे. रूहुल्लाहखानास हुकूम झाला तो असा : 'असदखानाचा मुलगा इअतिकादखान यास लिहावें कीं, उपर्युक्त जमीनदारास तंबी देण्यांसाठीं ताबडतोब स्वत: जावें.

सुप्याच्या घटनांवरून समजलें कीं, व्यापारी लोक इकडे अन्नधान्य आणीत आहेत. तें सांगत आहेत कीं, 'पावसामुळें इकडे धान्य येत नाहीं व याशिवाय मुत्सद्दी लोक प्रत्येकाकडून शेकडा पाच रुपये वसूल करतात. ते माफ झाले, तर अन्नधान्याचा सांठा वाढेल.' तें मंजूर केलें व हुकूम झाला कीं, 'त्यांत अडथळा आणूं नये'

असदखानास हुकूम झाला कीं, 'सुरतेचा मुत्सद्दी कारतलबखान यास लिहावें कीं, चांदीचीं नाणीं पाडण्यासाठीं नाणीं पाडणारीं १०० माणसें तेथून हुजूरकडे पाठवावीं.'

४९०

| जु. २७ शाबान २७<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه شعبان ۲۷ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۷ | श. १६०६ अ. श्रावण वद्य १४<br>इ. १६८४ जुलै ३१ |
|---|---|---|

فضایل خان عرض نمود کہ بندہ موافق حکم بہاری وغیرہ قوم مہدی را در عدالت رجوع نمودہ بودند چنانچہ آنہا مسلمان شدند حکم شد کہ حوالہ اهتمام خان نمایند۔

اسد خان عرض نمود کہ بہرام برادر جعفر خان مرحوم بہ بندہ خطی نوشتہ کہ فدوی آزار سخت دارد امیدوار است کہ بہرہ مند خان خانہ زاد را برائے ملاقی شدن رخصت نمایند فرمودند کہ رفتن بہرہ مند خان معلوم است بنویسد کہ حقائق بیماری خود معروض دارد۔

फजाइलखानानें अर्ज केला कीं, 'मी हुकुमाप्रमाणें महदी जमातींतील बहारी वगैरे लोकांना न्यायालयांत रुजू केलें होतें; नंतर ते मुसलमान झाले.' हुकूम झाला कीं, त्यांना इहतिमामखानाकडे पाठवावें.

असदखानानें अर्ज केला तो असा : मरहूम जाफरखानाचा भाऊ बहराम यानें मला पत्र लिहिलें आहे कीं, मी अतिशय आजारी आहे. बहरामंदखानास मला भेटण्यासाठीं रजा द्याल अशी आशा आहे. हुकूम झाला कीं, 'बहरामंदखान जाणें माहीतच आहे. त्यास आपल्या आजाराबद्दल कळविण्यास लिहावें.'

४९१

| जु. २७ शाबान २९<br>शनि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه شعبان ۲۹ سنہ<br>یوم السبت سنہ ۲۷ | श. १६०६ श्रावण शुद्ध २<br>इ. १६८४ आगस्ट २ |
|---|---|---|

رودر سنگھ وغیرہ پسران راجہ دیبی سنگھ متوفی را تھانہ داری بارامتی مقرر شد سبل سنگھ ولد رنگناتھ سنگھ معزول تھانہ دار بارامتی سیصدی ذات سیصد سوار منجملہ یک صد سوار دواسپہ بود یک صد سوار دو اسپہ بشرطی کہ فرمودند پرشا نوکر سنبہا مقہور را بتجویز اعظم شاہ ہزار پانصدی ذات ہزار سوار نو سرا فراز فرمودند۔

स्वर्गवासी देवीसिंगाचे मुलगे रुद्रसिंग वगैरे यांस बारामतीच्या ठाणेदारी-वर नेमले. बारामतीचा काढून टाकलेला ठाणेदार सबलसिंग वलद रंगनाथसिंग हा ३०० जात व ३०० स्वार असा मनसबदार होता. पैकीं १०० स्वार दुघोडी सशर्त नेमले होते. ते कमी केल्याचा हुकूम झाला. संभाचा नोकर परशा यास अअजमशाहाच्या तजविजीनें १५०० जात, १००० स्वार असा नवीन मानकरी केल्याचा हुकूम झाला.

४९२

| | | |
|---|---|---|
| जु. २८ शव्वाल २४ गुरु. | سیاہ اخبارات دربار معلے ماہ شوال ۲۸ سنہ یوم الخمس سنہ ۲۷ | श. १६०६ भाद्रपद वद्य १० इ. १६८४ सप्टेंबर २४ |

شہاب الدین قلی را فوجداری مانک پور از تغیر عنایت اللہ پسر سیف خان مرحوم مقرر نمودہ شش صدی ذات یک صد ہشتاد سوار بود سیصد بیست سوار اضافہ و خلعت دادہ رخصت نمودہ و سید محمد راضی بمعہ اضافہ از خدمت مذکور موقوف فرمودند۔

بموجب التماس رعدانداز خان بعرض رسید کہ بدھرو جی نوکر سنبہا مقہور برقول نامہ فدوی بہ ارادہ بندگی آمدہ حکم شد کہ او را بحضور بطلبد تا مقرر شدن منصب یومیہ مشارالیہ نمودہ خواہد شد۔

کہندوجی وغیرہ نوکران سنبہا مقہور بمعرفت قاضی حیدر آمدہ نوسرافراز فرمودند مشارالیہ ہراند شنکراجی پادشاہ قلی بابت سنبہا مقہور را معاف فرمودند ہزاری ذات پانصد سوار۔

मरहूम सैफखानाचा मुलगा इनायतुल्लाह यास शिहाबुद्दीन कुलीच्या बदलीमुळें माणिकपूरच्या फौजदारीवर नेमलें. तो ६०० जात व १८० स्वार असा मनसबदार होता. त्यास ३२० स्वारांची वाढ फर्माविली व खिलत देऊन

पाठविलें. सय्यिद मुहम्मद राजी यास वाढीसुध्दा उपर्युक्त चाकरीवर पाठविण्याचें स्थगित केलें.

रअदअंदाझखानाच्या विनंतीवरून समजलें कीं, 'माझ्या कौलनाम्या-प्रमाणें संभाचा नोकर भद्रोजी हा चाकरीच्या आशेनें आला.' हुकूम झाला कीं, 'त्यास हुजूर पाठवावें. त्यास मनसब देईपर्यंत रोजीना दिला जाईल. संभाचे नोकर खंडोजी वगैरे काजी हैदरच्या मार्फतीनें आले. त्याचा नव्यानें उत्कर्ष करण्याचा हुकूम झाला. संभाकडील उपर्युक्त हिरानंद, शंकराजी, पादशाहकुली यांस माफी फर्माविली. हजार जात व ५०० स्वार.(?)

४९३

| | | |
|---|---|---|
| जु. २८ शव्वाल २६ शनि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه شوال ۲۶ سنہ<br>یوم السبت سنہ ۲۷ | श. १६०६ भाद्रपद वद्य १२<br>इ. १६८४ सप्टेंबर २६ |

بروح الله خان فرمودند قاضی ابراهیم نوکر سیدی یعقوت خان فوجدار دندا راجپوری کہ پیش کش خان مذکور بحضور آورده است طلبیده بگوید اگر راضی باشد منصب سرافراز فرمایند چنانچہ پرسیده عرض نموده و التماس میدارد فدوی پیرو ضعیف شده و محمد حسین پسر بنده را خانجہان بہادر منصب تجویز نموده با و سرافراز نمایند۔

بہ محمد علی خان فرمودند توپ های باسم ظفربخش و فتح لشکر و دشمن کوب نزد اعظم شاه در اوایل ماه آبان خواهند فرستاد. شش فیل و شش صد پنجاه گاو برائے توپ کشی از مقامات طلب حضور نمایند۔

بہ محمد علی خان حکم شد دو ضرب توپ و سیصد بیلدار و دو صد تیر...... تعینات فوج غازی الدین خان بہادر نمایند۔

रूहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, दंडाराजपुरीचा फौजदार सीदी याकूतखान याचा नोकर काझी इब्राहीम यानें याकूतखानाची खंडणी आणली आहे. त्यास बोलावून विचारावें कीं, 'तुला कबूल असेल तर मनसब दिली जाईल.' त्यावर त्यास विचारून अर्ज केला तो असा : तो विनंति करितो कीं, 'मी वयस्कर व अशक्त झालों आहे. माझा मुलगा मुहम्मद हुसैन यास खान-जहान बहादुरानें मनसबीची तजवीज केली आहे ती त्यास मिळावी.'

मुहम्मद अलीखानास हुकूम झाला कीं, जफरबक्ष, फतहलश्कर व दुश्मन-कूब या तोफा आबान महिन्याच्या सुरुवातीस अअजमशाहाजवळ पाठवाव्या.

तोफा ओढण्यासाठीं ६ हत्ती व ६५० बैल ठिकठिकाणांहून हुजूर मागवावे.

मुहम्मद अलीखानास हुकूम झाला कीं, २ तोफा, ३०० बेलदार व २०० बाण....गाझीउद्दीनखान बहादुराच्या फौजेंत पोहोंचवावे.

४९४

| जु. २८ शव्वाल २९ मंगळ. | سیاهم اخبارات دربار معلے ماه شوال ۲۹ سنہ یوم الثلث سنہ ۲۷ | श. १६०६ आश्विन शुद्ध १ इ. १६८४ सप्टेंबर २९ |
|---|---|---|

هنونت راو را تهانه داری بارامتی مقرر نموده هفصدی ذات پانصدی سوار اضافه نموده حکم شد که نواحی تهانه مذکور در ملک جدید جاگیر تنخواه دهند سردار سنگه را بمعه اضافه موقوف فرمودند۔

بموجب التماس وکیل غازی الدین خان بهادر بعرض رسید اول انکه نوکران سنبها مقهور امید بندگی نزد موکل آمده اند حکم شد که تا یافتن منصب و جاگیر یومیه مقرر نمایند امیدواریم که چیزی مبلغ براے تنخواه این شوند حکم شد که پنجاه هزار روپیه بفرستند۔

دویم پنج هزار سوار نوکر مقهور موکل بنده ملاقی شده بحضور می آیند و اسپان و اسپ مادیه سواری آنها داغی اند امیدوارم که نیم حصه و جرمانه معاف شوند منظور فرمودند۔

हणमंतराव हा ७०० जात व ५०० स्वार असा मनसबदार होता. त्यास बारामतीच्या ठाणेदारीवर नेमलें. त्यास २०० जात, ४०० स्वार अशी वाढ फर्माविली. हुकूम झाला कीं, 'उपर्युक्त ठाण्याच्या आसपास नवीन घेतलेल्या मुलखांत त्यास जहागीर द्यावी' सरदारसिंग यास वाढीसह चाकरीवर पाठविण्याचें स्थगित केलें.

गाझीउद्दीनखानाच्या वकिलानें अर्ज केला तो असा : (१) माझ्या मालकाकडे संभाकडील चाकर नोकरीच्या आशेनें आले आहेत. हुकूम झाला कीं, त्यांना मनसब देईतों रोजीना नेमावा. (२) आशा करितों कीं यांना पगार देण्यासाठीं कांहीं रक्कम मिळावी. हुकूम झाला कीं पन्नास हजार रुपये पाठवावे. (३) संभाचे ५००० स्वार माझ्या मालकास भेटून हुजूर येत आहेत.

त्यांना स्वार होण्यासाठीं घोडे व घोड्या पाहिजेत. आशा करितों कीं, अर्धा हिस्सा व दंड माफ व्हावा. हुकूम झाला कीं, मंजूर आहे.

### ४९५

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्काद ४<br>शनि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعده ۴ سنہ<br>یوم السبت سنہ ۲۸ | श. १६०६ आश्विन शुद्ध ६<br>इ. १६८४ आक्टोबर ४ |

فخرالدین همشیره زاده سیف خان مرحوم را تهانہ داری سوپہ از تغیر عبدالرسول خان مقرر نموده حکم شد کہ یک هزار چهل سوار را فوج طیار نمایند عبدالرسول خان را تهانہ داری سیواپور ملک جدید کہ بتصرف بادشاهی آمده مقرر نموده حکم شده تعیناتیان تهانہ سوپہ همراه خان مذکور تعین نمایند ـ

मरहूम सैफखानाचा भाचा फखुद्दीन यास अब्दुर्रसूलखानाच्या बदली-मुळें सुप्याच्या ठाणेदारीवर नेमलें. हुकूम झाला कीं, १००० स्वारांची फौज तयार ठेवावी. नुकताच बादशाही अमलखालीं आलेल्या शिवापूरच्या प्रदेशावर अब्दुर्रसूलखान यास ठाणेदार नेमलें. हुकूम झाला कीं, सुपें येथें नेमलेल्या लोकांना खानाबरोबर द्यावें.

### ४९६

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्काद ६<br>सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعده ٦ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۸ | श. १६०६ आश्विन शुद्ध ८<br>इ. १६८४ आक्टोबर ६ |

فخرالدین تهانہ دار سوپہ مقرر شده بود رخصت شد خلعت و اسپ ـ

सुप्याचा ठाणेदार म्हणून फखुद्दीनखानाची नेमणूक झाली होती. त्यास खिलत व घोडा देऊन निरोप दिला.

### ४९७

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्काद ८<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ذی قعده ۸ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۸ | श. १६०६ आश्विन शुद्ध १०<br>इ. १६८४ आक्टोबर ८ |

محمد باقر را دیوانی فوج محی‌الدین خان تهانہ دار سوپہ مقرر نموده خلعت داده رخصت فرمودند ـ

सुप्याचा ठाणेदार मुहियुद्दीनखान याच्या फौजेचा दिवाण म्हणून मुहम्मद बाकिर यास नेमून त्याला खिलत देऊन पाठविलें.

४९८

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्काद ९ गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی قعدہ ۹ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۸<br>ملازمت | श. १६०६ आश्विन शुद्ध ११<br>इ. १६८४ आक्टोबर ९ |

آساجی وغیرہ سہ نفر نوکران سنبہا مقہور امید بندگی۔
محمود و فتح و سعادت دلیر خانی را تعینات تہانہ سوپہ نمودہ دو ہزار روپیہ ماعدت دادند۔
روح اللہ خان عرض نمود کہ عبدالعزیز خان قلعہ دار جونیر خطی نوشتہ کہ سوار و پیادہ جمعیت سنبہا مقہور در این نواحی آمدہ بود چنانچہ ازاین استماع صبحی ابوالخیر خانہ زاد شتافتہ مقابلہ کردہ شکست دادہ سلاح وغیرہ تاراج غنیم و کلہ بریدہ آوردہ امیدوار رعایت است فرمودند مجرای شد۔

संभाचे आसाजी वगैरे तीन नोकर चाकरीच्या आशेनें आले. महमूद, फतह व सआदत दिलेरखानी यांना सुप्यास नेमून दोन हजार रुपये मदत म्हणून दिले.

रूहुल्लाहखानानें अर्ज केला तो असा : जुन्नरचा किल्लेदार अब्दुल-अझीझखानी यानें पत्र लिहिलें आहे कीं, संभाचे स्वार व प्यादे या भागांत आले होते. तेव्हां माझा मुलगा अबुलखैर हा सकाळींच शत्रूवर धावून गेला. त्यानें सामना करून त्यांचा पराजय केला. शत्रूचीं हत्यारें वगैरे लुटून आणलीं. तसेंच गळा कापून शीर आणलें. आशा करितों कीं, कृपा व्हावी. यावर हुकूम झाला कीं, मान्य आहे.

४९९

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्काद १२ रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی قعدہ ۱۲ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۸ | श. १६०६ आश्विन शुद्ध १४<br>इ. १६८४ आक्टोबर १२ |

روح اللہ خان عرض نمود اکرام خان تہانہ دار گلشن آباد بیست یک نفر بندی بابت غنیم دستگیر نمودہ بحضور فرستادہ ازآن جملہ دوکس یکی پسر خواندہ قلعہ دار رام سیج و دویم دیسموکہ تل کوکن بابت مقہور اند حکم شد از ہردو حقایق استفسار نمودہ حوالہ اہتمام خان نمایند۔

حکم شد آتش خان بقلعہ داران صوبہ دکن بنویسد کہ مردم بندوقچیان از طرف سرکار والا [* در] قلعجات اند ھر کہ برادر او نوکر سنبھا مقھور ظاھر شود آنہارا قید نماید۔

بزبانی ھرکارہ بعرض رسید کہ در قلعہ احمدنگر مردم بندوقچیان کہ نوکراند برادران آنہا نوکر سنبھا مقھور اند ھرچہ امر شود حکم شدہ قید نمایند۔

रूहुल्लाहखानानें अर्ज केला कीं, गुलशनाबादेचा ठाणेदार इक्रामखान यानें शत्रूच्या २० लोकांना कैद करून हुजूर पाठविलें आहे. पैकीं एक जण रामसेजच्या किल्लेदाराचा औरस पुत्र व दुसरा शत्रूकडील तळकोंकणांतील देश-मुखाचा मुलगा आहे. हुकूम झाला कीं, त्या दोघांकडून सर्व माहिती काढून घेऊन त्यांना इहतिमामखानाच्या स्वाधीन करावें.

हुकूम झाला तो असा : दक्षिणेंतील सर्व किल्लेदारांना आतिशखानानें लिहावें कीं, किल्ल्यांत सरकारतर्फे बंदुकधारी लोक आहेत. त्यांचे कोणी भाऊबंद संभाच्या चाकरींत असल्याचें उमगलें तर त्यांना कैद करावें.

हरकाऱ्यांनीं सांगितलें कीं, अहमदनगरच्या किल्ल्यांत बंदूकधारी चाकर आहेत त्यांचे भाऊबंद संभाचे नोकर आहेत. याबाबत हुकूम झाला कीं, त्यांना कैद करावें.

५००

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्काद १५<br>बुध. | سیاھہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی قعدہ ۱۵ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۸ | श. १६०६ आश्विन वद्य २<br>इ. १६८४ आक्टोबर १५ |

محمد علی ولد نوراللہ قلعہ دار رایسن مقرر شد۔

मुहम्मद अली वलद नूरुल्लाह यास रायसीनचा किल्लेदार नेमलें.

५०१

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्काद १६<br>गुरु. | سیاھہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی قعدہ ۱۶ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۸ | श. १६०६ आश्विन वद्य ३<br>इ. १६८४ आक्टोबर १६ |

روح اللہ خان عرض نمود کہ عبداللہ چورہ غاشی فوجدار با روندہ خطی نوشتہ کہ حکم والا صادر شدہ بود کہ کانھوجی مقدم موضع اوندگانو عملہ پرگنہ چمارگوندہ اسپ مادیہ و بہالہ وغیرہ در موضع مذکور میدارد اگر بحضور

بفرستد بهتر الا تنبیه رساند چنانچه دادن قبول نه کرده بنابران بنده سواری نموده
مفسد مذکور را دستگیر کرده آوردیم هرچه امر شود حکم شد او را بحضور
بفرستد ـ

रूहुल्लाहखानानें अर्ज केला तो असा : पारोंघ्याचा फौजदार अब्दुल्लाह चौराघाशी यानें पत्र लिहिलें आहे कीं, 'बादशाही हुकूम सादर झाला कीं, चांभारगोंदें परगण्यांतील मौजे उंडगांव येथील कान्होजी पाटील हा उपर्युक्त गांवांत घोडे, भाले, वगैरे जमा करीत आहे. ते हुजूर पाठविले तर ठीक आहे; नाहीं तर त्यास तंबी द्यावी. परंतु, तो ते पाठविण्याचें कबूल करीत नव्हता. म्हणून मी स्वारी करून बंडखोरास पकडून आणिलें आहे. याबाबत हुकूम व्हावा.' हुकूम झाला कीं, त्यास हुजूर पाठवावें.

५०२

| जु. २८ जिल्काद १९<br>रवि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ذی قعده ۱۹ سنه<br>یوم الاحد سنه ۲۸ | श. १६०६ आश्विन वद्य ६<br>इ. १६८४ आक्टोबर १९ |
|---|---|---|

لودی خان قلعه دار و تهانه دار سانگوله اضافه حکم شد که رتن چند برادر
خدمت رای بمعه بیلداران رفته قلعچه تهانه سرول و سیواپور احداث نموده
بیاید و خسرو بیگ یساول [*و] سزاول باشد ـ

سابق بهانجی پاندره [بهانجی پاندره] بموجب قولنامه حسن علی خان بهادر
بامید بندگی سه هزار ذات سه هزار سوار آمده چنانچه بتجویز شاه عالم بهادر
دو هزاری ذات هزار سوار منظور شده بود درینولا بتجویز اعظم شاه دو هزاری
هزار سوار سرافراز فرمودند ـ

सांगोल्याचा ठाणेदार व किल्लेदार लोदीखान यास वाढ दिली. हुकूम झाला कीं, खिदमतरायाचा भाऊ रतनचंद यानें बेलदारांना बरोबर नेऊन शिरवळ व शिवापूर येथील गढ्यांची दुरुस्ती करून यावें. खुस्रवबेग यसावलानें त्यांची सजावली करावी.

हसनअलीखान बहादुराच्या कौलनाम्याप्रमाणें पूर्वी भानजी मांढरे (पांढरे?) ३००० जात व ३००० स्वार अशा मनसबीच्या आशेनें आला होता. त्यास शाहआलमच्या तजविजीनें २००० जात व १००० स्वार मंजूर केले होते. आतां अअजमशाहाच्या तजविजीनें २००० जात व १००० स्वार अधिक मंजूर केल्याचा हुकूम झाला.

५०३

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्काद २०<br>सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی قعدہ ۲۰ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۸ | श. १६०६ आश्विन वद्य ७<br>इ. १६८४ आक्टोबर २० |

اوداجی رام تعینات ہمراہ عبدالرسول خان تہانہ دار سیوا پور فوجداری ماہور مقرر نمودہ ہشتصدی ذات چہار صد سوار بود سیصد ۳ سوار اضافہ نمودہ و احمد خان معزول فوجدار نہصدی ذات ششصد ۶ سوار کم کردہ تعینات فوج روح اللہ خان فرمودند۔

शिवापूरचा ठाणेदार अब्दुर्रसूलखान याबरोबर नेमलेला उदाजीराम यास माहूरच्या फौजदारीवर नेमलें. तो ८०० जात व ४०० स्वार असा मनसबदार होता. त्यांत ३०० स्वारांची वाढ फर्माविली. तेथील काढून टाकलेला फौजदार अहमदखान याचे ९०० जात व ६०० स्वार कमी करून त्यास रूहुल्लाहखानाच्या फौजेंत नेमल्याचा हुकूम झाला.

५०४

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्काद २०<br>मंगळ. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماہ ذی قعدہ ۲۰ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۸ | श. १६०६ आश्विन वद्य ७<br>इ. १६८४ आक्टोबर २० |

مسند راو نوکران سنبہا مقہور فرستادہ امان اللہ خان نوسرافراز فرمودند۔
مشارالیہ مالوجی بنکاجی بہمان جی انوجی

अमानुल्लाहानें पाठविलेले संभाचे मसनदराव वगैरे नोकर यांस नवीन मानकरी केलें ते असे : उपर्युक्त, मालोजी, बंकाजी, बहमानजी, अनोजी.

५०५

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्काद २३<br>गुरु. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماہ ذی قعدہ ۲۳ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۸ | श. १६०६ आश्विन वद्य १०<br>इ. १६८४ आक्टोबर २३ |

عرضہ داشت محمد خلیل تہانہ دار سونیر آمدہ بنظر گذشت معروض داشتہ بود کہ اذهل راو ناسردار سنبہا مقہور کہ برای تحصیل چوتہائی درین ضلع مقرر

بود به اراده بندگی آمده به فقیر ملاق شده بعد مطالعه فرمان بنام مشارالیه مصحوب سید میرزا گرز بردار صادر نموده که مجرای شده او را با جمعیت خود بحضور بفرستد۔

قاضی حیدر عرض نمود که ملک بیگ ولد لعل بیگ نوکر سنبها مقهور قریب هزار سوار مسلمان تیرانداز و برقنداز همراه میداشت و یکهزار پانصد هون مشارالیه و شیخ حسین همراه مومی الله تعین بود پانصدی هون سالهانه می یافتند چنانچه هردو به اراده بندگی بحضور می آیند حسب الحکمهائی صادر شود که بجمعیت خاطر بیایند حکم شد اشرف خان قلمی نماید۔

शिवनेरचा ठाणेदार मुहम्मद खलील याचा अर्ज आला तो नजरेखालीं घातला. तो असा होता : या प्रांतांतील चौथ वसूल करण्यासाठीं नेमलेला शत्रूचा सरदार अढलराव हा चाकरीच्या आशेनें येऊन मला भेटला. अर्ज पाहिल्यावर उपर्युक्ताच्या नांवाचें फर्मान सय्यद मिर्झा गुर्जबर्दाराच्या जवळ दिलें. त्याचें म्हणणें मान्य असल्याचें व त्याला आपल्या लोकांसह हुजूर पाठवावें असें फर्माविलें.

काझी हैदरानें अर्ज केला तो असा : एक हजार मुसलमान तीरंदाज व बर्कंदाज स्वार हे संभाचा नोकर मलिकबेग वलद लालबेग याच्याजवळ आहेत. त्याला व त्याच्याबरोबर असलेला शेख हुसेन यास १००० होन सालीना नेमले होते. परंतु त्यांना पांचशें होन सालीना मिळत आहेत व म्हणून ते दोघेजण चाकरीच्या आशेनें हुजूर येत आहेत. त्यांनीं खातिरजमा ठेवून आपल्या लोकांसह यावें असे हुकूम सादर व्हावे. हुकूम झाला कीं, अश्रफखानानें लिहून पाठवावें.

५०६

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्हेज २ शुक्र. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ذی الحجه ۲ سنه<br>یوم الجمعه سنه ۲۸ | श. १६०६ कार्तिक शुद्ध ४<br>इ. १६८४ आक्टोबर ३१ |

خواجه حامد ولد عابد خان خزانه بفوج غازی الدین خان بهادر به تهانه کره نمونه رسانیده آمده ملازمت نموده پنج روپیه نذر گذرانید۔

ख्वाजा हमीद वलद आबिदखानानें करडे निमोणें येथें गाझीउद्दीन खानाच्या फौजेंत खजिना पोहोंचवून येऊन भेट घेतली व पांच रुपये भेट दिले.

५०७

| जु. २८ जिल्हेज ५ सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے ماه ذی‌الحجہ ٥ سنہ یوم الاثنا سنہ ۲۸ | श. १६०६ कार्तिक शुद्ध ७ इ. १६८४ नोव्हेंबर ३ |
|---|---|---|

سید اوغلان عرض نمود کہ غازی‌الدین خان بہادر خطی نوشتہ کہ جاسوسان خبر آوردند کہ جمعیت غنیم نواحی سوپہ آمده است بنابران بنده شتافتہ مقابلہ نموده ازاقبال حضرت بسیارکس بجہنم رسانیده و زخمی ساختہ شکست داده فتح بادشاهی شد تفصیل از وقایع بعرض خواهد رسید۔

सय्यिद ओघलाननें कळविलें तें असें : गाझीउद्दीनखान बहादुराचें पत्र आलें आहे कीं, शत्रूच्या फौजा सुप्याच्या आसमंतांत आल्या आहेत अशी हेरांनीं बातमी आणल्यामुळें मी घाईनें गेलों व त्यांशीं लढाई केली. बादशाही सुदैवानें पुष्कळ लोक मारून व जखमी करून शत्रूचा पराभव केला. बादशाही फत्ते झाली. या घटनेचा तपशीलवार अर्ज करीत आहे.

५०८

| जु. २८ जिल्हेज ८ गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے ماه ذی‌الحجہ ۸ سنہ یوم الخمس سنہ ۳۸ | श. १६०६ कार्तिक शुद्ध १० इ. १६८४ नोव्हेंबर ६ |
|---|---|---|

بہ بہره مند خان فرمودند کہ طرح قلعہ سوپہ از پارچہ برتختہ طیار کنانید بنظر بگذرانند۔

बहरामंदखानास हुकूम झाला कीं, सुप्याच्या किल्ल्याचा नकाशा कागदावरून फळ्यावर तयार करून नजरेखालीं घालावा.

५०९

| जु. २८ जिल्हेज १३ मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے ماه ذی‌الحجہ ۱۳ سنہ یوم الثلث سنہ ۲۸ | श. १६०६ कार्तिक शुद्ध १४ इ. १६८४ नोव्हेंबर ११ |
|---|---|---|

محمد بیگ گرزبردار حسب الحکم بروح‌الله خان و خلعت بہ بہادر خان موافق حکم در پرینده رسانیده عرضہ داشت آورده بنظر گذرانید۔

मुहम्मदबेग गुर्जबर्दारानें हुकुमाप्रमाणें रूहुल्लाहखानास हस्बुलहुकूम व बहादुरखानास खिलत परिंड्यास नेऊन पोहोंचविली. त्यांचे अर्ज आणून नजरेखालीं घातले.

५१०

| जु. २८ जिल्हेज १४ बुध. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ذی الحجہ ۲۸ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۸ | श. १६०६ कार्तिक शुद्ध १५<br>इ. १६८४ नोव्हेंबर १२ |
|---|---|---|

قاضی حیدر عرض نمود کہ محمد برادرزاده غلام علی برادر و عبدالقادر خویش مخلص خان مرحوم کہ از حضور جہتہ تسخیر قلعجات سنبہا مقہور تعین شده بودند بہ بنده خطی نوشتہ اند کہ بنده های پیاده پانصد این سرزمین نونوکر نگاه داشتہ در تہانہ کروس سکونت گرفتہ و با رامانجی زمیندار نواحی قلعہ کوتہلہ کہ برکوه دره تیلیا گہات واقعہ تلکوکن است اتفاق نموده جاسوسی یافتہ کہ مردم قلعہ درآن جا جہتہ ذخیره بدیہات کہ متصل قلعہ اند می آیند بنابران بتاریخ نہم ۹ شہر حال قلعہ کوتہلہ روانہ شد بتاریخ دهم بقلعہ مذکور رسیده پشتاره های جمدهر و شمشیر وغیره سلاح نموده برسر سیصد ۳ نفر بندوقچی کرده تا بہ قلعہ کوتہلہ روانہ شد و عبدالقادر انرا بمعہ جمعیت مشارالیہ زیر کوه پنہان کرد عقب گذاشتہ و بر دروازه کمرکوت آن قلعہ رفتہ آواز داده کہ دروازه قلعہ را بکشاید ذخیره آورده اند مردم خود دانستہ دروازه را کشاده بندهای درآمد شدند پشتارهای سلاح برآورده جنگ واقع شد چنانچہ مردم غنیم زیاده بودند لیکن عبدالقادر هم آمده داخل قلعہ شد فتح عظیم گردید و عبدالقادر تہانہ دار کروس و سانکوجی ماندزه (پاندره ؟) برائے کومک آمده بودند بعد فتح بہ تعلقہ خودها رفتہ و بتاریخ یازدهم مردم مقہور آمده قلعہ را محاصره کرده جنگ تیر و تفنگ درپیش است بعد معروض ظل سبحانی خوشوقت شده فرمودند کہ آنہا را رعایت خواهم کرد و قاضی حیدر را خلعت و یک فیل ماده انعام داده حکم شد بہره مند خان حسب الحکم بآنہا و هم تہانہ داران آن ضلح بنویسد کہ هرکدام از محافظت قلعہ و در تنبیہ آن سگ وار سرگرم باشد۔

काझी हैदर यानें अर्ज केला तो असा : माझा भाऊ गुलाम अली याचा मुलगा काझी मुहम्मद व मरहूम मुख्लिसखानाचा नातेवाईक अब्दुल कादिर यांना संभाचे किल्ले जिंकण्यासाठीं नेमिलें होतें. त्यांनीं मला पत्र लिहिलें कीं, येथील लोकांपैकीं चाकरीस ठेवलेले पांचशें पायदळ करूस येथें राहिले. त्यांनीं तळकोंकणांतील तेल्या घाटांत असलेल्या कोथळा किल्ल्याच्या परिसरांत

राहणारा जमीनदार रामाजी याशीं संगनमत केलें आणि हेरगिरीनें माहिती मिळविली कीं, किल्ल्यांतील लोक जवळच्या खेड्यांत धान्य गोळा करण्यासाठीं येत असतात. तेव्हां चालू महिन्याच्या नऊ तारखेस कोथळ्याकडे रवाना होऊन दहा तारखेस मी किल्ल्यापाशीं पोहोंचलों. जमधर, तलवारी वगैरे हत्यारें, तीनशें बंदुकधाऱ्यांबरोबर कोथळ्यास पाठविलीं. अब्दुल कादिरनें त्यांस आपल्या फौजेसह डोंगराच्या पायथ्याशीं लपवून ठेविलें व किल्ल्याच्या कमरकोट दरवाज्याजवळ जाऊन त्यानें ओरडा केला कीं, 'दरवाजा उघडा; लोकांनीं धान्य आणिलें आहे' आपलींच माणसें समजून आंतील लोकांनीं दरवाजा उघडला. माझे लोक आंत गेले. हत्यारें आणलीं. नंतर लढाई झाली. परंतु शत्रूचे लोक जास्त होते. तेव्हां अब्दुल कादिर देखील आंत गेला. मोठा विजय मिळाला. करूसचा ठाणेदार अब्दुल कादिर व माणकोजी मांढरे (पांढरे ?) मदतीस आले होते. ते विजय मिळाल्यावर स्वतःच्या प्रदेशांत गेले. अकरा तारखेस शत्रूच्या लोकांनीं येऊन वेढा दिला. बाणांची व बंदुकांची लढाई चालू आहे. अर्जानें बादशाहास आनंद होऊन हुकूम झाला कीं, त्याच्यावर कृपा केली जाईल. काजी हैदर यास एक हत्तीण व खिलत बक्षीस दिली. बहरामंदखानास हुकूम झाला कीं, त्यांना व त्या जिल्ह्यांतील सर्व ठाणेदारांस हस्बुलहुकूम लिहावा कीं, प्रत्येकानें किल्ल्याच्या संरक्षणांत व शत्रूला तंबी देण्यांत मग्न असावें.

५११

| जु. २८ जिल्हेज १६<br>शुक्र. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ذی الحجہ ١٦ سنہ<br>یوم الجمعہ سنہ ٢٨ | श. १६०६ कार्तिक वद्य २<br>इ. १६८४ नोव्हेंबर १४ |
|---|---|---|

قاضی حیدر عرض نمود کہ عبدالقادر کہ در قلعہ کوتہلہ است خطی نوشتہ کہ از تاریخ فتح قلعہ تا حال کسی بندہ بادشاهی برای کومک نرسید و مردم غنیم آمده قلعہ را محاصره کرده جنگ تیر و تفنگ در پیش است و ذخیره کہ در قلعہ بود از اتش سوختہ شد اگر حضرت خبر این جا بگیرند بهتر والا بکار خواهد آمد حکم شد بهره مند خان حسب الحکم این جماعہ ذیل قلمی نموده حوالہ خسرو بیگ صحبت یساول نموده روانہ نماید کہ زود همہ را تارسیدن عبدالکریم قلعہ دار آن جا سزاولی کرده برساند۔

काझी हैदरनें अर्ज केला तो असा : कोथळागडावर असलेल्या अब्दुल कादिरनें मला पत्र पाठविलें कीं, किल्ला जिंकून घेतला त्या दिवसापासून आज मितीपर्यंत कुणीही बादशाही चाकर मदतीस आला नाहीं. शत्रूच्या लोकांनीं किल्ल्यास वेढा घातला असून बाणांची व बंदुकांची लढाई चालू आहे आणि किल्ल्यांत असलेला दारूगोळा आगीच्या भक्ष्यस्थानीं पडला आहे. बादशाहांना ही खबर मिळाली तर ठीक; नाहींतर मी कामास येईन. यावर हुकूम झाला कीं, बहरामंदखानानें खालील लोकांस हस्बुलहुकूम लिहावा व तो खुस्रवबेग यसावल याजबरोबर पाठवून द्यावा. त्यानें तेथील किल्लेदार अब्दुलकरीम पोहोंचेपर्यंत तावडतोब सजावली करून सर्वांना तेथें पोहोंचवावें.

५१२

| जु. २८ ज़िल्हेज १८ रवि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ذی الحجه ۱۸ سنه<br>یوم الاحد سنه ۲۸ | श. १६०६ कार्तिक वद्य ४<br>इ. १६८४ नोव्हेंबर १६ |
|---|---|---|

عرضه داشت عبدالقادر بابت فتح قلعه کوتهله بمعه کلید طلا آمده بنظر گذشت بعد مطالعه کلید بمشارالیه معاف نموده اضافه فرمودند۔

कोथळा किल्ला घेतल्याबद्दल अब्दुल कादिरची आलेली अर्जी व सोन्याची किल्ली नजरेखालीं घातली. पाहिल्यावर किल्ली उपर्युक्तास माफ केली व वाढीचा हुकूम दिला.

५१३

| जु. २८ जिल्हेज २२ गुरु. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ذی الحجه ۲۲ سنه<br>یوم الخمس سنه ۲۸ | श. १६०६ कार्तिक वद्य ८<br>इ. १६८४ नोव्हेंबर २० |
|---|---|---|

اضافه

محمد خلیل تهانه دار سونیر رشید بیگ وغیره سه ۳ نفر منصبدار عرضه داشت غازی الدین خان بهادر آورده بنظر گذرانیده معروض داشته بود که بتاریخ ۱۰ شهر حال بنده خبر یافته که نا روخی بهوسله نا سردار سنبها مقهور با جمعیت ده هزار سوار بقلعه ستاره جمع شده نظر بر شوخی دارد بنده بتاریخ ۱۶ شهر حال از تهانه سرول بیست و چهار کروه اسپ قمچی دویده مقهور تاب مقابله نیاورده از اقبال حضرت دو صد نفر را بقتل رسانده فتح بادشاهی شد هفده نفر

این جانب بکار آمده و اکثر زخمی شدند بعد مطالع فرمودند که مجرای کلی شد بالتون بیگ وغیره را اضافه فرمودند۔

सुनेर (शिवनेर?) चा ठाणेदार मुहम्मद खलील, रशीदबेग वगैरे तीन मनसबदार यांनीं गाझीउद्दीनखानाचा अर्ज आणून नजरेखालीं घातला. अर्ज असा : चालू महिन्याच्या पंधरा तारखेस मला बातमी मिळाली कीं, संभाचा सरदार नारोजी भोसले दहा हजार स्वारांसह साताऱ्याच्या किल्ल्याकडे आला असून त्याचा खोडी काढण्याचा विचार आहे. म्हणून मी चालू महिन्याच्या सोळा तारखेस शिरवळहून २४ कोस दौड केली. शत्रूनें सामना दिला नाहीं. बादशाही सुदैवानें दोनशें लोक मारले जाऊन बादशाही फत्ते झाली. आमचे १७ लोक कामास आले व बहुतेक लोक जखमी झाले. अर्ज पाहिल्यावर हुकूम झाला कीं, मान्य आहे. बाल्तूनबेग वगैरेंना बाढ देण्याचा हुकूम झाला.

५१४

| जु. २८ जिल्हेज २२ गुरु. | سیاهه اخبارات دربار معلی ماه ذی الحجه ۲۲ سنه یوم الخمس سنه ۲۸ | श. १६०६ कार्तिक वद्य ८ इ. १६८४ नोव्हेंबर २० |
|---|---|---|

عرضه داشت عبدالعزیزخان قلعه دار جونیر آمده بمعرفت بختاور خان بنظر گذشت معروض داشته بود که بنده موافق حکم خانه زاد را بمعه جمعیت برای کومک عبدالقادر قلعه دار کوتهله فرستاده هرگاه متصل قلعه رسیده دیده که ناروجی ناسردار مقهور آمده دره مذکور مسدود نموده خانه زاد یورش نموده جنگ کوته یراق واقعه شد از اقبال حضرت بسیاری را بقتل رسانیده و سردار مذکور را دستگیر کرده درین ضمن بموجب نوشته خسرو بیگ صحبت یساول که جهته سزاولی آنها رفته بعرض رسید که ناروجی وغیره سردار مقهور دره قلعه کوتهله مسدود نموده چنانچه ابوالخیر پسر عبدالعزیزخان و بعد ازآن عبدالقادرخان تهانه دار کروس و مانکوجی تهانه دار شکارپور و رعداندازخان تهانه دار کره نمونه رسیده بسیاری را بقتل رسانیده سردار مقهور را دستگیر نموده و قربان بیگ وغیره دو نفر منصبدار عرضه داشته عبدالقادرخان درباب فتح آورده بنظر گذرانیده مطالعه نموده فرمودند مجرای آنها کلی شد و دارنده عرضه داشت را اضافه فرمودند قربان بیگ حسن بیگ۔

जुन्नरचा किल्लेदार अब्दुल अझीझखान याचा अर्ज आला तो बख्तावर-

खानाच्या मार्फतीनें नजरेखालीं घातला. तो अर्ज असा : हुकुमाप्रमाणें मी माझ्या मुलास जमेतीसह कोथळ्याचा किल्लेदार अब्दुल कादिर याच्या मदतीसाठीं पाठविलें. तो कोथळ्याजवळ पोहोंचला तेव्हां त्यास दिसलें कीं, शत्रूचा सरदार नारोजी यानें येऊन सदरहू खोरे रोखून धरलें आहे. माझ्या मुलानें हल्ला केला. तलवार-कट्यारींची हातघाईची लढाई झाली. बादशाही सुदैवानें अनेकांना मारून उपर्युक्त सरदारास पकडलें. याबाबत त्याची सजावली करण्यासाठीं गेलेला खुस्रवबेग सोहबत यसावल याच्या लिहिल्यावरून समजलें कीं, शत्रूच्या नारोजी वगैरे सरदारांनीं कोथळा किल्ल्याचें खोरें रोखलें होतें. म्हणून अब्दुल अझीझखानाचा मुलगा अबुलखैर व नंतर करूसचा ठाणेदार अब्दुलकादिरखान, शिकारपूरचा ठाणेदार माणकोजी व करडे निमोण्याचा ठाणेदार रअदअंदाझखान हे तेथें पोहोंचले; त्यांनीं अनेकांना मारलें व शत्रूच्या सरदारास पकडलें. कुर्बानबेग वगैरे मनसबदारांच्या दोन लोकांनीं किल्ला घेण्याबाबत अब्दुलकादिरखानाचा अर्ज आणून नजरेखालीं घातला. पाहिल्यावर हुकुम झाला कीं, त्याचें म्हणणें मान्य आहे. कुर्बानबेग व हुसेनबेग या अर्ज आणणाऱ्यांना बाढ फर्माविली.

५१५

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्हेज २३<br>शुक्र. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ذی الحجہ ۲۳ سنہ<br>یوم الجمعہ سنہ ۲۸ | श. १६०६ कार्तिक वद्य ९<br>इ. १६८४ नोव्हेंबर २१ |

سید اوغلال عرض نمود کہ مانکوجی ما (پا؟) ندرہ تہانہ دار شکارپور خطی نوشتہ کہ بموجب حکم بندہ و ابوالخیر وغیرہ بہ قلعہ کوتھلہ باتفاق یکدیگر رفتہ چنانچہ با ناروجی ترنبک نا سردار مقہور جنگ واقعہ شد از اقبال حضرت بسیارکس را بقتل رسانیدہ شکست دادہ و نا سردار مقہور را بجان کشتہ و گلہ را بریدہ مصحوب اوداجی منصبدار برادری خود بحضور فرستادہ امیدوار عنایت است بعد معروض فرمودند اهتمام خان گلہ را سری راہ درآویزد و اشرف خان مراتب عبدالعزیز خان وغیرہ بعرض رساند۔

सय्यिद ओघलान यानें अर्ज केला तो असा : शिकारपूरचा ठाणेदार माणकोजी पांढरे यानें पत्र लिहिलें कीं, हुकुमाप्रमाणें मी व अबुलखैर वगैरे एकमेकांच्या विचारानें कोथळा किल्ल्याकडे गेलों. तेव्हां शत्रूचा सरदार नारोजी त्रिंबक याशीं लढाई झाली. बादशाही कृपेनें अनेक लोक मारले गेले. त्याचा

पराभव झाला. शत्रूच्या सरदारास ठार केलें. त्याचें शीर कापलें तें माझा मनसबदार भाऊ उदाजी याजबरोबर पाठविलें आहे. त्यास कृपेची आशा आहे. अर्जानंतर हुकूम झाला कीं, इहतिमामखानानें त्या सरदाराचें डोकें रस्त्यावर टांगावें. अश्रफखानानें अब्दुलअझीझखान वगैरेंच्या मानसन्माना-बद्दल अर्ज करावा.

५१६

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्हेज २६ सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی الحجہ ۲٦ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۸ | श. १६०६ कार्तिक वद्य १३<br>इ. १६८४ नोव्हेंबर २४ |

اوداجی گلہ نا سردار سنبہا مقہور آوردہ خلعت انعام
بتجویز غازی الدین خان نوسرافراز فرمودند
سیواجی جیواجی میر مرتضیٰ ولد میر احمد

संभाच्या सरदाराचें शीर घेऊन उदाजी आला त्यास खिलत दिली. गाझीउद्दीनखानाच्या तजविजीनें नवीन मानकरी नेमले ते असे : शिवाजी, जिवाजी, मीर मुर्तजा वलद मीर अहमद.

५१७

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्हेज २६ सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی الحجہ ۲٦ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۸ | श. १६०६ कार्तिक वद्य १३<br>इ. १६८४ नोव्हेंबर २४ |

بموجب خط امان اللہ خان تہانہ دار بارامتی بعرض رسید دویم اگر مردم سنبہا مقہور برائے نوکری نزد بندہ رجوع آوردہ اند حکم شد بنویسد کہ دو هزار سوار نوکر نماید و بدستور غازی الدین خان بہادر سند بفرستد۔

बारामतीचा ठाणेदार अमानुल्लाहखान याच्या पत्रावरून समजलें कीं, 'माझ्याकडे संभाचे लोक चाकरीसाठीं रुजू होत असतील तर काय करावें ? हुकूम व्हावा.' हुकूम झाला कीं, 'त्यास लिहावें कीं, दोन हजार नोकर ठेवावे. नेहमींच्या प्रथेप्रमाणें गाझीउद्दीनखान हा सनद पाठवील.'

५१८

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्हेज २८ बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ذی الحجہ ۲۸ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۸ | श. १६०६ कार्तिक वद्य ३०<br>इ. १६८४ नोव्हेंबर २८ |

اضافہ

خیریت خان قلعدار دندا راجپوری برحسن تردد شیخ محمد بخشی واقعہ نویس دندا راجپوری عرضہ داشت اکرم خان تهانہ دار گلشن آباد و مرحمت خان بنظر گذشت معروض داشتہ بود سہ باری ترنبک منجملہ آن دو باری بهره مند خان سابق سوختہ بود و مردم مقهور باز آمده آباد شده بودند بندهای سواری نموده از اقبال حضرت سہ باری سوختہ و بند و مواشی بدست آورده فتح بادشادی شد و نیز ازوقایع بعرض رسید کہ از دست خان مشارالیهما و ملازم شاهزاده معزالدین خوب تردد شد فرمودند مجرای شد۔

दंडाराजपुरी येथील वाकेनवीस याच्या लिहिण्यावरून दंडाराजपुरीचा किल्लेदार खैरियतखान याचें ऊर्जित केलें. गुल्शनाबादेचा ठाणेदार अक्रमखान व मरहमतखान यांचे अर्ज नजरेखालीं घातले. त्रिंबकच्या तीन वाड्यांपकीं दोन वाड्या बहरामंदखानानें पूर्वींच जाळल्या होत्या; पण शत्रूच्या लोकांनीं येऊन त्या परत वसविल्या होत्या. आम्ही स्वार होऊन गेलों; बादशाही कृपेनें तिन्ही वाड्या जाळल्या; लोक व जनावरें हस्तगत केलीं; बादशाही फत्ते झाली. वाक्यावरून अशी हकीकत समजली कीं, उपर्युक्त खानानें व शाहझादा मुइझ्झुद्दीनच्या नोकरांनीं चांगले श्रम घेतले. हुकूम झाला कीं, मान्य आहे.

५११

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जिल्हेज २९ गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ذی الحجہ ۲۹ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۸ | श. १६०६ मार्गशीर्ष शुद्ध १<br>इ. १६८४ नोव्हेंबर २७ |

سیدی عبدالرحمان قلعہ دار دندوری بموجب نوشتہ خیریت خان عرضہ داشت غازی الدین خان بهادر آمده بنظر گذشت معروض داشتہ بود کہ یک آغا مانا اکبر باغی بمعہ وکیل سنبها مقهور نزد بنده آمده ظاهر نموده کہ بندهای بے تقصیر اند پیغام صلح آورده معروض دارند بنده جواب داده کہ مرا این قدرت نیست هرکس کہ درباب باغی و یا مقهور بعرض میرساند بندگان حضرت ازروی بیدماغی او را برطرف نموده قید یا داخل کشتنی می فرمایند آخرالامر ظاهر نموده کہ یک مرتبہ مقدمہ مایان معروض دارند هرچہ حکم بطالع مایان صادرشود بنابران معروض داشتہ ایم بعد مطالعہ بہ سید اوغلان

فرمودند کہ بہ خان مذکور بنوبسد کہ ایں مغلانی را معہ وکیل همراه ملک شاه برادر سید اوغلان بحضور بفرستد۔

खैरियतखानाच्या लिहिल्याप्रमाणें दिंडोरीचा किल्लेदार सीदी अब्दुर्रहमान यानें गाझीउद्दीनखानाचा अर्ज पाठविला तो असा : अकबराचा आगा मामा नांवाची बाई संभाच्या वकिलांसह मजजवळ आली होती. त्यांनीं आम्ही निर्दोष आहों; तहाचा निरोप घेऊन आलों आहों असें सांगितलें. मी त्यांना 'मला एवढा अधिकार नाहीं. जो कोणी संभा किंवा अकबराबद्दल अर्ज करतो त्यास बादशाह गैरमर्जीमुळें बडतर्फ करितात किंवा कैदेंत ठेवून मारून टाकतात' असें सांगितलें. पण त्यांनीं शेवटीं 'एक वेळ आमची कैफियत बादशाहापुढें मांडावी; आमच्या नशिबानें हुकूम होईल तो होवो' असें विनविलें. म्हणून हा अर्ज केला. त्यावर सय्यिद ओघलानास हुकूम केला कीं, उपर्युक्त खानास लिहावें कीं, या मुघलानींला वकिलांसह सय्यिद ओगलानचा भाऊ मलिक शाह याजबरोबर हुजूर पाठवावें.

### ५२०

| | | |
|---|---|---|
| जु. २८ मोहरम ४ सोम. | سیاهہ اخبارات دربار معلی<br>ماه محرم ۲۸ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۸ | श. १६०५ मार्गशीर्ष शुद्ध ५<br>इ. १६८४ डिसेंबर १ |

بہره مند خان را نیت خیر فاتحہ خوانده بمعہ همراهیان انعام داده با فوج سہ هزار دو صد هشتاد سوار جهتہ تنبیہ غنیم جانب سرول بجای غازی الدین خان بهادر رخصت فرمودند۔

خان مذکور عبدالواحد خان بخشی سرکار بادشاهزاده کام بخش محمد تقی خویش بہره مند خان معمور حان و سید خان محمد علی دیوان فوج سید الصادات و تحف قلی حاجی محمد صالح جان محمد و پسر عالم گرزبردار دلیر بیگ محمد موسی داروغہ افراسیاب بمعہ برادر۔

बहरामंदखान व त्याच्या सोबतचे लोक यांना बक्षीस वगैरे व ३२८० स्वार बरोबर देऊन गाझीउद्दीनखानाच्या ऐवजीं शिरवळकडे शत्रूला तंबी देण्यासाठीं पाठविलें. ते लोक असे : उपर्युक्त खान, कामबक्षाचा बक्षी अब्दुल-वाहिदखान, बहरामंदखानाचा नातलग मुहम्मद तकी, मामूरखान, सय्यिद-

खान, सय्यिदुस्सआदत याच्या फौजेचा दिवाण मुहम्मद अली, तुहफकुली, हाजी मुहम्मद सालिह, जान मुहम्मद, आलम गुर्जबर्दाराचा मुलगा दिलेरबेग, मुहम्मद मूमी दारूगा, भावासह अफरासियाब.

## ५२१

| | | |
|---|---|---|
| जु. २८ मोहरम ५<br>मंगळ. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه محرم ٥ منہ<br>یوم الثلاث سنہ ۲۸ | श. १६०६ मार्गशीर्ष शुद्ध ६<br>इ. १६८३ डिसेंबर २ |

قاضی حیدر عرض نمود کہ محمد حسین قاضی چیول خطی نوشتہ کہ درملک غنیم گرانی بسیار شده چنانچہ از بندر سورت وغیره بندر بہ احمدآباد رسد غلہ و سرب و باروت بمقهور میرسد اگر سید لطف‌الله گجراتی کہ بمنصب دو صد پنجاهی ذات پنجاه سوار درحضور است واقف حال این سرزمین است تعین شود و تا رسد غلہ بند نماید و عنقریب مقهور عاجز شود حکم شد او را بنظر بگذرانند۔

काझी हैदरानें अर्ज केला तो असा : चेऊलचा काझी मुहम्मद हुसैन यानें मला पत्र लिहिलें आहे कीं, शत्रूच्या प्रांतांत महागाई खूप आहे. पण सुरत व इतर बंदरें आणि अहमदाबाद वगैरे ठिकाणें येथून शत्रूस अन्नधान्याची रसद, शिसें, दारू वगैरे पोहोंचत आहे. हुजूर असलेला आणि २५० जात व ५० स्वार असा मनसबदार सय्यिद लुत्फुल्लाह गुजराती इकडील भागाशीं परिचीत आहे. त्यास इकडे नेमलें तर रसद जाते ती तो बंद करील व शत्रू त्रासून जाईल. हुकूम झाला कीं, त्यास नजरेखालून घालावें

## ५२२

| | | |
|---|---|---|
| जु. २८ मोहरम ६<br>बुध. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه محرم ٦ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۸ | श. १६०६ मार्गशीर्ष शुद्ध ७<br>इ. १८६४ डिसेंबर ३ |

عرضہ داشت آتش خان برای دیدن قلعہ کوتهلہ کہ بتصرف پادشاهی آمده است بنظر گذشت معروض داشتہ بود طوری کہ قاضی حیدر تعریف این قلعہ بعرض رسانید همان طور است چنانچہ از آمدن این قلعہ تمام تلکوکن درتصرف دولت قاهره خواهد آمد بعد مطالعہ از روی مهربانی قاضی حیدر را خطاب خانی و ده هزار روپیہ انعام مرحمت نموده دو هزاری ذات پانصد سوار بود پانصدی ذات اضافہ فرمودند۔

ملک شاه برادر سید اوغلان کہ همراه مریم مغلانی بمعہ وکلای اکبر ابتر [و*] سنبہا مقہور بحضور آمده بود یک اشرفی بوزن یک صد تولہ بمشارالیہ انعام و فرمان و یک زرہ خاصہ قیمت هفصد روپیہ براے غازی‌الدین خان بہادر حوالہ نموده بہ خانہ ذاد خان فرمودند کہ حسب‌الحکم بہ رعدانداز‌خان تہانہ‌دار کره نموئہ بنویسد کہ خود را بمعہ همراهیان نزد بہره‌مند خان رساند ـ

बादशाही अमलाखालीं आलेला कोथळागड पाहण्यासाठीं आतिश-खानाचा अर्ज आला. तो नजरेखालीं घातला. त्यांत 'काझी हैदरानें वर्णिल्या-प्रमाणें खरोखरच तो किल्ला आहे. तो हातीं आल्यामुळें सबंध तळकोंकणच बादशाही अमलाखालीं येईल' असें होतें. यावर काझी हैदरावर कृपा करून खानाची पदवी व दहा हजार रुपये बक्षीसी दिली. तो दोन हजार जात व पांचशें स्वारांचा मनसबदार होता. त्यांत पांचशें जातीची वाढ फर्माविली.

सय्यिद ओघलानचा भाऊ मलिक शाह हा मर्यम मुघलानी आणि अकबर व संभा यांचे वकील यांसह हुजूर आला. उपर्युक्तास शंभर तोळे वजनाची एक अश्रफी बक्षीस दिली. गाझीउद्दीनसाठीं फर्मान व ७० रुपये किंमतीचें खास चिलखत त्याजवळ दिलें. खानहझादखानास हुकूम झाला कीं, करडे निमोण्याचा ठाणेदार रअदअंदाजखान यास हस्बुलहुकूम लिहावा कीं, बरोबरच्या सर्व लोकांसह तातडीनें बहरामंदखानापाशीं पोहोंचावें.

## ५२३

| | | |
|---|---|---|
| जु. २८ मोहरम ७<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۷ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۸ | श. १६०६ कार्तिक शुद्ध ८<br>इ. १६८४ डिसेंबर ४ |

عرضہ داشت اکبر ابتر مریم مغلانی بمعہ محمد محسن وکیل بحضور آورده بخدمت زینت‌النساء بیگم گذرانیده بندگان حضرت از مغلانی حقایق ابتر استفسار نموده فرمودند کہ مغلانی و وکیل ابتر بالفعل در حضور باشد و شیخ عبدالله ازخرچ آنہا خبردار باشد و وکلای سنبہا مقہور کہ عرضہ داشت درباب صلح آورده بودند مطالعہ نکرده فرمودند کہ صلح آن قافر بچہ بہ شمشیر است دستک بدهند کہ آنہا را ملک شاه نزد غازی‌الدین خان بہادر ببرد کہ در راه کسی مزاهم نشود و از آن جا نزد مقہور بروند ـ

अकबराच्या अर्जासह मर्यम मुघलानी व मुहम्मद मुहसिन वकील हुजूर

आले. त्यांना झीनतुन्निसा बेगमेकडे पाठविलें. बादशाहानें मुघलानीपाशीं अकबराविषयीं चौकशी केली. हुकूम झाला कीं, मुघलानी व अकबराचा वकील यांनीं हुजूरच रहावें. शेख अब्दुल्लाहानें त्यांचा खर्च करावा. संभाच्या वकिलांनीं तह करण्याबाबत अर्ज आणिला होता तो बादशाहानें बघितला नाहीं. हुकूम झाला कीं, या काफिरबच्च्याशीं तह फक्त तलवारीनेंच केला जाईल. त्यांना जाण्यासाठीं दस्तक द्यावा. मलिक शाहानें त्यांना गाझीउद्दीनखानाकडे न्यावें. वाटेंत त्यांना कोणीही अडथळा करूं नये. तेथून त्यांनीं संभाकडे जावें.

५२४

| | | |
|---|---|---|
| जु. २८ मोहरम १२<br>मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ محرم ۱۲ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۸ | श. १६०६ मार्गशीर्ष शुद्ध १३<br>इ. १६८४ डिसेंबर २९ |

آتش خان موافق حکم طرح قلعہ کوتہلہ نوشتہ آوردہ۔

आतिशखानानें हुकुमाप्रमाणें कोथळा किल्ल्याचा नकाशा काढून आणला.

५२५

| | | |
|---|---|---|
| जु. २८ मोहरम १३<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ محرم ۱۳ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۸ | श. १६०६ मार्गशीर्ष शुद्ध १४<br>इ. १६८४ डिसेंबर १० |

میر محمد صالح ولد شمش الدین خان از پرینده آمده۔

मीर मुहम्मद सालिह वलद शम्सुद्दीनखान हा परिंड्याहून आला.

५२६

| | | |
|---|---|---|
| जु. २८ मोहरम १७<br>रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ محرم ۱۷ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۸ | श. १६०६ मार्गशीर्ष वद्य ३<br>इ. १६८४ डिसेंबर १४ |

بموجب نوشتہ غازی الدین خان بهادر بعرض رسید کہ تبردار وغیره براے صاف نمودن گہات تلکوکن همراه فدوی تعین شوند حکم شد یک صد کہار و پنجاه سنگ تراش از حضور بفرستند و دیوان فوج پانصد نفر تبردار نو نوکر نگاه دارد ۔

गाझीउद्दीनखानाचा अर्ज आला कीं, तळकोंकणचा घाट साफ करण्यासाठीं लाकूडतोडे वगैरे मजबरोबर नेमावे. हुकूम झाला कीं, शंभर कहार व

पन्नास पाथरवट हुजुराहून पाठवावे. फौजेंतील दिवाणानें नवीन पांचशें कुऱ्हाडे चाकरीस ठेवावे.

५२७

| | | |
|---|---|---|
| जु. २८ मोहरम २०<br>बुध. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۲۰ سنه<br>یوم الاربعه سنه ۲۸ | श. १६०६ मार्गशीर्ष वद्य ६<br>इ. १६८४ डिसेंबर १७ |

به آتش خان داروغه توپخانه دکن حکم شد چهل نفر سنگ تراش جهته مرمت قلعه کوتهله بفرستد -

दक्षिणेच्या तोफखान्याचा दारूगा आतिशखान यास हुकूम झाला कीं, कोथळ्याच्या दुरस्तीसाठीं चाळीस पाथरवट पाठवावे.

५२८

| | | |
|---|---|---|
| जु. २८ मोहरम २०<br>बुध. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۲۰ سنه<br>یوم الاربعه سنه ۲۸ | श. १६०६ मार्गशीर्ष वद्य ६<br>इ. १६८४ डिसेंबर १७ |

بلطف الله خان فرمودند بمرحمت خان بنویسد که از گلشن آباد به نولکه اومره بیاید و سابق حسب الحکم صادر شده است بران عمل نماید و فوج خان مذکور هشت صد شصت و چهار سوار بدستور سابق مقرر نماید و دو صد سوار شاهزاده معزالدین و محمد اعظم الدین و یک صد پنجاه سوار تابینان شمش الدین خان معه عبدالمومی که طلب حضور نموده اند خانه زاد خان سزاولی کرده به تهانه نولکه اومره رسانیده رسید بطلبد و محمد موسی را بخشی واقعه نویسی فوج خان مذکور بحال داشته -

علام الله برادر زاده قاضی حیدر خان بعد فتح قلعه کوتهله آمده ملازمت نموده معه مهر یکصد روپیه نذر گذرانید خلعت و اسپ انعام داده سیصدی ۳ ذات پنجاه سوار نوسرافراز فرمودند -

लुत्फुल्लाहखानास हुकूम झाला तो असा : मर्हमतखानास लिहावें कीं, त्यानें गुल्शनाबादेहून नौलाखउमऱ्यास यावें व पूर्वीं सादर झालेल्या हस्बुल-हुकुमाप्रमाणें वागावें. पूर्वींप्रमाणें उपर्युक्त खानाकडे ८६४ स्वारांची फौज नेमावी. शाहझादा मुइझ्झुद्दीन व मुहम्मद अअजमुद्दीन यांचे २०० स्वार व अब्दुलमोमीसह शम्सुद्दीनखानाचे १५० स्वार यांना खानाझादखानानें

सजावली करून नौलाखउमऱ्यास पोहोंचवावें व पावती घ्यावी. मुहम्मद मोमीनला उपर्युक्त खानाच्या वाकेनवीसीचा बक्षी करावें. काझी हैदरखानाचा पुतण्या अत्तामुल्लाह कोथळा घेतल्यानंतर आला. त्यानें भेटून ९ मोहरा व १०० रुपये दिले. त्यास खिलत व घोडा बक्षीस दिला आणि २०० स्वार व ५० स्वार असा नवीन मानकरी केला.

५२९

| जु. २८ मोहरम २१ गुरु. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۲۱ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۸ | श. १६०६ मार्गशीर्ष वद्य ७<br>इ. १६८४ डिसेंबर १८ |
|---|---|---|

رستم بیگ را قلعداری منگل بیده تعلقہ بیجاپور از تغیر عنایت‌الله ولد جوان‌مرد مقرر نموده و معزول قلعدار پانصدی ذات دو صد سوار بود یک صد سوار مشروط کم فرمودند۔

عرضہ‌داشت جگدیو راو زمیندار سری رنگ پتن آمده بنظر گذشت معروض داشتہ بود کہ دادوجی کاکہرا ناسردار سنبہا مقہور معہ جمعیت سہ هزار سوار دو هزار پیاده کہ متصل قلعہ بہتور تعلقہ مقہور جمع شده بودند ازاین خبر خانہ‌ذاد درگاه بخشی خود را با جمعیت هفت هزار سوار پانزده هزار پیاده جہتہ مقابلہ آن تیره بختان تعین نموده چنانچہ در آن‌جا رفتہ مقابلہ کرده جنگ واقعہ شده از اقبال حضرت ناسردار مقہور را معہ پسر بجہنم رسانیده و بیماجی برادر ناسردار را زنده دستگیر نموده تیماجی ناسردار دیگر زخمی ساختہ قریب مردن است و دیگر مردمان یک هزار کس را بقتل رسانیده و بسیاری زخمی کرده و یک هزار اسپ مادیہ و بهالہ و سلاح چہتری تاراج بدست آمده فتح بادشاهی شد و قلعہ بہتور از تعلقہ آن شور بخت تصرف بادشاهی آورده الحال ازراه بدبختی مردم مقہور فراهم میشوند اگر باین خانہ‌ذاد حکم شود نوکر نگاه دارم بعد معروض فرمودند مجرای شد و نوکر جہتہ تنبیہ مقہوران نگاه دارد۔

इनायतुल्लाह वलद जवांमर्द याच्या बदलीमुळें विजापूर तालुक्यांतील मंगळवेढ्याच्या किल्ल्ेदारीवर रुस्तुमबेग यास नेमलें. काढून टाकलेला किल्लेदार हा ५०० व २०० स्वार असा मनसबदार होता. पैकीं १०० स्वार सशर्त होते ते कमी केल्याचा हुकूम झाला.

श्रीरंगपट्टणचा जमीनदार जगदेवराव याचा अर्ज नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें आहे तें असें : संभाचा सरदार दाऊदजी काकडे ३००० स्वार व २००० पायदळ यांसह शत्रूच्या मुलखांतील किल्ले भिटोर येथें आला होता. म्हणून माझ्या फौजेच्या बक्षीला ७००० स्वार व ५००० पायदळ यांसह त्याचा सामना करण्यासाठीं नेमलें. ते तेथें गेले व त्यांनीं लढाई केली. बादशाही सुदैवानें शत्रूच्या सरदारास त्याचा मुलासह मारलें. त्याचा भाऊ बि(भि)माजी यास जिवंत पकडलें. तिमाजी नांवाच्या दुसऱ्या सरदारास जखमी केलें. तो मृत्युपंथास लागला आहे. इतर १००० माणसें मारलीं व अनेकांना जखमी करून १००० घोड्या, भाले, हत्यारें, छत्री वगैरे लूट हातीं आली. शत्रूचा भिटोर किल्ला आपल्या ताब्यांत आला. आपला विजय झाला. सध्या शत्रूचे लोक एकत्र जमत आहेत. हुकूम झाला कीं, तें मान्य आहे. शत्रूला तंबी देण्यासाठीं त्यांना चाकरीस ठेवावें.

५३०

| | | |
|---|---|---|
| जु. २८ मोहरम २४<br>रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۲۴ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۸ | श. १६०६ मार्गशीर्ष वद्य १०<br>इ. १६८४ डिसेंबर २१ |

قاضی حیدر خان عرض نمود کہ عبدالقادر وغیره قلعہ کوتہلہ بابت سنبہا مقہور کہ در تصرف بادشاهی آورده درباب آنہا سابق حکم شده بود کہ بعد تصرف آوردن قلعہ رعایتی خوب خواهند کرد بعد آمدن حضور جزو منصب و اضافہ سرافراز نموده هرچہ امر شود بعد معروض قلعہ کوتہلہ را اسم مفتاح الفتوح نہاده و هفت هزار روپیہ انعام بقاضی حیدر خان مرحمت نموده کہ آنچہ پیاده های مردم ماولیہ کہ دلیری کرده اندرون قلعہ اول مرتبہ داخل شده اند آنہارا کره طلا و نقره طیار کرده بدهند جماعہ ذیل را اضافہ فرمودند۔

انتخاب خط فخرالدین خان تہانہ دار سوپہ بعرض رسید اول دو صد سوار سنبہا مقہور بموجب قولنامہ عبدالرسول خان آمده اند فدوی تا حال هفت صد روپیہ ازخود بآنہا داده و بہ سبب پریشانی عاجز شده میخواهند کہ فراری شوند و جمعیت این تہانہ معلوم است و این مردم وقف کار این سرزمین اند حکم شد هزار روپیہ از سرکار والا بدهند۔

काझी हैदरखानानें अर्ज केला तो असा : अब्दुलकादिर इत्यादींनीं

संभाकडील कोथळा किल्ला बादशाही अमलाखालीं आणला. याचेबाबत पूर्वी हुकूम झाला होता कीं, किल्ला जिंकल्यावर उत्तम कृपा केली जाईल. तरी हुजूर आल्यावर कांहींतरी मनसब व वाढ देऊन ऊर्जित करावें. याबाबत हुकूम व्हावा. अर्ज ऐकल्यावर कोथळा किल्ल्यास मिफ्ताहुलफुतूह हें नांव दिलें व काझी हैदरखानास ७००० रुपये दिले. हुकूम झाला कीं, त्यानें पायदळापैकीं ज्या मावळे लोकांनीं शौर्य गाजवून किल्यांत प्रथम प्रवेश मिळविला त्यांना सोन्याचीं व चांदीचीं कडीं तयार करून द्यावीं. निम्नलिखित लोकांना वाढ फर्माविली. [यांत मराठ्यांचीं नावें नाहींत*]

सुप्याचा ठाणेदार फखरुद्दीन यानें लिहिलें तें असें : अब्दुर्रसूलच्या कौलनाम्याप्रमाणें संभाचे २०० स्वार आले आहेत. आतांपर्यंत मीं त्यांना माझ्याजवळचे ७०० रुपये दिले आहेत. ते परिस्थितीमुळें गांजले आहेत. त्यांचा पळून जाण्याचा विचार आहे. ह्या ठाण्यांत असलेली जमेत हुजुरास माहीत आहे. हे लोक येथील कामास उपयोगी आहेत. हुकूम झाला कीं, सरकारांतून त्यांना १००० रुपये द्यावे.

५३१

| जु. २८ मोहरम २५ सोम. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۲۵ سنه<br>یوم الاثنا سنه ۲۸ | श. १६०६ मार्गशीर्ष वद्य ११<br>इ. १६८४ डिसेंबर २२ |
|---|---|---|

حسب الحکم بنام مرحمت خان مضمون آنکه از تهانه نولکه اومره بقلعه مفتاح الفتوح برود و تهانه محکم نشانده خبردار باشد حواله غازی بیگ گرزبردار نموده گوبند راو وغیره مردم ماولیه که درقلعه مفتاح الفتوح درآمد شده بودند موافق حکم بنظر گذشتند بنا بران دو هزار پانصد هون انعام مرحمت فرمودند ـ

عرضداشت اکرام خان تهانه دار گلشن آباد آمده معرفت فضایل خان داروغه داک بنظر گذشت معروض داشته بود که جمعیت سنبها مقهور به نواحی قلعه رام سیج فرود آمده می خواستند که در مواضعات پادشاهی شوخی نمایند از این خبر بنده بتاریخ پانزد هم شهرحال اسپ قمچی دویده رفته مقابله کرده از اقبال حضرت دو صد کس بقتل رسانیده و بسیارکس زخمی ساخته شکست داده و اکثر مردم همراه بنده بکار آمده و زخمی شدند فتح بادشاهی شد و از واقعه نیز بعرض رسید فرمودند مجرای شد ـ

मरहमतखानाच्या नांवें हस्बुलहुकूम सादर होऊन गाझीबेग गुर्जबर्दारा-जवळ दिला. त्यांतील विषय असा : नौलाखउमऱ्याहून कोथळ्यास जावें व तेथें पक्कें ठाणें घालून सावध असावें. गोविंदराव वगैरे मावळे लोकांनीं कोथळा घेण्यास मदत केली. ते हुकुमाप्रमाणें आले. त्यांना नजरेखालीं घातले. नंतर २५०० होन बक्षीस दिले.

गुल्शनाबादेचा ठाणेदार इकरामखान याचा डाकचौकीचा अर्ज अधि-कारी फजाइलखान याच्या मार्फतीनें आला. नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें तें असें : संभाचे लोक रामसेज किल्ल्याच्या आसपास जमले आहेत. बादशाही गांवांत खोडी काढण्याचा त्यांचा विचार आहे. ही बातमी ऐकून मी चालू महिन्याच्या १५ तारखेस चढया घोड्यानिशीं स्वारी केली. त्यांचेशीं सामना दिला. बादशाही सुदैवानें २०० लोक मारले व अनेकांना जखमी करून त्यांचा मोड केला. माझ्याबरोबरचे बहुतेक लोक कामास आले व जखमी झाले. बादशाही फत्ते झाली. वाकाही असाच आला. हुकूम झाला कीं, मान्य आहे

५३२

| ज़ु. २८ मोहरम २७<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۲۷ سنہ<br>یوم الاربع سنہ ۲۸ | श. १६०६ मार्गशीर्ष वद्य १३<br>इ. १६८४ डिसेंबर २४ |
|---|---|---|

سید منور خان صوبہ دار برهانپور بموجب حکم در گلشن‌آباد آمده است حکم شد خان مذکور در پیپل گانو تهانہ مقرر نموده خبردار باشد و تاکید سازد کہ ازین طرف رسد غلہ بملک سنبها مقهور نتواند برود کسی را ازملک مقهور در ممالک محروسہ آمدن ندهند۔

हुकुमाप्रमाणें बुऱ्हाणपूरचा सुभेदार सय्यिद मुनव्वर हा गुल्शनाबादेस आला आहे. हुकूम झाला कीं, उपर्युक्त खानानें पिंपळगांवांत ठाणें कायम करून सावध असावें. त्यास ताकीद करावी कीं, त्या भागांतून संभाच्या मुलखांत अन्नधान्य जाऊं देऊं नये. तसेंच शत्रूच्या मुलखांतील कोणालाही बादशाही प्रदेशांत येऊं देऊं नये.

५३३

| ज़ु. २८ मोहरम २८<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه محرم ۲۸ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۸ | श. १६०६ मार्गशीर्ष वद्य १४<br>इ. १६८४ डिसेंबर २५ |
|---|---|---|

محمد شریف تهانہ دار پاتوده را تهانہ داری چاندور نیز مقرر نموده حکم شد قلعہ داری کسی دیگر تجویز نماید۔

पाटोद्याचा ठाणेदार मुहम्मद शरीफ यास चांदोरचीही ठाणेदारी दिली. हुकूम झाला कीं, तेथील किल्लेदारीवर दुसऱ्या कोणास नेमावें.

५३४

| | | |
|---|---|---|
| जु॰ २८ मोहरम ३० रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے ماه محرم ۳۰ سنہ یوم الاحد سنہ ۲۸ | श. १६०६ पौष शुद्ध २ इ. १६८४ डिसेंबर २७ |

بہ لطف الله خان فرمودند حسب الحکم بہ عبدالرسول خان تهانہ دار سیواپور بنویسد کہ عظمت برادر خورد بانصف جمعیت [در*] حد تهانہ گذاشتہ خود بانصف جمعیت نزد غازی الدین خان بهادر برود و سید منصور ولد جانبازخان را حکم شد برادری بہ تهانہ سیواپور رفتہ از بندوبست خبردار باشد۔

लुत्फुल्लाहखानास हुकूम झाला तो असा : शिवापूरचा ठाणेदार अब्दुर्रसूल-खान यास हुकूम लिहावा कीं, ‘ तुझा धाकटा भाऊ अजमत याजपाशीं निम्मे लोक तेथील ठाण्यांत ठेवून तू स्वतः निम्मे लोकांसह गाझीउद्दीनखाना-पाशीं जावें ’. सय्यिद मन्सूर वलद जांबाझखान यास हुकूम झाला कीं, तू आपल्या भाऊबंदांना घेऊन शिवापुरास जावें व तेथील बंदोबस्ताबद्दल सावध असावें. ’

५३५

| | | |
|---|---|---|
| जु. २८ सफर २ सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے ماه صفر ۲ سنہ یوم الاثنا سنہ ۲۸ | श. १६०६ पौष शुद्ध ४ इ. १६८४ डिसेंबर २९ |

دو قطعہ عرضداشت محمد اعظم شاه و یک قطعہ اوزبک خان قلعہ دار دهارور آمده بنظر گذشتند۔ شیو سنگهہ پسر رام سنگهہ راتهور تعینات فوج غازی الدین خان بهادر [ملازمت*] نموده شش صدی ۶ ذات پانصد پنجاه سوار دو اسپہ بود صدی ذات پنجاه سوار دو اسپہ اضافہ و خلعت داده حکم شد خزانہ تعیناتیان سیواپور همراه ببرد۔

از زبانی هرکاره ها بعرض رسید کہ جمعیت سنبها مقهور از قلعہ ها کہ درملک بادشاهی واقعہ اند فرود آمده نواحی تهانہ بیلہ شوخی نموده رفتند و

عبدالعزیز خان قلعدار جونیر معہ پسر سواری نکردہ از روی اعتراض منصب آنہا کم فرمودند۔

بہ لطف‌الله خان فرمودند آتش خان از فرستادن ملک مقہور موقوف نمودہ باید کہ طور ہمراہی خان مذکور ہمراہ سیف‌الله خان طیار نمایند و غظنفرخان جہت طلایہ لشکر بجای سیف‌الله خان میرفتہ باشد۔

मुहम्मद अअजमशाहाच्या अर्जाचीं दोन पानें व धारूरचा किल्लेदार उझबकखान याच्या अर्जाचें एक पान आलें. तीं नजरेखालीं घातलीं. गाझी-उद्दीनखानाच्या फौजेंत नेमलेला रामसिंग राठोडाचा मुलगा शिवसिंग यानें भेट घेतली. तो ६०० जात दुघोडी, ५५० स्वार असा मनसबदार होता. त्यास १०० जात दुघोडी, ५० स्वार एवढी वाढ व खिलत दिली. हुकूम झाला कीं, शिवापूरच्या फौजेचा खजिना आपल्याबरोबर ठेवावा.

हरकाऱ्यांच्या कडून तोंडीं अर्ज आला कीं, संभाचे लोक बादशाही मुलखांतील किल्ल्यांजवळ उतरत आहेत. बेल्हे ठाण्याच्या आसपास दांडगाई करून गेले. जुन्नरचा किल्लेदार अब्दुलअझीझखान व त्याचा मुलगा यांनीं स्वारी केली नाहीं. तेव्हां इतराजी होऊन त्यांची मनसब कमी केली.

लुत्फुल्लाहखानास हुकूम झाला कीं, आतिशखानास शत्रूच्या मुलखांत पाठविण्याचें स्थगित केलें आहे. उपर्युक्त खानाच्या बरोबर असलेल्या लोकांचा हिशेब सैफुल्लाहखानाबरोबर तयार ठेवावा. सैफुल्लाहखानाच्या ऐवजीं घझनफर-खानानें गस्त घालावी.

## ५३६

| जु. २८ सफर ३ मंगळ. | سیاہہ اخبارات دربار معلے ماہ صفر ۳ سنہ یوم الثلث سنہ ۲۸ | श. १६०६ पौष शुद्ध ५ इ. १६८४ डिसेंबर ३० |
|---|---|---|

اضافہ ہمراہیان اعتقاد خان کہ در چاندہ تردد نمودہ بودند۔

عرضہ داشت سپہ دارخان بہادر پسر خان بہادر پسر خان جہان بہادر آمدہ بنظر گذشت معروض داشتہ بود بندہ بموجب حکم معہ فوج جہت تنبیہ جمال پسر خواندہ شرزہ ہرزہ و فتح نایک‌واری کہ در قلعچہ کراچور و تالی‌کوت سکونت داشتہ رفتہ قلعچہ مذکور را از ہر چہار طرف مورچل بندی نمودہ تا سہ روز جنگ تیر و تفنگ در پیش ماندہ آخرش آن کوتہ اندیشان ہنگام شب

گریختہ رفتند و دو صد کس را بجہنم رسانیده و بسیاری زخمی ساختہ فتح بادشاهی شد و اکثر این جانب بکار آمده و زخمی شده دو قلعچہ بمعہ پرگنات تعلقہ بیجاپور درتصرف پادشاهی آوردیم و مفصل از واقعہ بعرض خواهد رسید بعد مطالعہ فرمودند مجرای شد۔

चांदा येथें इअतिकादखानाबरोबर असलेल्या लोकांना त्यांनीं उत्तम कष्ट केल्याबद्दल वाढ दिली.

खानजहान बहादुरचा नातू व खानबहादुराचा मुलगा सिपहदारखान याचा अर्ज आला तो नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, मी हुकुमाप्रमाणें शर्झ्याचा मानीव मुलगा जमाल यास तंबी देण्यासाठीं आणि कराचूर व तालीकोट येथील गढ्यांतील नायकवाडींना जिंकण्यासाठीं गेलों. त्या गढ्यांस चारी बाजूनीं मोर्चेबंदी करून तीन दिवस बाण व बंदुकांची लढाई केली. शेवटीं ते दुर्दैवी लोक रात्रीं पळून गेले. दोनशें लोकांना मारलें व अनेकांना जखमी केलें. बादशाही फत्ते झाली. तसेंच इकडील बहुतेक लोक कामास आले व जखमी झाले. दोन्ही गढया व बिजापूरसंबद्ध परगणे बादशाही कब्जांत आणले. हें वाक्यावरून समजेल. यावर हुकूम झाला कीं, मान्य आहे.

## ५३७

| जु. २८ सफर ४ बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے ماه صفر ۲۸ سنہ یوم الاربعہ سنہ ۲۸ | श. १६०६ पौष शुद्ध ६ इ. १६८४ डिसेंबर ३१ |
|---|---|---|

اضافہ

یادگار حسین خان قلعدار نلدرگ را فوجداری دهاراسیون و آلند نیز مقرر شد۔

بہ لطف‌الله خان فرمودند دو هزار سوار را فوج سوای جمعیت عبدالعزیزخان قلعہدار جونیر درآن جا مقرر نماید کہ مردم مقهور بملک بادشاهی آمدن نتوانند۔

عرضہ داشت مرحمت خان آمده بنظر گذشت معروض داشتہ بود کہ بنده بتاریخ بیست و هفتم ۲۷ محرم الحرام بہ قلعہ مفتاح‌الفتوح رسیده۔

नळदुर्गचा किल्लेदार यादगार हुसैन यास धाराशीव व आळंद यांच्याही फौजदारीवर नेमलें.

लुत्फुल्लाहखानास हुकूम झाला कीं, जुन्नरचा किल्लेदार अब्दुलअझीझखान याच्या लोकांसह दोन हजार फौज तिकडे नेमावी. त्यांनीं शत्रूच्या लोकांना बादशाही प्रदेशांत येऊं देऊं नये.

मरहमतखानाचा अर्ज आला तो नज़रेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, मोहरमच्या २७ तारखेस मिफ्ताहुलफुतूह (कोथळा) किल्ल्यास पोहोंचलों.

५३८

| | | |
|---|---|---|
| जु. २८ सफर ५<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ صفر ٥ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۸ | श. १६०६ पौष शुद्ध ७<br>इ. १६८५ जानेवारी १ |

ازواقعہ چانده بعرض رسید کہ تر (نر) ورسنگھ نرینہ راجہ کشن سنگھہ زمیندار این جا سیصدی ۲ ذات یک صد سوار بود فوت شد۔

ازواقعہ قلعہ مفتاح الفتوح بعرض رسید کہ مردم پیاده جمعیت سنبہا مقہور هنگام شب مابین قلعہ آمده بودند چنانچہ سید عبدالکریم قلعہدار این جا خبردار شده روشنای نموده جنگ تیر و تفنگ درپیش آمده آخرش گریختہ رفتند و غلہ این جا نمی رسد بنابران مردم قلعہ بسیار عاجز اند حکم شد بہ ابوالخیر فوجدار جونیر بنویسد کہ رسانیدن رسد غلہ قلعہ مذکور برذمہ خود دانستہ بسعی تمام رساند۔

चांद्याच्या घटनापत्रावरून समजलें कीं, तेथील जमीनदार राजा किशनसिंग त्रिवर (नरवर) सिंगाचा मुलगा हा ६०० जात व १०० स्वार असा मनसबदार होता. तो मेला. किल्ले मिफ्ताहुलफुतूह (कोथळा)च्या घटनापत्रावरून समजलें कीं, रात्रीं संभाचे पायदळी लोक किल्ल्यांत आले होते; तेव्हां तेथील किल्लेदार सय्यिद अब्दुलकरीम यानें सावध होऊन प्रकाश पाडला. बाणांची व बंदुकांची लढाई होऊन शत्रू पळून गेला. अन्नधान्य पोहोंचत नाहीं म्हणून किल्ल्यांतील लोक अत्यंत त्रासून गेले आहेत. यावर हुकूम झाला तो असा : जुन्नरचा फौजदार अबुलखैर यास लिहावें कीं, किल्ल्यास अन्नधान्य पोहोंचविण्याची जबाबदारी तुझी आहे असें समजून हर प्रयत्नानें तें पोहोंचवावें.

५३९

| | | |
|---|---|---|
| जु. २८ सफर ८<br>रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ صفر ۸ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۸ | श. १६०६ पौष शुद्ध ९<br>इ. १६८५ जानेवारी ४ |

دیروز شتر سوار عرضه داشت بهره مند خان آورده بنظر گذرانیده معروض داشته بود که جاسوسان خبر آوردند که جمعیت سنبها مقهور جهته مقابلہ بنده جانب پارنیر آورده شده است حکم شد اعتقاد خان معہ میرزا خان وغیره دو هزار هفت صد و هشتاد سوار جهته تنبیه آن بدکیشان میرود چنانچه یک پهر دو گهری شب مانده روانه شده۔

برام راو و بهاسکر راو داروغه هرکاره ها حکم شد حقایق خزانه و ملک قافر بچه بلطف‌الله خان ظاهری نموده باشند۔

काल सांडणीस्वारानें बहरामंदखानाचा अर्ज आणला. तो नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें तें असें : हेरांनीं बातमी आणली कीं, माझ्याशीं लढाई करण्यासाठीं संभाचे लोक पारनेरकडे आले आहेत. हुकूम झाला कीं, इअतिकादखानानें मिर्झाखान इत्यादींसह २७८० स्वार बरोबर घेऊन जाऊन शत्रूस तंबी द्यावी. तेव्हां तो रात्रीचा एक प्रहर दोन घटिका राहिल्यावर रवाना झाला.

हरकाऱ्यांचे दारोगे रामराव व भास्करराव यांस हुकूम झाला कीं, संभाचा मुलूख व खजाना यासंबंधीं माहिती लुत्फुल्लाहखानास कळवीत असावें.

९४०

| जु. २८ सफर ९ सोम. | سیاهه اخبارات دربار معلی بماه صفر ۹ سنه یوم الاثنا سنه ۲۸ | श. १६०६ पौष शुद्ध ६ इ. १६८५ जानेवारी ५ |
|---|---|---|

محمد حسین دیوان برار و فوجدار ملکاپور پانصدی ذات سیصد ۳ سوار منجملہ پانصدی ذات یک صد سوار بلاشرط و چهار سوار مشروط دیوانی و یک صد شصت سوار بشرط فوجداری بود بعد تغیر خدمت ده سوار بشرط دیوانی و پنجاه سوار مشروط تعیناتی دکهن بحال داشته یک صد سوار کم فرمودند۔

فضایل خان عرض نمود اکرم خان تهانه دار گلشن‌آباد بوکیل خود نوشته که محمد خلیل تهانه دار سونیر و گوبند راو تهانه دار بهگور خطی نوشته که کاتیا راو نا سردار سنبها مقهور با جمعیت پنج هزار سوار این نواحی آمده چنانچه خط تحسین فرستاده بنظر گذراند حکم شد لطف الله خان جواب این به اکرم خان بنویسد۔

वऱ्हाडचा दिवाण व मलकापूरचा फौजदार मुहम्मद हुसैन हा ५०० जात व ३०० स्वार असा मनसबदार होता. पैकीं ५०० जात व १०० स्वार बिनाशर्त व दिवाणीच्या कामासाठीं ४ स्वार सशर्त तसेंच फौजदारीच्या कामासाठीं १६० स्वार नेमले होते. त्याची ही चाकरी दूर केल्यामुळें दिवाण-कामासाठीं १० स्वार व दक्षिणेंतील नेमणुकेसाठीं ५० स्वार सशर्त नेमले. त्याचे १०० स्वार कमी केल्याचा हुकूम झाला.

फजाइलखानानें अर्ज केला तो असा : गुल्शनाबादेचा ठाणेदार अक्रमखान यानें आपल्या वकिलास लिहिलें कीं, शिवनेरचा ठाणेदार मुहम्मद खलील व भगूरचा ठाणेदार गोविंदराव यांनीं पत्र लिहिलें आहे कीं, 'संभाचा सरदार कात्याराव हा ५००० स्वारांसह या भागाजवळ आला. तेव्हां त्याच्या गौरवाचें पत्र पाठवून नजरेखालीं घालावें.' त्याप्रमाणें हें पत्र पाठविलें आहे. तें नजरेखालीं घालावें. हुकूम झाला कीं, लुत्फुल्लाहखानानें अक्रमखानास याचें उत्तर पाठवावें.

## ५४१

| | | |
|---|---|---|
| जु. २८ सफर १०<br>मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۱۰ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۸ | श. १६०६ पौष शुद्ध ११<br>इ. १६८५ जानेवारी ६ |

از زبانی هرکاره ها بعرض رسید کہ جمعیت سنبہا مقہور نواحی سنگمنیر وغیره بند و مویشی تاراج نموده بردند و تہانہ داران آن ضلع جہتہ تنبیہ آنہا سواری نکرده بنابران منصب کم نموده بہ لطف‌الله خان فرمووند حسب‌الحکم بانہا بنویسد ازآینده واقع خبردار باشند و جمعیت مقہور را آمدن ندهند۔

حکم شد لطف‌الله خان حسب‌الحکم با اعتقاد خان بنویسد کہ از نوشتہ سید منور خان و اکرام خان تہانہ دار گلشن‌آباد بعرض رسید کہ جمعیت غنیم درین ضلع آمده است باید کہ خود را معہ فوج رسانیده تنبیہ رساند حوالہ شتر سوار نموده بفرستد۔

ترمبک جی ولد لکهموجی ازبابت سنبہا مقہور نوسرافراز فرمودند۔

हरकाऱ्यांकडून तोंडी अर्ज आला कीं, संभाच्या लोकांनीं संगमनेरच्या आसपासचे लोक व जनावरें यांची लुटालूट केली. परंतु त्या जिल्ह्यांतील ठाणेदारांनीं त्यांना तंबी देण्यासाठीं स्वारी केली नाहीं. म्हणून त्यांच्या मनसबी

कमी केल्या. लुत्फुल्लाहखानास हुकूम झाला कीं, 'येथून पुढें नीट सावध असावें व शत्रूच्या लोकांना येऊ देऊ नयें' असे हस्बुलहुकूम त्यांना लिहावे

हुकूम झाला तो असा : लुत्फुल्लाहखानानें इअतिकादखानास हस्बुलहुकूम लिहावा कीं, 'गुल्शनाबादेचा ठाणेदार इक्रामखान याच्या लिहिल्यावरून शत्रूचें सैन्य त्या जिल्ह्यांत आलें असल्याचें समजतें. तरी तू फौजेसह जाऊन त्यांना तंबी द्यावी.' व तो सांडणीस्वाराजवळ देऊन पाठवावा.

संभाकडील त्रिंबकजी वलद लखमोजी याचें नव्यानें ऊर्जित केलें.

## ५४२

| | | |
|---|---|---|
| जु. २८ सफर ११<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۱۱ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۸ | श. १६०६ पौष शुद्ध १२<br>इ. १६८५ जानेवारी ७ |

از نوشتہ رعد انداز خان تہانہ دار سوپہ بعرض رسید کہ پانصد چہار سوار جمعیت همراه بنده است در این جا آمد و رفت غنیم است دیگر جمعیت تعین شود حکم شد لطف الله خان چہار صد و هشتاد سوار ازحضور دیگر تعین نماید۔

سید اوغلان عرض نموده عموی سنبہا مقہور امید بندگی بحضور می آمد مردم مقہور او را دستگیر نموده بردند و متعلقان او نزد غازی الدین خان بہادر آمده حکم شد بہ خان مذکور بنویسد کہ آنہا را بحضور بفرستد۔

सुप्याचा ठाणेदार रअदअंदाजखान याच्या लिहिण्यावरून समजलें तें असे : 'माझ्याजवळ ५०४ स्वारांची जमेत आहे. या भागांत शत्रूची येजा चालू आहे. तरी दुसरी जमेत नेमावी.' हुकूम झाला कीं, लुत्फुल्लाहखानानें हुजुराहून दुसरे ४८० स्वार नेमावे.

सय्यिद ओघलानानें अर्ज केला कीं, संभाचा काका चाकरीच्या आशेनें हुजूर येत असतां शत्रूनें त्याला कैद करून नेलें. त्याचे संबंधी गाझीउद्दीन-खानापाशीं आले आहेत. हुकूम झाला कीं, त्यांना हुजूर पाठविण्याबद्दल खानास लिहावें.

## ५४३

| | | |
|---|---|---|
| जु. २८ सफर १२<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۱۲ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۸ | श. १६०६ पौष शुद्ध १३<br>इ. १६८५ जानेवारी ८ |

رایا جی وغیره دو نفر نوکران سنبها مقهور معہ پنجاه راس مویشی بابت قلعہ مفتاح الفتوح کہ غازی الدین خان بهادر قید نموده بود بموجب حکم سهراب [چلہ؟] رفتہ آورده بعرض رسانید حکم شد حوالی حیدر خان نماید

بہ جمدة الملکی فرمودند حسب الحکم بہ کارطلب خان فوجدار احمدآباد بنویسد کہ بعرض رسیده کہ رسد غلہ از تعلقہ احمدآباد بہ سنبها مقهور میرسد باید کہ از همہ فوجداران و تهانہ داران و زمینداران و بیوپاریان مچلکہ بگیرند احدی از ملک ممالک محروسہ رسد مقهور نبرند۔

गाझीउद्दीनखानानें मिफ्ताहुल्फुतूह (कोथळा) गडावरील रायाजी वगैरे संभाचे दोन नोकर व ५० जनावरें यांना कैद केलें होतें. सुहराब चेला, हुकुमाप्रमाणें त्यांना हुजूर घेऊन आला व त्यानें वर्दी दिली. हुकूम झाला कीं, त्यांना हैदरखानाच्या स्वाधीन करावें.

जुम्दतुल्मुल्कास हुकूम झाला तो असा : अहमदाबादेचा फौजदार कारतलबखान यास हस्बुलहुकूम लिहावा कीं, अहमदाबादेहून संभाकडे अन्नधान्य जात असल्याचें समजलें आहे. तरी सर्व फौजदार, ठाणेदार, जमीनदार व व्यापारी यांच्याकडून कोणीही बादशाही मुलखांतून शत्रूच्या प्रांतांत अन्नधान्य नेणार नाहीं असा मुचलका घ्यावा.

५४४

| जु. २८ सफर ९५ शुक्र (?). | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۱۰ منہ<br>یوم الجمعہ (؟) سنہ ۲۶ | श. १६०६ पौष वद्य १<br>इ. १६८५ जानेवारी ११ |
|---|---|---|

میر روح الله خان گرز بردار را معہ ده ده نفر یساول و منصبدار و گرزبردار و برقنداز و پنچاه نفر بندوقچی تعین نموده کہ بطرف پارنیر رفتہ نشستہ شتران وغیره مردم لشکر معلے را جهتہ کاه و همیہ آن طرف رفتن ندهند۔

حکم شد یک هزار یک صد هفتاد یک سوار را فوج از حضور تعینات جونیر همراهی عبدالعزیز خان قلعہ دار فوجدار آن جا تعین نمایند و سیف الله خان سزاولی نموده روانہ سازد۔

मीर रूहुल्लाहखान गुर्जबर्दारासांगाती यसावलचे दहादहा लोक, मनसबदार, गुर्जबर्दार, बर्कंदाज आणि ५० बंदुकधाऱ्यांना नेमले. त्यांनीं पारनेराकडे

जाऊन थांबावें आणि शाही लश्करांतील उंटांना कही व घासदाण्यासाठीं त्या बाजूस जाऊं देऊं नये.

हुकूम झाला कीं, ११७१ स्वारांना हुजुराहून जुन्नरच्या फौजेंत तेथील किल्लेदार व फौजदार अब्दुलअझीझखानाबरोबर नेमावें. सैफुल्लाहखानानें सजावली करून पाठवावें.

९४५

| जु. २८ सफर १६ सोम. | سیاهه اخبارات دربار معلے ماه صفر ۱٦ سنه یوم الاثنا سنه ۲۸ | श. १६०६ पौष वद्य २ इ. १६८५ जानेवारी १२ |
|---|---|---|

انعام

نوکران سنبها مقهور از بابت قلعه مفتاح الفتوح از نزد غازی الدین خان بهادر آمده ـ

راما جی خلعت و اسپ گوبند راو

به لطف الله خان فرمودند بروح الله خان بنویسد اگر جمعیت سنبها مقهور امید بندگی بشما رجوع نماید تا دو هزار سوار نگاه دارد و تا پذیرای منصب و یافتن جاگیر سردار نیم روپیه و پائین را پاو روپیه ازخزانه میداده باشد ـ

عرضه داشت فخرالدین خان تهانه دار پونه آمده بنظر گذشت معروض داشته بود که جمعیت در این ضلع آمده بود بنده سواری نموده مقابله کرده بسیاری را بجهنم رسانیده شکست داده فرمودند مجرای شد مراتب او بعرض رسانند ـ

اشرف خان عرض نمود خوجه حامد که در تهانه کره نمونه است خطی نوشته که در این جا شورش غنیم بسیار است و جمعیت همراه بنده معدوم (معلوم) و باباجی با دو صد سوار و پرسو جی با یک صد پنجاه سوار وغیره أمید بندگی آمده اند فرمودند بمشارالیه بنویسد اگر جمعیت مقهور تا هزار سوار بیاید فوج شما قافیست تنبیه خواهد کرد و اگر زیادتی باشد شما در جای خود بماند آنها سزای خواهد یافت و اگر نوکران مقهور خواهد داده (آمد) روانه حضور نماید ـ

बक्षीस

मिफ्ताहुल्फुतूह (कोथळा) गडाशीं संबद्ध संभाचे कांहीं चाकर गाझीउद्दीनखानाकडून आले. रामाजी (खिलत व घोडा) व गोविंदराव.

लुत्फुल्लाहखानास हुकूम झाला तो असा : रूहुल्लाहखानास लिहावें कीं, संभाचे नोकर चाकरीच्या आशेनें तुजकडे आले तर त्यांतील दोन हजार स्वारांपर्यंत चाकरीस ठेवावें. तसेंच त्यांच्या मनसबा व जागीरा यांचा विचार होईतों सरदारास अर्धा रुपया व पदातीस पाव रुपया खजिन्यांतून देत जावा.

पुण्याचा ठाणेदार फख्रुद्दीनखान याचा अर्ज आला तो नजरेखालीं घातला. त्यानें 'शत्रूचे लोक ह्या जिल्ह्यामधें आले होते; मी स्वारी करून त्यांशीं सामना केला; अनेकांना मारून त्यांचा मोड केला.' असें लिहिलें होतें. त्यावर 'हें मान्य आहे, त्याच्या मरातिबाविषयीं अर्ज करावा' असा हुकूम झाला.

अश्रफखानानें अर्ज केला तो असा : कर्डे–निमोणें येथें असलेला खोजा हामिद यानें पत्र लिहिलें कीं, 'ह्या भागांत शत्रूची फार दंगल आहे व मजकडे किती लोक आहेत हें आपणांस माहीतच आहे. दोनशे स्वारांसह बाबाजी व दीडशे स्वारांसह परसोजी वगैरे चाकरीच्या आशेनें आले आहेत.' हुकूम झाला तो असा : उपर्युक्तास लिहावें कीं, शत्रूचे एक हजार स्वार आले तरी तुझ्याकडे असलेले लोक त्यांना पुरेसे आहेत, त्यांना तंबी द्यावी. शत्रूचे लोक फारच जास्त असतील तर तू आपल्या ठिकाणींच रहावें; त्यांचें पारिपत्य केलें जाईल. शत्रूचे लोक तुजकडे आले तर त्यांना हुजूर पाठवावें.

५४६

| | | |
|---|---|---|
| जु. २८ सफर १७<br>मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ صفر ۱۷ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۸ | श. १६०६ पौष वद्य ३<br>इ. १६८५ जानेवारी १३ |

عرضہ داشت قمرالدین پسر غازی‌الدین خان بہادر و خط رعدانداز خان کہ در تہانہ پونہ اند آمدہ بنظر گذشت معروض‌داشتہ بودند کہ جمعیت قافر بچہ قریب دو ہزار سوار آمدہ سر بفساد برداشتہ چنانچہ بندہا سواری نمودہ مقابلہ کردہ جنگ واقعہ شد و از اقبال حضرت بسیار کس را بقتل رسانیدہ و تا حال جنگ در پیش است و حقیقت کمی جمعیت بندہای معلوم امیدوار کومک اند بنا بران آتش خان را معہ یک ہزار چہار صد پنجاہ پنج سوار و یک شمشیر قبضہ انعام و دو ہزار روپیہ مساعدت دادہ اللہ یار بیگ ولد مغل خان مرحوم را خلعت دادہ نیت خیر فاتحہ خواندہ رخصت نمودہ بلطف‌اللہ خان فرمودند کہ سزاول دادہ ہما تعیناتیان را روانہ سازد و ہرکہ ایستادگی نماید برطرف شناسند ـ

فرمان و حسب الحکم بمهر جمدة الملک بنام بهره مند خان که در تهانه سیرول است و حسب الحکم بنام بهادرخان که جهته تنبیه مقهوران نزد بهره مند خان بیاید صادر شدند حواله محمد عاقل وغیره هفت نفر گرز بردار نموده حکم شد به تهانه داران سری راه بنویسد که بدرقه داده سلامت رسانند -

بختاور خان عرض نمود ابوالخیر ولد عبدالعزیز خان که در تهانه نولکه امره است خطی نوشته که جمعیت غنیم اینواحی آمده سر بفساد برداشته است و جمعیت همراهی بنده روشن است ازاقبال حضرت تنبیه خواهم نمود حکم شد آتش خان بتاکید تمام به پونه رفته بعد ازان کومک مشارالیه به نولکه امره بیاید -

از التماس گوبند راو جماعه دار پیاده قوم ماولیه بابت قلعه مفتاح الفتوح بعرض رسید که بنده پیاده ها را امیدوار منصب نموده بود چنانچه دراین ولا سه ۳ سه ۳ روپیه در ماه می نمایند امیدواریم منصب سرافراز نموده جای خدمت بفرمایند حکم شد الحال بدین مواجب قانع باشند -

गाझीउद्दीनखानाचा मुलगा कम्रुद्दीन याचा अर्ज व पुण्याचा ठाणेदार रअदअंदाझखान याचें पत्र आलें. दोन्ही नजरेखालीं घातलीं. त्यांनीं लिहिलें होतें कीं, संभाची जवळजवळ दहा हजार जमेत आली व तिनें बंड केलें होतें; म्हणून आम्ही स्वारी करून तिशीं सामना केला. लढाई होऊन बादशाही सुदैवानें अनेक लोक मारले. अजूनही लढाई चालू आहे. आमच्याकडे लोक कमी आहेत हें माहीतच आहे. कुमक पाठवाल अशी आशा आहे. तेव्हां आतिशखानाबरोबर १४५५ स्वार, एक तलवार बक्षीस व दोन हजार रुपये मदत दिली. मरहूम मुघलखानाचा मुलगा इलहयारबेग यास पोशाख देऊन व सदिच्छेबद्दल कुराणांतील भाग वाचून निरोप दिला व लुत्फुल्लाहखानास फर्मा-विलें कीं, सजावल देऊन नेमलेल्या सर्व लोकांस पाठवावें व जाणार नाहीं त्यास बडतर्फ समजावें.

शिरवळच्या ठाण्यांत असलेल्या बहरामंदखानाच्या नावें फर्मान व जुम्दतुल्मुल्काच्या शिक्याचा हस्बुलहुकूम तसेंच शत्रूला तंबी देण्यासाठीं बहरामंदखानाकडे येण्याबद्दल बहादुरखानाच्या नांवें हस्बुलहुकूम सादर झाला. हे मुहम्मद आकिल वगैरे सात गुर्जबर्दारांच्या बरोबर दिले. हुकूम झाला कीं, मार्गावरील ठाणेदारांना लिहावें कीं, त्यांना संरक्षणासाठीं सोबत देऊन सुरक्षित-पणें पोहोंचवावें.

बख्तावरखानानें अर्ज केला तो असा : अब्दुलअझीझखानाचा नवलाख-उमरें ठाण्यांत असलेला मुलगा अबुलखैर यानें पत्र लिहिलें कीं, 'शत्रूची फौज ह्या परिसरांत आली; पुंडाई चालू आहे; माझी फौज किती आहे हें माहीतच आहे. बादशाही सुदैवानें तंबी देईन. हुकूम झाला कीं, आतिशखानानें काळजीपूर्वक व्यवस्था करून, पुण्यास जाऊन, नंतर नवलाखउमरें येथें मदतीसाठीं जावें.

मावळ्यांच्या पायदळाचा जमादार गोविंदराव यानें 'मिफ्ताहुल्फुतूह (कोथळा) गड घेतल्याबाबत मी व माझें पायदळ मनसबीची आशा धरून होतों. आतां प्रतिमास प्रत्येकीं तीन तीन रुपये देत जावें; तसेंच मनसब देऊन उर्जित कराल व चाकरीची जागा द्याल अशी आशा करतों' असा अर्ज केला आहे. आहे त्यांत संतुष्ट रहावें असा हुकूम झाला.

५४७

| | | |
|---|---|---|
| जु. २८ सफर १८<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ صفر ۱۸ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۸ | श. १६०६ पौष वद्य ४<br>इ. १६८५ जानेवारी १४ |

سید عزت خان میر بخشی سرکار شاہ عالم بہادر را دیروز خلعت دادہ معہ پسر پانصد سوار جمعیت شاہزادہ جیو و دو صد سوار شاہزادہ معزالدین بہ ہمراہی آتش خان بہ نولکہ امرہ رخصت نمودہ حکم شد یک لک روپیہ و پنج ہزار اشرفی ازسرکار والا جہتہ طلب تنخواہ ملازمان بادشاہزادہ جیو معہ پسر تنخواہ دہند۔

دو نفر شتر سوار عرضہ داشت مرحمت خان کہ بردرہ قلعہ مفتاح الفتوح رفتہ است آوردہ بنظر گذرانیدہ معروض داشتہ بود کہ ہفت ہزار سوار جمعیت غنیم آمدہ بود خانہ زاد سواری نمودہ از اقبال حضرت بسیاری را بجہنم رسانیدہ و زخمی ساختہ شکست دادہ فتح بادشاہی شد فرمودند مجرای کلی شد۔ شمشیر جہتہ فخرالدین خان تہانہ دار سوپہ بابت فتح حوالہ جلال الدین کہ عرضہ داشت آوردہ بود نمودہ رخصت فرمودند۔

خانہ زاد خان عرض نمود رعدانداز خان کہ در پونہ است بہ بندہ خطی نوشتہ کہ جمعیت قافر بچہ در این نواحی آمدہ بود بندہ سواری نمودہ از اقبال حضرت ہفتاد نفر بقتل رسانیدہ و بسیاری را زخمی ساختہ و جمعیت مقہور گریختہ جانب نولکہ امرہ رفتہ فرمودند مجرای شد۔

शाहआलमचा मीर बक्षी सय्यिद इझ्झतखान यास काल पोशाख देऊन आणि स्वतःचा मुलगा, शाहझाद्याचे ५०० स्वार व मुइझ्झुद्दीनाचे २०० स्वार यांस आतिशखानाबरोबर देऊन नवलाखउमऱ्याकडे पाठविलें. हुकूम झाला कीं, बादशाही खजिन्यांतून एक लक्ष रुपये व ५००० अश्रफ्या शाहझाद्याच्या नोकरांच्या पगारासाठीं द्यावें.

मिफ्ताहुल्फुतूह (कोथळा) गडाच्या खोऱ्यांत गेलेल्या मरहमतखानाचा अर्ज घेऊन दोन सांडणीस्वार आले. 'शत्रूचे ७००० स्वार आले होते; बादशाही सुदैवानें स्वारी करून मी अनेकांना मारलें व जखमी केलें. त्यांचा मोड केला. बादशाही फत्ते झाली.' असें लिहिलें होतें. तो नजरेखालीं घातला. 'मान्य आहे' असा हुकूम झाला.

विजय मिळविल्याबद्दल सुप्याचा ठाणेदार फखुद्दीन यास देण्यासाठीं एक तलवार, त्याचा अर्ज आणणाऱ्या जलालुद्दीनाजवळ देऊन पाठविली.

'ह्या भागांत संभाचे लोक आले होते; मी स्वारी केली; बादशाही सुदैवानें सत्तर लोकांना मारलें व अनेकांना जखमी केलें. शत्रूचे लोक पळून नवलाखउमऱ्याकडे गेले,' असें पुण्यांत असलेल्या रअदअंदाझखानाचें पत्र खानहझादखानाकडे आल्याचा अर्ज आला. 'तें मान्य आहे' असा त्यावर हुकूम झाला.

५४८

| | | |
|---|---|---|
| जु. २८ सफर १९ गुरु. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۱۹ سنه<br>یوم الخمس سنه ۲۸ | श. १६०६ पौष वद्य ५<br>इ. १६८५ जानेवारी १५ |

محمد زمان گرزبردار عرضه داشت بهره مند خان آورده بنظر گذرانیده بعرض رسانید که خان مذکور معه فوج جهته تنبیه مردم غنیم از تهانه سیرول سواری نموده مابین تهانه کره نمونه و شکارپور گذشته آمدیم محمد اسمعیل گرزبردار دو هزار گاو رسد غله از حضور نزد بهره مند خان به تهانه سیرول برده بود چنانچه یک هزار هفت صد گاو رسد را مردم غنیم بغارت برده و سیصد ۳ گاو رسد به سوپه رسانیده آمده بعرض رسانید۔

मुहम्मद झमान गुर्जबर्दारानें बहरामंदखानाचा अर्ज आणला तो नजरेखालीं घातला. त्यांत शत्रूस तंबी देण्यासाठीं बहरामंदखान फौजेसह शिरवळा-

हून कडें निमोणें व शिकारपूर (शिक्रापूर) यामधून जाऊन आला असा मजकूर होता. मुहम्मद इस्माईल गुर्जबर्दारानें २००० बैल धान्य सरकारांतून बहरामंद-खानाकडे शिरवळ येथें नेलें होतें; पैकीं १७०० बैल धान्य शत्रूनें लुटून नेलें. ३०० बैल रसद सुष्यास पोहोंचविली असा अर्ज आला.

५४९

| | | |
|---|---|---|
| ज्यु. २८ सफर २१<br>शनि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۲۱ سنہ<br>یوم الثبت سنہ ۲۸ | श. १६०६ पौष वद्य ७<br>इ. १६८५ जानेवारी १७ |

چوں پسران عبدالعزیزخان تهانہ دار نولکہ امرہ مردم مقهوران را بجهنم رسانید ہ بنا بران بدین موجب حکم شد {حکم شد} لطف الله خان به بهره مند خان بنویسد کہ بہ تهانہ سیرول آمده خبردار باشد و محمد عاقل گرزبردار جماعہ ذیل را بہ تهانہ مذکور رسانیدہ بیاید۔

नवलाखउमऱ्याचा ठाणेदार व अबदुलअझीझखानाची मुलें यांनीं शत्रूच्या लोकांना ठार केलें होतें. म्हणून हुकूम झाला तो असा : लुत्फुल्लाहखानानें बहरामंदखानास लिहावें कीं, शिरवळास येऊन सावध असावें. मुहम्मद आकिल गुर्जबर्दारानें खालील लोकांना उपर्युक्त ठाण्यास पोहोचवून परत यावें. [येथील नावांत मराठा कोणी नाहीं]

५५०

| | | |
|---|---|---|
| ज्यु. २८ सफर २२<br>रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۲۲ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۸ | श. १६०६ पौष वद्य ८<br>इ. १६८५ जानेवारी १८ |

سید عزت خان را تا مقرر شدن تهانہ دار مادهہ واره نگاه داشتہ حکم شد در آن جا قلعچہ احداث نماید۔

माढावाड्याचा ठाणेदार नियुक्त होईपर्यंत सय्यिद इझ्झतखानास चाकरीस ठेवावें व तेथें गढी उभारावी असा हुकूम झाला.

५५१

| | | |
|---|---|---|
| ज्यु. २८ सफर २३<br>सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۲۳ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۸ | श. १६०६ पौष वद्य ९<br>इ. १६८५ जानेवारी १९ |

دلیر ولد بهادر خان مرحوم را تهانہ داری آونت گره ملک جدید مقرر

نموده هزاری ذات هشت صد سوار منجمله دو صد سوار دو اسپه بود پانصدی ذات دو صد سوار بابت کمی مشروط اضافه نموده حکم شد مدهوجی وغیره پسران و خویشان بجاجی متوفی وغیره دو هزار چهل و یک سوار از تعیناتیان فوج خان جهان بهادر همراه مشارالیه تعین نماید۔

नुकत्याच ताब्यांत आलेल्या अहिवंतगडाच्या ठाणेदारीवर मरहूम बहादुरखानाचा मुलगा दिलेर यास नेमलें. तो १००० जात, ८०० स्वार - पैकीं २०० स्वार दुघोडी - असा मनसबदार होता. त्याचे ५०० जात व २०० स्वार कमी केले होते ते सशर्त वाढविले. हुकूम झाला कीं, उपर्युक्ताबरोबर कै. बजाजी याचे मुधोजी वगैरे मुलगे व नातेवाईक, तसेंच खानजहान बहादुराच्या फौजेंतील २०४१ स्वार नेमावे.

५५२

| जु. २८ सफर २४<br>मंगळ. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۲۸ سنه<br>یوم الثلث سنه ۲۸ | श. १६०६ पौष वद्य ११<br>इ. १६८५ जानेवारी २० |
|---|---|---|

از زبانی هرکاره ها بعرض رسید که جمعیت غنیم نواحی پارنیر آمده نمایان شده حکم شد غضنفرخان معه فوج هفت صد سوار اسپ قمچی دویده رفته مردم غنیم را بجهنم رسانیده بیاید و لطف الله خان به عبدالکریم تهانه دار پارنیر و خوجه حامد که در تهانه کره نمونه است بنویسد که باتفاق یک دیگر مردم غنیم را تهه تیغ کردانیده [باشند*] حواله حبیب الله گرز بردار نماید۔

خسرو بیگ صحبت یساول مردم بیلدار و سنگ تراش و سرب وغیره بتعلقه مفتاح الفتوح رسانیده آمده بعرض رسانیده حکم شد غضنفرخان جهته تنبیه غنیم جانب پارنیر سواری نموده همراهی خان مذکور را سزاولی کرده برساند۔ فرمان و یک قبضه شمشیر بابت فتح غنیم بمرحمت خان حواله محمد وصال وغیره گرز بردار فرمودند۔

हरकाऱ्यांकडून तोंडीं समजलें कीं, पारनेरच्या आसपास शत्रूचे लोक आलेले दिसले. तेव्हां हुकूम झाला कीं, घझनफरखानानें ७०० स्वारांसह जाऊन शत्रूस मारून परत यावें. पारनेरचा ठाणेदार अब्दुलकरीम व कडें-निमोणें येथील खोजा हामिद यास लुत्फुल्लाहखानानें लिहावें कीं, त्यांनीं एकमेकांच्या सहकार्यानें शत्रूसैन्यास कापून काढावें. हें हबीबुल्लाह गुर्जबर्दाराजवळ

द्यावें. यसावलचा सोबती खुस्रवबेग यानें बेलदार, पाथरवट, शिसें, वगैरे मिफ्ताहुल-फुतूह (कोथळा) गड येथें पोहोंचविल्याचा अर्ज केला. त्यावर हुकूम झाला कीं, त्यानें शत्रूस तंबी देण्यासाठीं पाठविलेल्या घझनफरखानाची सजावली करून त्यास पारनेरास पोहोंचवावें. तसेंच शत्रूवर विजय मिळविल्याबद्दल मरहमतखानासाठीं फर्मान व एक तलवार मुहम्मदसाल वगैरे गुर्जबर्दारांजवळ द्यावी.

५५३

| जु. २८ सफर २५ बुध. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۲۵ سنه<br>بوم الاربعه سنه ۲۸ | श. १६०६ पौष वद्य १२<br>इ. १६८५ जानेवारी २१ |
|---|---|---|

اشرف خان عرض نمود که خوجه حامد از تهانه کره نمونه خطی نوشته که بتاریخ ......شهرحال دو گهری روز برآمده مردم هرکاره خبر آوردند که قریب هفت صد سوار جمعیت مقهور موضع تل (مل*) تهان که از این جا شش کروه واقعه است قبل نموده بنابر بنده بهیر را گذاشته به محمد صوفی فوجدار این جا تاکید نموده جهته تنبیه مقهوران اسپ قمچی رفته خبر رسید که موضع سیرور شتافته اند بنده به یلغر در آن جا رسیده مقهوران بند مویشی وا گذاشته دو کس از رعایا زخمی نموده رو بفرار نهادند در این اثنا جیواجی برادر مانکوجی تهانه‌دار شکارپور با جمعیت آمده ملاق شده و بنده به تعلقه خود آمده جهته محافظت بهیر جای نیست حکم شد متصل گدهی احاطه طیار شده هنگام سواری در آن جا گذاشته می رفته باشند۔

अश्रफखानानें अर्ज केला तो असा : कर्डे–निमोणें येथून खोजा हामिद यानें पत्र लिहिलें आहे कीं, चालू महिन्याच्या........तारखेस दोन घटका दिवस आल्यावर हरकाऱ्यांनीं बातमी आणली कीं, शत्रूचे ७०० स्वार येथून ६ कोसांवर मलठण येथें आले आहेत. म्हणून मी बुणग्यांना पाठीमागें सोडून व तेथील फौजदार मुहम्मद सूफी यास ताकीद देऊन शत्रूला तंबी देण्यासाठीं स्वारी केली. तेथें बातमी मिळाली कीं, शत्रू शिरूर येथें गेला. मी त्वरेनें तेथें पोहोंचलों. शत्रूनें बंदी व जनावरें तेथें ठेविलीं व तेथील लोकांपैकीं दोघांस जखमी करून तो पळून गेला. त्या वेळीं शिक्रापूरचा ठाणेदार माणकोजी याचा भाऊ जिवाजी यानें आपल्या लोकांसह येऊन माझी भेट घेतली व नंतर मी माझ्या तालुक्यास आलों. बुणग्यांना सुरक्षित ठेवण्यासाठीं योग्य ठिकाण नाहीं.

हुकूम झाला कीं, गढीच्या भोंवतीं तट बांधावा व स्वारीच्या वेळीं त्यांना तेथें ठेवून स्वारीस जावें.

५५४

जु. २८ सफर २६ गुरु.

سیاهہ اخبارات دربار معلے
ماہ صفر ۲٦ سنہ
یوم الخمس سنہ ۲۸

श. १६०६ पौष वद्य १३
इ. १६८५ जानेवारी २२

مرشد قلی خان فوجدار ملکاپور سیصدی ۳ ذات سیصد ۳ پنجاہ سوار بود پنجاہ سوار اضافہ فرمودند۔

حاجی خوجہ وغیرہ سہ ۳ منصبدار عرضداشت غازی الدین خان بہادر آوردہ بنظر گذرانیدہ معروض داشتہ بود کہ بندہ از اقبال حضرت نظام پور وغیرہ سہ ۳ جای تعلق سنبہا مقہور بخاک برابر ساختہ آتش دادہ و بند و مویشی بدست آوردہ فتح نمودہ بعد ازآن باڑی قلعہ راہیری کہ درآن سنبہا مقہور بود رسیدہ تاخت و تاراج نمودہ آتش دادہ و مقہور بعد استماع فوج بادشاہی معہ متعلقان بالای قلعہ مذکور رفتہ و آنچہ نواحی آباد اند تاخت و تاراج می نمایم بعد مطالعہ تعریف خان مذکور نمودہ فرمودند آفرین باد خوب تلاش کردہ در آن جا رسیدہ و مراتب منصبداران کہ عرضداشت آوردہ بعرض رسانند۔

نوکران سنبہا مقہور بتجویز شاہ عالم بہادر نو سرافراز فرمودند۔
دھناجی کشن راو بھگونت راو میواجی و رنگاجی

मलकापूरचा फौजदार मुर्शिदकुलीखान हा ३०० जात, ३५० स्वार असा मनसबदार होता; त्यांत ५० स्वारांची वाढ केल्याचा हुकूम झाला.

हाजी खोजा वगैरे ३ मनसबदारांनीं गाझीउद्दीनखानाचा अर्ज आणून नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, ' मी बादशाही सुदैवानें संभाच्या तालुक्यांतील निजामपूर वगैरे तीन ठिकाणें जमीनदोस्त करून जाळून टाकलीं. बंदी व जनावरें हातीं येऊन मला विजय मिळाला. त्यानंतर किल्ले राहेरी येथील बाडीत संभा होता तेथें पोहोंचलों व ती लुटून जाळली. संभा, बादशाही फौजेबद्दल बातमी मिळाल्यावर, आपल्या नातेवाइकांसह किल्ल्यावर गेला. येथील जवळपासचा वस्ती असलेला भाग लुटीत आहे. अर्ज पाहिल्यावर बादशाहानें उपर्युक्त खानाची तारीफ करून त्यानें उत्तम कष्ट घेतल्याबद्दल त्यास शाबासकी दिली व हुकूम केला कीं, उपर्युक्त खानाचा अर्ज आणणाऱ्या मनसबदाराच्या मरातिबाबद्दल अर्ज करावा.

शाहआलम याच्या तजविजीनें संभाच्या नोकरांचे ऊर्जित केल्याचा हुकूम झाला. धनाजी, किशनराव, भगवंतराव, मेवाजी व रंगाजी.

५५५

| | | |
|---|---|---|
| ज़ु. २८ सफर २८<br>मंगळ. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۲۸ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۸ | श. १६०६ पौष वद्य ३०<br>इ. १६८५ जानेवारी २४ |

غضنفر خان معہ فوج جہتہ تنبیہ مردم غنیم کہ جانب پارنیر رفتہ بود مقہوران گریختہ رفتہ شده آمده یک مہر نذر گذرانیده۔

حکم شد لطف‌الله خان بہ آتش خان بنویسد هرگاه غازی‌الدین خان بہادر بالای گہات برگشتہ برسد شما معہ همراهیان بحضور بیاید۔

از نوشتہ بہره‌مند خان بعرض رسید غازی‌الدین خان بہادر موضع پانچوری باری قلعہ راهیری و قصبہ نظام‌پور وغیره مقہور تاخت و تاراج نموده بملک بادشاهی روانہ شد۔

पारनेरकडे घझनफरखान फौजेसह शत्रूला तंबी देण्यासाठीं गेला होता. परंतु शत्रू पळून गेला. खानानें येऊन एक मोहोर भेट दिली.

हुकूम झाला कीं, लुत्फुल्लाहखानानें आतिशखानास लिहावें कीं, त्यानें गाझीउद्दीनखान बालाघाटावरून परत आल्यावर आपल्या लोकांसह परत यावें.

बहरामंदखानाच्या लिहिण्यावरून समजलें कीं, गाझीउद्दीनखानानें शत्रूच्या प्रांतांतील किल्ले राहेरी येथील पाचोरी (पाचाड) वाडी व कसबे निजामपूर वगैरे लुटलें व त्यांचा नाश करून बादशाही मुलखास रवाना झाला.

५५६

| | | |
|---|---|---|
| ज़ु. २८ सफर २९<br>रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه صفر ۲۹ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۸ | श. १६०६ माघ शुद्ध १<br>इ. १६८५ जानेवारी २५ |

دیروز خوجہ محمد صادق وغیره چہار نفر منصبدار عرضہ داشت غازی‌الدین خان بہادر آورده بنظر گذرانیده معروض داشتہ بود کہ بنده بعد تاخت موضع پانچوری باری قلعہ راهیری وغیره بمفاصلہ دو کروه از قلعہ مذکور دیره نموده بود چنانچہ سنبہا مقہور همیر راو و روپا بہونسلہ را معہ پانزده ۱۰ هزار سوار فرستاده بنده سواری نموده جنگ تیر و تفنگ در پیش آمده چنانچہ بندها از هر چہار طرف بر مقہوران افتادند جنگ کوتہ یراق نموده غنیم تاب نیاورده

گریختہ رفتند و بندہ هفت کروه تعاقب نموده بسیار کس را بجهنم رسانیده و زخمی نموده فتح بادشاهی شد در آن جا برگشتہ بدیره مذکور آمده در آن جا مقام نموده و آنچہ آبادانی در آن جا بود تاراج نموده و یک ماه را آذقہ بود خرچ شده بنابران کوچ نموده بسمت دره مفتاح الفتوح روانہ شده بتاریخ ۲۹ شهر حال بالای گہات خواهم آمد بعد مطالعہ بہ خان مذکور خطاب فیروز جنگ سرافراز نموده بتفصیل ذیل اضافہ و انعام مرحمت فرمودند خان مشارالیہ اندر سنگہ راتهور ناهر خان تهانہدار سیرول مانکوجی یعقوب ولد عبدالعزیز خانی شریف خان عرف خان میرزا قادر خان دلپت ولد سوبهکرن بندیلہ۔

عبدالرسول خان تهانہدار سیواپور دو هزاری ذات هزار سوار منجملہ دو صد سوار دو اسپہ از آن جملہ پانصدی ذات دو صد سوار مشروط بود پانصدی ذات بلا شرط نموده خلعت دادند۔

खोजा मुहम्मद सादिक वगैरे चार मनसबदारांनीं काल गाझीउद्दीन-खानाचा अर्ज आणला तो नजरेखालीं घातला. त्यानें कळविलें कीं, 'मी मौजे पाचोरीबाडी, किल्ले राहिरी वगैरेवर हल्ले करून त्या किल्ल्यापासून दोन कोस अंतरावर डेरा दिला होता. तेव्हां संभानें हंबीरराव व रूपा भोसले यांना पंधरा हजार फौजेसह पाठविलें. बाण व बंदुका यांची लढाई झाली. आम्ही चारी बाजूंनीं शत्रूशीं छोट्या हत्यारांनीं लढाई केल्यामुळें त्यास निभावणें अशक्य होऊन त्यानें पळ काढला. आम्ही सात कोसपर्यंत पाठलाग केला; त्याचे अनेक लोक मारले व जखमी केले आणि बादशाही फत्ते झाली. आम्ही परत डेऱ्यास येऊन मुक्काम केला. तेथें सुबत्ता होती तिची लूट केली. एक महिन्याची तरतूद होती ती खर्च झाली तेव्हां कूच केलें व मिफ्ताहुलफुतूह दरीच्या परिसरांत गेलो. या महिन्याच्या दि. २९ला घाटावर पोहोंचू. हें वाचल्यावर सदरहू खानास फीरोझजंग हा किताब देऊन बहुमान केला. उपर्युक्त खान इंद्रसिंग राठोड, शिरवळचा ठाणेदार नाहिरखान, माणकोजी, याकूब वलद अब्दुलअझीझखानी, शरीफखान उर्फ खान मीर्झा क़ादिरखान, दलपत वलद शुभकरण बुंदेला यांचें ऊर्जित केलें व बहुमान केला.

शिवापूरचा ठाणेदार अब्दुर्रसूलखान यास २००० जात व १००० स्वार अशी मनसब होती. पैकीं २०० स्वार दुघोडी होते आणि ५०० जात, २०० स्वार सशर्त होते. आतां ५०० जात बिनशर्त केले व मानाचे कपडे दिले.

५५७

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रवल २<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع الاول ۲ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۸ | श. १६०६ माघ शुद्ध ४<br>इ. १६८५ जानेवारी २८ |

انعام داده بہ تہانہ مادھوارہ رخصت نموده قاضی محمد راماجی ماولیہ
بعرض رسید کہ حبیب اللہ خان تہانہ دار اینداپور احوال پریشان دارد دواب معاف شود حکم شد دامہای عیوض دواب وضع نمایند۔
راماجی و نراین جی عرضہ داشت جگدیوراو زمیندار سری رنگ پتن آورده بودند درین ولا قول {و} پنجہ حوالہ نموده هردو را خلعت داده رخصت فرمودند۔

काझी मुहम्मद व रामाजी मावळे यांना इनाम देऊन माढेवाड्यास पाठविलें.
अर्ज आला कीं, इंदापूरचा ठाणेदार हबीबुल्लाहखान याची परिस्थिति वाईट आहे. तरी दवाब ( पशुधन ) माफ व्हावा. हुकूम झाला कीं, दवाबाच्या ऐवजीं त्याची किंमत वजा करावी.

रामाजी व नारायणजी यांनीं श्रीरंगपट्टणचा जमीनदार जगदेवराव याचा अर्ज आणला होता. त्यांजवळ कौल व पंजा आणि दोघांस खिलत देऊन परत पाठविण्याचा हुकूम झाला.

५५८

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रवल ३<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع الاول ۳ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۸ | श. १६०६ माघ शुद्ध ५<br>इ. १६८५ जानेवारी २९ |

لطف اللہ خان عرض نمود بہره مند خان در تہانہ سرول بیمار است فرمودند بنویسد فوج همراهی خود نزد امان اللہ خان در تہانہ مذکور گذاشتہ با جمعیت خود بحضور بیاید و حکیم محمد معصوم معالجہ نماید۔
از نوشتہ ملک بیگ و شیخ محمد حسین نوکران سنبہا مقہور بعرض رسید کہ بندها امید بندگی آمده هفت کروه از پونا این طرف رسیده و جمعیت همراه آوردن از ملک مقہور دشوار بود بنابران جریده آمده احوال پریشان است چیزی مساعدت و حسب الحکم درباب شده مرحمت شود حکم شد حیدر خان ازطرف خود بنویسد کہ بخاطرجمع بیایند بقدر حال سرافراز نموده خواهد شد۔
از التماس خوجہ حامد بعرض رسید کہ راهون گانو ازکره نمونہ هفسد کروه

در دریا بهمره واقع است مردم غنیم قریب پنجاه کس هنگام شب طریق دزدی می آیند اگر حکم شود هنگام شب جهت تنبیه مفسدان سواری می نموده باشم حکم شد لطف‌الله خان بمرحمت خان بنویسد که یک منصبدار از همراهی خود با جمعیت به تهانه راهو گانو بفرستد۔

लुत्फुल्लाहखानानें अर्ज केला कीं, शिरवळ येथें बहरामंदखान आजारी आहे. हुकूम झाला कीं, त्यानें स्वतःची फौज अमानुल्लाहखानाकडे उपर्युक्त ठाण्यांत ठेऊन आपल्या लोकांबरोबर हुजूर यावें. मुहम्मद मअसूम वैद्यानें उपचार करावे.

संभाचे नोकर मलिकबेग व शेख मुहम्मद हुसैन यांच्या लिहिण्यावरून समजलें तें असें : आम्ही चाकरीच्या हेतूनें पुण्याहून सात कोस अलीकडे आलों आहों. शत्रूच्या मुलखांतून जमेत आणणें कठीण होतें. म्हणून एकटेच आलों आहों. परिस्थिति वाईट असल्यामुळें कांहीं तरी मदत मिळावी. आमच्या बाबत हस्बुलहुकूम व मदत यांची कृपा व्हावी. यावर हुकूम झाला तो असा : हैदरखानानें स्वतः लिहावें कीं, त्यांनीं खातरजमा ठेवून यावें. त्यांना सध्याच्या परिस्थितीप्रमाणें नवीन मानकरी करूं.

खोजा हामिद याच्या विनंतीवरून समजलें कीं, राहू हा गांव भीमा नदीवर असून कर्डे–निमोण्यापासून सात कोसांवर आहे. शत्रूचे पन्नास लोक रात्रीं चोरासारखे येत असतात. हुकूम झाला तर शत्रूला तंबी देण्यासाठीं रात्रींच स्वारी करावी अशी इच्छा करितों. यावर हुकूम झाला तो असा : लुत्फुल्लाहखानानें मरहमतखानास लिहावें कीं, स्वतःच्या एका मनसबदाराबरोबर लोक देऊन राहू गांवास पाठवावें.

५५९

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रवल ४<br>शुक्र. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول ۴ سنه<br>یوم الجمعه سنه ۲۸ | श. १६०६ माघ शुद्ध ६<br>इ. १६८५ जानेवारी ३० |

اززبانی هرکاره بعرض رسید که جمعیت مقهور جانب پرینده آمده می خواهد که شوخی نمایند حکم شد که اعتقاد خان رفته تنبیه نماید بعرض رسید که خان مذکور بیمار است حکم شد فوج خان مذکور همراه غضنفر خان معه فوج طلایه رفته تنبیه رساند۔

از زبانی هرکاره بعرض رسید جمعیت قافر بچه از قلعه های فرود آمده می‌خواهد نواحی قادرآباد شوخی نماید فرمودند سید اوغلان معه گرز برداران جهت تنبیه مقهوران برود چنانچه مشارالیه اسپ قمچی دویده هرگاه دو کروه از قادرآباد این طرف رسیده معروض داشته که جمعیت مقهور زیاده است و همراه فدوی معلوم حکم شد ملتفت خان بخشی سرکار شاه عالم بهادر بمعه جمعیت هزار سوار بادشاهزاده جیو بکومک مشارالیه رفته باتفاق یکدیگر تنبیه رسانند۔

لطف‌الله خان عرض نمود که شهاب‌الدین تهانه‌دار اکوله یازده اسپ ساده و چهار بهاله و یک نشان و بیست دو شمشیر و دهوپ بگذرانید چنانچه بنظر گذرانیده حکم شد جنس را حواله محمد علی خان و بندی را حواله اهتمام خان نمایند۔

हरकाऱ्यांकडून तोंडीं समजलें कीं, शत्रूचे लोक परिंड्याकडून येऊन खोडी काढतात. हुकूम झाला कीं, इअतिकादखानानें जाऊन त्यांस तंबी द्यावी. नंतर समजलें कीं, उपर्युक्त खान आजारी आहे. हुकूम झाला कीं, सदरहू खानाची फौज घझनफरखानाबरोबर देऊन गस्त घालणाऱ्या फौजेसह त्यानें जाऊन तंबी द्यावी. आणखी समजलें कीं, संभाजीची फौज किल्ल्यांतून खालीं येऊन कादिराबादच्या आसपास खोडी काढूं पहात आहे. हुकूम झाला कीं, सय्यिद ओघलान यानें गुर्जबर्दारांसह जाऊन तंबी द्यावी. नंतर उपर्युक्त घोड्यावर बसून गेला. तो कादिराबादेच्या अलीकडे दोन कोसांवर असतां 'शत्रूचे लोक जास्त आहेत व माझे लोक हुजुरास माहीत आहेत' असा त्यानें अर्ज केला. तेव्हां फर्माविलें कीं, शाहआलमचा बक्षी मुल्तफितखान यानें शाहजाद्याचे एक हजार स्वार बरोबर घेऊन उपर्युक्ताच्या मदतीसाठीं जाऊन एकमेकांच्या सहकार्यानें शत्रूस तंबी द्यावी.

लुत्फुल्लाहखानानें अर्ज केला कीं, अकोल्याचा ठाणेदार शिहाबुद्दीन यानें ११ घोड्या, ४ भाले, १ निशाण, २२ तलवारी व १ धूप या वस्तू मुहम्मद अलीखानाजवळ द्याव्या व कैद्यांना इहतिमामखानाच्या स्वाधीन करावें.

५६०

| जु. २८ रवल ५<br>शनि. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول ۵ سنه<br>یوم الثبت سنه ۲۸ | श. १६०६ माघ शुद्ध ७<br>इ. १६८५ जानेवारी ३१ |
|---|---|---|

راماجی و گوبندجی سرداران ماولیہ ہرکدام پانصدی ذات دو صد سوار نوسرافراز فرمودند۔

حسب الحکم بنام بہره مند خان مضمون آنکہ سابق شما [را*] حکم شده بود کہ فوج همراهی خود همراه امان‌الله خان گذاشتہ بحضور بیاید درین ولا موقوف نموده باید کہ معہ فوج از تہانہ سیرول در بہادرگده آمده معالجہ نماید و اگر بخواهد متعلقان خود را بطلبیده. حوالہ محمد عاقل گرز بردار نموده۔

سید اوغلان جہتہ تنبیہ غنیم قادرآباد رفتہ بود آمده بعرض رسانید کہ مردم مقہور گریختہ رفتند حکم شد کہ شما برائے طلایہ بجای غضنفرخان سواری می نموده باشند۔

मावळ्यांचे सरदार रामाजी व गोविंदजी या प्रत्येकास ५०० जात व २०० स्वार असे नवीन मानकरी केलें.

बहरामंदखानाच्या नांवें हस्बुलहुकूम गेला तो असा : ‘ पूर्वी तुला हुकूम झाला होता कीं, स्वतःची फौज अमानुल्लाहखानाबरोबर देऊन हुजूर यावें. परंतु तो आतां स्थगित झाला असून तू फौजेसह शिरवळहून बहादूरगडास यावें व तेथेंच उपचार करून घ्यावे. हा हुकूम मुहम्मद आकिल गुर्जबर्दार याचे स्वाधीन केला.

शत्रूला तंबी देण्यासाठीं सय्यिद ओघलान कादिराबादेकडे गेला होता. त्यानें येऊन अर्ज केला कीं, शत्रूचे लोक पळून गेले. हुकूम झाला कीं, तू घझनफरखानाच्या ऐवजीं गस्त घालण्यासाठीं स्वारी करीत असावे.

५६१

| जु. २८ रवल ६<br>रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ربیع‌الاول ۶ سنہ<br>یوم‌الاحد سنہ ۲۸ | श. १६०६ माघ शुद्ध ८<br>इ. १६८५ फेब्रुवारी १ |
|---|---|---|

آتش خان بموجب حکم بمعہ فوج ازسوبہ آمده ملازمت نموده دو مہر نذر گذرانید۔

لطف‌الله خان عرض نمود کہ غضنفرخان خطی نوشتہ کہ جمعیت غنیم بمفاصلہ چہار کروه ازقادرآباد آمده بود گریختہ رفتہ درپی آنہا میرود هرجا کہ حکم شود جہتہ تنبیہ آنہا بروم حکم شد تا دریای بہیمره برود اگر جمعیت مقہور این طرف دریا مذکور باشد تنبیہ رساند والا همون جا مانده معروض دارد بموجب کہ حکم شود برآن عمل نمایند۔

हुकुमाप्रमाणें आतिशखान फौजेसह पुण्याहून आला. त्यानें भेट घेऊन दोन मोहरा नजर केल्या.

लुत्फुल्लाहखानानें अर्ज केला तो असा : घइनफरखानानें पत्र लिहिलें आहे कीं, शत्रूचे लोक कादिराबादेपासून चार कोसांवर येऊन पळून गेले; त्यांच्या पाठलागावर जात आहे. हुकूम होईल तेथें तंबी देण्यासाठीं जाईन. हुकूम झाला कीं, भीमा नदीपर्यंत जावें व शत्रूचे लोक नदीच्या या बाजूस असतील तर त्यांना तंबी द्यावी. नाहीं तर तेथेंच थांबावें. त्यानें अर्ज केला कीं, हुकुमाप्रमाणें वागत आहे.

५६२

जु. २८ रवल ७ सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے ماہ ربیع الاول ۷ سنہ یوم الاثنا سنہ ۲۸ | श. १६०६ माघ शुद्ध ९ इ. १६८५ फेब्रुवारी २

از واقعہ گلشن آباد بعرض رسید جمعیت مقہور درین جا آمده بنابر آتش خان را یک قبضہ خنجر انعام داده معہ فوج جہتہ تنبیہ غنیم جانب گلشن آباد رخصت نموده فرمودند الله یار بیگ مشرف قراولان رعداندازخان را از کره نمونہ و محمد طفل گرزبردار مرحمت خان را از نولکہ امره و محمد خلیل را از سونیر سزاولی نموده جہتہ تنبیہ مقہوران بہ گلشن آباد رسانیده بیاید۔

مراد بیگ یساول وغیره هفت نفر چلہ عرضہ داشت بہره مند خان آورده بنظر گذرانیده معروض داشتہ بود جمعیت مقہور از ملک پادشاهی بند و سواسی سپردند خانہ زاد سواری نموده در تہانہ مولہیر مقابلہ نموده جنگ واقعہ شده از اقبال حضرت بسیار بجہنم و زخمی نموده شکست داده اسپان ماده و بہالہ وغیره تاراج بدست آورده و اکثر ابن جانب بکار آمدند و مفصل از واقعہ بعرض خواهد رسید۔

بلطف الله خان فرمودند حسب الحکم بہ ابوالخیر خان پسر عبدالعزیز خان بنویسد کہ در تہانہ نولکہ امره آمده خبردار باشد۔

از نوشتہ رعداندازخان بعرض رسید کہ گوبند راو نوکر مقہور امید بندگی نزد بنده آمده است بمنصب سرافراز شود حکم شد بحضور فرستند۔

गुल्शनाबादेच्या घटनांवरून समजलें कीं, शत्रूचे लोक इकडे आले आहेत. म्हणून आतिशखानास एक खंजीर बक्षीस देऊन शत्रूला तंबी देण्यासाठीं गुल्शनाबादेकडे फौजेसह जाण्यासाठीं निरोप दिला. हुकूम झाला

कीं, करावलांचा मुश्रीफ इलहयारबेग यानें रअदअंदाझखानास कडें–निमोण्याहून मुहम्मद तुफल गुर्जबर्दारानें मरहमतखानास नवलाखउमऱ्याहून व मुहम्मद खलील यास शिवनेरीहून सजावली करून शत्रूला तंबी देण्यासाठीं गुल्शनाबादेस पोहोंचवून परत यावें.

मुरादबेग यसावल वगैरे ५ चेल्यांनीं बहरामंदखानाचा अर्ज आणून नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, शत्रूचे लोक बादशाही मुलखांतून बंदी व जनावरें नेत आहेत. म्हणून मी स्वारी करून मुल्हेर येथें शत्रूशीं सामना दिला. लढाई होऊन बादशाही सुदैवानें शत्रूचे अनेक लोक मारले व जखमी केले. शत्रूचा मोड केला. घोड्या, भाले वगैरे लूट हातीं आली. आपले बहुतेक लोक कामास आले. घटनेचा तपशिलवार वाका येईल.

लुत्फुल्लाहखानास हुकूम झाला कीं, अब्दुलअझीझखानाचा मुलगा अबुलखैरखान यास हस्बुलहुकूम लिहावा कीं, नवलाखउमरे येथें येऊन सावध असावें.

रअदअंदाझखानाच्या लिहिल्यावरून समजलें तें असें : शत्रूचा नोकर गोविंदराव हा चाकरीच्या आशेनें मजकडे आला आहे, त्यास मनसब द्यावी. हुकूम झाला कीं, त्यास हुजूर पाठवावें.

५६३

| जु. २८ रवल ८<br>मंगळ. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الاول ۸ سنہ<br>یوم الثلث سنہ ۲۸ | श. १६०६ माघ शुद्ध ९<br>इ. १६८५ फेब्रुवारी ३ |
|---|---|---|

لطف‌الله خان عرض نمود بهره مند خان به بنده نوشتہ کہ بتاریخ نہم شہر حال از تہانہ بہادر گدہ آمده خبردار شد۔

लुत्फुल्लाहखानानें अर्ज केला कीं, बहरामंदखानानें मला ‘चालू महिन्याचे ९ तारखेस बहादुरगडाहून आलों. सावध आहे,’ असें पत्र लिहिलें आहे.

५६४

| जु. २८ रवल ९<br>बुध. | سیاسه اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الاول ۹ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۸ | श. १६०६ माघ शुद्ध १०<br>इ. १६८५ फेब्रुवारी ४ |
|---|---|---|

لودی خان قلعدار سانگولہ را تہانہ داری ساجره (ناجره) تجویز روح‌الله خان

نیز مقرر نموده هزاری ذات هشت صد سوار منجمله صدی مشروط بود بلا شرط نموده دو صد سوار اضافه فرمودند۔

عرضه داشت سید منور خان آمده بنظر گذشت معروض داشته بود که فدوی اکرم خان تهانه‌دار گلشن‌آباد را جهته حراست شهر گذاشته بمعه جمعیت خود و دو صد سوار از تعیناتیان تهانه جهته تنبیه مقهوران که دراین ضلع آمده سواری نموده از اقبال حضرت تنبیه خواهم کرد۔

रूहुल्लाहखानाच्या तजविजीनें सांगोल्याचा किल्लेदार लोदीखान यास माजरा (नाझरें) येथील ठाणेदारीवर नेमलें. तो १००० जात, ८०० स्वार असा मनसबदार होता; पैकीं १०० सशर्त होते ते बिनाशर्त करून २०० स्वारांच्या वाढीचा हुकूम केला.

सय्यिद मुनव्वरखानाचा अर्ज येऊन नजरेखालीं गेला. त्यानें लिहिलें होतें कीं, 'मी गुल्शनाबादेचा ठाणेदार अक्रमखान यास शहराच्या संरक्षणासाठीं ठेवून माझे लोक व त्या ठाण्यांत नियुक्त केलेल्या स्वारांपैकीं २०० स्वार घेऊन या जिल्ह्यांत आलेल्या शत्रूला तंबी देईन.

५६५

| जु. २८ रवल १० गुरु. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع‌الاول ۱۰ سنه<br>یوم الخمس سنه ۲۸ | श. १६०६ माघ शुद्ध ११<br>इ. १६८५ फेब्रुवारी ५ |
|---|---|---|

انعام

کشناجی را تعیناتی فوج سید عزت‌خان رخصت نموده خلعت بهادرعلی‌خان جهته سیر نمودن جانوران جام‌کهیره رفته است عرضه داشت بهروزخان تهانه‌دار تهالنیر آمده معرفت لطف‌الله خان بنظر گذشت معروض داشته بود که جمعیت مقهور هنوز گده آمده بود فدوی بسبب بیماری سواری نکرده محمد اسمعیل خانه‌زاد را معه جمعیت جهته تنبیه مقهوران تعین نموده آخرش خانه‌زاد رفته مقابله کرده جنگ واقعه شده بسیارکس را بقتل رسانیده شکست داده فتح بادشاهی شد و نقاره و بهاله وغیره نامسردار بدست آورده بعد مطالعه حکم شد لطف‌الله خان به خان مذکور بنویسد که مجرای کلی شد۔

زبانی هرکاره ها بعرض رسید که جمعیت مقهور نواحی گلشن‌آباد آمده بود می‌خواهد جانب اورنگ‌آباد رفته شوخی نمایند بنابران بدین موجب حکم شد۔

बक्षीस—किशनाजी यास सय्यिद इझ्झतखानाच्या फौजेंत नेमून पाठविलें व खिलत दिली.

जनावरें हिंडविण्यासाठीं बहादुरअलीखान जामखेड्यास गेला. थाळनेरचा ठाणेदार बहरूझखान याचा अर्ज आला तो लुत्फुल्लाहखानाच्या मार्फतीनें नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, शत्रूचे लोक हनवंतगडास आले होते. मी आजारामुळें स्वारी केली नाहीं. मुहम्मद इस्माईल वगैरे लोक बरोबर देऊन त्यास शत्रूला तंबी देण्यासाठीं नेमलें. त्यानें शत्रूशीं सामना दिला. लढाई झाली व अनेकांना मारून त्यांचा मोड केला. बादशाही फत्ते होऊन शत्रूच्या सरदाराचा भाला व नगारा हातीं आले. पाहिल्यावर हुकूम झाला कीं, लुत्फुल्लाहखानानें खान मजकुरास लिहावें कीं, मान्य आहे.

हरकाऱ्यांकडून तोंडीं समजलें कीं, शत्रूचे लोक गुल्शनाबादेच्या आस-पास आले होते. त्यांचा औरंगाबादेकडे जाऊन खोडी काढण्याचा विचार आहे. तेव्हा हुकूम झाला. [येथून पुढील कांहीं अंश नाहींसा झाला असावा.*]

५६६

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रवल ११<br>शुक्र. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الاول ۱۱ سنہ<br>یوم الجمعہ سنہ ۲۸ | श. १६०६ माघ शुद्ध १२<br>इ. १६८५ फेब्रुवारी ६ |

خوجہ ایاز عرض نمود وکیل آتش خان التماس میدارد هرگاه موکل متصل گلشن آباد رسیده جاسوسان خبر آوردند کہ جمعیت مقهور از نواحی گریختہ بسمت بگلانہ رفتہ خانہ ذاد مردم بهیر و اسباب زیادتی در موضع محمدپور گذاشتہ اسپ قمچی دویده تعاقب مقهوران نموده ازاقبال حضرت تنبیہ واقعہ خواهم کرد فرمودند آفرین باد ـ

فضایل خان عرض نمود اکرم خان تهانہدار گلشن آباد خطی نوشتہ است جمعیت مقهور از این جا رو بفرار نهاده جانب برار خاندیس رفتند بنا بران سید منورخان دو حصہ جمعیت تعیناتیان این جا نزد فدوی گذاشتہ جمعیت خود و یک حصہ تعیناتیان تهانہ مذکور همراه گرفتہ تعاقب مقهوران کرده است بعد معروض بہ لطف الله خان فرمودند حسب الحکم بہ سید منور خان نویسد تا رسیدن اتش خان بہ گلشن آباد مانده بعد از آن بصوبہ برهان پور رفتہ خبردار باشد ـ

حسب الحکم بمهر لطف الله خان بہ مرحمت خان و رعدانداز خان مصحوب

شتر سوار صادر نموده مضمون آنکہ جمعیت صوبہ برار و خاندیس رفتہ است
خود ها جہتہ تنبیہ مقہوران رساند ۔

بہ لطف اللہ خان فرمودند بہ ملتفت خان بخشی سرکار شاہ عالم بہادر بنویسد
کہ بہرہ مند خان جہتہ تنبیہ مقہوران جانب برار رفتہ باید کہ شما معہ جمعیت
بادشاہزادہ جیو در بہادر گدہ ماندہ خبردار باشد ۔

खोजा अयाज यानें अर्ज केला तो असा : आतिशखानाचा वकील अर्ज करीत आहे कीं, ' माझे मालक गुल्शनाबादेस पोहोंचल्यावर गुप्तचरांनीं बातमी आणली कीं, शत्रूचे लोक तेथून पळून बागलाणाच्या आसपास गेले आहेत. माझ्या मुलानें बुणगे व जास्तीचें सामान मुहम्मदपूर येथें ठेवलें व स्वार होऊन त्यानें शत्रूचा पाठलाग केला. बादशाही सुदैवानें शत्रूस चांगली तंबी देईन. हुकूम झाला कीं, शाबास.

फजाइलखानानें अर्ज केला तो असा : गुल्शनाबादेचा ठाणेदार अक्रमखान यानें पत्र लिहिलें आहे कीं, येथून शत्रूचे लोक पळून वऱ्हाड-खानदेशाकडे गेले आहेत. म्हणून येथें नेमलेल्या लोकांपैकीं दोन हिस्से लोक मुनव्वरखानानें मजजवळ ठेवून बाकी एक हिस्सा लोक व स्वतःचे लोक बरोबर घेऊन शत्रूचा पाठलाग केला. यावर लुत्फुल्लाहखानास हुकूम झाला तो असा : सय्यिद मुनव्वरखानास हस्बुलहुकूम लिहावा कीं, आतिशखान तेथें पोहोंचेपर्यंत तू गुल्शनाबादेस रहावें. नंतर सुभे बुर्हानपुरास जाऊन असावेंस.

लुत्फुल्लाहखानाच्या शिक्क्याचा हस्बुलहुकूम मरहमतखान व रअदअंदाझखान यांच्या नांवें सादर होऊन सांडणीस्वाराच्या स्वाधीन केला. त्याचा सारांश असा : (शत्रूचे) लोक वऱ्हाड-खानदेश सुभ्यांत गेले आहेत; तरी तुम्ही स्वतः शत्रूला तंबी देण्यासाठीं तेथें पोहोंचावें.

लुत्फुल्लाहखानास हुकूम झाला तो असा : शाहआलम बहादूर याचा बक्षी मुल्तफितखान यास लिहावें कीं, 'बहरामंदखान शत्रूला तंबी देण्यासाठीं वऱ्हाडकडे गेला आहे. तू शाहझाद्याच्या लोकांसह बहादुरगडास सावधपणें असावेंस.

५६७

| जु. २८ रवल १३ रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع الاول ۱۳ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۸ | श. १६०६ माघ शुद्ध १४<br>इ. १६८५ फेब्रुवारी ८ |
|---|---|---|

انعام

رحمت خان میر هدایت‌الله خویش نظام الدین حیدرآبادی بھگونت و سیواجی و بنکاجی تعینات فوج عزت خان خلعت حکم شده لطف‌الله خان به فخرالدین خان تھانہ‌دار سوبه بنویسد که خود را به تھانه مولھیر می رسانیده در آن جا قلعچه احداث بکنانند۔

محمد عاقل گرز بردار عرضه داشت غازی‌الدین خان بهادر آورده فیروزجنگ بنظر گذرانیده معروض داشته بود که بنده موافق حکم بروز جمعه از پونه سواری نموده معه فوج جهته تنبیه مردم غنیم جانب گلشن‌آباد دویده تنبیه خواهم کرد۔

इझ्झतखानाच्या फौजेंत नेमलेले निजामुद्दीन हैद्राबादीचा नातेवाईक रहमतखान, मीर हिदायतुल्लाह, भगवंत, शिवाजी व बंकाजी यांना खिलती दिल्या. हुकूम झाला कीं, सुप्याचा ठाणेदार फखरुद्दीन यास लुत्फुल्लाहखानानें लिहावें कीं, त्यानें स्वतः मुल्हेर येथें जावें व गढी तयार करावी.

मुहम्मद आकिल गुर्जबर्दारानें गाझीउद्दीनखानाचा अर्ज आणला तो फीरूझजंगानें नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, मी हुकुमाप्रमाणें शुक्रवारीं पुण्याहून स्वार होऊन फौजेसह शत्रूस तंबी देण्यासाठीं गुल्शनाबादेकडे धावलों. तंबी देईन.

५६८

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रवल १५<br>मंगळ. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الاول ۱۰ سنه<br>یوم الثلث سنه ۲۸ | श. १६०६ माघ वद्य १<br>इ. १६८५ फेब्रुवारी १० |

محمد شریف منصبدار عرضه داشت خوجه حامد پسر عابد خان که به تھانه کره نمونه است آورده بنظر گذرانیده که کھندوجی ناسردار سنبھا مقهور معه جمعیت آمده سرس گانو را محاصره نموده بودند چنانچه مردم هرکاره بتاریخ دوازدهم خبر آورده که فوج غنیم بر یورش برداشته است ازاین استماع خانه‌زاد اسپ قمچی دویده در آن جا رسیده مقابله کرده جنگ واقعه شده آخرش مقهوران رو بفرار نهاده فدوی تا دریا بهمره تعاقب کرده از اقبال حضرت بسیار بجهنم رسانیده و زخمی گردانیده مویشی و شتران که از مردم لشکری بردند واپس گرفته و اسپ سواری خانه‌زاد بکارآمده فتح عظیم شده بعد مطالعه فرمودند مجرای شد از روی عنایت خلعت و یک اسپ انعام حواله دارنده فرمودند۔

कर्डें-निमोणें येथें असलेल्या आबिदखानाचा मुलगा खोजा हामिद याचा अर्ज मुहम्मद शरीफ मनसबदार यानें आणला तो नजरेखालीं घातला. त्यानें लिहिलें होतें कीं, संभाचा सरदार खंडोजी यानें आपल्या लोकांसह सरसगांवास वेढा घातला होता. नंतर १२ तारखेस हरकाऱ्यांनीं बातमी आणली कीं, शत्रूचे लोक लढाईसाठीं आले आहेत. म्हणून मी स्वारी केली व शत्रूशीं सामना केला. तेव्हां शत्रूचे लोक पळून गेले. मी त्यांचा भीमेपर्यंत पाठलाग केला. बादशाही सुदैवानें अनेकांना ठार व जखमी केले. लश्करांतील लोकांचीं जनावरें व उंट शत्रू पळवीत होता ते परत मिळविले. माझ्या स्वारीचा घोडा कामास आला. मोठा विजय प्राप्त झाला. यावर हुकूम झाला कीं, मान्य आहे. यावर कृपा करून यास खिलत व घोडा अर्ज आणणाऱ्या माणसाबरोबर बक्षीस पाठविले.

५६९

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रखर १<br>बुध. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی غره سنه<br>یوم الاربعه سنه ۲۸ | श. १६०६ फाल्गुन शुद्ध २<br>इ. १६८५ फेब्रुवारी २५ |

واجب العرض سید عبدالکریم قلعه دار مفتاح الفتوح بعرض رسید ـ

اول راج جی جماعه دار چهارصد پیاده قوم ماولیه نوکر مقهور باراده بندگی معه متعلقان دراین جا امده است حکم شد بحضور بفرستند ـ

دوم رسد غله دراین جانمی رسید امیدوارم پانصد سوار و پانصد پیاده ها همراه بنده تعین شود که جا بجای فرستاده رسد بطلبم حکم شد به عبدالعزیز خان قلعه دار جونیر بنویسد که رسد برساند ـ

मिफ्ताहुलफुतूह(कोथळा) चा किल्लेदार सय्यिद अब्दुलकरीम याचा अर्ज आला तो असा :

१) शत्रूचा नोकर व मावळ्यांच्या ४०० पायदळाचा जमादार राजजी हा आपल्या संबंध्यांसह चाकरीच्या आशेनें येथें आला आहे. हुकूम झाला कीं, त्यास हुजूर पाठवावें.

२) इकडे अन्नधान्याची रसद पोहोंचत नाहीं म्हणून आशा करतों कीं, माझ्याबरोबर ५०० स्वार व ५०० प्यादे नेमले जातील. म्हणजे ठिकठिकाणीं त्यांना पाठवून रसद मागवून घेईन. हुकूम झाला कीं, जुन्नरचा किल्लेदार अब्दुलअझीझखान यास लिहावें कीं, रसद पोहोंचवावी.

५७०

| जु. २८ रबर २<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع الثانی ۲ منہ<br>یوم الخمس سنہ ۲۸ | श. १६०६ फाल्गुन शुद्ध ३<br>इ. १६८५ फेब्रुवारी २६ |
|---|---|---|

دیروز از زبانی هرکاره بعرض رسید رانا جیسنگر نا سردار مقهور معہ جمعیت جانب پرینده آمده است بنا بران مرحمت خان پسر نامدار خان را یک فیل قیمت پنج هزار روپیہ انعام داده جہتہ تنبیہ مقهوران رخصت نموده حکم شد پانزده هزار روپیہ خزانہ تعیناتیان منجملہ ده هزار روپیہ در وجہ مساعدت بہ خان مذکور بدهند و فوج خان مذکور یک هزار یک صد پانزده {هزار} سوار بود درین ولا نہ صد چهار بیست سوار دیگر تعین فرمودند۔

شیخ حامد میر عدل و استاد محمد اکبر را چیزی ارشاد نموده خلعت انعام داده نزد محمد اکبر رخصت نموده و فرمان حوالہ کرده برساند و بگوید بہ خاطرجمع بیاید سیف‌الله خان را خلعت انعام داده جہتہ آوردن محمد اکبر بہ تهانہ سیرول رخصت کرده پانصدی ذات یک صد سوار بود دو صدی ذات پنجاه سوار از بابت کمی اضافہ فرمودند۔

گوبند راو ولد ناگوجی نوکر سنبہا مقهور امید بندگی ملازمت نموده پنج اشرفی و پنجاه روپیہ نذر گذرانیده سیصدی ۳ ذات یک صد سوار نوسرافراز فرمودند۔

काल हरकाऱ्यांकडून तोंडीं समजलें कीं, शत्रूचा सरदार राणा जयसिंग आपल्या लोकांसह परिंड्याकडे आला आहे. म्हणून नामदारखानाचा मुलगा मरहमतखान यास पांच हजार रुपयांचा हत्ती बक्षीस देऊन शत्रूस तंबी देण्यासाठीं पाठविलें. हुकूम झाला कीं, खजिन्यांतील पंधरा हजार रुपयांपैकीं दहा हजार रुपये उपर्युक्त खानास त्याच्या फौजेंत नेमलेल्या लोकांसाठीं म्हणून द्यावे. तसेंच उपर्युक्त खानाची फौज १११५ होती तींत ९८० स्वारांची वाढ केली. मीर अद्ल व मुहम्मद अकबरचा शिक्षक शेख हामिद यांस कांहीं सांगून आणि खिलत व फर्मान देऊन मुहम्मद अकबराकडे पाठविलें व फर्माविलें कीं, ते त्यास पोहोंचवून सांगावें कीं, शांत चित्तानें परत यावें

सैफुल्लाहखानास खिलत देऊन मुहम्मद अकबरास आणण्यासाठीं शिरवळकडे पाठविलें. तो ५०० जात व १०० स्वार असा मनसबदार होता. पैकीं

२०० जात व ५० स्वार कमी केले होते; त्यांत वाढ केल्याचा हुकूम झाला.

संभाचा चाकर गोविंदराव वलद नागोजी हा चाकरीच्या आशेनें येऊन भेटला. त्यानें ५ अश्रफी व ५ रुपये भेट दिले. त्यास ३०० जात, १०० स्वार असा नवीन मानकरी केल्याचा हुकूम झाला.

५७१

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रखर ३<br>शुक्र. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الثانی ۲ سنه<br>یوم الجمعه سنه ۲۸ | श. १६०६ फाल्गुन शुद्ध ४<br>इ. १६८५ फेब्रुवारी २७ |

محمد شریف منصبدار عرضه داشت بهادر خان آورده بنظر گذرانیده معروض داشته بود که رانا جیسنگه سردار سنبها مقهور بطرف پرینده آمده چنانچه خانه‌زاد از تهانه بهالونی بیست و پنج کروه دویده مابین اینداپور و ادگانو مقابله نموده از اقبال حضرت سردار مقهور را بجهنم رسانیده بسیار بقتل و زخمی نموده دو صد مادیه و بهاله و چهتری و غیره تاراج غنیم بدست آورده فتح عظیم شد بعد مطالعه فرمودند مجرای کلی شد فرمان و یک قبضه شمشیر درباب مجرا علحده نموده و محمد شریف دو بیستی بود نیم بیسی اضافه فرمودند۔

پانزده نفر نوکر محمد اکبر عرضه داشت محمد اکبر بطرف دیوڑهی زینت‌النسا بیگم بموجب حکم آورده بنظر گذرانیده بندگان حضرت بمطالعه خاص در آورده فرمودند که ده خلعت خاصه و یک اوزی مرصع قیمت پنج هزار روپیه از سرکار والا و هفت خلعت از طرف خود جهته محمد اکبر نزد شیخ حامد که میرود بفرستند و حکم شد که سیف‌الله خان دو هزار گاو رسد غله همراه خود نزد محمد اکبر ببرد۔

मुहम्मद शरीफ मनसबदारानें बहादुरखानाचा अर्ज आणून नजरेखालीं घातला. त्यांत लिहिलें होतें कीं, संभाचा सरदार राणा जयसिंग हा परिंड्याहून आला तेव्हां मी भाळवणीहून २५ कोस दौड केली आणि इंदापूर व आदगांव यांच्या दरम्यान आमची लढाई होऊन बादशाही सुदैवानें शत्रूचा सरदार ठार केला. तसेंच अनेकांना मारलें व जखमी केलें. दोनशें घोड्या, भाले, छत्री, अशी शत्रूची लूट हातीं आली. मोठा विजय प्राप्त झाला. यावर हुकूम झाला कीं, मान्य आहे. तद्दर्शक एक तलवार व फर्मान वेगळें ठेवलें. मुहम्मद शरीफ दोबीस्ती होता त्यास नीमबीस्तीची वाढ फर्माविली.

हुकुमाप्रमाणें मुहम्मद अकबराच्या पंधरा नोकरांनीं त्याचा अर्ज झीनतुन्निसा बेगम हिच्या देवडीकडून आणून नजरेखालीं घातला. बादशाहानें खास विचार करून हुकूम केला कीं, सरकारांतून दहा खासे खिलत व ५००० रुपये किमतीचा जडावाचा एक आवजी(?) तसेंच स्वतःचे सात खिलत हे मुहम्मद अकबरासाठीं शेख हामिद याजबरोबर पाठवावे आणि सैफुल्लाहखानानें आपल्याबरोबरचे धान्याच्या रसदेचे २००० बैल मुहम्मद अकबराकडे न्यावे.

५७२

| जु. २८ रबर ४ शनि. | سیاه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الثانی ۴ سنه<br>یوم السبت سنه ۲۸ | श. १६०६ फाल्गुन शुद्ध ५<br>इ. १६८५ फेब्रुवारी २८ |
|---|---|---|

کشناجی برادر پدنایک دو صدی ذات بیست سوار چوتهای وضع نوسرافراز فرمودند -

पीडनायकाचा भाऊ कृष्णाजी यास चौथाई वजा करून २०० जात, २० स्वार असा नवीन मानकरी केला.

५७३

| जु. २८ रबर ५ रवि. | سیاه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الثانی ۵ سنه<br>یوم الاحد سنه ۲۸ | श. १६०६ फाल्गुन शुद्ध ६<br>इ. १६८५ मार्च १ |
|---|---|---|

وفا بیگ وغیره چهار نفر گرزبردار عرضه داشت غضنفر خان آورده بنظر گذرانیده معروض داشته بود که جاسوسان خبر آوردند جمعیت مقهور بطرف آونده پته میرود بنابران بتاریخ دوم شهر حال از گهات دریا گنگ شتافته بتاریخ سیوم پلاش کهره مقابله شده بسیاری را بجهنم رسانیده شکست داده فتح بادشاهی شد و اسپ ماده و چهتری و بهاله وغیره اسلحه بابت تاراج غنیم بدست آورده و اکثر مردم این جانب بکارآمده و زخمی شد بعد مطالعه فرمودند که مجرای کلی شد مراتب بعرض رسانند-

محمد عاقل گرزبردار عرضه داشت امان‌الله خان آورده بنظر گذرانیده معروض داشته بود که به بنده خبر رسید جمعیت غنیم این طرف دیوسه میرود بنده معه فوج ازسیرول شتافته مقابله نموده از اقبال حضرت بسیاری را بجهنم رسانیده هزیمت داده فتح بادشاهی شد فرمودند مجرای شد-

راماجی بتجویز شاه عالم بهادر هزاری ذات پانصد سوار سرافراز شده بود درین ولا بنظر گذشت هشت صدی ذات چهار صد سوار بحال داشته۔

वफाबेग वगैरे चार गुर्जबर्दारांनीं घझ्नफरखानाचा अर्ज आणून नजरेखालीं घातला तो असा : 'हेरांनीं बातमी आणली कीं, शत्रूचे लोक औंढ्यापट्ट्याकडे जात आहेत. तेव्हां मी चालू महिन्याच्या दोन तारखेस गंगेच्या घाटावरून दौड केली. तीन तारखेस पलाशखेडा येथें सामना झाला. अनेकांना मारून शत्रूचा मोड केला. बादशाही फत्ते झाली व शत्रूकडील घोडी, छत्री, भाले वगैरे लूट हातीं आली. मजकडील बहुतेक लोक कामास आले व जखमी झाले.' यावर हुकूम झाला कीं, 'मान्य आहे; त्याच्या मरातिबाबद्दल अर्ज करावा.'

मुहम्मद आकिल गुर्जबर्दारानें अमानुल्लाहखानाचा अर्ज आणून नजरेखालीं घातला. तो असा : 'मला बातमी मिळाली कीं, शत्रूचे लोक देवशाच्या या बाजूनें जात आहेत. मी शिरवळहून फौजेसह दौड केली व त्यांशीं सामना दिला. बादशाही सुदैवानें अनेकांना मारलें व पळवून लावलें. बादशाहाची फत्ते झाली'. हुकूम झाला कीं, मान्य आहे.

शाहआलम याच्या तजविजीनें रामाजी यास १००० जात व ५०० स्वार असा मानकरी केला होता तें बादशाहाच्या नजरेखालीं घातलें. आतां ८०० जात व ४०० स्वार बहाल केले.

## ५७४

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रखर ९<br>गुरु. | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه ربیع الثانی ۹ سنه<br>یوم الخمس سنه ۲۸ | श. १६०६ फाल्गुन शुद्ध १०<br>इ. १६८५ मार्च ५ |

محمد شریف شتر سوار حسب الحکم روح الله خان رسانیده جواب آن خط خان مذکور آورده بنظر گذرانیده بعرض رسانید که خان مذکور بموجب حکم پنجم شهر حال از منگل بیده روانه حضور شده و قاسم خان را سردار فوج همراهی خود مقرر کرده در آن جا گذاشته است۔

عرضه داشت امان الله خان بنظر گذشت معروض داشته بود جمعیت مقهور جانب چندن مندن آمده بود خانه زاد سواری نموده مقابله کرده جنگ واقعه شد از اقبال حضرت بسیاری را بجهنم رسانیده مجروح ساخته شکست داده و بیست و پنج مادیه و یک هزار پانصد بندی و مویشی و بیست قبضه بندوق و دو

نشان و یک روح نقاره تاراج غنیم بدست آورده فرمودند مجرای خان مذکور کلی شد۔

मुहम्मद शरीफ सांडणीस्वारानें रूहुल्लाहखानास हस्बुलहुकूम पोहोंचवून त्याच्या उत्तरीं आणलेलें खानाचें पत्र नजरेखालीं घातलें तें असें : उपर्युक्त खान हुकुमाप्रमाणें चालू महिन्याच्या पाच तारखेस मंगळवेढ्याहून हुजूर रवाना झाला आहे व त्यानें कासिमखानास फौजेचा सरदार नेमून तेथें ठेविलें आहे.

अमानुल्लाहखानाचा अर्ज नजरेखालीं घातला तो असा : 'शत्रूचे लोक चंदन मं(वं)दनकडे आले तेव्हां मी स्वारी करून त्यांशीं सामना केला. खूप लढाई झाली. बादशाही सुदैवानें अनेकांना ठार व जखमी करून त्यांचा मोड केला. पंचवीस घोड्या, १५०० कैदी व जनावरें जखमी करून २० बंदुका, २ निशाणें व नगाऱ्याचे एक भांडें अशी लूट हातीं आली'. हुकूम झाला कीं, सर्व मान्य आहे.

५७५

| जु. २८ रखर १० शुक्र. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ۱۰ سنه<br>یوم الجمعه سنه ۲۸ | श. १६०६ फाल्गुन शुद्ध ११<br>इ. १६८५ मार्च ६ |
|---|---|---|

بهادر علی خان جهته سیر نمودن جانوران به پرگنه اوسه رفته بود آمده دو پر کلنگ پیشکش گذرانید۔

बहादुरअलीखान जनावरें हिंडविण्यासाठीं औशाकडे गेला होता. त्यानें येऊन कुलंगाचीं दोन पिसें बादशाहास भेट दिली.

५७६

| जु. २८ रखर ११ शनि. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ۱۱ سنه<br>یوم السبت سنه ۲۸ | श. १६०६ फाल्गुन शुद्ध १२<br>इ. १६८५ मार्च ७ |
|---|---|---|

بخشی الملک روح الله خان بموجب حکم معه همراهیان از منگل بیده آمده ملازمت نموده نذر گذرانده بندگان حضرت تعریف نموده فرمودند هزار آفرین باد برنمک خوردن شما از روی عنایت خلعت خاصه مرحمت فرمودند۔

از واقعه فوج محمد اعظم شاه بعرض رسید بادشاهزاده جیو گنگا جی جادون را چهار هزاری ذات سه هزار سوار تجویز نموده هرچه امر شود حکم شد مشارالیه را روانه حضور نمایند۔

हुकुमाप्रमाणें बक्षीउल्मुल्क हा आपल्या लोकांसह मंगळवेढ्याहून आला. त्यानें भेट घेऊन नजर दिली. बादशाहानें त्याची वाहवा केली व हुकूम झाला कीं, खाल्ल्या मिठास जागल्याबद्दल हजार शाबासक्या दिल्या व कृपारूपानें खासा खिलत दिली.

मुहम्मद अअजमशाहाच्या फौजेंतील घटनांवरून समजलें कीं, शाहझाद्यानें गंगाजी जाधवास ४००० जात व ३००० स्वार याची तजवीज केली आहे. यावर हुकूम झाला कीं, उपर्युक्तास हुजूर पाठवावें.

५७७

| जु. २८ रखर १३ सोम. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ۱۳ سنه<br>یوم الاثنا سنه ۲۸ | श. १६०६ फाल्गुन शुद्ध १४<br>इ. १६८५ मार्च ९ |
|---|---|---|

سید عزت خان میر بخشی سرکار شاه عالم بهادر را که در تهانه ماده واره است فوجداری جونیر از تغیر عبدالعزیز خان مقرر نموده شش صدی ذات پنجاه سوار بود دو صد سوار اضافه نموده بروح الله خان فرمودند پانصد سوار همراه خان مشارالیه دیگر تعین نماید و عبدالعزیز خان معه پسران منصب کم فرمودند ـ

محمد عابد ولد محمد اکبر نبیره وزیر خان مرحوم نوکری سنبها مقهور گذاشته امید بندگی آمده ملازمت نموده نه اشرفی هزده روپیه نذر و یک مصحف پیشکش گذرانیده نذر گرفته خلعت مرحمت شد ـ

از نوشته سیف الله خان بعرض رسید جمعیت مقهور آمده با خانه زاد مقابله نموده بود جیواجی برادر مانکوجی پانده ره در تهانه شکار [پور*] رفاقت بنده نکرد بنابرکم فرمودند جیواجی برادر مانکوجی تعینات فوج غازی الدین خان بهادر ـ

मादावाडा येथील शाहआलम याचा मीर बक्षी सय्यिद इझ्झतखान यास अब्दुलअझीझखानास बदलून जुन्नरच्या फौजदारीवर नेमलें. तो ६०० जात व ५० स्वार असा मनसबदार होता. त्यास २०० स्वारांची वाढ केली व रूहुल्लाहखानास हुकूम झाला कीं, उपर्युक्त खानाबरोबर आणखी ५०० स्वार नेमावे. अब्दुलअझीझखान व त्याचे मुलगे यांची मनसब कमी केली.

मरहूम वझीरखानाचा नातू मुहम्मद आबिद वलद मुहम्मद अकबर यानें

संभाची नोकरी सोडून, चाकरीच्या आशेनें येऊन भेट घेतली. ९ अश्रफी, १८ रुपये व कुराणाची १ प्रत नजर केली. भेट स्वीकारून त्यावर खिल-तीची कृपा झाली.

सैफुल्लाहखानाच्या लिहिण्यावरून समजलें कीं, 'शत्रूचे लोक मजवर चालून आले तेव्हां त्यांचा व माझा सामना झाला. त्यांत शिक्रापूर येथील माणकोजी पांढरे याचा भाऊ जिवाजी यानें मला मदत केली नाहीं म्हणून त्यास कमी केलें. तो गाझीउद्दीनखानाच्या फौजेंत नेमलेला होता.

५७८

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रखर १४<br>मंगळ. | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ۱۴ سنه<br>یوم الثلث سنه ۲۸ | श. १६०६ फाल्गुन शुद्ध १५<br>इ. १६८५ मार्च १० |

نذر ملازمت

محمد صوفی بهادر از کره نمونه آمده

محمد علی خان عرض نمود که گاوان توت کشی وغیره از پرینده بحضور آمده اگر حکم شود بصحرا بفرستند حکم شد تا یک ماه ایام فرصت اند بفرستند ـ

از واقعه فوج رکاب پادشاهزاده محمد اعظم شاه بعرض رسید که پادشاهزاده جیو سید میران را تعینات عبدالغنی خان قلعهدار دهارور سی نمودند مشارالیه قبول نکرده بنابران از منصب هفت صدی ذات پانصد سوار برطرف فرمودند ـ

بموجب نوشته محمد خلیل تهانه دار گلشن آباد منصب رگهناته سنگه وغیره تعینات سیونیر کم فرمودند ـ

नजर व भेट....मुहम्मद सूफी कर्डे-निमोण्याहून आला

मुहम्मद अलीखानानें अर्ज केला कीं, तोफांचे बैल वगैरे परिंड्याहून हुजूर आले आहेत. हुकूम असेल तर त्यांना रानांत पाठवीन. हुकूम झाला कीं, अजून एक महिना अवधी आहे; मग पाठवावे.

मुहम्मद अअजमशाहाच्या फौजेंतील वाक्यावरून समजलें कीं, शाह-झाद्यानें सय्यिद मीरान याची धारूरच्या किल्लेदार अब्दुलघनीखान याजकडे नेमणूक केली आहे. परंतु उपर्युक्तानें तें मान्य केलें नाहीं. म्हणून त्यास

७०० जात व ५०० स्वार या मनसबीवरून बडतर्फ केलें.

गुल्शनाबादेचा ठाणेदार मुहम्मद खलील याच्या लिहिण्यावरून रघुनाथसिंग वगैरे शिवनेर येथें नेमले होते त्यांची मनसब कमी केली.

५७९

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रखर १५<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ۱۵ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۸ | श. १६०६ फाल्गुन वद्य १<br>इ. १६८५ मार्च ११ |

فرمان بنام بهادر خان و قاسم خان حوالہ محمد عاقل وغیره دوازده نفر گرزبردار نموده حکم شد اول فرمان بقاسم خان رسانیده خان مذکور از منگل بیدهٔ بہ شاه پور روانہ سازد بعد ازآن بهادر خان را از تهانہ بهالکی سزاولی نموده بہ پاندره بہ سرحد حیدرآباد لشکر برسانند کہ بہ جمعیت حیدرآباد بکومک بیجاپور برود۔

बहादुरखान व कासिमखान यांच्या नांवाचें फर्मान मुहम्मद आकिल वगैरे बारा गुर्जबर्दारांच्या स्वाधीन केलें. हुकूम झाला कीं, प्रथम कासिमखानास फर्मान पोहोंचवावें व उपर्युक्त खानास मंगळवेढ्याहून शाहापुरास पाठवावें. नंतर बहादुरखानाची भालकीहून सजावली करून हैद्राबादेच्या सरहद्दीवर असलेल्या पांढरा येथें लश्करांत पोहोंचवावें. त्यानें हैद्राबादेच्या लोकांसह विजापूरची कुमक करावी.

५८०

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रखर १६<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ۱۶ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۸ | श. १६०६ फाल्गुन वद्य २<br>इ. १६८५ मार्च १२ |

از زبانی هرکاره بعرض رسید کہ مردم هرکاره بہ بادشاهزاده محمد اعظم شاه خبر رسانید شرزه هرزه وغیره بیجاپوری و جمعیت سنبها مقهور از لشکر بمفاصلہ پانزده ۱۵ کروه اند استقامت گرفتہ قصد جنگ میدارند بنابران بادشاهزاده جیو معہ فوج هنگام شب شب خون نموده جنگ واقعہ شد از اقبال حضرت بسیاری را بجهنم رسانیده و زخمی ساختہ شکست داده و اکثر بندهای بادشاهی بکارآمدند بعد مطالعہ تعریف بادشاهزاده جیو و حسن علی خان بهادر سرافرازخان وغیره نموده حسب ذیل انعام مرحمت خان فرمودند۔

بادشاهزاده جیو سعہ شاهزاده بیدار بخت حسن علی خان بہادر وغیره
خلعت و فیل فتح جنگ خان وغیره راو انوپ سنگہ کمال الدین یشونت راو
سید شیر خان فیاض خان راو جگدیو کشور سنگہ هادا نصرت خان جمیل بیگ
خان فتاح خان بہروز خان جیسنگہ بہبورا (؟) سادات خان وغیره سید اسدالله
خان بخشی شجاع خان داروغہ محمد عوض برادر زاده عابد خان عبدالمجید
رعایت خان بخشی عبدالسلام رضی الدین خان میرخان دیوان بسالت خان بخشی
میر جلال الدین سور سنگہ کچھواهہ سجان راو میر پهراک کشناجی ۔

हरकाऱ्यांच्या तोंडून कळलें कीं, हरकाऱ्यांच्या लोकांनीं बादशाहझादा मुहम्मद अअजमशाह याला बातमी दिली कीं, शर्जा वगैरे विजापूरी लोक व संभाचे लोक यांनीं लश्करापासून पंधरा कोसांच्या अंतरावर येऊन ठाण मांडलें आहे व लढाईचा हेतू आहे. म्हणून बादशाहझाद्यानें रात्रीं हल्ला केला. लढाई झाली. बादशाही कृपेनें अनेकांना ठार करून व जखमी करून त्यांचा मोड केला आणि बहुतेक बादशाही लोक कामास आले. हें समजल्यावर बादशाहझादा व हसन अलीखान बहादुर व सर्फराजखान वगैरेंची स्तुती केली व लोकांना निम्नलिखित बक्षीसें दिलीं.

बादशाहझादा व शाहझादा बीदारबख्त, हसन अलीखान बहादुर वगैरेंना पोषाख व हत्ती. [पुढील लोकांना काय दिलें तें नमूद नाहीं किंवा येथें उतरून घेतलेलें नाहीं*]

फतहजंगखान वगैरे, राव अनूपसिंग, कमालुद्दीनखान, यशवंतराव, सय्यिद शेरखान, फय्याजखान, राव जगदेव, किशोरसिंग हाडा, नुस्रतखान, जमीलबेगखान, फताहखान, बहरोझखान, जयसिंग भिवरा (?), सादातखान वगैरे, सय्यिद असदुल्लाहखान बख्शी, शुजाअखान दारूगा, आबिदखानाचा पुतण्या मुहम्मद अवज, अब्दुलमजीद, रिआयतखान बख्शी, अब्दुलइस्लाम, रिजाउद्दीनखान, मीरखान दीवान, बसालतखान बख्शी, मीर जलालुदीन, सूरसिंग कछवाह, सुजानराव, मीर पहराक, कृष्णाजी.

५८१

| जु. २८ रखर १६ गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ١٦ سنہ<br>یوم الخمس سنہ ٢٨ | श. १६०६ फाल्गुन वद्य २<br>इ. १६८५ मार्च १२ |
|---|---|---|

بهادر علی خان و جهانگیر بیگ خوش منزل و اصل و بیست قراولان را رخصت نموده حکم شد که براه پرینده به گلبرگه جریب همراه برده منازل و جای دولت خانه مشخص نموده بحضور بیایند۔

बहादुरअलीखान, जहांगीरबेग खुशमंझिल, असल व वीस करावल, यांना निरोप देऊन हुकूम केला कीं, बरोबर जमीन मोजण्याचें माप घेऊन परिंड्याहून कलबर्ग्याला जाण्याच्या मार्गावरील मुक्काम व बादशाहाच्या तंबूच्या जागा निश्चित करून हुजूर यावें.

५८२

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रखर १९ रवि. | سیاهه اخبارات دربار معلی ماه ربیع الثانی ۱۹ سنه یوم الاحد سنه ۲۸ | श. १६०६ फाल्गुन वद्य ५ इ. १६८४ मार्च १५ |

محمد علی خان عرض نمود ابو محمد زمیندار بهوج به بنده نوشته که اموال حیات الله مرحوم کوچ او قریب ده لکه روپیه را نقد و جنس جابجای پنهان نموده است هرچه امر شود حکم شد عبدالقادر پسر خوانده مرحوم در حضور است تحقیق نماید چنانچه پرسیده عرض نمود التماس می دارد که بنده واقف است حکم شد بدیوان شاهجهان آباد بنویسد یک گرزبردار یقین نماید که عبدالقادر و ابو محمد را از فتح پور خانوه به شاهجهان آباد رسانند با اتفاق عاقل خان تحقیق نموده آنچه ظاهر شود ضبط نماید۔

मुहम्मदअलीखानानें अर्ज केला तो असा : भूजचा जमीनदार अबू मुहम्मद यानें मला लिहिलें कीं, मयत हयातुल्लाहची सुमारें दहा लाख रुपये रोख व जिन्नस अशी संपत्ती त्याच्या बायकोनें ठिकठिकाणीं लपवून ठेवली आहे. हुकूम व्हावा. हुकूम झाला कीं, मयताचा दत्तक पुत्र अब्दुलकादिर हुजूर आहे. पक्का शोध घ्यावा. तेव्हां चौकशी करून अर्ज केला कीं, अब्दुलकादिरची विनंति आहे कीं, तें मला ठाऊक आहे. त्यावर हुकूम झाला कीं, शाहजहानाबादेच्या दिवाणाला लिहावें कीं, एक विश्वासू गुर्जबर्दार नेमून त्यानें अब्दुलकादिर व अबू मुहम्मद यांना फतहपूर खानवाहून शाहजहानाबादेस आणावें आणि आकिलखानासह पक्का शोध घेऊन जें कांहीं उघड होईल तें जप्त करावें.

५८३

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रखर २१ मंगळ. | سیاهه اخبارات دربار معلی ماه ربیع الثانی ۲۱ سنه یوم الثلث سنه ۲۸ | श. १६०६ फाल्गुन वद्य ७ इ. १६८५ मार्च १७ |

صبحی بندگان حضرت جهت شکار جانب ادگانو سوار شدند شاه عالم بهادر بموجب حکم دو چهه کاره شکار نموده مسافت راه سه ۳ کروه پا و بالا طی نموده یک پهر چهار گهری روز برآمده داخل دولت خانه شده آخر روز غسل خانه فرمودند۔

از واقع فوج روح‌الله خان بعرض رسید محمد حسین وغیره پسران رندوله خان مرحوم درجنگ زخمی شده افتاده بودند مردم غنیم دستگیر نموده برده بودند درین ولا خلاص شده آمده امیدوار اند بحال شوند منظور فرمودند۔

مشارالیه لطف‌الله

सकाळीं बादशाह स्वार होऊन शिकारीसाठीं अदगावाकडे गेला. शाहआलम बहादुरानें हुकुमाप्रमाणें दोन छकडे शिकार करून व सव्वातीन कोस रस्ता चालून एक प्रहर चार घटिका दिवस वर आल्यावर छावणींत दाखल झाला आणि सांयकाळीं गुसलखाना केला (मंत्रणा केली).

रूहुल्लाहखानाकडील फौजेच्या बातमीपत्रावरून कळलें कीं, मरहूम रणदुल्लाखानाचे मुहम्मद हुसैन वगैरे मुलगे युध्दांत जखमी होऊन पडले, गनिमाकडील लोक त्यांना कैद करून घेऊन गेले; आतां सुटून आले आहेत व पुन्हा चाकरींत येण्यास उत्सुक आहेत. ते मान्य आहे. मुहम्मद हुसैन लुत्फुल्लाह

९८४

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रखर २३ गुरु. | سیاهه اخبارات دربار معلی ماه ربیع الثانی ۲۳ سنه یوم الخمس سنه ۲۸ | श. १६०६ फाल्गुन वद्य १० इ. १६८५ मार्च १९ |

شیخ حسن ولد شیخ ولی جهت طیاری سرب و باروت بقلعه شولاپور رخصت فرمودند صد پنجاهی۔

بچهتر مل واقعه نویس فرمودند منازل پیدگانو و گلبرگه و دهول کوٹ مفصل بعرض رساند و بهره مند خان فرمودند به بهادر علی خان که جهت جریب نمودن منازل و جای مشخص نمودن دولت خانه به گلبرگه رخصت شده بنویسد که در اوایل ماه جمادی الاول بحضور بیاید۔

عطاالله معمار را جهت مرحمت مسجد پیدگانو رخصت نموده۔

शेख हसन वल्द शेख वली यास दारूगोळ्याच्या तयारीसाठीं सोलापूर

किल्ल्यास पाठविलें. छत्रसाल वाकेनवीसास दीडशे स्वारांची मनसब देऊन फर्माविलें कीं, पेडगांव, कलबर्गे व धुळकोट यांकडे जाण्याचे मुक्काम तपशीलवार कळवावे व बहरामंदखानानें बहादुरअलीखानास हुकूम केला कीं, मुक्काम व बादशाही तंबूच्या जागा निश्चित करण्यासाठीं कलबर्ग्यास जाऊन [तेथून] लिहावें कीं, जमादिलावल महिन्याच्या आरंभीं परत यईन.

अताउल्लाह गवंड्याला पेडगांवची मशीद दुरुस्त करण्यासाठीं पाठविलें.

५८५

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रखर २५<br>शनि. | سیاهم اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ۲۵ سنہ<br>یوم السبت سنہ ۲۸ | श. १६०६ फाल्गुन वद्य १२<br>इ. १६८५ मार्च २१ |

به محمد یوسف چیله و کلیان پسر هیرا معمار فرمودند طیار شوند جهته صاف و سفیدی کنانیدن محلهای بهادر گڈه عرف پیدگانو رخصت خواهم فرموده و جلوخانه مختصر است باید که آنرا وسیع نمایند ـ

به بهره مند خان فرمودند که طومار فوج همراهی اعتقاد خان طیار نماید و محمد عابد برادر فیض الله خان هزاری ذات دوصد سوار و سیوسنگه هفت صدی ذات شش صد سوار ۲ اسپه داخل فوج نماید و بالفعل یک ماه همراه غضنفر خان باشند باجی وغیره نوکران سنبها مقهور را سرافراز فرمود ـ

مشارالیه پانصدی نرسوجی چهارصدی راگهوجی دوصد پنجاهی یشونت راو شرح ایفاً ـ

از واقعه رکاب محمد اعظم شاه بعرض رسید که بادشاهزاده جیو سیف الله ولد محمد مراد امین داغ و تصحیحه فوج خود را خدمت دیوانی و واقعه نویسی قلعه دهارور نیز مقرر نموده سه ۳ صدی ذات ده سوار منجمله پنجاهی ذات و سواران مشروط امینی بود صدی ذات اضافه تجویز نموده اند فرمودند شرطی امینی مذکور و اضافه حال بشرط دیوانی و واقعه نویسی اعتبار نمایند ـ

मुहम्मद युसुफ चेला व हीरा गवंड्याचा मुलगा कल्याण यांना तयार होण्याची आज्ञा केली. बहादुरगड उर्फ पेडगांव येथील महालाची साफ-सफेदी व महालाच्या दर्शनी बाजू अरुंद आहेत त्या रुंद करण्यासाठीं पाठविणार आहेत.

बहरामंदखानाला हुकूम केला कीं, इअतिकादखानाबरोबरच्या फौजेचा हिशेब तयार करावा व फैजुल्लाहखानाचा भाऊ मुहम्मद आबिद हजार जात व

दोनशे स्वार, शिवसिंग सातशे जात व सहाशे स्वार दुघोडी यांना फौजेंत दाखल करावें आणि त्यांनीं घझनफरखानाबरोबर एक महिनाभर असावें.

बाजी वगैरे संभाजीच्या नोकरांना-बाजीस पाचशे, नरसोजीला चारशे, राघोजीला अडीचशे, यशवन्तरावाला निम्नलिखित शेऱ्याप्रमाणें सर्फराज केलें [तो शेरा येथें घेतला नाहीं*]

मुहम्मद अअजमशाहाकडील बातमीपत्रावरून कळलें कीं, स्वतःच्या फौजेचा तस्हीह व दाग यांचा अमीन सैफुल्लाहखान वलद मुहम्मद मुराद याला धारूरच्या किल्ल्याची दिवाणी व वाकेनवीसी मुक़र्रर केली आणि तीनशे जात व दहा स्वारांची मनसब दिली. पैकीं पन्नास जात व स्वार हे अमीनीच्या शर्तीवर होते व शंभर जात अधिक अशी तजवीज केली होती. अमीनीची शर्त, दिवाणी व वाकेनवीसी यांबद्दल दिलेली वाढ या विषयीं खात्री बाळगावी.

५८६

| जु. २८ रखर २६<br>रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ۲۶ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۸ | श. १६०६ फाल्गुन वद्य १३<br>इ. १६८५ मार्च २२ |
|---|---|---|

گوبند راو تهانہ دار سیواپور جهت کتخدای آمده نہ مهر نذر گذرانید پانصدی ذات سہ ۳ صد سوار بود پنجاه سوار اضافہ فرمودند۔

- اهتمام خان کوتوال وغیره را بہ بهادرگڈه عرف پیدگانو رخصت فرمودند۔

शिवापूरचा ठाणेदार गोविंदराव यानें लग्नास येऊन नऊ मोहरा भेट दिल्या. तो पाचशे जात व तीनशे स्वारांचा मनसबदार होता. त्याला पन्नास स्वारांची वाढ दिली.

इहतिमामखान कोतवाल वगैरेंना बहादुरगड उर्फ पेडगांव येथें जाण्यास निरोप दिला.

५८७

| जु. २८ रखर २६<br>रवि. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ۲۶ سنہ<br>یوم الاحد سنہ ۲۸ | श. १६०६ फाल्गुन वद्य १३<br>इ. १६८५ मार्च २२ |
|---|---|---|

دوندا جی نوکر سنبها مقهور بموجب تجویز شاه عالم بهادر هزاری ذات هفت صد سوار نوسرافراز شده بود درین ولا بنظر گذشت چهار صدی ذات دو صد سوار بحال داشتہ۔

संभाजीचा नोकर दोण्डाजी यास शाहआलम बहादुराच्या तजवीजी-नुसार हजारी जात व सातशे स्वार असा नवा मनसबदार केला [असा अर्ज आला तो*] नजरेखालीं घातला. त्यास चारशे जात व दोनशे स्वार अशी मनसब दिली.

५८८

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रखर २७<br>सोम. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع الثانی ۲۷ سنہ<br>یوم الاثنا سنہ ۲۸ | श. १६०६ फाल्गुन वद्य १४<br>इ. १६८५ मार्च २३ |

بموجب التماس فضل علی داروغہ زین خان بعرض رسید کوچ رایات عالیات بہ بہادرگڈھ عرف پیدگانو مقرر شدہ و محمد علی خان چہار شتر بار برداری دادہ و بار زیادہ است حکم شد پنج نفر شتر بدھند و آنچہ زیادتی باشد بہ اورنگ آباد بفرستند۔

जीनखान्याचा दारोगा फज्लअली याया विनंतीवरून कळलें कीं, फौजेचें कूच बहादुरगड उर्फ पेडगांव येथें होण्याचें ठरलें आहे व मुहम्मद अलीखान यास ओझें वाहण्यासाठीं चार उंट दिले. पण ओझें जास्त होतें. हुकूम झाला कीं, पांच उंठ द्यावे व अधिक राहील तें औरंगाबादेस पाठवावें.

५८९

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रखर २९<br>बुध. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع الثانی ۲۹ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۸ | श. १६०७ चैत्र शुद्ध १<br>इ. १६८५ मार्च २५ |

از واقعہ پرینده بعرض رسید کہ مانا سندیہ تعنیات تہانہ منگل بیدہ فوت شد دو ہزاری ذات دو ہزار سوار سرافراز بود۔

परिंड्याच्या बातमीपत्रावरून कळलें कीं मंगळवेढ्याच्या ठाण्यावर असलेला मानाजी शिंदे मरण पावला. तो दोन हजारी जात व दोन हजार स्वार असा मनसबदार होता.

५९०

| | | |
|---|---|---|
| जु. २८ रखर ३०<br>गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماہ ربیع الثانی ۳۰ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۸ | श. १६०७ चैत्र शुद्ध २<br>इ. १६८५ मार्च २६ |

فرمان بعبدالعزیز خان قلعہ دار جونیر صادر نمودہ مضمون آنکہ ابوالخیر خان پسر خود را نیابت در قلعہ گذاشتہ جریدہ بحضور بیاید۔

از نوشتہ محمد تقی تھانہ دار جل گانو بعرض رسید کہ درین جا قلعچہ نیست اگر بیلداران تعین شوند طیار نمایم حکم شد معہ یک احدی بیست نفر بیلداری را تعین نمایند۔

از نوشتہ عبدالرحمان قلعدار بہادرگڈھ بعرض رسید کہ مسجد طیار شدہ چنانچہ یک چاہ متصل مسجد کندیدہ آب شور برآمدہ بنابر کمی آب است از قلعہ نہر اگر در مسجد بیاید افزونی شود بنا بران یک هزار یک صد نود و چہار روپیہ برآوردہ آن نہر شدہ اند حکم شد معمار بفرستند۔

जुन्नरचा किल्लेदार अब्दुलअझीझखान यास पाठविलेलें फर्मान त्यास पोचलें. त्यांत लिहिलें होतें कीं, स्वतःचा मुलगा अबुलखैरखान याजकडे किल्ल्याची नायबी देऊन व सडे होऊन हुजूर यावें

जळगांवचा ठाणेदार मुहम्मद तकी यानें लिहिल्यावरून कळलें कीं, या जागीं गढी नाहीं. बेलदार नेमले तर तयार करीन. हुकूम झाला कीं, यासाठीं अेक अहदी व वीस बेलदार नेमावें.

बहादुरगडचा किल्लेदार अब्दुर्रहमान यानें लिहिल्यावरून कळलें कीं, मशीद तयार झाली. तद्वत् मशीदीजवळ एक विहीर खणली; पण ती मधून खराब पाणी निघालें. त्यामुळें पाण्याचा तुटवडा आहे. किल्ल्यापासून पाट काढून मशीदींत आणला तर विपुलता होईल. म्हणून एक हजार एकशें चौऱ्याण्णव रुपये खर्चून पाट काढला. हुकूम झाला कीं, गवंडी पाठवावा.

५९१

| जु. २८ रखर ३० गुरु. | سیاهہ اخبارات دربار معلے<br>ماه ربیع الثانی ۳۰ سنہ<br>یوم الخمس سنہ ۲۸ | श. १६०७ चैत्र शुद्ध २<br>इ. १६८५ मार्च २६ |
|---|---|---|

محمد علی خان بموجب حکم طرح قلعہ پیدگانو بنظر گذرانیدہ ملاحظہ نمودہ حوالہ خدمت خان فرمودند۔

حکم شد محمد علی خان موجودات باروت قلعہ پرینده و شولاپور و گلبرگہ و نلدرگ بعرض رساند۔

از التماس متصدیان خوشبوخانہ و روغن خانہ بعرض رسید کہ کوچ رایات عالیات بہ پیشتر مقرر شد و حکم شده است کہ دو ماه سرانجام بدستور برآمدن از اورنگ‌آباد در رکاب بگیرند و تتمہ ذخیره باورنگ‌آباد بفرستند چنانچہ درفرستادن

اورنگ‌آباد بار برداری در کار خواهد شد اگر حکم شود تتمہ ذخیرہ را در قلعہ احمد نگر بگذرانند۔

ہنگام درکار طلب نمایند درین کفایت است حکم شد ہفت ماہ را سرانجام نمودہ ہمراہ رکاب بگیرند۔

मुहम्मद अलीखानानें हुकुमाप्रमाणें पेडगांव किल्ल्याचा आराखडा बादशाहाच्या नज़रेखालीं घालून खिदमतखानाच्या स्वाधीन केला.

हुकूम झाला कीं, मुहम्मद अलीखानानें परिंडा, सोलापूर, कलबर्गा व नळदुर्ग या किल्ल्यांसंबंधीं दारूचा अहवाल पाठवावा. अत्तरखाना व तेलखाना यांवरील अधिकाऱ्यांच्या विनंतीवरून कळलें कीं, शाही फौजेचें कूच पुढें ढकललें आहे. हुकूम झाला कीं, औरंगाबादेहून निघते वेळीं दोन महिन्यांचा सरंजाम बरोबर घ्यावा व उरलेलें सामान औरंगाबादेस ठेवावें. औरंगाबादेस सामान पाठविण्यासाठीं ओझें वाहणाऱ्या जनावरांची गरज लागेल. हुकूम झाल्यास उरलेलें सामान अहमदनगर किल्ल्यांत ठेवूं. आवश्यकता असेल तेव्हां मागवूं; त्यांत फायदा आहे. हुकूम झाला कीं, सात महिन्यांचा सरंजाम बरोबर घ्यावा.

## ५९२

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जवल २<br>शनि. | سیاہہ اخبارات دربار معلے<br>ماہ جمادی‌الاول ۲ سنہ<br>یوم‌السبت سنہ ۲۸ | श. १६०७ चैत्र शुद्ध ३<br>इ. १६८५ मार्च २८ |

پسران و برادران باباجی متوفی را تجویز رفیع‌اللہ خان اضافہ فرمودند رنباجی شرزہ راو فرنگوجی سومانجی۔

मयत बाबाजीचे मुलगे व भाऊ यांना रफीउल्लाहखानाच्या तजविजीनुसार वाढ फर्माविली. [त्यांचीं नावें अशीं*] रंबाजी, शर्जाराव, फिरंगोंजी, सोमानजी.

## ५९३

| | | |
|---|---|---|
| जु. २८ जवल ३ | سیاہہ اخبارات دربار معلے<br>ماہ جمادی‌الاول ۳ سنہ<br>سنہ ۲۸ | श. १६०७ चैत्र शुद्ध ४<br>इ. १६८५ मार्च २९ |

باجی وغیرہ سنبہا مقہور خلمتان۔

संभाजीकडील बाजी वगैरेंना पोषाख दिले.

५९४

| जु. २८ जवल ७० | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه جمادی الاول ۷ سنه<br>سنه ۲۸ | श. १६०६ चैत्र शुद्ध ८<br>इ. १६८५ एप्रिल २ |
|---|---|---|

به بهره مند خان فرمودند حسب الحکم به حسام الدین دیوان فوج روح الله خان بنویسند که نوکران سنبها مقهور آمده دراین جا رجوع می شوند دو هزار سوار والا نو نوکر نگاه دارد.

बहरामंदखानास फर्माविलें कीं, रूहुल्लाहखानाच्या फौजेचा दिवाण हुसामुद्दीन यास हस्बुलहुक्म लिहावा कीं, संभाचे नोकर येऊन या ठिकाणीं रुजू होत आहेत. दोन हजार स्वार सरकारांत नव्यानें नोकरीस ठेवावे.

५९५

| जु. २८ जवल १० | سیاهه اخبارات دربار معلی<br>ماه جمادی الاول ۱۰ سنه<br>سنه ۲۸ | श. १६०७ चैत्र शुद्ध ११<br>इ. १६८५ एप्रिल ५ |
|---|---|---|

دو نفر شتر سوار عرض داشت خان جهان بهادر آورده معرفت لطف الله خان بنظر گذرانید معروض داشته بود که فدوی بموجب حکم برقلعه ناگ تهانه که شش کروه این طرف بیجاپور واقعه است سواری نموده در آن جا رسیده از هر چهار طرف نرغه کرده می خواستند که یورش نمایند مردم بیجاپوری که اندرون قلعه بودند از هیبت لشکر گریخته رفته شد و قلعه را در تصرف بادشاهی آورده جزوی مردم همراهی خود در قلعه گذشته معه فوج براه رسول پور بر خندق قلعه بیجاپور رفته جای برای مورچل بندی و دمدمه و یورش قلعه دیده چنانچه مردم سنگ دلان بیجاپوری از راه کوته اندیشی توپ اندازی نموده و خواجه عبدالرحیم حاجب بیجاپوری به بنده نوشته که سکندر عادل جا کم آنچه مردم خود مقرر نموده که این را ازحویلی شاهپور بدر نمایند قصد این داشتند هرگاه براید متاعش را بتاراج برند خبر گرفتنی بنده ضرور است بنابرآن دو صد سوار و دو صد بندوقچی فرستاده ایم که هرگاه قاسم خان به شاهپور برسد آن زمانی نزد بنده بیایند وکلید طلا بابت فتح قلعه ناگ تهان و نقشه مورچل بندی وغیره قلعه بیجاپوری ارسال داشته بود بنظر گذشت مطالعه خاصه در آورده تعریف خان مذکور نموده فرمودند مجرای شد و عرض داشت را بشاه عالم بهادر نمودند.

بمیر عبدالحی مشرف فراش خانہ فرمودند کوچ [ کوچ ] بہادر گدہ نمودہ فرش در آن جا بفرستند و بتاریخ پنجم جمادی الثانی براہ پرپندہ بہ شولاپور تشریف خواہند فرمود در آن جا فرش خواہند فرستاد ۔

दोंन सांडणीस्वारांनीं खानजहान बहादुराचा अर्ज आणला तो लुतफुल्लाहखानाच्या मार्फतीनें नजरेखालीं घातला. त्यांत लिहिलें होतें कीं, मी हुकुमाप्रमाणें विजापूरच्या अलीकडे सहा कोस असलेल्या नागठाण्याच्या किल्ल्यावर स्वारी केली, त्या ठिकाणीं पोहोंचलों, चहू बाजूंनीं वेढा घालून हल्ला चढवावा असें योजिलें होतें. किल्ल्यांत विजापुरी लोक होते ते लश्कराच्या भीतीनें पळून गेले व किल्ला बादशाहाच्या हातीं आला. माझ्या बरोबरच्या लोकांपैकीं कांहीं जण किल्ल्यांत ठेवून फौजेसह रसूलपूरच्या मार्गानें विजापूर किल्ल्याच्या खंदकापर्यंत जाऊन त्या ठिकाणीं मोर्चेबंदी, दमदमे व हल्ला यांच्या जागा हेरल्या. विजापूरच्या लोकांनीं अविचारानें तोफांचा मारा केला. विजापूरचा हेजीब खाजा अब्दुर्रहीम यानें मला लिहिलें कीं, मालक सिकंदर आदिल स्वतःला शाहपुराच्या हवेलींतून बाहेर काढण्यासाठीं आपल्या लोकांपैकीं ज्यांना नेमील ते बाहेर जात असतां त्यांची मालमत्ता लुटून न्यावी. तेव्हां मला पाळतीवर असणें आवश्यक आहे. म्हणून दोंनशे स्वार व दोनशे बंदूकधारी पाठविले व फर्माविलें कीं, कासिमखान शाहपूरला पोंहोंचल्यावर त्यांनीं मजकडे परत यावें. जिंकलेल्या नागठाण किल्ल्याची सोंन्याची किल्ली व विजापूर किल्ल्याच्या मोर्चेबंदी आदींचा नकाशा पाठविला होंता तो नजरेखालीं घातला. त्यावर विचार करून मग खान मजकुराची स्तुती केली व फर्माविलें कीं, ठीक आहे. ती अर्जदाश्त शाहआलमाला दाखविली.

फर्रासखान्याचा अधिकारी मीर अब्दुलहया यास फर्माविलें कीं, बहादुरगडाकडे कूच करून फर्रासाचें सामान तेथें पाठवावें. जमादिलाखरच्या पाच तारखेस आम्ही परिंडामार्गें सोलापुरास पोंहचूं. तिथें बैठकीचें सामान पाठवावें.

५९६

| | | |
|---|---|---|
| ज्रु. २८ जवल ११ | سیاہ اخبارات دربار معلے<br>ماہ جمادی الاول ۱۱ سنہ<br>یوم الاربعہ سنہ ۲۸ | श. १६०७ चैत्र शुद्ध १२<br>इ. १६८५ एप्रिल ६ |

محمد عاقل خان گرزبردار فرمان بہ بہادرخان و قایم خان رسانیدہ عرضداشت ہر دو و خواجہ عبدالرحیم حاجب بیجاپور آوردہ بنظر گذرانیدہ بعرض رسانید

که بموجب حکم بهادر خان را بدریای بان گنگ و قایم خان را به شاه پور رسانیده آمدیم سه ۳ صد روپیه خان مذکور و دو صد روپیه قایم خان خدمتانه می دادند نگرفتم و رفیع الله خان بیست کروه از قلعه بیجاپور این طرف رسیده بود۔

मुहम्मद आकिलखान गुर्जबर्दारानें बहादुरखान व कायिमखान यांचीं फर्मानें पोंहचवून, त्या दोघांचे व विजापूरचा हेजीब खाजा अब्दुर्रहीम याचे अर्ज आणिले ते नजरेखालीं घालून सांगितलें कीं, हुकुमानुसार बहादुरखानाला बाणगंगेकडे व कायिमखानाला शाहपुराकडे पोंहचवून आलों. बहादुरखान तीनशे व कायिमखान दोनशे रुपये खिदमताना देत होते; पण मी घेतला नाहीं. रफीउल्लाहखान विजापूर किल्ल्यापासून वीस कोस इकडे आला होता.

५९७

| जु. २८ जवल १२ | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه جمادی الاول ۱۲ سنه<br>سنه ۲۸ | श. १६०७ चैत्र शुद्ध १३<br>इ. १६८५ एप्रिल ७ |
|---|---|---|

به جمدة الملک فرمودند حسب الحکم بفوجداران و دیوانیان ممالک محروسه بنویسد که آنچه مردم هنود در این جا مسلمان می شوند سری مرد چهار روپیه و عورت دو روپیه از خزانه آن جا بطریق انعام مقرر است چنانچه آنها برای دین اسلام خود مسلمان می شوند از آینده مبلغ های موقوف نمایند۔

जुम्दतुल्मुल्कास फर्माविलें कीं, विविध प्रदेशांतील फौजदारांना व दिवाणांना हस्बुल्हुकूम लिहावा कीं, जे हिंदू लोक मुसलमान होंत आहेत त्यांतील प्रत्येक पुरुषास चार रुपये व प्रत्येक स्त्रीस दोंन रुपये तेथील खजिन्यांतून बक्षिस दिले आहेत. ते लोंक खरोंखर धर्मभावनेनें आपणहून मुसलमान होंतील तर यापुढें त्यांना पैसे देणें थांबवावें.

५९८

| जु. २८ जवल १३ | سیاهه اخبارات دربار معلے<br>ماه جمادی الاول ۱۳ سنه<br>سنه ۲۸ | श. १६०७ चैत्र शुद्ध १२<br>इ. १६८५ एप्रिल ८ |
|---|---|---|

راجا منوهر داس قلعدار مولهیر را خدمت تهانه داری پارسا از تغیر میر نور الله مقرر نموده و میر نور الله را به معه همراهیان حضور طلب فرمودند۔

मुल्हेरचा किल्लेदार राजा मनोहरदास यास मीर नूरुल्लाहच्या ऐवजीं पारसाचा ठाणेदार नेमिलें आहे. मीर नूरुल्लाह यास आपल्या लोकांसह हुजूर बोलाविलें.

५९९

| जु. २८ जवल १३ | سیاہہ اخبارات دربار معلے<br>ماہ جمادی الاول ۱۳ سنہ<br>سنہ ۲۸ | श. १६०७ चैत्र शुद्ध १४<br>इ. १६८५ एप्रिल ८ |
|---|---|---|

از التماس وکیل شہاب تہانہ دار اکولہ بعرض رسید کہ یک نفر نوکر کافر بدکیش در آن ضلع جہتہ جاسوسی آمدہ بود موکل بندہ دیگر نمودہ بحضور فرستادہ است حکم شد حوالہ اہتمام خان نماید۔

अकोल्याच्या ठाणेदार शिहाब याच्या वकिलानें विनंती केल्यावरून कळलें कीं, काफिराचा एक नोकर या जिल्ह्यात हेरगिरीसाठीं आला होता. मी दुसऱ्या मनुष्याबरोबर त्यास हुजूर पाठविला आहे. हुकूम झाला कीं, इहतिमामखानाच्या स्वाधीन करावा.

६००

| जु. २८ जवल १८ | سیاہہ اخبارات دربار معلے<br>ماہ جمادی الاول ۱۸ سنہ<br>سنہ ۲۸ | श. १६०७ चैत्र वद्य ५<br>इ. १६८५ एप्रिल १३ |
|---|---|---|

اہتمام خان عرض نمود سید عزت خان فوجدار جونیر پانصد دھوپ و دو بہالہ و یک بندوق و سہ ۳ نفر بندیوان بابت ساخت غنیم مصحوب ہدایت اللہ وغیرہ دو نفر گرزبردار بحضور فرستادہ است حکم شد بندیوانان در قید نگاہ دارد و دھوپ وغیرہ حوالہ خان نماید۔

इहतिमामखानानें अर्ज केला कीं, जुन्नरचा फौजदार सय्यिद इझ्झत-खानानें शत्रूशीं केलेल्या चकमकींत मिळालेले पाचशे धूप, दोन भाले, एक बंदूक व तीन कैदी हिदायतुल्लाह व अन्य दोन गुर्जबर्दारांबरोबर हुजूर पाठविले आहेत. हुकूम झाला कीं, बंदीवानांना कैदेंत ठेवावें व धूप वगैरे खानाच्या स्वाधीन करावें.

# सूची

या सूचीमध्यें नोंदीपुढील आकडे पृष्ठांचे नसून उताऱ्यांचे आहेत. या उताऱ्यांत मुसलमान व हिंदू अशा दोघांचीही व्यक्तिस्थलनामें आलीं आहेत. मुसलमानी नांवांत उच्चाराचा सोपेपणा आणण्यासाठीं मूळांतच कांहीं बदल केलेले आढळले नाहींत. म्हणून तीं नांवें या सूचींत शुद्ध स्वरूपांतच घेतलीं आहेत. पण गंगाजमनी आणि हिंदू नावांचें तसें नाहीं. त्यांत शुद्ध नावें व प्रचलित असलेलीं नावें यांत सोपेपणासाठीं बदल झालेला आढळतो. उदा. ज्यास आपण सध्या बऱ्हाणपूर म्हणतो त्याचा मूळ उच्चार **बुऱ्हानपूर** असा आहे. उताऱ्यांत शिवाजीसाठीं 'सेवा' असा शब्दही वापरलेला आढळेल. सूचीमध्यें अशा विशेषनामांचीं मूळ शुद्ध रूपें दिलीं आहेत. फार्सी किंवा इंग्रजी वर्णविन्यास आणि बालबोधीचा वर्णविन्यास यांत महत्त्वाचे फरक आहेत. उदा. 'पंडित' हा शब्द फार्सींत लिहितांना व सूचीमध्यें त्याचें स्थान ठरवितांना अडचण येत नाहीं. पण तो शब्द मराठींत लिहितांना परसवर्णाचा अनुस्वार करतात. त्यामुळें बालबोधींत शब्दारंभीं अनुस्वारयुक्त वर्ण आल्यास तो कोठें घालावा याची अडचण उत्पन्न होते व त्यामुळें विकल्पही झाले आहेत. या सूचीमध्यें अशा शब्दांची म्हणजे प्रारंभीं सानुस्वार वर्ण असलेल्या शब्दांची स्वतंत्र बाराखडी केली आहे. उदा. पंडित, पांडुरंग, पिंगुळकर, पेंडसे इ. सानुस्वार वर्णांनीं आरंभ होणारे शब्द, औकारादि वर्ण असलेल्या शब्दांच्या नंतर घातले आहेत. हिंदू व्यक्तींच्या नावांत आडनांव असेल तर तें प्रथम देऊन नंतर व्यक्तिनाम दिलें आहे. अशीं नावें आडनाववार पाहिलीं पाहिजेत.